# आभार

सन १९३२ मध्यें श्री. ह. भ. प. बाबासाहेब देहूकर यांच्या घराण्यांत परंपरेनें पूजेंत असलेल्या वहीचें मला प्रथम दर्शन झालें. त्यावेळीं श्री तुकोबारायांच्या अभंगांच्या वहीचा मला त्यांनीं फोटो घेऊं दिला व पुढें अभंगांचे शोधार्थ ठिकठिकाणीं जाऊन संशोधनासहि मदत केली. संशोधनार्थ पंढरींत आम्ही जुन्या गाथ्यांचा शोध करीत होतों, तेव्हां ह भ. प. सख्या हरि शिंपी यांच्या घराण्यांत पूजेंत परंपरेनें आलेली एक वही मला त्यांनीं पहावयास दिली. त्या वहीची मीं त्यावेळीं नकल करून घेऊन त्यांची वही त्यांस परत केली. पुढें कांहीं वर्षांनीं म्हणजे सन १९४० च्या सुमारास श्री सद्गुरु दादामहाराज सातारकर मुंबईस राहूं लागून त्यांचे तोंडून श्री तुकोबारायांच्या अनेक अभंगाचें निरूपण ऐकण्याचा योग आला. तेव्हां मी नकल करून घेतलेल्या सख्या हरि शिंपी यांच्या वहींत मला ज्या ओळी आढळत त्या त्यांचे नजरेस आणून, त्यांचेकडून या वहींतलि अभंगाचें निरूपण ऐकावें अशा इच्छेनें ही वही पंढरपुराहून पुनः आणून ती श्री. दादामहाराज यांस दाखविली त्यांस रोज तुकोबांचें वचन नव्या उल्हासानें भोगण्यास हवेंच होतें. या वहींतील अभंगाचें त्यांनीं कांहीं दिवस निरूपण केल्यावर सख्या हरीस ती वही परत नेण्याची लहर आली त्यांनीं वही परत मागितली व मीं परत केली. पण रोज सकाळीं तुकोबारायांचा अभंग सांगण्याचा क्रम श्री. दादामहाराजांनीं सुरू केला होता, तो त्यांनीं कृपाळूपणानें तसा च चालू ठेविला. त्याशिवाय त्यांस करमेना. पुढें आजारानें प्रकृति फार बिघडली, तरी सकाळीं अभंग सांगण्यास ते ताजेतवाने होऊन आमची वाट पाहात बसत. तो सकाळचा औषधाचा डोस आहे असें म्हणत. ऐवढे ते अभंग सांगण्यास, तुकोबारायांच्या वचनासीं संग करण्यास, आपक्ष होते. त्या दीड पावणेदोन वर्षांत तुकोबारायांच्या ओळी असलेले, पंडित प्रतींतील बरेचसे अभंग झाल्यावर, करुणापर, संतपर, पढरीपर असे अभंग होऊन त्या सर्व निरूपणावर श्री ज्ञानेश्वर माउलीच्या विरहिण्या सांगण्यानें कळस चढवून श्री. दादामहाराज आळंदीस जाऊन कायमचे बसले. तेव्हां सकाळचा अभंग ऐकण्याची सवय स्वस्थ बसूं देईना. या दीड दोन वर्षांच्या श्रवणानें मनांत ज्या गोष्टींचा ठसा उमटला होता, त्या गोष्टी या भिजल्या वहींतलि अभंगांचा अर्थ स्पष्ट करूं लागल्या. अशा स्थितींत या भिजल्या वहीचीं अनेक पारायणें केलीं, तेव्हां त्यांत बऱ्याचशा ठिकाणीं ओळी आहेत असें वाटूं लागलें. १९४७ सालीं उन्हाळ्याच्या सुट्टींत श्रीक्षेत्र आळंदी येथें मी श्रीविष्णुमंदिरांत राहावयास गेलों. तुका म्हणे तेथें सुखा काय उणें। राहे समाधानें चित्ताचिया।– तसा मी चित्ताच्या समाधानानें श्री ज्ञानेश्वर माउलीच्या सान्निध्यांत राहात होतों तेथें सुखासहि कांहीं उणीव नव्हती – अशा

सुखासमाधानाच्या स्थितीत या भिजल्या वहींतील अभंगाचें रूपांतर "माउली" च्या सहवासांत झालें. अन्तर्गत दुवेहि स्पष्ट झाले. वही, रूपांतर, त्याबद्दलची थोडी चर्चा येवढें लिहून झाल्यावर ती हस्तलिखित प्रत माझेजवळ तशीच सप्रहास होती, १९४८–४९ मध्यें संताजीच्या वह्यांचें रूपांतर केलें भिजल्या वहींतील अभंग या महागाईच्या दिवसांत छापले जातील अशी कल्पना मला केव्हांच नव्हती

गेल्या ( १९४९ ) वर्षी याच सुमारास मुंबईस श्री. धनजय रामचंद्र गाडगीळ यांस भेटावयास गेलों असतांना आम्हां उभयतांचें दुसऱ्या कांहीं गोष्टींवरून बोलणें होता होता श्री तुकोबारायांच्या अभंगावर आलें – तेव्हां मी सहज भिजल्यावहीचें महत्त्व माझे मतें काय आहे हें त्यांस सांगितलें व छापखान्यास छापावयास देतां येईल अशी हस्तलिखित प्रत तयार आहे म्हणून म्हणतांच त्यांनीं ती पहावयास मागितली. – ते उतरले होते तेथून माझें घर पांच मिनिटांच्या रस्त्यावर आहे तेव्हां मी घरीं जाऊन हस्तलिखित आणून त्यांस पहावयास दिलें. त्यांचा मुक्काम त्यावेळीं १।२ दिवस मुंबईस होता. पुण्यास परत येतांना त्यांनीं म हें हस्तलिखित परत केलें. पुढें महिन्या दीड महिन्यानें मला श्री. धनजयराव गाडगीळ यांचें पत्र आलें कीं भिजल्या वहीचे अभग छापले जावेत म्हणून मीं कांहीं जणांना विचारलें. त्यांचीं अनुकूल उत्तरें आलीं नाहींत. तेव्हां वही आपण च छापावी असें ठरविलें आहे. याप्रमाणें आर्यभूषण छापखान्यात छापवून श्री. धनजयराव गाडगीळ भिजल्या वहीचे अभंग प्रसिद्ध करीत आहेत. ही वही महाराजांच्या निर्याणाच्या सोहळ्याचे वेळीं प्रसिद्ध करावी असा विचार होता. परतु पुण्यळ प्रकाशक पुष्कळशीं पुस्तकें तीनशें वर्षाच्या महोत्सवाच्या संधीचा फायदा घेऊन प्रसिद्ध करीत आहेत असें ऐकून आम्हीं प्रकाशनाचा बेत पुढें ढकलला, व तें काम आतां आषाढीच्या निमित्तानें होत आहे. अभंगांचा अर्थ, टिपा – निरूपणें श्री. दादामहाराजांच्या तोंडून ऐकलेल्या सतबोधाचें, प्रेमबोधाचें व त्यांच्या कृपेचें वैभव आहे. यथार्थ प्रसिद्धीकरण हें श्री गाडगीळ याच्या सौजन्याचें व लोभाचें फळ आहे.

आर्यभूषण छापखान्यानें पुस्तक तातडी करून वेळेवर छापून दिलें याबद्दल श्री. वि अ पटवर्धन यांचा आभारी आहे.

ह. भ. प सख्या हरि शिंपी यांचा मी वही वापरावयास, नकल करावयास दिली याबद्दल आभारी आहे

श्री ह. भ. प. बाबासाहेब देहूकर यानीं पुर्जेतील वही या ग्रंथात छापावयास व त्या बरोबर च वहींतील एका पृष्ठाचा ब्लॉक करून छापावयास परवानगी दिली याबद्दल मी त्याचा अत्यत ऋणी आहे मूळ वहींतील अभंग ✻ ✻ अशा खुणानीं या ग्रथात छापले आहेत व ब्लॉक मध्यें आलेले अभग ३६०–६४ आहेत.

पुणें
२१।७।१९५० } वा. ग. परांजपे

# प्रस्तावना



श्रीतुकोबारायांच्या गाथ्याच्या छापील, मुख्य मुख्य, प्रतींची यादी पुढीलप्रमाणें आहे:—

| अनुक्रम | प्रसिद्धीवर्ष | छापखाना | प्रकाशक | अभंग |
|---|---|---|---|---|
| १ | १८६२—६८ | शिळा प्रेस | माधव चंद्रोबा | ३२२८ |
| २ | १८६७ | गणपत कृष्णाजी | गणपत कृष्णाजी | ४५०० |
| ३ | १८६९ | इंदुप्रकाश | पंडित | ४६२१ |
| ४ | १८८६ | निर्णयसागर | रा. वि. माडगांवकर | ४६४५ |
| ५ | १८८९ | सुबोध प्रकाश | तुकाराम तात्या | ८४४१ |
| ६ | १८८९ | ” | ” | ४६२१ |
| ७ | १९०१ | इंदिरा प्रेस | जोग व गुळवे | ४५७५ |
| ८ | १९०३ | निर्णयसागर | काशीबाई हेर्लेकर | ४४७६ |
| ९ | १९०९ | जगद्धितेच्छु | विष्णुबोवा जोग | ४१४१ |
| १० | १९१२ | निर्णयसागर | पणसीकर | ४५०५ |
| ११ | १९१३ | आर्यभूषण | देवडीकर | ४०९२ |
| १२ | १९१३ | जगद्धितेच्छु | गोडबोले | ४४९९ |
| १३ | १८४७ शके | चित्रशाळा | देशमुख व दांडेकर | |
| १४ | —— | —— | आजगांवकर | |
| १५ | १९३३ सन | चित्रशाळा | तुकारामबोवा वडापुरकर | ४५९० |
| १६ | १८४१ शके | आर्यभूषण | वि. ल. भावे | १३२३ |

वरील सर्व प्रतींपैकीं ( १६ वी प्रत वगळून ) नीट छापलेली व व्यवस्थित रीतीनें पाठांतरें दिलेली प्रत अनुक्रमांक ३ हीं होय. प्रकाशकांनीं आपण हीं प्रत कोणत्या प्रतीवरून छापीत आहोंत, पाठांतरें कोणत्या प्रतीवरून दिलीं हीं माहिती ग्रंथास Critical Preface जोडून इंग्रजींत दिली आहे. त्यावरून हीं प्रत त्र्यंबक कासार याच्या वही बरहुकूम छापली आहे, असें वाटतें. हीं वही प्रकाशकांस तळेगांव येथें मिळाली, व त्यांस पाठांतरें देण्यास, (१) देहूची हस्तलिखित प्रत (२) कडूस येथील मवाळांची हस्तलिखित प्रत, व (३) पंढर-

परची गगुस्काची प्रत मिळाली होती अनुक्रमाक ३ ही इटुनकाग क्विा पडित याची प्रत म्हणून प्रसिद्ध आहे ही प्रत त्यावेळचे Oriental Translator शकर पाडुरग पडित याचे सहाय्यानें विष्णु परशुराम शास्त्री पटित यानीं शुद्ध करून छापण्याकरिता तयार केली असें मुखपृष्ठावर म्हटलें आहे ही प्रत त्र्यबक कासार याच्या वहीवरून छापली आहे त्र्यबक कासारान आपल्या वहीच्या ६८ व्या पृष्ठावर ही वही ४० वर्षे अभग गोळा करून शके १७०९ मध्यें सपविली असें म्हटलें आहे

या सर्व प्रतींत अनुक्रमाक १।२।७।५ या प्रती फार उपयुक्त आहेत अनुक्रमाक १ च्या प्रतींत अभग सख्या ३०२८ आहे देहूस थोड्या वर्षांपूर्वी मा एक ३।३॥ हजार अभगाची हस्तलिखित प्रत पाहिली होती तिची च नक्कल अनुक्रमाक १ असावी असें वाटतें आज ती हस्तलिखित प्रत उपलब्ध नाहीं अनुक्रमाक २ व १२ या प्रती पढरपुरास भागवत बोवा बेलापुरकर याची प्रत आहे, त्याच्या नक्ला असाव्यात यद्रा ती प्रत केमकर यानीं प्रसिद्ध केली आहे अनुक्रमाक ४।६ ही अनुक्रमाक ३ ची नक्कल आहे अनुक्रमाक ५ चीं काहीं पानें देहूस थोड्या वर्षांपर्वी पाहिलीं होतीं पण अनुक्रमाक १ च्या प्रतीप्रमाणें च सध्या तीं पृष्ठें हि उपलब्ध नाहींत. अनुक्रमाक ११ ही प्रत गगुकाकाच्या प्रतीवरून देवडीकरानीं छापली आहे तुकोबारायाचे टाळकरी सताजी तेरी जगनाडे याच्या दोन वह्यावरून क वि ल भावे यानीं आर्यभूषण मध्यें छापलेल्या प्रतीचें विवेचन पुढें स्वतत्र येणार आहे, तेव्हा पुढील विवेचन ह सताजीची प्रत वगळून आहे, म्हणून समजावें

माधव चद्रोबा, गणपत कृष्णाजी व तुकाराम तात्या, यानीं आपल्या प्रती कोणत्या पोथीवरून छापल्या आहेत, याचा कोठें च उल्लेख केलेला नाहीं पुढें ज्या प्रती निघाल्या त्यानीं हि आपण कोणती प्रत वापरली तें प्रसिद्ध केलें नाहीं मला वाटतें, छापण्याची कला ही माथा छापण्याच्या कामीं वापरण्यास त्या वेळचे मठाधिपति विरुद्ध असावेत म्हणन हे उल्लेख केलले नसावेत अनुक्रमाक ९ ही जगद्धितेच्छनें छापलेली प्रत आळदीस हबत बोवाची जी प्रत आहे, त्या प्रती वरून छापली आहे असें वाटतें जवळ जवळ अशी च प्रत १९१२ मध्यें गोटबोले यानी जगद्धितेच्छु छाप खान्यात छापली व प्रसिद्ध केली ही प्रत माळेची प्रत किवा ओळीचा

गाथा म्हणून समजला जातो. या प्रतींत शब्द तोडलेले नाहींत. या प्रतीचें पुनर्मुद्रण सन १९२६ सालीं झालें. व त्या प्रतीच्या मुखपृष्ठावर ह. भ. प. देहूकर महाराज, भागवत बोवा वेलापूरकर व वासकर यांच्या फडांतील वारकरी सांप्रदायिक ओळींचा गाथा–असें या प्रतीचें वर्णन केलें आहे. या च प्रतीची आणखी एक नवी आवृत्ति यंदा केमकर आणि मंडळी यांनीं प्रसिद्ध केली आहे. सन १९०१ मध्यें जोग व गुळवे यांनीं इंदिरा छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलेल्या गाथ्यांत पाहिल्या प्रथम अभंगांत वर्गवारी (रूपाचें–नामपर–संतपर–करुणापर अशी वर्गवारी करून) केली; व या नव्या प्रथेची टूम प्रत्येकास आपण करावी असें वाटूं लागलें. ही गोष्ट निर्णयसागर प्रतीच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत स्पष्टपणें नमूद केला आहे. प्रकाशक म्हणतात कीं:—

"आमची तुकारामाच्या गाथेची पहिली आवृत्ति ईशकृपेनें लवकर च संपल्यामुळें हल्लीं पुनः दुसरी आवृत्ति छापली आहे. पहिली आवृत्ति बाहेर पडतां च रा. रा. त्र्यंबक हरि आवटे, इंदिरा प्रेसचे मालक, पुणें यांनीं आपल्या पुस्तकांत ठेविलेल्या क्रमाप्रमाणें च या हि पुस्तकाचा क्रम असावा. अशा अनेकांकडून सूचना आल्या व विशेषें करून स्फुट अभंग या सदरा खालील अनेक अभंग फोडून ते निरनिराळीं प्रकरणें करून त्यांत घालावे अशी श्री.तुकारामाच्या अभंगांचें निरंतर परिशीलन करणारे रा. रा. दादा बाळाजी पाटील मु. जोपुळ व कै. रा. रा. बळवंत खंडुजी पारख वगैरे मंडळींनीं फार अगत्याची सूचना केली व थोडी माहिती हि दिली त्यावरून आम्ही या आवृत्तींत अनेक प्रकरणें करून त्या त्या प्रकरणांत ते ते अभंग घालून हें पुस्तक छापलें आहे."

तेव्हां अनुक्रमांक १–५ या गाथ्यांतून कोणती तरी जुनी हस्तलिखित प्रत मिळवून गाथा छापावयाची रीत प्रथम इंदिरा प्रेसनें मोडली व त्या नव्या रीतीचा स्वीकार करून पुढील बऱ्या च प्रकाशकांनीं इंदिरा प्रेसचा कित्ता गिरविला आहे. इंदिरा प्रेसनें ही प्रथा कां सुरू केली याचें नीटसें उत्तर त्या प्रतीच्या प्रस्तावनेंत सांपडत नाहीं. त्यांस उत्तर नीटसें देतां आलें असतें असें हि वाटत नाहीं. कारण पूर्वीच्या माहीत असलेल्या प्रती अगोदर च प्रसिद्ध झाल्या होत्या व त्या सर्व प्रती Copy Right Act प्रमाणें नोंदविलेल्या होत्या, शिवाय इतर ज्या हस्तलिखित प्रता उपलब्ध असतील त्या

तेवढ्याशा प्रसिद्ध घराण्यांतील नसाव्यात. शिवाय जो कोणी मठाधिपति आपली प्रत वापरूं देण्यास तयार झाला असता त्यानें त्या प्रतीवर आपला व आपल्या मठाचे स्वामित्वाचा असा साहाजिक च हक्क सांगितला असावा. त्या बरोबर थोडी दक्षणा हि मागितली असावी. अशा सर्व अडचणी (कायद्याच्या व इतर) चुकविण्याची शकल (अभंगांची वर्गवारी करावी ही) कोणा कायदा जाणणाऱ्या माणसानें सुचविलेली असावी. तेव्हां जोग व गुळवे यांनीं माधव चंद्रोबा, गणपत कृष्णाजी, पंडित या तीन प्रतींची वर्गवारी करून नवी प्रत छापली. अशी प्रत आजवर प्रसिद्ध झाली नव्हती, शिवाय त्यावेळीं पहिल्या तीन्ही प्रती बाजारांत मिळत नाहीशा झाल्या होत्या. अशा दोन्ही कारणांनीं या प्रतीचा बोलबाला झाला असावा. याचें प्रत्यंतर निर्णयसागर छापखान्याच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत (वर उद्धृत केलेल्या) पाहावयास सांपडतें. माडगांवकर यांनीं पहिल्यानें निर्णयसागर छापखान्यांत जी प्रत छापली ती पंडितांच्या प्रतीची नक्कल होती, पण त्यांनीं हि पुढें एक प्रत छापली ती इंदिरा प्रेसच्या प्रतीची नक्कल करून च छापली. तेव्हां जोग, गुळवे व इंदिरा प्रेसचे मालक यांनीं जी नवी टूम काढली, ती त्या वेळच्या मंडळींस पटली असावी. कारण तशा वर्गवारीचा एक उपयोग असा आहे कीं, कीर्तनकारास कोणत्या हि एका विवक्षित विषयावरील एका तऱ्हेचीं वचनें फार श्रम न करतां चटकन् सांपडतात. पण या नव्या प्रथेनें एक नुकसान झालें व तें हें कीं माधव चंद्रोबा, गणपत कृष्णाजी व पंडित यांच्या प्रतींत चुकत माकत ज्या तुकोबारायांच्या ओळी (ओळ म्हणजे ज्या क्रमानें तुकोबास अभंग स्फुरून ते लिहिले गेले ती ओळ, ती माळ, तो क्रम,) शिल्लक राहिल्या होत्या त्या नष्ट झाल्या; व मौज अशी कीं त्याची क्षिती कोणास हि वाटली नाहीं, इतकेंच नव्हे तर वर उद्धृत केलेल्या निर्णयसागराच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें "श्रीतुकारामाच्या अभंगांचें निरंतर परिशीलन करणारें" वारकरी च ही नवी टूम स्वीकारा म्हणून अधिकारयुक्त वाणीनें सांगण्यास पुढें यावेत याहून दुसरी खेदाची व नवलाईची गोष्ट कोणती असणार! छापील गाथ्यांच्या बहुतेक सर्व प्रतींच्या प्रस्तावना वाचून मला असें वाटूं लागलें आहे की, या प्रकाशकांनी च काय पण वर उल्लेखिलेल्या व त्या सारख्या इतर हरिभक्तपरायण वारकरी मंडळींनीं, तुकोबारायांचे अभंग मुळांत कसे प्रगट झाले असावेत, ते लेखनिविष्ट केव्हां व कोणीं केले असावेत, त्या अभंगांत विषयवारीनें किंवा कीर्तनाच्या अनुसंधानानें क्रम काय असावा,

तसें च एका वेळीं एका कीर्तनांत वा भजनांत कांहीं वृत्तींच्या आविष्करणास, एकाद्या रसाच्या परिपोषास, अनुसरून कांहीं क्रम असावा का, या गोष्टीचा कोठें हि केव्हां हि विचार केलेला दिसत नाहीं. या सर्व मंडळींनीं जुन्या प्रती डावलून जी नवी प्रथा पाडली ती गोष्ट परिस टाकून कांच पदरांत घ्यावी तशी झाली. नुसते सुटे सुटे अभंग छापून मोकळें होण्याची ही नवी प्रथा ह. भ. प. विष्णुबोवा जोग यांनीं स्वतः ( १९०१ मध्यें ) पाडली व अभंगांचा शब्दशः अर्थ देऊन गाथा छापण्याचें काम त्यांनीं ( सन १९०९ मध्यें ) पत्करलें तेव्हां आपण च मुळांत अभंग स्फुट आहेत, म्हणून तक्रार करण्यास सुरवात केली. पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत कै. विष्णुबोवा जोग म्हणतात कीं:—

"ज्ञानेश्वरी, अमृतानुभव या ग्रंथांची भाषा जरी निराळी भासते तरी अर्थ समजूत तुकाराम महाराजांच्या गाथ्यापेक्षां लवकर पटते, कारण त्यांत एक वेळ विषयसरणी किंवा कोणत्या विषयावर तें लिहिलें आहे, हें कळलें म्हणजे अर्थज्ञान होण्यास साधारण मनुष्यास सुद्धां सोपें पडतें. परंतु तुकाराम महाराजांच्या गाथ्यासंबंधानें तसें नाहीं; ( १ ) त्यांच्यांत मुळींच अभग स्फुट आहेत; ( २ ) अभंगांत जरी विषयवारी लाविली तरी ती संगतवार जुळत नाहीं. ( ३ ) एका अभंगाचा अर्थ पुढच्याच्या अर्थास जुळत नाहीं, म्हणून अर्थ समजण्यास पुष्कळ कठीण पडतें. ( ४ ) कांहीं कांहीं रूपकें फारच कठीण आहत. ( ५ ) अभंग होत असतांना जशी तुकाराममहाराजांची वृत्ती असेल तसे अभंग होत असत. त्यांच्या वाणींत अभंग प्रगट होत असतांना त्यांची वृत्ती कशी असावी, हें ज्यास ताडतां येईल त्यासच त्यांच्या अभंगांचें खरें रहस्य कळेल."

विष्णुबोवा जोग यांनीं त्यांस ज्या अडचणी जाणवल्या त्यांची नोंद प्रांजलपणानें केली आहे. याबद्दल त्यांस धन्यवाद दिले पाहिजेत. कारण आपणास अमुक एक गोष्ट नीट समजली नाहीं, उमजली नाहीं, असें कबूल करण्यास अहंकार गिळावा लागतो, तेवढा प्रांजलपणा विष्णुबोवांनीं दाखविला आहे. परंतु या नडी आपण ( १९०१ मध्यें ) स्वतः उत्पन्न केल्या हें त्यांच्या गांवीं होतेंसें कोठें हि दिसत नाहीं. त्यांस आढळलेल्या नडींतून बाहेर पडण्याचा प्रयत्न त्यांनीं केल्यासारखा दिसत नाहीं. तुकोबारायांचें एक वचन असें आहे कीं:—

भुकेचे सन्नीध वसे स्तनपान उपायांची भिन्न चिंता नाहीं तसें या वचनावर टेकून विष्णुबोवांनी आपल्या शंका–अडचणी फेडून घेण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. विष्णुबोवा जोगांनीं आपली सार्थगाथ्याची प्रत बहुतांशीं पंडितांच्या प्रतीची नक्कल केलेली आहे. त्यांनीं आपल्या प्रतींत फरक करून दाखविला आहे व तो हा कीं जेथें जेथें एखादें स्वतंत्र प्रकरण पंडित प्रतींत आलें तें जोगांनीं उचलून शेवटीं अगर निरनिराळी वर्गवारी केलेसें दाखवून दुसऱ्या ठिकाणीं छापलें आहे. या दृष्टीनें जो कोणी दोन्ही प्रतींची तुलना करून पाहील त्याच्या ही गोष्ट सहज लक्ष्यांत येईल विष्णुबोवांनीं आपली प्रत (नक्कल) लिहून तयार करण्याचें काम दुसऱ्या कोणाकडून करवून घेतलें असावें, कारण पंडितांच्या प्रतीवरून स्वतः नक्कल करतांना त्यांच्या एक गोष्ट लक्ष्यांत आली असती कीं पंडितांच्या प्रतींत कांहीं अभंगांच्या शेवटीं आंकडे घातलेले आहेत. त्या आंकड्यांचा अर्थ काय असा त्यांनीं आपणा स्वतःस प्रश्न विचारला असता तर त्या प्रश्नाचें उत्तर हि त्यांस सहज सुचलें असतें कीं:– हे जे मधून मधून पंडितांच्या प्रतींत आकडे आले आहेत ते अभंगांचे लहानमोठे गट्ट असून त्या अभंगांत अन्तर्गत दुवा आहे. विष्णुबोवांनीं म्हटल्याप्रमाणें त्या गटांत परस्पर विरोधी वचनें येत नाहींत, इतकें च नव्हे तर तो अभंगांचा गट्ट कोणत्या मनस्थितींत स्फुरला आहे, याचा हि निर्देश तुकोबारायांनीं कोठेंना कोठें केलेला आहे.

तुका म्हणे येथें करावा उकल। लागेची ना बोल वाढउनी। (पंडित प्रत २७०५) स्वतः तुकोबारायांची वरील चरणांत म्हटल्याप्रमाणें इच्छा असतांना विष्णुबोवा सारख्या अधिकारी पुरुषांस अर्थज्ञान होण्यास नडी व अडचणी कां जाणवाव्यात? त्यांत त्यांची चूक नव्हती. तुकोबारायांच्या अभंगांची महाराष्ट्राकडून हयगय फार झाली. तुकोबारायांच्या अभंगांच्या व्यवस्थित केलेल्या नकला आज हि उपलब्ध नाहींत, इतकेंच नव्हे तर मुळांत तुकोबारायांचे अभंग कसे असावेत, किती असावेत याची हि कोणी क्षिती बाळगली नाहीं. सत्य ज्ञानाची महाराष्ट्रास चाड आहे कोठें! समारंभ पार पाडावेत, दिवस साजरा करावा, आली वेळ निभावून न्यावी, चार वचनें गोळा करून कीर्तन, व्याख्यान व प्रवचन वक्तृत्वाचा पाऊस पाडून शेवटास न्यावें व लोकांकडून वाहवा म्हणवून घ्यावी या पलीकडे कितीसे सुशिक्षित लोक खोल पाण्यांत शिरण्याचा प्रयत्न करीत असतांना आढळतात! भोळ्या वारकऱ्यांबद्दल

बोलावयास च नको. आपला परंपरागत नित्यक्रम पार पडला म्हणजे त्यांना आजचा दिवस पदरांत पडला, असा त्यांचा विश्वास ! तेव्हां त्यांच्याबद्दल ज्यास्त कांहीं एक न लिहितां सुशिक्षित पदवीधर वर्गानें आपलें कर्तव्य कां ओळखलें नाहीं याचा आपण विचार केला पाहिजे. असा विचार करूं लागावें तर असें आढळून येतें कीं आपला पूर्वकालीन पदवीधर वर्ग संस्कृत व इंग्रजी या भाषांच्या दास्यत्वांत होता. त्यांना असें केव्हां च वाटल्या सारखें आढळत नाहीं कीं ज्ञानेश्वरी व तुकोबारायांचा गाथा हे दोन ग्रंथ जगाच्या उत्कृष्ट वाङ्मयांत गणले जातील च. व आपलें भाग्य थोर, असें कीं, हे ग्रंथराज आपल्या मराठी भाषेंत आहेत. त्यांची गोडी, त्यांचा रस, हा केव्हां हि भाषांतरांत चाखतां येणार नाही. इतके ते ग्रंथ मराठी, अव्वल, अस्सल, आहेत. हे दोन्ही ग्रंथ वाचण्यास—शिकून—आपलेसे करण्यास आपण व्यर्थ आटाआट करावयास नको. आपली जन्मभाषा मराठी आहे. पण कोणा, किती, पदवीधरांस आंग्लाईत मराठी भाषेबद्दल एवढा अभिमान वाटला आहे ! नाहीं म्हणावयास आपल्या महाराष्ट्रांतील तिन्ही महापुरुष या दोन्ही ग्रंथांची योग्यता ओळखून होते व ते म्हणजे (१) महादेव गोविंद रानडे. (२) डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर व (३) बाळ गंगाधर टिळक. रानड्यांनीं या ग्रंथांच्या आधारें भागवतधर्मावर व्याख्यानें दिलीं, तीं ग्रंथ—रूपानें प्रसिद्ध आहेत. भांडारकरांनीं प्रवचनें व कीर्तनें केलीं, व टिळकांनीं प्रत्येक अध्यात्मिक गोष्टीचा अनुभव सांगतांना गीतारहस्यांत ज्ञानोबांचें किंवा तुकोबांचें वचन उद्धृत करून अत्यंत आदरानें वापरलें.** असो.

सुशिक्षित पदवीधरांनीं तुकोबारायांच्या अभंगांची संस्कृत व इंग्रजी या दोन भाषांच्या सासुरवासानें कशी उपेक्षा केली हा भाग वर आला आहे. त्यांचें विस्तरशः जास्त वर्णन नको. पदवीधरांमध्यें जो परस्पर पत्रव्यवहार होतो तो पुष्कळ अंशीं इंग्रजींतून च होतो, हें एक प्रमाण बौद्धिक दास्यत्व सिद्ध करण्यास पुरेसें आहे. असो, जे थोडेफार सुशिक्षित व पदवीधर या दास्यत्वांत न सांपडतां मोकळे राहिले व संतवाङ्मयाकडे वळले अशांतील प्रमुख नांव श्री. लक्ष्मणराव पांगारकर यांचें आहे. यांनीं बहुतेक सर्व संत

** गीतारहस्यांतील भक्तिमार्ग हें प्रकरण बहुशीं तुकोबारायांच्या अभंगांवर आधारलेलें आहे.

वाङ्मयावर कांहींना कांहीं लिहिलें नाही असें झालें नाहीं. या परिस्थितीमुळें रात्र थोडी व सोंगें फार अशी पांगारकरांची स्थिति झाली. त्यांनीं कोणत्या हि प्रश्नाचा सखोल विचार केला नाहीं. प्रत्येक गोष्ट ही महिपती-बोवांच्या हरिद्वासी कोष्टयांप्रमाणें झाली आहे, हें सिद्ध करण्याची त्यांची केवढी आटाआटी! विष्णुबोवांच्या सार्थ अभंगांच्या गाथ्यास पांगारकर यांनीं लिहिलेलें तुकोबांचें चरित्र जोडलें आहे. तेव्हां पांगारकर यांना विष्णुबोवांनीं उत्पन्न केलेल्या प्रश्नांस उत्तर देणें, निदान ते प्रश्न लक्षांत घेणें, भाग होतें. पांगारकर यांनीं या प्रश्नांचा कसा निकाल लाविला तो आतां पाहूं.

"कोणत्या प्रसंगीं, कोणत्या अवस्थेंत, त्यांच्या मुखांतून, कोण कोणते अभंग बाहेर आले, ते संगतवार पद्धतीनें देणारा गाथा जर छापतां आला असता तर किती बहार झाली असती बरें!! पण येवढें भाग्य आम्हां मर्त्यांचें नाहीं. त्यामुळें परंपरागत आलेल्या साडे चार हजार अभंगांवरच भिस्त टेवून आम्हीं राहिलें पाहिजे." पांगारकरांच्या या निरूपणानें कोणाचें समाधान होणार असेल तें होवो, पण माझें कांहीं त्यानें समाधान झालें नाहीं. पांगारकर स्वतः तुकाराम चरित्र लिहावयास बसले, तेव्हां विष्णुबोवा जोगांनीं उपस्थित केलेले प्रश्न सोडविण्याचा कसा बसा प्रयत्न करणें त्यांना प्राप्त होतें, व तसा त्यांनीं प्रयत्न केला आहे. पांगारकर यांनीं तुकोबांच्या चरित्राचा मुख्य आधार म्हणजे अभंग होत असें म्हणून तुकाराम चरित्राच्या प्रस्तावनेंत पुढें गाथ्यांची चर्चा केली आहे ती अशीः—

"इंदुप्रकाश गाथा, दोन सांप्रदायिक गाथे, संताजीचा गाथा, बहिणाबाईचा गाथा, हे पांच गाथे मुख्य आहेत. थोडे फार पाठभेद आहेत. शुद्धाशुद्धतेंत फरक आहेत. पण तात्पर्यार्थाच्या बाजूनें पाहतां गाथ्या–गाथ्यांत डोंगराएवढे फरक आहेत, असें नाहीं. सांप्रदायाचे सिद्धांत माहीत असले, तुकोबांच्या विचारांचा व भावनांचा अंतरंग परिचय असला, निदान विचारांचा एकसूत्रीपणा पटलेला असला, म्हणजे कोणताहि गाथा वापरला तरी परमार्थाची विशेष हानि होण्याचा संभव आहे, असें मला वाटत नाहीं. अभंगाचे शुद्ध पाठ मिळण्यास एक तुकोबांच्या हातचा, निदान त्यांना सर्वतोपरी मान्य असलेला गाथा तरी मिळाला पाहिजे. किंवा हे चारपांच गाथे बारकाईनें अभंगशः तपासून व आणखी शोध करून, एक सर्वजन मान्य होईल असा एक नवीन गाथा परंपरेच्या व संशोधनाच्या अशा दुहेरी दृष्टीनें तयार

झाला पाहिजे. मीं हे सर्व गाथे पाहिले आहेत. विशेष महत्त्वाचे व मर्माचे अभंग प्रत्येक गाथ्यांत ताडून पाहिले आहेत व अशा दृष्टीनें सांप्रदाय-परंपरा यांच्या दृष्टीनें, वारकऱ्यांत प्रेमानें मिसळून वागल्यानें व आळंदी, देहू, पंढरी येथील परंपरेप्रमाणें कथा, कीर्तनें व पुराणें ऐकल्यानें व केल्यानें सांप्रदाय-शुद्ध विचारसरणी कळून येऊन तदनुरोधानें अभंगांचा अभ्यास व मनन माझें ( पांगारकर ) झालें आहे. ”

वरील विवेचनांत विष्णुबोवा जोग यांच्या प्रश्नास उत्तर आहे असें मला वाटत नाहीं. अभंग हा च जर चरित्राचा मुख्य आधार तर मग सांप्रदायिक व संशोधक दृष्टीनें गाथा तयार करून त्या गाथ्यास धरून त्यांनीं चरित्र लिहिलें नाहीं. तसें करण्यास पांगारकर असमर्थ होते असें हि नाहीं. ते स्वतःस सांप्रदायिक म्हणवीत होते, व होईल तें संशोधन हि करीत होते. त्यांनीं मर्माचे अभंग ताडून पाहिले म्हणून म्हटलें आहे. परंतु संताजीचा गाथा त्यांनीं इतर गाथ्यांशीं ताडून पाहिला असतां, तर त्यांस कांहीं नवे विचार सुचले असते. पण गाथ्या-गाथ्यांत डोंगराएवढे फरक आहेत असें नाहीं, या पूर्वग्रहानें कामास लागल्यावर त्यांस फरक कसा आढळणार? असो, हें विवेचन वाढवून विष्णुबोवांच्या प्रश्नास उत्तरें सांपडणार नाहींत. पुढें मी जें विवेचन करीत आहें तें गाथ्या-गाथ्यांत डोंगराएवढे फरक आहेत हें दाखविण्यासाठीं आहे. व या विवेचनांत विष्णुबोवांच्या प्रश्नांस मला सुचलेलीं उत्तरें येणार आहेत.

येथ वर ज्या लोकांनीं तुकोबांच्या गाथ्याचा विचार केला अशा दोन्ही लेखकांचें अभंगांबद्दलचें म्हणणें वर दिलें आहे. त्याचा निष्कर्ष एवढा च कीं त्यांनीं या विषयाचा जेवढा खोल विचार करावयास हवा होता, तेवढा केलेला दिसत नाहीं. असो, तो विचार आपण या प्रस्तावनेंत करण्याचा प्रयत्न करूं.

तुकोबारायांस कवित्वस्फूर्ति होऊन ते कवित्वें करूं लागले तेव्हां त्यांस बाळबोध लिहिण्याची संवय नव्हती. ती संवय व्हावी म्हणून त्यांनीं एक वही तयार करून बालक्रीडा लिहावयास सुरवात केली, असें विधान महिपतीबोवांनीं आपले संतलीलामृतांत केलें आहे. मी तें विधान बरोबर आहे असें मानीत नाहीं. कवित्वस्फूर्ति होण्यापूर्वी तुकोबांनीं कांहीं पाठ केलीं संतांचीं वचनें, म्हणून स्वतः म्हटलें आहे. तीं वचनें त्यांनीं मोडींत लिहून घेतलीं होतीं कां ? मी महिपतीबोवांचें वचन एवढ्या च पुरतें उद्धृत

केलें आहे कीं कवित्वस्फूर्ति होऊन तुकोबांस जेव्हां अभंग स्फुरत तेव्हां ते अभंग तुकोबा स्वतः लिहून ठेवीत होते. अशाबद्दल वह्या बुडविल्यानंतर तुकोबांनी जेव्हां पांडुरंगावर वह्या तारण्याचा भार घालून, अन्नपाणी वर्ज करून, धरणें धरून, दिव्य केलें तेव्हां एका अभंगांत म्हटलें को–हातीं न धरीं लेखणी, (पं. २२२८) तेव्हां तुकोबा स्वहस्तें अभंग लिहीत होते ही गोष्ट त्यांच्या अभंगानें सिद्ध होत आहे. याशिवाय तुकोबांचे "बुडाविल्या वह्या बैसलों धरणें (पं. १३३३ चरण १६) हें हि वचन अभंगांतील आहे. तेव्हां या दोन चरणांवरून येवढें अनुमान करतां येतें की तुकोबा स्वहस्तें अभंग लिहीत होते व अशा अभंग लिहिलेल्या वह्या एकाहून कांहीं तरी ज्यास्त बुडविल्या गेल्या होत्या. अशापैकीं तुकोबारायांच्या नंतर उपजलेले नारायणबोवा गोसावी यांच्या घराण्यांत एक वही तुकोबारायांच्या हातची म्हणून पूजेंत आहे. या वहींतील बरीचशीं पृष्ठें दक्षणा देऊन नात्या–गोत्याच्या किंवा इतर पैसेवाल्या लोकांनीं काढून प्रसाद म्हणून नेलेलीं आहेत. त्यांपैकीं जेवढीं पृष्ठें आज उपलब्ध आहेत, त्यांत असलेले सर्व अभंग त्या च क्रमानें यापुढें छापले आहेत. त्यावर * * अशी खूण केली आहे. वहींतून प्रसाद म्हणून बाहेर गेलेलीं दोन पृष्ठें मला मिळालीं आहेत, त्यावरील अभंग हि पुढें १०८–११८ व २५४–५७ असे छापले आहेत. तुकोबांनीं ही वही स्वहस्तें लिहिलेली, बुडविली होती. अशी पूर्वींपासून वारकरी सांप्रदायांत ही परंपरागत हकीगत माहित होती. यामुळें ज्यांना या वहीवरून नकल करून घेतां येत असेल असे कांहीं विशेष भाविक लोक या वहींवरून नकला करून नेत असावेत. मला अशी एक नकल सख्या हरि शिंपी या पंढरीच्या आस्थेवाईक वारकरी गृहस्थांकडे आढळली. ती त्यांनी मला कांहीं दिवस कृपाळु होऊन वापरावयास दिली. त्यावेळीं मी त्या वहींची नक्कल करून घेतली. या वहींतील पहिल्या पृष्ठावर "भिजल्या वहींतील अभंग" म्हटलें आहे व पृष्ठाचे पाठीवर च अभंग लिहिण्यास सुरवात केली आहे. या दोन्हीं वह्यांचें वर्णन पुढें देणार आहे. पण येथें अभंगांबद्दल जें विवेचन करीत आहे तें पुरें करून घेऊं. तेव्हां तुकोबांनीं ज्या वह्या बुडविल्या त्या खात्रीनें च अस्सल वह्या समजण्यास प्रत्यवाय नाहीं. या वह्या एकाहून कांहीं तरी ज्यास्त होत्या याबद्दल हि संशय नाहीं. तेव्हां त्या सर्व वह्या अस्सल आहेत. यानंतर या वह्यांवरून केलेल्या नकला, नकला बरोबर केल्या गेल्या असल्या तर, अस्सल, पण दुय्यम प्रतीच्या, म्हणून समजण्यास हरकत नाहीं. वह्या तर-

त्यावर गांवोगांवचे लोक येऊन नकला करून घेऊन गेले असें महिपतीबोवांनीं म्हटलें आहे. अशा पैकीं एक नकल येथें छापली जात आहे.

सख्या हरींच्या ज्या पूर्वजानें ही नक्कल स्वत: किंवा लेखकाकडून करवून घेतली, त्यानें ही नक्कल तेवढ्या काळजीपूर्वक केली आहे असें मला म्हणवत नाहीं. आज देहूकरांच्या घराण्यांत पूजेंत असलेल्या वहींत जे अभंग आहेत ते हि सख्या हरींच्या पूर्वजानें किंवा त्याच्या लेखकानें सर्वच्या सर्व लिहून घेतले नाहींत परंतु त्या लेखकानें एक गोष्ट नक्कल करतांना संभाळली आहे. ती ही कीं लेखकानें अभंगांत शब्द बदलल्याचें उदाहरण कोठें हि आढळलें नाहीं. तेव्हां सख्या हरि शिंपी याच्या पूर्वजांनीं स्वत: केलेली किंवा करविलेली नक्कल ही अस्सल वह्यांच्या खालच्या पायरीवर आहे.

या वही शिवाय संताजी तेली जगनाडे हे तुकोबारायांचे टाळकरी होते. त्यांनीं स्वहस्तें लिहिलेल्या दोन त्रुटित वह्या छापवून प्रसिद्ध करून कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं मराठी सारस्वतावर फार थोर उपकार केले. पांगारकर यांना संताजीच्या वह्यांचा सुगावा लागला व ती अद्भुत गोष्ट त्यांनीं सन १९०३ मध्यें केसरींत प्रसिद्ध केली. त्यानंतर विश्वनाथ काशिनाथ राजवडे यांनीं जगनाडा म्हणून एक लेख ग्रंथमालेंत लिहिला. त्यानंतर राजवाडे यांच्या सांगण्यावरून महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांनीं कांहीं अभंग भारत–इतिहास–संशोधक–मंडळाच्या इतिवृत्तांत छापले पण तुकोबारायांचे संताजीच्या वह्यांत आढळले ते सर्व अभंग गोळा करून अस्सल बरहुकूम नकल करून घेऊन भावे यांनीं छापले. या संताजींच्या दोन्ही वह्या त्रुटित आहेत त्यांचीं सुरवातीचीं व शेवटचीं पृष्ठें हि प्रसाद म्हणून गेलेलीं आहेत. संताजीबोवा हे तुकोबांचे एक टाळकरी होते. ही गोष्ट स्पष्ट आहे. तेव्हां त्यांस तुकोबांच्या वह्यांच्या नकला करून घेणें शक्य होतें. तशा नकला त्यांनीं स्वत: करून घेतल्या आहेत. देहूकर घराण्यांत जी वही आज विद्यमान आहे, त्या वहीशीं जर संताजींची वही लावून पाहिली तर जे थोडे अभंग दोन्ही वह्यांत समान आहेत. त्यांत किरकोळ लेखनाच्या चुका पलीकडे दोन्ही वह्यांत फारसा फरक आढळत नाहीं. पण फरक नाहीं, असें नाहीं पुढें छापलेल्या अभंगांत * * असे नक्षत्रांकित अभंग हे देहूकरांच्या घरीं जेवढी वही आज विद्यमान आहे, त्या वहींतील आहेत. तेव्हां ज्या वेळीं कोणत्या एखाद्या वहींत या नक्षत्रांकित अभंगांच्या क्रमाशीं जुळत असलेला

अभंगांचा क्रम आढळेल तेव्हां सकृद्दर्शनीं ते अभंग केव्हां तरी मूळ वहीवरून नकल करून घेतले होते असें गृहीत धरून ती वही काळजीपूर्वक तपासली पाहिजे. दुसरी गोष्ट आपण अशी लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं संताजी तेली व गंगाराम मवाळ हे तुकोबांचे लेखक होते. ते कीर्तनांत अभंग स्फुरत तेव्हां लिहून घेत असें वर्णन महिपती-बोवांनीं केलें आहे. तें विधान विश्वासार्ह आहे असें वाटत नाहीं. परंतु तें विधान विचारांत घेण्याजोगें आहे येवढें खरें. तें विधान विचारांत घेऊन मी एवढें अनुमान करतों कीं संताजी तेली व गंगाराम मवाळ या उभयतांस तुकोबारायांच्या वह्या या केव्हां हि नकल करून घेण्यास उपलब्ध होत्या. तेव्हां संताजीनें स्वहस्तें लिहिलेल्या ज्या वह्या उपलब्ध होतील त्या वह्या अस्सल वह्यांची दुसरी एखादी येथें छापलेल्या वहीसारखी प्रत सापडे *पर्यंत अस्सल पण दुय्यम प्रतीच्या म्हणून समजण्यास हरकत नाहीं.* संताजी सारखी गंगाराम मवाळानें स्वहस्तें लिहिलेली एक हि वही आजवर उपलब्ध झाली नाहीं. मवाळांच्या घराण्यांत एक गाथा दाखवितात पण तो पंढरींत देहूकरांच्या घराण्यांत जो गाथा आहे त्या च वेळचा आहे. पंढरींत तुकाविप्राचें एक घराणें आहे. तुकाविप्र हा तुकोबांच्या नंतर १००।१२५ वर्षांनीं झाला. त्यावेळचा त्यांच्या घराण्यांत गाथा आहे. परंतु तो गाथा मवाळांचा गाथा, देहूकरांच्या,– ('पंढरींतील ) घरांतील गाथा, हे सर्व कोणी तरी अभंग गोळा करून व्यवस्थित लावून, सर्वत्रांस उपयोगी पडावा, म्हणून जो गाथा तयार केला त्याच्या नकला आहेत. या नकलांत संताजीच्या वह्यांत अभंग जसे होत गेले तसे लेखनिविष्ट झालेले सांपडतात तसे सापडत नाहींत. या तिन्ही प्रतीबद्दल पुढें जास्त विवेचन करूं. पण त्यापूर्वी संताजीच्या वह्यांचें विवेचन पूर्ण करून घेऊं.

संताजी तेली हा त्यावेळच्या परिस्थितीप्रमाणें सुरवातीस साक्षर असावा असें मला वाटत नाहीं. संताजीच्या वह्यांत एक च शब्द दोन–कचित्– तीन तऱ्हांनीं लिहिलेला आढळतो. याचा अर्थ एवढा च समजावा कीं संताजी-बोवा हे जेव्हां समोर दुसरी वही ठेवून नकल करीत.–तेव्हां नक्कल बरीचशी शुद्ध करीत; व जेव्हां पाठ केलेले–झालेले–अभंग लिहीत तेव्हां नक्कल बरीचशी अशुद्ध होई. कै. विनायकराव भावे यांनीं संताजीच्या वह्या हा च अस्सल गाथा होय, ही गोष्ट सिद्ध करण्याचा जो अट्टाहास केला, त्या

प्रयत्नांत, त्यांनीं दोन्ही वह्या छापून महाराष्ट्रास आदरयुक्त भावनेनें न दिल्यामुळें त्या वह्यांचा महाराष्ट्रांत व्हावा तसा प्रसार झाला नाहीं. तसा प्रसार होऊन दुसऱ्या जुन्या वारकरी घराण्यांतील विद्यमान पुरुषांस आपल्या संग्रहीं असलेल्या वह्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळांत नेऊन दाखवाव्यात असें हि वाटलें नाहीं. भावे यांनीं वह्या छापून प्रसिद्ध केल्या हे महाराष्ट्रावर उपकार झाले. परंतु त्या वह्यांस जी प्रस्तावना जोडली आहे ती येनकेन प्रकारेण तुकोबांस कमीपणा देण्याच्या उद्देशानें लिहिलेली असल्यामुळें भावे यांच्या हातून नुकसान हि फार झालें. असो. भावे यांनीं ज्या वह्या छापल्या आहेत त्या संशोधनाच्या दृष्टीनें जेवढ्या व्यवस्थित छापल्या जावयास हव्यात तशा च म्हणजे ओळीस ओळ, अक्षरांत, यत्किंचित् फरक न करतां अक्षर बरहुकम अक्षर, अशा छापल्या गेल्या आहेत. त्या दोन्ही भागांस त्यांनीं अभंगांची अनुक्रमणिका जोडली नाहीं, येवढा च त्या प्रतींत दोष आहे. संताजीच्या हस्ताक्षराचा नमुना म्हणून त्यांनीं एका पृष्ठाचा फोटो हि दिला आहे. दोन्ही भाग प्रसिद्ध करतांना त्यांनीं वेगवेगळाले प्रसिद्ध केले होते. व पुढें दोन्ही भाग एकत्र बांधून प्रसिद्ध केले आहेत. या दोन्ही वह्यांपैकीं दुसऱ्या भागाची वही आज हि संताजी तेली जगनाडे यांचे विद्यमान वंशज मनोहर हरिश्चंद्र जगनाडे, तळेगांव दाभाडे, यांचेकडे कोणास हि पाहावयास सापडते. पहिला भाग ज्या वहीवरून छापला, ती वही, पनवेल येथील जगनाडे यांच्या हातून दुसऱ्याच्या हातीं गेली आहे; व तो मनुष्य त्या वहीची कोणास हि दाद लागूं देत नाहीं. कांहीं हि सबब स गून झुकांडी देतो. पनवेल येथील जगनाडे यांनीं ती वही परत आणून मला दाखविण्याचा फार प्रयत्न केला पण हा गृहस्थ कांहीं त्या माणसास बधत नाहीं. असा हा गृहस्थ त्या वहीचा स्वतः उपयोग करीत नाहीं. दुसऱ्यास करूं देत नाहीं. तेवढ्यानें कांहीं बिनसणार आहे, असें मला वाटत नाहीं. कारण वर म्हटल्याप्रमाणें ही नक्कल अस्सल बरहुकूम झाली आहे. हें मीं स्वतः पाहिलें आहे.

पहिली वही प्रसिद्ध करतांना रा. भावे यांनीं विज्ञप्ति म्हणून लहान च दोन पृष्ठांची प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत भावे यांनीं खालील उद्गार काढले आहेत.

( १ ) " तुकारामाच्या अभंगांना नीटनेटकें नागर स्वरूप रामेश्वर भट्टानें दिलें. व मग नागर स्वरूपांत त्याचा प्रसार सर्वत्र झाला. अशी एक आख्या-

यिका महाराष्ट्रांत ऐकूं येते. ही रामेश्वर भटाची झिलई चढण्यापूर्वीचें अस्सल रूप आपणांस या जगनाडी सहितेत पाहण्यास सांपडेल. तुकाराम महाराजांच्या मुखांतून या बहुमोल अभंगांची वाणी कोणत्या स्वरूपांत प्रगट होई याचा हि अंदाज बांधण्यास यापासून मदत होईल." दुसऱ्या भागास अस्सल गाथा म्हणून भावे यांनीं जी प्रस्तावना जोडली आहे, त्यांत त्यांनी खालील विधानें केलीं आहेत

(२) महिपतीबोवा ताहराबादकर यांनी गंगाराम मवाळ व संताजी तेली जगनाडे हे तुकोबांचे लेखक होते म्हणून म्हटलें आहे.

(३) तेव्हां गंगाराम मवाळ यांच्या हातचा किंवा इतर कोणा टाळकऱ्याच्या हातच्या गाथा सापडल्यास तो हि या (सताजीच्या) गाथ्याच्या तोलाचा समाजावा लागेल.

(४) कदाचित् पुढें मागें खुद्द तुकारामाच्या हातचा गाथा सांपडल्यास तो मात्र या (संताजी) हून निःसंशय वरच्या दर्जाचा अस्सल होय हें निर्विवाद होय.

(५) असें दिसतें कीं संताजी हा तुकारामाच्या सेवेंत राहूं लागला तेव्हां त्याचें वय २०।२५ चे सुमारास होतें.

(६) अनेक वर्षे तुकारामाच्या निकट सान्निध्यांत भक्तिप्रेमानें राहिल्यावर या चुणचुणीत तरुण मुलानें आपल्या गुरुजींची प्रत्येक गोष्ट पूर्णपणें उचलली असली पाहिजे.

(७) संताजीच्या शुद्धलेखनापेक्षां तुकारामाचें लिखाण कांहीं विशेष निराळें असेल असें मला वाटत नाही.

(८) तुकारामास लिहिता येत होतें हें अगदीं निःसंशय आहे. परंतु स्वतःचें कवित्व तो लिहून ठेवीत असेल असें मला वाटत नाहीं.

(९) तो कीर्तनांत उभा राहिला म्हणजे तेथल्या तेथेंच अभंग रचून म्हणे व ते टाळकरी पाठ करीत किंवा मागाहून लिहून ठेवीत असा क्रम असावा.

(१०) तुकारामानें स्वहस्तें लिहून ठेविलेल्या त्याच्या अभंगांच्या वह्या तेव्हां नव्हत्या, हल्लींहि उपलब्ध नाहींत व तशा उपलब्ध होतील असा संभव दिसत नाहीं.

( ११ ) संताजीनें एकंदर चार वह्या लिहिल्या होत्या असें त्याचे वंशज सांगतात.

( १२ ) या वह्या संताजीनें कशा लिहिल्या तें समजण्यास साधन नाहीं.

तेव्हां वर भावे यांचीं जीं मुक्ताफळें उद्धृत केलीं आहेत हीं त्यांच्या बुद्धिमत्तेची आतषबाजी आहे! ती त्यांस उत्तम साधली आहे! भावे यांच्या विधानांचा आतां थोडक्यांत विचार करूं. तुकोबारायांच्या अभंगांस रामेश्वर भट झिलई चढवीत होते, ही आख्यायिका मला देहू, आळंदी व पंढरपूर येथें कोठें हि ऐकूं आली नाहीं व तशी आख्यायिका प्रसृत होणें शक्य नाहीं; कारण रामेश्वर भटाची तुकोबारायांशीं गांठ पडण्यापूर्वीं च तुकोबांच्या अभंगांची कीर्ति महाराष्ट्रभर पसरली, सर्व साधारण लोक तुकोबांस मानूं लागले, तेव्हां कपाळाची तिडीक उठून रामेश्वर भटानें दिवाणांत फिर्याद दाखल केली. तुकोबांस देहू सोडावें लागलें, कवित्व बुडवावें लागले. तेव्हां भावे यांनीं नमूद केलेली ही आख्यायिका स्वकपोलकल्पित कोणकडी आहे. वरें रामेश्वर भटानें ठेवी मस्तकी हात—अशी विनंती केली त्या वेळीं पण दुसऱ्या प्रसंगानें तुकोबांच्या कवित्वाबद्दल जे उद्गार काढले आहेत कीः— तुकोबा—

॥ अमृताची वाणी। वरुपला शुद्ध। करी त्या अशुद्ध। ऐसा कोण। या उद्गारानें तुकोबारायांच्या वचनास हात लावून झिलई चढविण्याचा प्रयत्न रामेश्वर-भटानें केला असेल असें वाटत नाहीं. आतां प्रचलित आख्यायिका च पहावयाची तर अशी आहे कीं रामेश्वरभटाचें पुस्तकी ज्ञान हें कांहीं दुरुस्त्या अभंगांत सुचवूं लागलें. तेव्हां त्यास दृष्टांत होऊन त्यांची समजूत घातली गेली. ॥"मिळोनी गौळणी यशोदे देती गाऱ्हाणीं"॥ या गवळणींतील तिसऱ्या चरणांत "मुखमळीण उभा हाडतीय घोणे"॥ (पंडित ३८८) असे शब्द आहेत. रामेश्वर भटानें "मळीण" याबद्दल "म्लान" असा पाठभेद सुचविला तेव्हां त्यास दृष्टांतांत असें सांगण्यांत आलें कीं, "बा, मला असें काय कमी आहे की त्या विचारानें माझें मुख 'म्लान' व्हावें. मी गोपाळांबरोबर मातींत खेळत होतों, तेव्हां माती तोंडावर उडून मुख मलीन झालें होतें, ते मी जाऊन यशोदेच्या पदरानें पुसलें." मला वाटतें हा किंवा असा कांहीं दृष्टांत पोटीं धरून रामेश्वर भटानें अमृताची वाणी वरुपला शुद्ध असा मुद्दाम च शब्द योजला असावा. तेव्हां

भावे यांनीं दिलेली आख्यायिका कशी हि पाहिली तरी चूक आहे. संताजी-बोवा व तुकोबाराय यांचे संबंध काय होते ग्रामइल महिपतीबोवा ताहराबादकर यांनीं जें लिहिलें आहे त्या पलीकडे कोणास कांहीं ज्यास्त माहिती नाहीं. तेव्हां संताजी हा २०।२५ वर्षांचा होता, तेव्हांपासून तुकोबांच्या सेवेंत राहूं लागला वगैरे ज्या अघळपघळ गोष्टी भावे यांनीं लिहिल्या आहेत, ते केवळ तर्क आहेत. तेव्हां त्या सर्व गोष्टी वाचकांनीं सोडून द्याव्यात. "तुकारामाचें लिखाण संताजी पेक्षां निराळें असेल असें मला वाटत नाही" असें भावे यांनीं ठासून विधान केलें आहे. पण प्रत्यक्ष परिस्थिति अशी आहे कीं, देहूकरांच्या घरांत पूजेंत असलेली वही व संताजी यांची वही या दोन्हीं वह्या मीं एकमेकांस लावून पाहून सांगत आहें कीं, तत्कालीन लेखनपद्धती-प्रमाणें तुकोबांच्या लेखनांत शुद्धलेखनाची चूक नाहीं; तुकोबा स्वतःचें कवित्व स्वतः लिहून ठेवीत होते व त्यांनीं स्वहस्तें लिहिलेल्या एकाहून ज्यास्त वह्या होत्या.

तुकोबा स्वतःचें कवित्व स्वतः लिहून ठेवीत नव्हते असें जें भावे यांनीं लिहिलें आहे तें चूक आहे हें मीं सप्रमाण वर दिलें आहे च. तुकोबा कीर्तनांत अभंग करून म्हणत व केव्हां लिहीत याचें विवेचन पुढें योग्य स्थळीं केलें आहे. तेव्हां त्याची द्विरुक्ती येथें करीत नाहीं. तुकोबा स्वतः अभंग लिहीत असत व अशा अभंग लिहिलेल्या वह्या त्यांनीं बुडविल्या ही गोष्ट मीं वर अभंगांतील वचनें दिली आहेत त्यावरून स्पष्ट आहे. तेव्हां भावे यांनीं भाषेच्या रूपापलिकडे व ओबडधोबड लिहिण्यापलिकडे जावून संताजीच्या वह्यांत काय नाविन्य आहे हें शोधलें असतें तर त्या वह्यांत त्यांस रत्नांच्या खाणी सापडल्या असत्या. पण त्या खाणी भावे यांस नको होत्या, त्यांस प्रस्तावनेचे निमित्त करून तुकोबांवर राजवाडे कंपूंतील एक म्हणून तोंडसुख घ्यावयाचें होतें, तें त्यांनीं यथेच्छ पोटभर घेतलें. असो, आतां संताजीच्या वह्यांत अपूर्व काय आहे तें आपण पाहूं.

संताजी हे कांहीं पढीक विद्वान शास्त्री पंडित नव्हते; व्यवसायानें तेली असल्यामुळें त्यांस कांहीं अक्षर-ओळख असेल असें हि गृहीत धरावयास नको. ते केव्हां तरी कीर्तनांत वा भजनांत आकर्षिले गेले, त्यांचें मन कीर्तनांत समाधान पावलें व ते तुकोबारायाकडे येऊं जाऊं लागले असावेत; संताजी मुळचे चाकणचे. तेव्हां ते सदा सर्वकाळ तुकोबाचे जवळ

राहत असावेत असें म्हणावयास कांहीं आधार नाहीं. संताजी व तुकोबा यांच्या एकमेकांच्या वयांत अंतर किती होतें हें सांगण्यास कांही साधन नाहीं. परंतु तुकोबांच्या निर्याणानंतर ते पुष्कळ वर्षे हयात होते. तेव्हां ते तुकोबां पेक्षां असले च तर थोडे फार लहान होते असें आपण गृहीत धरूं. अभगांची गोडी लागल्यावर संताजी अभंग पाठ करूं लागले असावेत व अभंगसंग्रह आपले जवळ असावा म्हणून ते लिहावयास शिकले असावेत. तेव्हां त्यांनीं पाठ केलेले अभंग ते लिहीत तेव्हां तोंडीं उच्चार बसला असेल तसें अशुद्ध लिहीत व जेव्हां दुसऱ्या पोथीवरून नकल करित तेव्हां शुद्ध लिहीत. संताजी केव्हां हि तुकोबांचे स्वतःचे लिखाण समोर ठेवून नकल करून घेण्यास मोकळे होते म्हणून त्यांनीं आपले कडून नकल कसोशीनें केली आहे. देहूकरांच्या घराण्यांतील मूळ वहींतः दोन शून्याची खूण करून चरण तोडण्याची जी तऱ्हा आहे. ती तऱ्हा संताजीनें बरोबर उचलली आहे. संताजींनीं काळी व तांबडी शाई अशी मूळ वहीची नकल केली नाहीं संताजीची तळेगांव येथील वही देहूच्या इनामदारांच्या घराण्यांतील त्रुटीत मूळ वही प्रमाणें खतावणी सारखी आहे. मूळ वहींत नसलेली एक गोष्ट संताजीनें केली आहे व ती ही कीं त्यांनीं ठिकठिकाणीं कांहीं अभंगांचे गटाचे शेवटीं आकडे घातले आहेत. यामुळें तुकोबांनीं कोणत्या निमित्तानें कोणते अभंग केलें हें कळतें. ( मूळ वहींत अभंगांचे गटाचे शेवटीं आकडे नाहींत. ) संताजींच्या या अभंग वेगळे दाखविण्याच्या पद्धतीनें एखाद्या वेळीं एक अभंग झालेला असला तर तो त्यांनीं तसा च लिहून शेवटीं १ असा आकडा घातलेला पाहिला कीं त्यावेळेपुरता तो विषय दृष्टीआड झाला असें समजावयास हरकत नाहीं. एक हा आकडा ७२२ । ७४१।७४९ व १२९४ या अभंगांचे शेवटीं आहे. असे च २।३।४।५ असे हि आकडे ठिकठिकाणीं आहेत. कांहीं अभंगांचे गटाचे शेवटीं आकडे घालावयाचे राहिले आहेत. पण एका ओघानें बरेचसे अभग आपण वाचीत आलों तर ओघ कोठें बदलतो हें चटकन लक्ष्यांत येते. लहान मोठ्या गटा गटांच्या पुष्कळशा अभंगांच्या अभ्यासानें तुकोबांच्या कवित्वाची झरवणी कशी झुळु झुळू वाहत होती हें लक्ष्यांत येतें. ही गोष्ट दुसऱ्या कोणत्या हि गाथ्याच्या अभ्यासानें होणारी नाहीं. संताजीच्या गाथ्यांत ठिकठिकाणी सरस पाठ आहेत. ते सरस पाठ चुकलेले असावेत असें वाटून नकलकारांनी विद्वत्शुद्धी केलेलीं दोन स्थळें उदाहरणार्थ देतों. संताजींमधील ६५२ वा अभंग पहा—जाणे भक्तींचा जीव्हाळा । तो चीं देवाचा पुतळा ॥ १ ॥ हा पाठ पटीत यांच्या प्रतींत ( ७३० ) असा च

आहे. पण ओळींचा गाथा, (११५३) निर्णयसागर (२०५७) देवडकिर ३७४ यांत देवाचा पुतळा असा पाठ आहे. या अभंगांतील तिसरे चरण नामरूपीं मीनलें चीत। असें आहे–तें सर्व प्रतींत जडलें असें बदललें आहे. मीनलें व जडलें यांत फरक आहे. व तो फरक अर्थपूर्ण आहे. ( २ ) संताजीमधील अभंग ११२६ हरी तुझी कांती रे सावळी। मी रे गोरी चापयाची कळी। तुझीया स्परुशें होईन काळी।- यातील "स्परुशे" हा शब्द पंडीत ३९०, ओळींचा गाथा ६५१, देवडीकर २७९० निर्णयसागर १२५ व इतर गाथे यांत "दर्शनें" असा येतो. या दोन शब्दांतील भेद स्पष्ट आहे. व "स्परुशे" हा पाठ निःसंशय श्रेष्ठ आहे.

असे श्रेष्ठ पाठ संताजच्या गाथ्यांत ठिकठिकाणीं आहेत. संताजीच्या गाथ्यांत अभंग हे असे गटागटानें आलेलें असल्यामुळें त्या अभंगांत एक-मेकांस जोडणारा दुवा आपल्या लक्ष्यांत येतो. व त्या एका प्रसंगाच्या अभंगांचा गट आपण अभ्यासिला तर अभंगाच्या एकमेकांच्या संदर्भानें अर्थ लागण्यास फार मदत होते. याची दोन उदाहरणें देतों.

( १ ) संताजी अभंग ३०५ ज्ञानीयांचें घरीं चोजवितां देव। हा अभंग पंडीत १५२६ ओळींच्या गाथा १८९२ देवडकिर १०४० निर्णयसागर १२९७ असा आला आहे. पण एका हि प्रतींत या अभंगापूर्वी आम्हां घरीं गाये। येकी दुभता हे। हा अभंग आलेला नाहीं. संताजी गाथ्यांत अभंग २९६ पासून जो ओघ वाहतो आहे, त्याचा कळस–आम्हां घरीं येकी गाय दुभता हे। हें सांगण्यांत होतो व लगेच ज्ञानीयांचें घरीं चोजवीतां देव। असें म्हणून फरक दाखवून ती ओळ ३०७ या अभंगाशीं संपते. आम्हां घरीं येकीं गाय दुभताहे। व ज्ञानीयांच्या घरीं चोजवीतां देव। हे एकमेकांस परस्पर विरुद्ध अभंग आहेत. ही गोष्ट दुसऱ्या कोणत्या हि कारणानें लक्ष्यांत येण्याजोगी नाहीं.

( २ ) संताजी अभंग ९३० भक्तीं प्रेमसुख नेणवे आणीकां। हा अभंग पंडीत ३०४८ ओळींचा गाथा २०१३ निर्णयसागर ३२१५ देवडीकर १०९९ असा आला आहे. पण कोणत्या हि गाथ्यांत संताजीमध्यें आहेत असे आधींचें २।३ अभंग नाहींत. संताजीमध्यें अभंग ९२८ मध्यें, तुका म्हणे मुगुट मणी हे भक्तीं। असें सांगून ९२९ मध्यें भक्तांचा महिमा भक्तची जाणती। असें सांगून भक्त सुख कोणते भोगतात-तें सांगून पुढें अभेदूनी भेद राखीयेला अंगीं वाढा-

वया जगीं प्रेमसुख । असें सांगितलें व या अभंगाचा शेवट तुका म्हणे हे आहे तया ठावे। जीहीं एकाभावे जाणीतले या उलट-भक्ती प्रेम सुख नेणवे आणीका । पंडीत वाचका ज्ञानीयांसी ॥ धृ ॥ आत्मनिष्ठ जन्ही जाले जीवन्मुक्त । तन्ही भक्तिसुख दुर्लभ त्या ॥ धृ ॥ संताजीच्या तिसऱ्या चरणांत व इतर गाथ्यांतील तिसऱ्या चरणांत हि फरक आहे. तसें च पुढील अभंग भक्ती-प्रेम सुख ज्यांना लाभलें ( ९३१ ) त्यांनीं साठविला हरी जीहीं हृदय मंदीरीं व या च ओळींचें आणखी तीन अभंग पुढें आहेत. पांगारकरांनीं सर्व वर्गाचे अभंग सर्व गाथ्यांत ताडून पाहिले म्हणून म्हटलें, पण हें संताजीच्या गाथ्यांत आढळणारे भक्तिप्रेम सुखाचें निरूपण त्यांच्या तुकारामचरित्रांत कोठें च आढळत नाहीं. तात्पर्य संताजींच्या गाथ्याचा कोणी तितक्या कसोशीनें अभ्यास च केला नाहीं. संताजीच्या गाथ्यानें इतर गाथ्यांत ओळी कशा बदलत गेल्या हें समजण्याचें साधन सांपडतें-तें साधन असें कीं, संताजी-मधील एक ओळ घेऊन ती दुसऱ्या गाथ्याशीं लावून पाहिली म्हणजे संताजी व पंडित,-ओळींचा गाथा व इतर हस्तलिखीत गाथे यामध्यें फरक कसा पडत गेला तें लक्षांत येतें. संताजीमध्यें ७६५-७७० ही एक ओळ आहे. हे अभंग पंडितांच्या प्रतींत २३०९।१०' असे आहेत. त्यापुढील चारी अभंग त्र्यंबक कासाराच्या संग्रहीं पूर्वीच ३६१'। ११४३ । ११४४ । ११४५ या क्रमानें होते. तेव्हां ते अभंग त्यानें २३१० नतर लिहून घेतले नाहींत, तशी कांहीं नोंद हि केली नाहीं; व तुकोबांची संताजीच्या गाथ्यांत संग्रहीत झालेली ओळ जी एकदा बिघडली ती कायमची बिघडली. संताजी ४७५-४८२ ही हि एक ओळ आहे. यांत लक्षांत ठेवण्याजोगा गोष्ट अशी आहे कीं, ४७५ व ४७६ हे अभंग पूर्वी २०२ व २०२ असें आले आहेत. तरी ते संताजीनें या ओळींत पुनः उद्धृत केले आहेत. कारण असें कीं या दोन्हीं प्रसंगाचे वेळीं या अभंगानीं निरनिराळें कार्य होत होतें. ते उपटसुभासारखे-अनारिसे दिसत नव्हते, हे संताजींनीं प्रत्यक्ष पाहिलें असल्यामुळें, त्यांनीं आळस केला नाहीं. दोन्ही कीर्तनें-भजनें त्यांनीं वेगवेगळीं लिहून घेतलीं. ४७५-८२ हे अभंग वरील दुसऱ्या कोणत्या छापील किंवा हस्तलिखित प्रतींत या ओळींनें आले नाहींत. ७६५-७० या अभंगांबद्दल जें वर विवेचन केलें आहे तें या अभंगास हि लागू आहे असें आढळेल. असा या संताजींच्या गाथ्याचा गाथ्या-गाथ्यांत फरक कसा पडत गेला हें समजण्यास मला फार उपयोग झाला. सताजींनें आरत्यांच्या शेवटीं

१५६८ पार्थिव संवत्सर आश्विन शुद्ध पौर्णिमा व तीर्थावळींचे अभंगाचे शेवटीं शके १६१० विभवनाम संवत्सरे अमावास्या शुक्रवार अशा मिती दिल्या आहेत. यावरून मी येवढें च अनुमान काढावयास तयार आहे कीं तुकोबारायांच्या निर्याणापूर्वी कांहीं वर्षे संताजी बोवा अभंग लिहूं लागले होते व तें काम ४०।४५ वर्षे चालूं होतें. तेव्हां भावे यांनीं नमूद केल्याप्रमाणें संताजीनें लिहिलेल्या तुकोबारायांच्या चार वह्या होत्या, ही गोष्ट मला मान्य नाहीं. मला वाटतें कीं तुकोबांच्या निर्याणानंतर संताजीनें मिळतील तेवढे महाराजांचे अभंग गोळा करून संग्रहीत केलेले असावेत व रोज नित्य नेमानें त्यांची उजळणी करीत, तुकोबांचीं कीर्तनें, भजनें, आठवीत संताजी बोवा आपल्या आयुष्याचे दिवस कंठीत असावेत. संताजींनीं नकला केल्या. त्या मुद्यावरून केल्या व कोणती ओळ कुठें सुरू होते, व कोठें संपते, हें सांगण्यास कांहीं दिवस लेखक च स्वतः हजर होते. तेव्हां त्यांनीं अभंगाचे शेवटीं घातलेला आंकडा पाहून त्या वेळेपुरता तो विषय संपला असें समजलें पाहिजे. संताजीस अस्सल वह्या नकल करण्यास उपलब्ध होत्या, संताजींनीं पुष्कळशा भजनांत व कीर्तनांत टाळकरी म्हणून अभंग म्हटलेले होते, तेव्हां त्यांच्या गाथ्यांत आज क्षेपक म्हणून गणले जातात, अशा अभंगापैकीं अभंग आले तर ते क्षेपक अभंग निवडणारांची चूक आहे असें खुशाल समजावें. येथवर संताजींच्या प्रतींत मला आढळणारे गुण सांगितले. त्या वहींत दोष दाखवावयाचा तर सर्व च अभंगांचे गट्टाचे शेवटीं आकडे घालण्यास हे भक्त विसरले कसें येवढा च दोष आहे. त्यांनीं अभंग काय कारणानें झालें हें सांगितलें असतें तर दुधांत साखर पडल्या सारखें झालें असतें.

महाराजांच्या निर्याणानंतर संताजीसारख्या निस्सीम भक्तानें अभंगांचा संग्रह गोळा करून जे अभंग लिहून घेतले असतील ते वगळले तर तुकोबांच्या घराण्यांत किंवा दुसऱ्या कोणा हि टाळकऱ्याच्या संग्रहीं अभंगांचा संपूर्ण संग्रह सापडूं नये याचा खेद वाटतो, लाज हि वाटते. मराठी राज्यांत संस्कृताची व इंग्रजी राज्यांत इंग्रजीची सुशिक्षित वर्गाच्या मनावर एवढी छाप होती कीं कोणा हि थोर सुशिक्षीत पुरुषास तुकोबांचे अभंग रत्नभांडार गोळा करावें अशी इच्छा झाली नाहीं. वारकरी मंडळींत हि एका पुढें एक शिष्यपरंपरा तेवढ्या अधिकाराची, आस्थेची, असते च असें नाहीं. तात्पर्य तुकोबांस ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें अशा संताजींसारख्या व्यक्ती नाहींशा झाल्यावर म्हणजे तुकोबांच्या निर्याणानंतर सुमारें ५०।७५ वर्षांनीं पंढरीची वारी करणाऱ्या १।२

मठाधिपतीस तुकोबांचा जो कांहीं अभंगसंग्रह मिळेल तो गोळा करावा असें वाटलें असावें व त्याप्रमाणें जेवढे म्हणून या कल्पनेस अनुकूल लहान मोठे दिंडीवाले, मठाधिपती असतील, अशांनीं आपापला संग्रह एकत्रित करून ४।४॥ हजार अभंगांचा एक गाथा कोणा तरी त्यांतल्यात्यांत श्रेष्ठ अशा मठाधिपतींच्या देखरेखीखालीं तयार केला असावा व मग त्या मूळ गाथ्याच्या ज्यानें त्यानें नकला आपल्या सोईप्रमाणें केल्या असाव्यात. सोईप्रमाणें म्हणण्याचें कारण त्या दिंडीवाल्यास किंवा मठाधिपतीस स्वतः जवळ जो संग्रह होता तो लिहून घेण्याचें कारण नव्हतें. स्वतः जवळ नसेल असा भाग प्रत्येक जण लिहून घेत असावा. पंढरीतील देहूकरांचा, मवाळांचा, देहूंत ३।३॥ हजार अभंगांचा गाथा, होता तो, असे कांहीं गाथे मी पाहिले तेव्हां मला कांहीं कांहीं ठिकाणीं तेंच हस्ताक्षर पुनः पुनः आढळे. यावरून ४।४॥ हजार अभंगांची संख्या ठरली त्यानंतर तोच लेखक सवडी सवडीनें नकला करून देत असावा. असा एकजुटीनें वागून कांहीं मठाधिपतींनीं मिळून साडेचार हजार अभंगांचा गाथा काढल्यावर जे कोणी या मठाधिपतींच्या कक्षेंत येत नव्हतें, असे दिंडीवाले मठाधिपती राहिले यांनीं हि साडेचार हजार अभंगांचा गाथा तयार केला. हे दोन निरनिराळे प्रयत्न कसे ओळखावेत तें मी खालीं देत आहे:—नमनाचे (१) समचरण दृष्टी (२) सुंदर तें ध्यान हे दोन अभंग झाल्यावर जुन्या हस्तलिखीत गाथ्यांतून बालक्रीडा येते, त्यानंतर ओवींचे तीन अभंग, येवढें झाल्यावर एका गटाच्या गाथ्यास सुरवात यारे हरिदासांनो जिंको कळीकाळा। अशी होते. असे गट माधव चंद्रोबा, ओळीचा गाथा, व गणपत कृष्णाजी— या पोथ्यांच्या मालकांचा व दुसरा गट पहिले दोन नमनाचे अभंग झाल्यावर बालक्रीडा घेवोत. किंवा त्र्यंबक कासाराप्रमाणें विराण्या घेवोत. पण अभंग लिहिण्यास सुरुवात नये जरी तुज मधुर उत्तर। येथून होते. आतां या दोन्हीं गटापैकीं सर्व नकलकारांनीं आपण दुसऱ्याची नक्कल करीत आहोंत असें दिसूं नये म्हणून खालचे अभंग वर, वरचे खालीं, लिहून घेतलें आहेत. कांहीं बहाद्दर याहि पुढें गेले. त्यांनीं अभंगांचे चरण खालचे वर केले!! पंडितांच्या प्रतीचा व देवडीकरांचा क्रम बहुतेक एक आहे. परंतु पंडितांच्या गाथ्यांत अंतरीची घेतो. गोडी (३५) यानंतर सुखें वोळंब दावी गोहा हा अभंग येतो. देवडीकरांच्या किंवा गंगूकाकांच्या गाथ्यांत सुखें ओळंब हा अभंग पावलें पावलें या अभंगानंतर येतो. पुढें गंमत पाहण्याजोगी आहे. पंडितांच्या प्रतींत पावलें पावलें

नंतर वंदूं चरण रज सेवूं उद्धावळी हा अभंग आहे. व त्यांतील चवथा चरण गेले पुढें त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आम्हीं ॥ असा आहे. या चरणांत गेलें पुढें याच्यावद्दल पुढे गेलें त्याचा। अशी त्याच अभंगास सुरवात देवडीकराच्या गाथ्यांत आहे. कोणी कोणाची नक्कल केली व आपला गाथा निराळा दिसावा म्हणून चरण व अभंग खालचे वर व वरचे खालीं केले हे दोन्हीं गाथे तपासले तर सांगता येईल, तेव्हां या निरनिराळ्या प्रतींतील क्रमातील फरकास किंवा पाठांतरास काय किंमत द्यावयाची याचा ज्यानें त्यानें विचार ठरवावा वर वर्णिलेल्या शितावरून भाताची परीक्षा ज्यांना करतां येईल त्यांनीं तशी करावी. तेव्हा असे साडे चार हजार अभंगांचे दोन निरनिराळे पण जवळ जवळ त्या च अभगाचे गाथे तयार झाले व त्याच्या नक्ला होऊं लागल्या, तेव्हा आपल्या संग्रहीं असतील तेवढे अभंग वगळून प्रत्येक नकलकार बाकीचे अभंग मिळतील तसे संग्रहित करू लागला. अशा तऱ्हेनें कोणास च (तुकोबांच्या खास टाळकऱ्यानंतर) तुकोबांच्या ओळी कायम ठेवाव्यात अशी आस नसल्यामुळें अस्सल ओळींचे अभंग न मिळता गाथ्या–गाथ्यांत फरक पडत गेला, हे दोन गाथे तयार होत असतांना संताजीच्या वह्या अस्सल समजून कोणी वापरल्या असतील असें मला वाटत नाहीं. कारण संताजी मधील २८८ व २८९ हे अभंग मला कोठच्या हि गाथ्यांत सांपडले नाहींत. फार काय पण तुकाराम तात्यांच्या ८४४१ अभंगांच्या गाथ्यांत हि हे दोन अभंग नाहींत. या दोन अभंगांबद्दल कोणा हि मठाधिपतीस आज विचारावयास जा तर हे अभंग क्षेपक आहेत असे तो सांगेल. संताजींच्या वहींतलि अभंगांस केव्हां हि कोणास हि क्षेपक म्हणतां येणार नाहीं. असें च जयरामस्वामी वडगांवकर यांचें मठांत तुकोबारायांचे कांहीं नवीन अभंग आढळले. त्यास हि हे लोक क्षेपक म्हणणार च. पण ज्यानीं कोणी चार साडेचार हजार अभंगाची गाथा तयार केली त्यांनीं जुने अभग जमेस धरले नाहीत, जुन्या वह्या शोधल्या नाहींत तेव्हां त्याचे म्हणणें प्रमाण कसें मानावयाचें ? ही चार साडेचार हजार अभंगांची संख्या कोणी व कशी ठरविली याचा शोध झाला पाहिजे. त्यांनी कोणत्या प्रती वापरल्या हें हि कळलें पाहिजे. असो.

या दोन गट्टांतून अभंग मिळवून नकल करून घेतांना पंडित प्रतीचा मूळ मालक व लेखक त्र्यंबक कासार यानें चाळीस वर्षे मेहनत करून प्रत

तयार केली म्हणून ग्रंथाचें शेवटीं म्हटलें आहे; हें काम त्यानें काळजी-पूर्वक केलें आहे हें हि खरें. त्र्यंबक कासारानें संताजीच्या वह्या वापरल्या होत्या असें दिसतें. त्यानें एक च गोष्ट केली नाहीं व ती ही कीं, त्यानें संताजीची ओळ जशीच्या तशी ठेविली नाही. पूर्वी त्याचे संग्रहीं जे अभंग होते ते वगळून नकल केलेली ओळ हि ती च ठेविली पण क्रम बदलला. त्र्यंबक कासारानें नकल करतांना एक अति उत्कृष्ठ गोष्ट केली, जेथें त्यास शक्य होतें॰तेथें कांहीं कांहीं अभंगांचे गटाचे शेवटीं आंकडे घातले आहेत. ही रीत त्यानें संताजीवरून उचलली. म्हणजे तेवढ्यापुरती ती ओळ शाबूत राहिली. असे आकडे घातलेले गट पंडित प्रतींत पुष्कळ च आहेत. त्यांत कांही चुका आहेत. ( १९७५–१९८० ) या अभंगांचे शेवटीं ६ चा आकडा आहे पण तो चुकीचा आहे. १९७५–७८ हे अभंग एका ओळींत आहेत; पुढील दोन नाहींत. तसें च नकल करून घेतांना हि कांहीं अभंग मध्यें च येतात. १६५९–१६९२ ही ओळ आहे पण त्या ओळींत १६६७। १६६८ व १६९० हे अभंग उत्कृष्ठ असले तरी भलत्या ठिकाणीं आले आहेत असें वाटतें॰ तेव्हां पंडितांची प्रत सुद्धां जरा विचार करून च वापरावी लागते. परंतु संताजीची प्रत वगळून सर्व छापील प्रतींत पंडिताची प्रत उत्कृष्ठ आहे याबद्दल वाद नाहीं.

माधव चंद्रोबा, गणपत कृष्णाजी, पंडित, ओळींचा गाथा, देवडीकरांचा गाथा या छापील प्रती व ४।४॥ हजार अभंगांच्या इतर हस्तलिखित प्रती यांमध्यें मूळ ओळी मुद्दाम होऊन संग्राहकांनीं मोडल्या नाहींत. पण कांहीं गट या ओळी आहेत. हें ओळखून त्यांनीं जी खबरदारी घ्यावयास हवी होती. ती त्या लोकांनीं घेतली नाहीं हें खरें पण या सर्व ओळी मोडून व जेणें करून कोणती प्रत आपण वापरली हें सांगावयास लागूं नये. म्हणून के. विष्णूबोवा जोग व गुळवे यांनीं चार साडे चार अभंगांच्या सर्व छापील प्रती गोळा केल्या, त्या अभंगांची विषयवारी केली, व एक नवीन तऱ्हा करून दाखविली. हे गृहस्थ प्रस्तावनेच्या सुरवातीस लिहितात कीं "महासाधु तुकाराम महाराज यांच्या अभंगांच्या गाथा अनेक लोकांनीं छापून प्रसिद्ध केल्या आहेत. ह्यापैकीं सुमारें साडेचार हजार अभंगांच्या गाथा वारकरी सांप्रदायी मंडळीस मान्य आहेत. या साडेचार हजार अभंगांतून विषयवारीनें प्रकरणें पाडून छापण्याचा प्रयत्न केलेला आढळन येतो, परंतु बहुतकरून दीड हजार अभंगांचीच बरोबर

विषयवारी लावून बाकीचे सुमार तीन हजार अभंग "स्फुट अभंग" या सदरांत घातलेले आढळतात. तुकाराम महाराजांनीं निरनिराळ्या प्रसंगीं केलेलें अभंग निवडून काढून त्यांचीं प्रकरणें पाडण्याचा हेतु, एका विषया-वरील त्यांचे अभग एके ठिकाणीं पहावयास मिळावें हा होय हा हेतु उपलब्ध गाथा पाहिल्या म्हणजे जसा जावा तसा शेवटास गेलेला दिसत नाहीं. ही उणीव दूर होऊन हल्लींच्या गाथांतील दुर्बोधत्व होतां होईल तितकें कमी करावें ह्या हेतूनें आम्हीं ही गाथा प्रसिद्ध केली आहे." येथें तुकोबारायांच्या, किंवा त्यांच्या टाळकर्‍यांच्या, अगर त्यांच्या शिष्यांच्या वह्या मिळवून ग्रंथ छापावा असा उद्देश च नव्हता. या गाथा प्रकाशकांस तुकोबारायांच्या अभं-गाच्यां ओळी असतील अशी कल्पना हि शिवलेली त्यांच्या प्रस्तावनेवरून दिसत नाहीं. ही वर्गवारीनें गाथा छापण्याची तऱ्हा पूर्वींच्या सर्व छापील गाथ्यांच्या मुळावर आली.

एतावता भावे यांनीं काढलेली संताजीची गाथा वगळून कोणा हि गाथा प्रकाशकांस मुळांत तुकोबांचे अभंग कोणत्या स्वरूपांत असतील, आपल्या गाथेंत ते तसे कां नाहींत असला विचार स्पर्श हि करून गेला नाहीं. तसा विचार पुढें आला असतांना पांगारकरांसारख्या सुशिक्षित पदवीधर हरिभक्तपरायण माणसानें कशी बगल मारून नेली हें आपण पाहिलें. असो. आतां यापुढें देहूकर इनामदार यांच्या घराण्यांत जी मुळ वही आजपर्यंत ८।१० पिढ्या महाराजांच्या हातची म्हणून पूजेंत आहे व जी या गाथ्यांत * * अशा नक्षत्रांकित खुणांनीं छापली आहे. तिचें वर्णन थोडक्यांत करतों.

ही वही सुमार १९२२ सालीं प्रथम पाहिली. संताजीच्या दोन्ही वह्या पूर्वीं पाहिल्या होत्या, तेव्हां त्या वेळची अक्षरें लिहिण्याची रीत मला माहीत होती, वही पाहतां च ती वही समकालीन आहे याबद्दल मला शंका हि आली नाहीं. या पोथींतील दोन अभंगांचा फोटो पांगारकर यांनीं श्री तुकाराम चरित्रांत छापला होता. तो फोटो पाहून भावे यांचें मत "हें अक्षर तुकाराम-कालीन असावें असें तो फोटो पाहून माझें मत झालें आहे." असें त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. नारायणबोवा ( निर्याणानतर जन्मलेले ) देहूकर यांच्या घराण्यांत पिढ्यानुपिढ्या ही पोथी स्वतः महारा-जांच्या हातची म्हणून पूजेंत ठेविलेली आहे. ही वही जुन्या जुन्नरी घोटीव

कागदावर लिहिलेली आहे. वही ११ इंच लांब व ७ इंच रुंद आहे. प्रत्येक पानाच्या दोन्ही कडांस तांबड्या शाईच्या दोन दोन रेघा आहेत; वही पाठ-पोठ लिहिलेली आहे. वहीच्या प्रत्येक पृष्ठावर २३ ते २५ ओळी असून प्रत्येक ओळींत सरासरी २४ अक्षरें आहेत. अभंगांच्या लहानमोठेपणाप्रमाणें प्रत्येक पृष्ठावर ३।४।५।६ असे अभंग आहेत. दोन अभंगामध्यें छ छ छ अशा खुणा करून एकेक ओळ जागा सोडली आहे. या वहींतील विशेष गुण असे कीं, (१) अभंग एका पृष्ठावर सुरू होऊन पुरा झाला नाहीं. म्हणून अभंग दुसऱ्या पृष्ठावर न्यावा लागला नाहीं. (२) अभंग हे काळ्या व तांबड्या अशा दोन रंगांच्या शाईनीं लिहिलेले आहेत. (३) अभंगांतील चरण जेथें तुटतो तें स्थान दोन शून्यांची: अशी खूण करून दाखविलें आहे. (४) या वहीच्या लेखकाचें हस्ताक्षर संताजीच्यापेक्षां कितीं तरी पट चांगलें आहे. (५) या वहीच्या लेखकाच्या त्या वेळच्या शुद्धलेखनाच्या कल्पना स्पष्ट आहेत. (६) त्याप्रमाणें जोडाक्षरें केव्हां हि संस्कृत उच्चाराप्रमाणें न लिहितां त्या वेळच्या प्राकृत उच्चाराप्रमाणें अक्षरें फोडून लिहिलेलीं आहेत. (७) वहीच्या लेखकाच्या ऱ्हस्व दीर्घ जोडाक्षरें व संस्कृत शब्द लिहिण्याच्या कल्पना अगदीं स्पष्ट व निश्चित आहेत; एकदां एक शब्द एका तऱ्हेनें व दुसऱ्या वेळीं निराळ्या तऱ्हेनें लिहिलेला आढळत नाहीं. (८) या वहींत दोन स्थळें वगळून कोठें हि ऱ्हस्व इकार नाहीं. (९) अभंगांचा अन्वय अर्थ लावतांना शब्दांची ओढाताण न करतां अर्थ बरोबर लागतो. (१०) वहींतील १७।१८।१९।२०।२२।३० येवढे च लेखकानें घातलेले पृष्ठांक शाबूत आहेत पण जेवढी वही आज शाबूत आहे तेवढ्यांत अभंगांचा क्रम उत्तम लागतो व असा क्रम सताजी शिवाय दुसरीकडे कोणत्या हि गाथ्यांत पहावयास सांपडत नाहीं. (११) ही वही खतावणी-सारखी बांधलेली आहे व (१२) या पोथीची जुनी बांधणी अद्याप शाबूत आहे. (१३) या वहींत अनुक्रमांक नाहींत. (१४) सध्यांच्या व तुकाराम-कालीन लिपींत, शब्दांत, जो फरक आढळून येतो. त्याची यादी प्रस्तावने-नंतर दिली आहे.

श्री. ह. भ. बाबासाहेब देहूकर इनामदार (नारायणबोवा गोसावीं) यांचे विद्यमान वंशज व मी महाराजांच्या जुन्या गाथ्यांचा शोध करीत होतों. त्या वेळीं पिढ्यानुपिढ्या वारकरी असलेल्या घराण्यांतील विद्यमान वंशज सख्या हरि

शिपी या आस्थेवाईक वारकरी गृहस्थांकडे पंढरीत एक जुनी वही सापडली. या वहीच्या मुखपृष्ठावर " भिजल्या वहींतील अभग " म्हणून लिहिलेले आहे. व आतील पृष्ठावर भिजल्या वहींतील अभग जुने–अभग असे म्हणून नकल करण्यास सुरवात हाते. ही नकल खतावणीसारखी केली नसून पुस्तकासारखी केली आहे. ही नकल ज्यानें केली आहे, त्याचे हातून अभग गळणें, वाचनाची चूक होणें, शब्दाचे आधुनिकीकरण होणे या चुका झाल्या आहेत. परतु सर्व वहीत त्यानें शब्द किंवा व्याकरणाचें रूप पालटले नाही. अभग गळले आहेत. पण खालीवर केले नाहींत. केव्हा हि पदरचा चरण–प्रचलीत असलेला चरण–घातला नाही आपण पूजेंतील भिजल्या वहीची नक्कल करीत आहोंत म्हणून जेवढा आदर मूळ ग्रथ जशाचा तसा उतरून घेताना नकलकराच्या ठिकाणीं असावा तेवढा त्याच्या ठिकाणी होता म्हणून मूळ वहीत 'बरें झालें देवा बाईल कर्कशा' हा चरण नाही तसा या नकलेंत हि नाहीं. या वहीत ११२ वा अभंग व मूळ त्रुटित वहींतील पहिला अभग हे बरोबर जुळतात व तेथपासून पुढे मूळ वहींत जेवढी पृष्ठें शिल्लक आहेत, तेवढ्या पुरते ते अभग या नकलेशी जुळते आहेत. क्रम हि तोच आहे. नक्लकारांच्या हातून अभग गळले आहेत, ही गोष्ट मूळ वहींतील पृष्ठे या वहींतील अभंगाशीं ताडून पाहिलीं तेव्हां लक्ष्यांत आलें, तसेंच पतिव्रते आनदमनी। हा अभंग या वहीत नकलकारानें कसा लिहून घेतला याचें मला आश्चर्य वाटते. ही नकल आजवर कोणास हि माहीत नव्हती. ज्यांनी साडेचार हजार अभंगांचा गाथा बनविला, त्यास या वहीचा सुगावा नव्हता व सख्या हरीस मी या वहीचें महत्त्व सागेपर्यंत कोणास कांहीं त्या वहीची कल्पना च नव्हती. ही वही जुनरी घोटीव कागदावर लिहिलेली आहे; पण लेखकाच्या अक्षराचें वळण तितकेसें रेखीव व घोटीव नाही. या वहीत ६७३ अभंग होईपर्यंतची नक्कल एका हातानें केलेली आहे. पुढें मागच्या च अभगाची पुनः नकल केलेली आहे. व इतर सताचे अभंग हि आले आहेत. त्यांतील द्विरुक्तीस सुरवात होईपर्यंतचे च अभग येथें छापले आहेत. या सर्व अभगांची नकल मूळ वहीच्या नकलेशीं ताडून पाहिली तेव्हा मूळ वहींतील कांहीं अभग नकल करून घेण्यास हा जुना नकलकार विसरला किंवा चुकला आहे असे आढळून आलें. तेव्हां मूळ वहीतून ते अभग जागच्या जागीं घातले

सन १९४७ उन्हाळ्याच्या सुटींत या अभंगांचें शब्दशः रूपांतर-स्पष्टीकरण–अन्तर्गत दुवा कोठें आहे, हें दाखविण्याच्या उद्देशानें मीं केलें. हा नक्‍लकार अभंग लिहून घेतांना कांहीं अभंग गाळतो असें लक्ष्यांत आले होतें म्हणून-छापील गाथ्यांतील उत्कृष्ट गाथ्या-( पंडित प्रत ) शीं या वहींतील प्रत्येक अभंग लावून पाहिला. हेतु हा कीं त्या ( पंडित ) प्रतींत चुकत माकत ज्या ओळी शाबूत आहेत, त्या पाहून त्यांतून कोठें कोठें या नक्‍लकाराच्या हातून गळलेले अभंग आढळले तर ते अभंग घ्यावेत. तसे कांहीं अभंग मला आढळले व ते मीं येथें घेतले आहेत. मूळ वहींतून नक्‍ल करतांना गळलेले अभंग मी पूर्वीं च जागचे जागीं उद्धृत केले होते. नंतर पंडित प्रतींतून कांहीं अभंग घेऊन, केलेलें रूपांतर मला थोडें फार सुधारतां आलें. हे सर्व अधिक अभंग सख्या हरीच्या वहीचा क्रम कायम रहावा म्हणून जेथें अभंग ज्यास्त घालावा लागे तेथें अ. आ. असें म्हणून घाली. ही वही छापून काढण्याचें ठरल्यावर माझी नक्‍ल ही सख्या हरिच्या पूर्वजांच्या नक्‍लेपेक्षां केव्हां हि निःसंशय श्रेष्ठ आहे अशी खात्री होऊन मी माझ्या नक्‍लेंतील अभंगांचा अनुक्रमांक बदलला आहे. या ज्यास्त अभंगांची यादी ग्रंथाचे शेवटीं दिली आहे. तेव्हां ग्रंथाचें संशोधन व संपादन करतांना खरी अस्सल संहिता लोकांचे हातीं पडावी म्हणून जेवढी खबरदारी घेता आली तेवढी घेतली आहे. मूळ वहीतील अभंग पहिल्या प्रथम च या ग्रंथांत जशेचे तसे छापले जात आहेत. त्यांत हि मीं प्रचलीत लिपी वापरली आहे. रूपांतर करून खालीं सारांश देऊन स्पष्टीकरण देत आहें. तेव्हां अभंगांचा अर्थावबोध होण्यास अडचण होणार नाहीं म्हणून व्याकरणाची–जोडाक्षरांचीं रूपें जशींचीं तशींच ठेविलीं आहेत. मुख या बद्दल मुप हें मुळ वहींतील रूप दिलें नाहीं, मुख असा च शब्द येथें दिला आहे.

असो, अभगांच्या ओळीबद्दलच्या विवेचनाचा सारांश देऊन प्रस्तावनेंतील हें प्रकरण संपवितों.

( १ ) तुकोबाराय स्वहस्तें अभंग लिहीत होते याबद्दल संशय घेण्यास जागा नाहीं.

( २ ) स्वहस्तें अभंग लिहिलेल्या वह्या डोहांत बुडविल्या होत्या याबद्दल वाद नाहीं.

( ३ ) या वह्या तरल्यावर ठिकठिकाणचे लोक येऊन त्यांच्या नक्‍ला करून नेत होते असें विधान महिपतीबोवांनीं केलें आहे.

( ४ ) त्याप्रमाणें पंढरपुराच्या एका वारकऱ्यानें एका वहीची करून नेलेली नकल, भिजल्यावहींची नकल, म्हणून आतां छापीत आहें.

( ५ ) संताजी तेली जगनाडे व गंगाराम मवाळ, हे दोघेजण अभंग लिहून घेत असत असे महिपतीबोवांनीं नमूद केलें आहे.

( ६ ) संताजीच्या दोन त्रुटित वह्या भावे यांनीं प्रसिद्ध केल्या आहेत. संताजीच्या वह्या चार होत्या अशी भावे यांना माहिती कळली होती तेव्हां इतर वह्यांचा शोध झाला पाहिजे.

( ७ ) गंगाराम मवाळ यांच्या संग्रहीं असलेल्या अभंगांच्या वह्यांचा अद्याप कांहीं च तपास लागला नाहीं. त्याप्रमाणें इतर टाळकऱ्यांच्या सग्रहीं जे थोडे फार अभंग असतील त्यांचा हि आजवर कांहीं शोध झाला नाहीं, लागला नाहीं.

(८) बुडविल्या वह्यांचा हि आजवर कांहीं शोध लागला नाहीं. त्या वह्यांवरून केलेल्या नकलांचा हि कांहीं शोध झाला नाहीं.

(९) साडेचार अभंगांचा गाथा कोणी व केव्हां निश्चित करून प्रचलीत केला याचा शोध कोणीं केला नाही. परंपरेप्रमाणें हा मोघम शब्द प्रत्येक जण वापरीत आला आहे.

(१०) साडेचार अभंगांचा गाथा परंपरागत मान्य होता म्हणून प्रत्येकानें म्हटलें होतें तरी हि तुकाराम तात्यांस ८४४१ अभंगांची एक प्रत मिळून छापता आली.

(११) तुकोबारायांची अपार कवित्व शक्ति होती. त्यांनीं नामदेवरायांची बाकी फेडली म्हणून प्रसिद्धि आहे तेव्हां तें कवित्व साडेचार हजार किंवा आठ हजार अभंगापुरतें च होतें असें म्हणण्यास सबळ कारण नाहीं.

(१२) साडेचार अभंगांचा गाथा तयार झाल्यावर त्याच्या नकलांच्या प्रतींची तुलना करून कांहीं ओळी निश्चित करतां येतील असें मला वाटत नाहीं.

(१३) परंतु ज्या इतर वह्या बुडविल्या त्यांचा किंवा त्यांच्या नकलांचा शोध झाला पाहिजे.

( १४ ) त्यांत संताजीच्या वह्याप्रमाणें किंवा या वहीच्या ओळीप्रमाणें ओळी सांपडल्या पाहिजेत.

( १५ ) असल्या नकलांच्या वह्या निर्याणानंतरच्या २५।३० वर्षांच्या काळांतल्या सांपडल्या तर महाराष्ट्राचें निजधन हातीं येईल, सध्यां तरी आपल्या पूर्वजांच्या हलगर्जीपणानें, उदासीनतेनें तें धन आपण गमावून बसलों आहोंत.

# चरित्र



*माऊली श्रीमंत संत जगद्गुरु तुकोबाराय महाराज यांस त्यांच्या भक्तांनीं* विचारिलें कीं "माउली, आपण तर शुद्र वंशांत जन्मलेले, व्यवसायानें वाणी असें असून आपल्या ठिकाणीं ही हरिभक्ति उपजली कशी? आपणास या विठ्ठलाच्या नामाची आवडी कशी उत्पन्न झाली? आपले सद्गुरु आपणास कसे भेटले? आपणास कवित्व स्फूर्ति कोठून व कशी झाली? आपणांस प्रत्येक वेळीं नवे नवे विचार कोण सुचवितो? आपण ग्रंथाध्ययन, शास्त्रसंशोधन, भाषाशास्त्र, व्युत्पत्ति, योग, कांहीं याग, असें जें कांहीं केलें असेल तें आम्हांस मोकळेपणानें कृपाळू होऊन सांगावें. कारण, आम्हांस असें खरें च वाटतें कीं, आम्ही आपल्यासारखे हरिभक्त व्हावें. पण तें कांही जमत नाहीं. आपणास आम्ही लहानपणीं आमच्या च सारखे वागतांना पाहात होतों. आपलें स्थित्यंतर आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहात आहोंत. पुराणांतरीं कोणी हजार पांचशें वर्षें तपश्चर्या केली, मग इंद्राला त्या तपश्चर्येचा धाक पडला, त्यानें तपश्चर्येचा भंग करण्यास्तव उर्वशीसारख्या अप्सरा पाठवाव्यात, त्यान्या तपश्चर्येचा भंग करवावा, त्यास त्याच्या तपश्चर्येचें फळ हातीं लागूं नये, तपश्चर्या सिद्धीस जाऊं नये, असले दाखले पुराणिक पोथी सांगतांना आम्ही ऐकतों. पण आपण तर "याची देहीं याची डोळां भोगूं मुक्तीचा सोहळा"। मुक्ताबाईशीं मी लग्न लाविलें आहे, माझ्या घरीं–वेदांत पाणी वाहतो, "ब्रह्मरस पिका आला," म्हणून सांगतां, आम्ही ऐकतों. आपला भक्तीचा कळस झालेला आम्ही पहातों, तेव्हां–इतर पुराणांतरींचे दाखले नकोत, पूर्वीच्या सत्पुरुषांच्या रम्य गोष्टी नकोत, आपण आपलें चरित्र आम्हांस एकवार सांगा म्हणजे आपल्या सहज बोलण्यांत तुम्हां आम्हांत फरक कोठें पटत गेला तें लक्ष्यांत येऊन आम्हांस हितोपदेश होईल."

"*आत्मचरित्र सांगणें हें एक अवघड काम आहे. त्यांत आपण निराळा मार्ग कसा* काढीत गेलों, तुम्हांस ज्या गोष्टी रम्य वाटून समाधान वाटे, त्यांतून माझें मन कसें सुटलें–हें सांगूं जावें–तर चर्चेला–विचाराचा फाटा फुटण्यास वाव होते, त्यांत कोणास आत्मश्लाघा वाटते. बरें त्या गोष्टी सांगूं नयेत तर जीवाच्या कळवळ्यानें आलेल्या आर्त माणसाची फसवणूक केल्यासारखें व्हावयाचें. अशा या गडसंदीच्या अवघड स्थितींत ६१७ अभंगांत तुकोबांनी आपलें चरित्र सांगितलें आहे. त्यांतील कांहीं अभंग या छापलेल्या भिजल्या वहींत

आले आहेत. ( अभंग १७७–१८१ ) (१)–याती शुद्र वैश्य केला वेवसाव (२) ऐका वचन हे सत (पं १३३३–४) हे दोन अभग या वहींत आले नाहींत, पण हे दोन अभग, येथें आलेले पांच अभंग, असे हे सात आत्मचरित्रपर अभग तुकोबांच्या चरित्राचा पाया समजण्यास कांहीं हरकत नाहीं. स्वतःच्या स्तुती-पर शब्द उच्चारूं नये; ती आत्मश्लाघा होते. पण प्रश्न विचारणारांचा भाव शुद्ध आहे. आर्तता खरी च आहे असें पाहून तुकोबा म्हणाले कीं–

**॥ नये बोलों परी पाळीलें वचन। केलीयाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥**

तुम्ही शुद्ध भावानें, खऱ्या अवस्थेनें प्रश्न विचारला आहे. तेव्हां तुमचें वचन पाळावें म्हणून मी चार शब्द बोलतों. एरव्हीं ही गोष्ट बोलूं नये अशी आहे. हे सहासात अभंग उभयपक्षीं उत्कट शुद्ध भावनेच्या अवस्थेंत स्फुरलेले असल्यामुळें ते साहजिक च मोठे उद्बोधक व अर्थपूर्ण असे आहेत; त्यांतील प्रत्येक चरण हा महाराजांच्या सिद्धपथाचा एकेक टप्पा आहे. त्यांतील प्रत्येक शब्द स्थानापन्न आहे, आत्मचरित्राची फलश्रुति ॥

**॥ भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा। कृपावंत ऐसा कळो आलें ॥**

अशी आहे. नये बोलों असें म्हणून आत्मचरित्र सांगण्यास जी सुरवात झाली. तो ओघ हि ॥

**॥ वीस्तारीं सांगतां बहुत प्रकार। होईल उशीर आतां पुरे ॥**

असें म्हणून तुकोबांनीं आवरला आहे. तात्पर्य हें कीं, हे आत्मचरित्र अति संक्षिप्त आहे. तरी हि जिज्ञासु माणसास या चरित्रापासून वर वर्णिलेली फलश्रुति लाभेल या बद्दल शंका नको. चरित्र विस्तारपूर्वक सांगावयास लागलों तर त्याचे बहुत प्रकार होतील. तेव्हां आतां पुरे असें म्हणून तुकोबांनीं लेखणी आवरण्याचें कारण असें कीं, अभंग जे स्फुरत आहेत, ते एकप्रकारें प्रकट चरित्र कथन च आहे. ही गोष्ट या समोरच्या मूर्तीस ज्या अर्थी उमगली नाहीं तेव्हां आपण स्वचरित्र अभंगांत कसें सांठविलें आहे, तें विस्तारशः सांगावें लागलें असतें. तसें न करितां या सहा सात अभंगांत चरित्राची रूपरेषा सांगून ठेवावी व ती जो नीट आकलन करील तो सर्व अभग कोणत्या दृष्टीनें पहावयाचे यावर नजर ठेवील या उद्देशानें हे सहा सात अभंग झाले असावेत.

तुकोबारायांचा जन्म देहू गांवीं मोरे यांच्या कुळींत बोल्होबाचे पोटीं झाला. बोलोबास पुत्र तीन. वडील सावजी, मधले तुकोबा व धाकटे कान्होबा.

बोलोबांचे कुळांत विठोबा–रखुमादेवींची उपासना, पंढरीची वारी व वैश्यवृत्ति होती. हें घराणें संपन्न असावें. कारण या घराण्यांत महाजनकीचें वतन वडिलोपार्जित होतें, व त्याची खूण म्हणून या घराण्यांतील पुरुष सही करतांना निशाणी तागडी लावीत, शिवाय घरांत विठोबारखुमाईचें मंदिर होतें. तुकोबारायांचा जन्म केव्हां झाला याची निश्चित तिथि मास व वर्ष हें सांगतां येत नाहीं. त्याबद्दलचे वाद पुष्कळ आहेत. परंतु, त्यांतून फलनिष्पत्ती कांहीं झाली नाहीं. वादे वादे जायते तत्त्वबोधः असें एक वचन नेहमीं उच्चारलें जातें पण तुकोबारायांच्या जन्मशकाबद्दलच्या गुरूपदेशाच्या शकाचा व निर्याणाच्या शकाचे वाद–अद्याप अनिर्णीत आहेत. तात्पर्य, वरील वचन तुकोबांच्या चरित्रापुरतें निरुपयोगी आहे. हे वाद एखादा जुना अस्सल कागद सांपडेल तेव्हां तुटतील. एरव्हीं तर्कानें तर्क वाढवून कोटीवर कोटी लढवून कितीं हि लिहिलें तरी तें लिहिणें भरभक्कम पायांवर आधारलेलें नसल्यामुळें (तर्काच्या तरंगावर उभारलेलें असल्यानें) निरुपयोगी आहे. गुरूपदेशाची मिति माघशु. १० गुरुवार हा योग शके १५४१ व शके १५६१ ला येतो. महाराष्ट्रांत दुष्काळ पडला तीं वर्षे १५५१।१५५२ हीं आहेत. त्यानंतरचा माघशु. १० गुरुवार हा योग १५६१ ला येतो. तें च वर्ष गुरूपदेशाचें मानावें असें वाटतें. पांगारकरांनीं १५५४ हें वर्ष दिलें आहे. त्याबद्दल सूक्ष्म गणित केल्याचें म्हटलें आहे. तुकोबारायांनीं येवढें सूक्ष्म गणित केलें असेल, त्यांस त्यावेळीं तसें सूक्ष्म गणित करण्यास साधनाची अनुकूलता होती असें वाटत नाहीं. निर्याणाचा शक १५७१ फाल्गुन वद्य २. या दिवशीं सोमवार येत नाही, शनिवार येतो. परंतु साधारणपणें विचार करतां माणसांच्या लक्ष्यांत वर्ष महिना तीथ राहते. वार तेवढा राहत नाहीं. तेव्हां शके १५७१ फाल्गुन वद्य २ शनिवार विरोधीनाम संवत्सरे हा शक निर्याण शक मानावा असें वाटतें. संतलीलामृतांत महिपतीबुवा ताहराबादकर यांनीं तुकोबारायांचें चरित्र रसाळ भाषेंत गाइलें आहे. महिपतीबुवांनीं त्यांना त्यावेळीं मिळवितां आली ती सर्व परंपरागत माहिती मिळवून चरित्र लिहिलें आहे. बहुतेक सर्व चरित्रकारांनीं आपापल्या आवडी नावडीप्रमाणे ती च माहिती रंगवून निरनिराळीं चरित्रें लिहिलीं आहेत. तुकोबारायांच्या चरित्राचा पाया त्यांचे अभंग होत. असें प्रत्येक लेखकानें वरकरणी म्हटलें आहे. पण प्रत्येक अभंगांतून चरित्र गोळा करण्याचें अवघड काम आजवर कोणीं केलें नाहीं. तेव्हां तसा प्रयत्न यापुढें करून पाहूं.

(पं.१३३३) याती शुद्र, वैश्य व्यवसाय। आदि तो हा देव कुळपूज्य। ही परंपरा बोलोबांची चालू होती. या परंपरेप्रमाणें, बोलोबांचें वय होत चाललें, तेव्हां मुलांनीं व्यवसाय संभाळावा व आपण हरि हरि म्हणत स्वस्थ बसावें. अशी बोलोबास इच्छा झाली. वडील मुलगा सावजी हा संसाराची धुरा अंगावर घेईना, सावकारींतील वैश्यव्यवसायातील दगदग व लटपट तो पत्करीना. तेव्हां तुकोबांनीं तें काम अंगावर घेतलें, व आईबापांच्या देखरेखीखाली तुकोबा वैश्य व्यवसाय करूं लागले. या वेळीं बोलोबांच्या घरांत ती नवरा बायको, सावजी व त्याची बायको, तुकोबा व त्यांची बायको रुक्मिणी, कान्होबा व त्याची बायको येवढी मडळी असावीत. तुकोबा व्यवसाय करू लागल्यावर थोड्या दिवसांत त्यांना त्यांतील खाणा–खुणा डाव-पेंच समजून ते तुकशेट या पदवीस चढले. या सुमारास तुकोबांच्या बायकोस रुक्मिणीस धापेची व्यथा आहे असें दिसून आलें. तेव्हां उत्साही व कर्तृत्ववान मुलास संसारांत उदास वाटूं नये म्हणून पुण्याच्या आप्पाजी गुळवे सावकारांची मुलगी मागणी घालून बोलोबांनी नवी सून करून आणली. ही च प्रसिद्ध आवली किंवा जिजाई होय. सवत जीवंत असतांना पुण्याच्या संपन्न सावकारांनीं आपली मुलगी दुसरेपणावर दिली यावरून तुकोबांच्या घराण्याची सांपत्तिक स्थिति त्यावेळीं चांगली च असावी, व तुकशेट मोठे हिंमतवान सावकार असावेत. यावेळीं इष्ट, मित्र, गण गोत यांचे तोंडून तुकाशेट व्यवसायांत दक्ष आहेत, असें ऐकून बोलोबांस सुख होई. पण ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं. अशा संसाराच्या सुखांत बोलोबाचा काळ झाला. तुकशेट यांस डोक्यावर विचारण्यास वडील होते हा मोठा आधार वाटे, त्यामुळें या मृत्यूच्या घाल्यानें त्यांचें चित्त दुखावलें. पण झाली गेली गोष्ट कांहीं परत येत नाहीं या विचारानें तुकशेट संसार–सावकारी नीट चालवीत होते. त्यांत च या च सुमारास सावजीची बायको निवर्तली म्हणून तो उदास होऊन तीर्थयात्रेस निघून गेला. या च सुमारास आई हि गेली असावी. कारण पुढील चरित्रांत आईचा उल्लेख कोठें च येत नाहीं. अशा तऱ्हेनें तुकशेट वाणी व त्यांच्या दोन्हीं बायका, रुक्मिणी व आवली ऊर्फ जीजाई व रुक्मिणीचा मुलगा संतु असा तुकशेट यांचा संसार होता. तुकशेट संसार दक्षतेनें करून थोडीफार पुंजी गोळा करूं लागून त्यांची भरभराट होत होती. या च सुमारास महाराष्ट्रभर दुर्गादेवी या नांवाचा भयंकर दुष्काळ पडून सर्वत्र हाःहाःकार झाला. हीं वर्षे शके १५५१।५२ हीं होत. त्यांत च आई गेली, बाप गेला. भावजय गेली म्हणून

भाऊ घर सोडून गेला भरभराटीचा म्हणून जो काळ सुखाचा त्यावेळीं वाटत होता–त्यानें पुढें सतपणाची जोड झाल्यावर तुकशेट तुकोबा झाल्यावर त्यानीं वर्णन खालीलप्रमाणें केलें आहे. अर्थात् वैराग्यानें ससार कटू वाटू लागल्या-वरचें हें वर्णन आहे एवढी गोष्ट जमेस धरून खालील वचनें पहावयाचीं आहेत. तुकशेट दोन्ही बायका सुखानें नांदवीत होते त्याबद्दल पुढें आपल्या गत आयु ष्याकडे वळून पाहून तुकोबाराय म्हणतात —( प १२३७ )

॥ एका पुरुषा दोघी नारी। पाप वसे त्याचे घरीं ॥ १ ॥
॥ पाप न लगे धुडावे। लागेल तेणे तेथे जावें ॥ धृ ॥
॥ कांहीं दुसरा विचार। न लगे करावा चि फार ॥ २ ॥
॥ असत्य जे वाणी। तेथे पापाची च खाणी ॥ ३ ॥
॥ सत्य बोले मुखें। तेथें उचंबळतीं सुखें ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे दोन्ही। जवळी च लाभ हानी ॥ ५ ॥

सावकारीचा, देण्या–घेण्याचा तुकशेट वाणी याचा जम चागला बसला होता म्हणून तुकशेट याची स्तुति–इष्ट–मित्र–गण–गोत बोलोबास ऐकवीत होते व त्या स्तुतीच्या श्रवणाने बोलोबाच्या कानाचें पारणें फिटे पण तुकशेट याच्या मीपणाबद्दल तुकोबाराय म्हणतात —( प २८३४ )

लक्ष्मीमदें मातें घडल महादोप। पत्नी दोन्ही भेदाभेद ॥
पितृवचन घडली अवज्ञा अविचार। कुटिल कुचर वादी निंद्य॥
× × ×
भूतदया उपकार नाही शब्दाधीर। विषयीं लपट हीन ॥

मोठ्या नेकीनें चालविलेला ससार दुर्गादेवीच्या दुष्काळात सुखाच्या ऐवजीं दु:खास कारणीभूत झाला याबद्दल तुकोबा समोरच्या श्रोत्यास सागतात कीं —

१३३३ संवसारें जालों अति दु खे दु खी। मायबाप सेखीं क्रमीलीया॥
दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दु खे। वेवसाव देखें तुटी येतां॥

हें च वर्णन पुढील ( १३३४ ) व्या अभगात आलें आहे

बहु पीडीलों सवसारें। मोडी पुसे पीटी मेलीं ढोरें।
न पडतां पुरें। या विचारें राहिलों ॥
सहज सरले होते कांहीं। द्रव्य थोडें बहु त ही॥
× × ×
प्रिया पुत्र बधु। यांच्या तोडीला संबधु ॥

सहज जालों मंद्। भाग्य हीन करंटा ॥
तोंड न दाखवें जना। गिरि सांदी भेर राणां ॥
एकांत तो जाणा। तयासाठीं लागला ॥
पोटें पीटिलों काहारें। दया नाहीं या विचारें ॥

वर जे उतारे दिले आहेत ते स्वचरित्राचें सिंहावलोकन आहे व त्यांतल्या त्यांत संतांनीं मुद्दाम विनयपूर्वक सांगितलेलें व्यवसायी संसारिकाचें वर्णन आहे. तेव्हां तें चित्र थोडें फार भडक रंगवलें असण्याचा संभव आहे. वरील उताऱ्यात स्वदोषांची निंदा थोड्या अतिशयोक्तीनें केली नसेल असें मला म्हणवत नाहीं. दोन जिवंत बायकांना नांदवितांना त्यांच्यांतील मत्सरास सांभाळण्यासाठीं ह्या दादल्यानें जेवढी लपंडाई—खरें खोटें करावयास हवें तेवढें तुकशेट करीत होते, असें आपण गृहीत धरूं. कर्तृत्ववान मनुष्य उमेदीनें, धिटाईनें, उर्दा टाकून व्यापार करीत असतांना, ज्यांच्या नाड्या थंडावल्या आहेत, अशा वडिलांचें जेवढें वचन मोडतों. तेवढी तुकशेट पितृवचन मोडून अवज्ञा करीत होते असें हि आपण गृहीत धरू. पण त्यावेळच्या रीतिरिवाजाप्रमाणें त्यांनीं नांव व भूषण मिळविलें होतें. ही हि गोष्ट आपण जमेस घेऊं. अशा मनुष्यास स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली. व पोटें पीटिलो काहारें या गोष्टी केव्हां हि जिव्हारीं लागतील च. तशी ती तुकशेट यास जिव्हारीं जखम झाली असावी. तेव्हां कोणाशीं संबंध नको. असें वाटून एकांत आवडावा हें सहज आहे. अशा एकांतांत असतांना आपलें काय व कोठें चुकलें हा विचार कोणी हि करणार च. मनुष्य अशा तऱ्हेनें आपली चूक शोधीत असतांना, आपण उत्साहानें ज्या ज्या गोष्टी केल्या त्या त्या कोठें—घसरल्या—फसल्या सिद्धीस कां गेल्या नाहींत, या सर्वांचें कारण दुष्काळ हें लक्ष्यांत आल्यावर हा दुष्काळ निवारण करणें हें कांहीं माझ्या हातचें नाहीं—हा दुष्काळ कांहीं मी आणला नाहीं तेव्हां दुष्काळें आटीलें द्रव्य नेला मान, स्त्री एकी अन्न अन्न करीतां मेली, याबद्दल एकवार बुद्धिनिश्चय झाल्यावर, परंपरागत समजुतीप्रमाणें, ईश्वरी क्षोभानें, ही अवनत अवस्था आली आहे, असें पटल्यावर, लज्जा वाटे जीवा। त्रासलो या दु.खें। वेवसाय देखें तुटी येतां-ही अवस्था प्राप्त झाली. तेव्हां घराण्यांत परंपरेनें आलेलें (१) हरिनाम (२) पंढरीची वारी व (३) विठोबा रखुमाईचें देऊळ होतें इकडे तुकशेट यांची दृष्टि वळली. तेव्हां खालील शब्दांत नव्हे (कारण ही शब्दरचना—पुढें देशाउर झाल्यानंतरची आहे.) पण खालील अभंगांत जो अर्थ सांठवला आहे त्या अर्थानें तुकशेट यानीं देवास म्हटलें

असावें कीं-बा पंढरीनाथा–तुम्ही उभयतां आमच्या घराण्याचें सात पिढ्या संरक्षण करीत आहांत. माझी स्थिति अति बिकट झाली आहे–यांतून बाहेर पडण्याचा मला तर मार्ग दिसत नाहीं. जो जो उपाय करावा, तो तो अपाय होतो, तेव्हां बा-मी तुला शरण आहे ही स्थिति तुम्ही आणली आहे. तेव्हां तीं कशी निवारावयाची तें तुम्ही पाहून घ्या. मी परंपरेनें आलेलें तुमचें नाम गाईन, नाम घ्याईन. हा संसाराचा भार माझ्यानें पेलवत नाहीं. यावेळीं तुकशेट यांनीं खालील शब्दांनीं नव्हे पण या अवस्थेनें विठोबास म्हटलें असावें कीं:—(पं. ३६३१)

**॥ माझीये बुद्धीचिया खुंटला उपाव। करसील काय पाहेन तें ॥ १ ॥**
**॥ ध्रु ॥ सूत्रधारी तूं हें सकळ चाळीता। कासया अनंता भार वाहों ॥ध्रु॥**
**॥ वाहीले संकल्प न पवती सीद्धी। येऊं देह बुद्धी वरी नये ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे दुःखीं करीती तरंग। चिंतू पांडूरंग आवरूनी ॥ ३ ॥**

मनांत जे निरनिराळे तरंग येऊन दुःख होई, तें निवारण्यास्तव आपण केलेले सर्व उपाय निरुपयोगी झाले असें पाहून–वाहीले संकल्प न पवती सीद्धी। अशी स्थिति झाली असतांना करशील काय पाहेन तें। असें म्हणून देवावर भार घालून तुकशेट स्वस्थ झाले. तेव्हां देवानें उपाय करण्यास सुरवात केली. देवा: पहिली गोष्ट केली ती ही कीं,

**देवाचें देऊळ होतें तें भंगलें। चित्तासी जें आलें करावेसें ॥ ५ ॥**

देवाचें देऊळ भंगलें आहे. तसा च आपला संसार हि भंगला आहे. यांच्या संबंध कांहीं असेल काय, नसेल हि, पण आतां तें देऊळ स्वतः अंगमेहनत करून दुरुस्त करावें. अशी च वृत्ती–अशा च मनाच्या स्थितींत Saint Francis of Assissi या संतास आली होती. परंपरेनें चालत आलेलें हरिनाम घ्यावें व तें घेत घेत देवाचें देऊळ दुरुस्त करावें असा हातापायांस व वाणीस व्यवसाय सुरू झाला. यापूर्वीं परंपरेनें आलेली एकादशी तुकशेट पाळीत होते. हरिकीर्तनास हि जात होते. परंतु संतवचनें पाठ करावीं. त्यांचा अभ्यास करावा अशी बुद्धि झाली नव्हती. परंतु मुखीं नाम वास करूं लागल्यावर पुढची पायरी आपोआप पुढें आली ती ही कीं:—

**॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें। वीश्वासें आदरें करूनीयां ॥**

हीं वचनें नीट पाठ व्हावींत, त्यांचा भाव मनीं नीट ठसावा म्हणून

॥ गातां पुढें त्यांचे धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करूनीयां ॥

—तुकोबांनीं विश्वासानें व आदरानें संतांचीं कांहीं वचनें पाठ केलीं. या वचनाचा आधार घेऊन के. ल. रा. पांगारकर यांनीं तुकोबांचें ग्रंथाध्ययन असें एक सहासष्ट पृष्ठांचें रसभरीत प्रकरण लिहिलें आहे. पण देहूसारख्या ठिकाणीं येवढे ग्रंथ त्यावेळीं मिळणें शक्य होतें का ? बरें ग्रंथ होते असें जरी मानलें तरी ते ग्रंथ तुकोबांस वाचावयास मिळण्यासारखे होते का–? कोणी वाचूं दिले असते का ? ग्रंथाध्ययन करण्याजोगें तुकोबांचें बाल वय होतें का ? जाती वगैरे मनांत न आणतां ग्रंथांतील रहस्य उकलून सांगतील असे महात्मे देहूच्या आसपास कोणी होते का ? या गोष्टींचा पांगारकरांनीं विचार करावयास हवा होता. पण यांपैकी एक हि विचार त्यांना शिवला नाहीं. अभंगांत आलेल्या विचारासारखा विचार एखाद्या ग्रंथांत आलेला पाहिला कीं तो ग्रंथ तुकोबांनीं अभ्यासिला होता, असें म्हणण्यास पांगारकर तयार !! सुमारें १००।१२५ वचनें अभंगांत व बायबलमध्यें सारखीं आहेत. एवढ्यानें तुकोबा बायबल शिकले होते असें का म्हणावयाचें ? अध्यात्माचा विचार करूं लागावें तों कांहीं श्रुतींच्या वचनांप्रमाणें अभंगांचे चरण सांपडतील, यावरून तुकोबांनी उपनिषदांचा अभ्यास केला होता असें का म्हणावयाचें ? शिवाय कांहीं पाठ केली यापेक्षां, विश्वासें आदरें करूनीयां, हें चरण जास्त महत्त्वाचें आहे. तुकोबांनीं पाठ केलीं अशीं जीं "कांहीं" वचनें असतील, तीं निवडक असतील. वचनें नारायणाची जोडी करून देणारीं असतील हें खरें, पण तीं वचनें कांहीं म्हणजे थोडीं च होतीं ही गोष्ट आपण केव्हां हि दृष्टीआड करून उपयोगी नाहीं. थोडीं याचा अर्थ केव्हां हि पुष्कळ असा होत नाही. ग्रंथाध्ययनाबद्दल तुकोबांचें मत काय होतें तें त्यांनीं भरणेकऱ्यास उपदेश केला तेव्हां पहिल्या च वाक्यांत "नको कांहीं पडो ग्रंथाचीये भरी" असें निश्चित सांगितलें आहे. तेव्हां समग्र साडेचार हजार अभंगांत ग्रंथाध्ययनाबद्दल आलेले सर्व उल्लेख येथें उद्धृत करीत नाहीं पण येथें छापलेल्या या भिजल्या वहींतील उल्लेख (अभंग ४२३-४२६) येथें आले आहेत ते विचारांत घेतले पाहिजे. ४२३ अभंगांत तुकोबा म्हणतातः—आपण पाठांतर करावयाचें तें असें करावयाचें की, तीं वचनें करुणापर असावींत, त्या वचनांत देव प्रत्यक्ष भेटावा, त्या वचनांनीं कैवल्याच्या सोज्वळ वाटा स्पष्ट व्हाव्यात, व त्या पाठांतराचा उपयोग ती जोडी मला व्हावी असा हेवा उत्पन्न करण्यास व्हावा..या पुढील अभंगांत स्पष्ट म्हटलें आहे कीं:– ( ४२४ )

॥ पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं। नाहीं ऐसी मती अर्थ कळे ॥

शिवाय ग्रंथाध्ययन केलें तर

अंगासी एखादा येईल प्रकार।

तेव्हां पुढील अभंगांत म्हणतात का ( ४२६ )

॥ तुका म्हणे बहु सांडीयली मतें। आपुल्या पुरतें धरूनी ठेली ॥

तेव्हां मतांतरें गोळा न करितां अभंग ४२३-४२६ या वचनांस धरून तुकोबांनीं कांहीं पाठ केलीं संतांचीं वचनें, वीश्वासें आदरें करूनीयां। हीं तुकोबांनीं पाठ केलेलीं वचनें कोणतीं असावीत हें समजणें केव्हां हि तुकोबांच्या चरित्र-लेखनास अत्यंत अवश्यक आहे. तीं वचनें अभंग ४२३ च्या कसोटीस उतरलीं पाहिजेत. सध्यां तीं यादी आपणास उपलब्ध नाहीं. परंतु पूर्वीच्या संतांच्या वचनांतून कांहीं वचनें त्यांनीं विश्वासें आदरें पाठ केलीं हा चरित्रांतील एक टप्पा आहे. हरिपाठ ( ज्ञानेश्वर ), श्रीज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पासष्टी, श्रीज्ञानेश्वर अभंग-निवृत्तिनाथ-अभंग, नामदेवराय (अभंग), जनाबाई ( अभंग ), एकनाथ, भागवत रामायण, अभंग-व कबीर यांच्या वचनांचा तुकोबारायांच्या मनावर पुष्कळ च संस्कार झाला असणार. ग्रंथांचे इतर पढीक विद्वान व तुकोबा यांत मुख्य फरक विश्वासें आदरें व भावें चित्तशुद्ध करोनिया। या वृत्तींत आहे. तुकोबारायांनीं विश्वासें आदरें पाठ केलेल्या वचनांचा संग्रह आज तरी काळाच्या उदरांत गडप झाला आहे, पण यदाकदाचित् तसा हस्तलिखित संग्रह, त्यांनीं वापरलेले ग्रंथ, कदाकाळीं उपलब्ध होतील, तर त्या वचनांच्या आधारें किती तरी अभंगांचा अर्थ स्पष्ट होईल ! सध्यां त्याबद्दल अनुमान च केलें पाहिजे, पण तें अनुमान असें केलें पाहिजे की, आज तुकोबांचे जे अभंग उपलब्ध आहेत, तें ज्या वचनांचें फळ शोभेल अशीं बीज-वचनें तुकोबारायांनीं आपल्या मनोभूमींत रुजत घातलीं असावीत. तीं वचनें कोणतीं असावींत अशा विचारानें पूर्वीच्या संतांचे ग्रंथ आपण जरूर पाहावे.

तेव्हां माझीया बुद्धीचा खुंटला उपाव। असें म्हणूनें तुकोबांनीं जेव्हां घरच्या कुळदेवतेस-करशील काय पाहेन तें। असें म्हटलें-व देवावर भार घालून राहिले. तेव्हां हरिमुखें म्हणा-हरिमुखें म्हणा। या ज्ञानराज माऊलीच्या उपदेशा-प्रमाणें तुकोबांचा आचार होता, हा आचार त्यांनीं ( १७९ )

॥ बोलावा वीठल पाहावा वीठल करावा वीठल जीवभाव ॥

असा पाळला. करावा वीठल जीवभाव । हें चरण मोठें च अवघड आहे, व त्याची साक्ष ज्याची त्यानें च द्यावयाची असते. पण हा आचार असा साच भावानें वागून संभाळला म्हणून काय झालें तें पुढील चरणांत त्यांनीं सांगितलें आहे.

॥ धृ ॥ येणे सोसें मन जालें हावभरी । परती माघारी घेत नाहीं ॥
॥ बंधनापासुनी उकलली गांठी । देतां आली मिठी सावकासें ॥
॥ तुका म्हणे देह भरीला वीठलें । कामक्रोधीं घर केलें रीतें ॥

संतांचीं वचने विश्वासाने व आदरानें पाठ करीत असतांना त्या ऐश्वर्यवंत वचनाचा प्रभाव दिसूं लागून तुकोबांचा आचार बदलला. त्यांनी स्वचरित्रपर अभगांत म्हटलें आहे कीं,

१३३३ ॥ गाती पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें चित्त शुद्ध करोनीयां ॥

भावें चित्तशुद्ध करोनीया । हा चरण विश्वासें आदरें करोनीया या चरणाचा च पाठचा भाऊ आहे.

॥ संतांचे सेवीलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली. ॥

या लाजेवर पुढें ३१४ अभंग झणझणीत च केले आहेत.

॥ टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवुनी ॥

हा उपकार शरीर कष्टवून कसा केला हें सांगतांना महिपतीबोवांनीं तुकोबांनीं एका वृद्ध ब्राह्मणीस तेल आणून दिलें. तें पुष्कळ दिवस पुरलें. तेव्हां गांवच्या सर्व च बायका आपली तेलाची बुधली व पैसे तुकोबांजवळ देऊं लागल्या, तुकोबा ते पैसे व बुधले गळ्यांत अडकवून तेल्याकडे जात; तेल्यापुढें ते पैसे व बुधले टाकीत. तेली ज्याचे जेवढे पैसे तेवढें च तेल अन्तर्ज्ञानानें प्रत्येक बुधल्यांत बरोबर भरी—असें मोठें चटकदार वर्णन महिपत्तीबुवांनीं केलें आहे. पण मला ही हरदासी कोटी आहे असें वाटतें. अंतरीं ज्ञानज्योती प्रकट होत असतांना मनुष्य गाफील—उदास व पिसा होतो कीं काय? तेव्हां तुकोबांस गांवच्या (महिपतीनें म्हटल्याप्रमाणें) बायकांनीं वेठीस धरलें असेल हें संभवत नाहीं. त्यांच्या ज्ञानांत जास्त जास्त स्पष्टता होत होती म्हणून ते केव्हां हि—एकावें जनाचें करावें मनाचें या वृत्तीचे होते म्हणून तुकोबा स्वचरित्रपर अभगांत पुढें सांगतात कीं,

वचन मानीलें नाहीं सुहृदाचें। समूळ प्रपंचे वीट आला ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही। मानीयलें नाहीं बहुमतां ॥

तुकोबा होयवा नव्हते ही गोष्ट त्यांनीं वचन मानिलें नाहीं सुहृदयाचें। या शब्दांत स्पष्ट सांगितली आहे. अत्यंत उत्साहानें संसार करीत असतांना आपल्या बुद्धीचे सर्व उपाव कुंठीत जालें, तेव्हां जो माझ्या जीवाचें सूत्र हालवीत आहे, तो आपलें काम कसें करतो हें पाहण्याचें काम कांहीं माझें नाहीं. तो मज व्हावा। तो मज व्हावा। अशी मला आतां आस लागली आहे-तेव्हां त्याचें काम तो करो-माझें काम मी करतों. अशा निश्चयानें तुकोबा वागत म्हणून संसारांत काय किंवा परमार्थांत काय, त्यांस कोणी कांहीं हि सांगून भुलवूं शकेल, कोणी कांहीं शिकवूं शकेल अशी स्थिति उरली नव्हती. त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं,

सत्य असत्यासी मन केलें ग्वाही। मानीयलें नाहीं बहुमतां।

' या एका वचनांत केवढा अर्थ सांठविला आहे! हें वचन बव्हंशीं ज्ञानेश्वर माउलीचे शिकवणीवर आधारलेलें आहे. श्रीज्ञानेश्वरीत नवव्या अध्यायांत खालील ओव्या आहेत.

म्हणौनि ज्ञान तें चि आंधारें। ज्ञानासि करिति ॥ १७०

* * *

आंधलेया गरुडाचे पांख आहाति। ते कोण्हाहि उपेगा जांती।
तैसें सत्कार्यांचे उपखे ठांती। अज्ञानां तैवी। ३०३।

* * *

ऐसे दीक्षीत जे सोमप। जे आपण चि यज्ञाचें रुप।
तींहीं तेया पुण्याचेनि नांवें पाप। जोडीलें देखे ॥ ३०६।
जे श्रुतीत्रयींतें जाणौनि। शतवेन्हीं यज्ञ करुनि।
यजियला हि मातें चुकउनी। स्वर्गु वरींति ॥ ३०७।
जैसें कल्पतरु तळवटीं। बैसोनि झोळीये पाडी गांठी।
मग निदेंॐ निगे किरीटी। दैन्य करूं ॥ ३०८।
तैसें शतक्रतु याजिले मातें। कीं इच्छितातीं स्वर्गादि सुखातें।
अतां हें पुण्य कीं निरुतें। पाप नोहे ॥ ३०९ ॥
म्हणौनि मजवीण पावीजे स्वर्गु। तो अज्ञानाचा का पुण्यमार्गु।
ज्ञानीये तेयातें उपसर्गु। हाणि म्हणती ॥ ३१० ॥

पऱ्हवीं तरी नरकीचें दु:ख । पाहूनि स्वर्गा नांव की सुख ॥
वाचूनि नित्यानंद निर्दोष । तें स्वरुप माझें ॥ ३११ ॥

मज येतां पै सुभटा । हा द्विविधु गा अव्हांटा ।
स्वर्ग नरक इया वाटा । चोरांचिया ॥ ३१२ ॥

स्वर्गा पुण्यात्मकें येईजे । पापे चि पापात्मकें जाइजें ॥
मग मातें चि जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥ ३१३ ॥

आणि मज चि माझि असतां । जेणे मी दूरी होये पांडुसुता ।
तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न झडे ॥ ३१४ ॥

*　　*　　*

मग तेया पुण्याची पाहुती सरे । सवें चि इंद्रपणाची उटी उतरे ।
आणि येवों लागती माघारे । मृत्यु लोका ॥ ३१५ ॥

जैसा माटीचा कवडा वेचे । मग द्वार ही चेपूं नेये तेयाचें ।
ऐसें लाजीरवाणें दीक्षीताचें । काइ सांघो ॥ ३१६ ॥

*　　*　　*

अर्जुना वेदु जऱ्ही जाला । तऱ्ही मी नेणतां वाया गेला ।
कनु सांडौनि उपणीला । कोंढा जैसा ॥ ३१९ ॥

*　　*　　*

येर मातें नेणौनि भजन । तें वाया चि गा आनीआन ।
म्हणौनि कर्मांचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवे ॥ ३४९ ॥

तसें च तेराव्या अध्यायांत खालील ओव्या आहेत:—

नीच आराधन माझें । कां जी कुलदेवतीं भजे ।
पर्व विशेषें भोजें । पूजा आन ॥ ८१४ ॥

• माझें आधिष्ठान घरीं । आणि वौरो आनाचे करी ॥
पितर कार्य अवसरी । पितराचा होए ॥ ८१५ ॥

एकादशीच्या दिसीं । जेतुला पाडु आमसीं ।
तेतुला चि नागासी । पंचमीसी ॥ ८१६ ॥

चौथि मोटकी पाहे । आणि गणेशांचा हि होए ।
चाउदसि म्हणें माए । तुझा चि वो दुर्गे ॥ ८१७ ॥

नवमीतें मांडी । आणि वैसे नवचंडी ।
आदित्यावारिं वाढी । भैरवा भरी ॥ ८१८ ॥

पाठीं सोमवार पावे । आणि वेलेंसि लिंगा धावे ।
ऐसें एकला चि आघवें । जोगावी जो ॥ ८१९ ॥

अखंड भजन करी । उगा न राहे क्षणभरीं ।
आघवेति गांवद्वारीं । ऐहेव जैशी ॥ ८२० ॥

तैसेनि जो गा भगतु । वेखासि सैरा धावंतु ।
जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतारु तो ॥ ८२१ ॥

याशिवाय अमृतानुभवांत खालील ओव्या आहेत.

आणि ज्ञानवंधु ऐसें । शिवसूत्राचेनि मिसें ।
म्हणितले असे । सदाशिवें ॥ प्र. ३।१६ ॥

आणि वैकुंठीचे हि सुजाणें । ज्ञानापाशीं सत्वगुणें ।
वांधिजे हे वोलणें । बहु केलें ॥ १७ ॥

परि शिवें कां श्रीवल्लभें । वोलीलें येणें चि लोभें ।
•मानु तें हि लाभे । न वोलतां हि ॥ १८ ॥

जें आत्मज्ञान निखळ । तें हि ये ज्ञानाचें वळ ।
तें सूर्य चिती सवळ । तैसे नोव्हे ॥

एऱ्हवीं तरी नरकीचे दुःख । पाहूनि स्वर्गा नांव की सुख ॥
वाचूनि नित्यानद निर्दोष । ते स्वरुप माझे ॥ ३११ ॥

मज येतां पै सुभटा । हा द्विविधु गा अव्हांटा ।
स्वर्ग नरक इया वाटा । चोरांचिया ॥ ३१२ ॥

स्वर्गा पुण्यात्मके येईजे । पापे चि पापात्मके जाइजे ॥
मग माते चि जेणे पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥ ३१३ ॥

आणि मज चि माझि असतां । जेणे मी दूरी होये पांडुसुता ।
ते पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न झडे ॥ ३१४ ॥

*　　　　*　　　　*

मग तेया पुण्याची पाहुती सरे । सवे चि इंद्रपणाची उटी उतरे ।
आणि येवो लागती माघारे । मृत्यु लोका ॥ ३२५ ॥

जैसा भाडीचा कवडा वेचे । मग दार ही चेपूं नैये तेयाचें ।
ऐसें लाजीरवाणें दीक्षीताचे । काइ सांघो ॥ ३२६ ॥

*　　　　*　　　　*

अर्जुना वेदु जऱ्हीं जाला । तऱ्ही मी नेणतां वाया गेला ।
कनु सांडौनि उपणीला । कोंडा जैसा ॥ ३२९ ॥

*　　　　*　　　　*

आतां आणीक संभ्रदाये । परी माते नेणाति समवाए ।
जे अग्नये इद्राय अर्यमणे सोमाय ॥ म्हणौनि भजतां ॥ ३४० ॥

तें हि कीर मातें चि होये । कां जें हें आघवें मी चि आहे ।
परि भजती उजिरी नोहे । विसम पडे ॥ ३४१ ॥

पाहे पां शाखा पल्लव वृक्षाचे । हे न्हवाति येका चि बीजाचे
परी पाणी घेणे मुळांचे । ते मुळीच घापे ॥ ३४२ ॥

का दाही इंद्रियें आथि । इयें जऱ्ही एकीची देहिचिं होति ॥
आणि इहीं सेविले विखम जाति । एका चि ठाया ॥ ३४३ ॥

तरी करूनि रसेयि वरवी । कानि केवी भरावी ।
फूल आणुनु बांधावीं । डोळां केवि ॥ ३४४ ॥

तेथ रसु तो मुपे चि सेवावा । परिमलु तो घ्राणे चि घेयावा ।
तैसा मी तो यजावा । मी चि म्हणौनि ॥

येर मातें नेणौनि भजन । तें वाया चि गा आनीआन ।
म्हणौनि कर्मांचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३४९ ॥

तसें च तेराव्या अध्यायांत खालील ओव्या आहेतः—

नीच आराधन माझें । कां जी कुलदेवतीं भजे ।
पर्व विशेषें भोजें । पूजा आन ॥ ८१४ ॥

माझें आधिष्ठान घरीं । आणि वौरो आनाचे करी ॥
पितर कार्य अवसरी । पितराचा होए ॥ ८१५ ॥

एकादशीच्या दिसीं । जेतुला पाडु आमसीं ।
तेतुला चि नागासी । पंचमीसी ॥ ८१६ ॥

चौथि मोटकी पाहे । आणि गणेशांचा हि होए ।
चाउदसि म्हणे माए । तुझा चि वो दुर्गे ॥ ८१७ ॥

नवमीतें मांडी । आणि वैसे नवचंडी ।
आदित्यावारिं वारी । भैरवा भरी ॥ ८१८ ॥

पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसि लिंगा धावे ।
ऐसें एकला चि आघवें । जोगावी जो ॥ ८१९ ॥

अखंड भजन करी । उगा न राहे क्षणभरीं ।
आघवेति गांवद्वारीं । ऐहेव जैशी ॥ ८२० ॥

तैसेनि जो गा भगतु । वेखासि सैरा धावंतु ।
जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतारु तो ॥ ८२१ ॥

याशिवाय अमृतानुभवांत खालील ओव्या आहेत.

आणि ज्ञानबंधु ऐसें । शिवसूत्राचेनि मिसें ।
म्हणितलें असे । सदाशिवें ॥ प्र. ३.१६ ॥

आणि वैकुंठीचे हि सुजाणें । ज्ञानापाशीं सत्वगुणें ।
बांधिजे हें बोलणें । बहु केलें ॥ १७ ॥

परि शिवें कां श्रीवल्लभें । बोलील येणे चि लोभें ।
मानु तें हि लाभे । न बोलतां हि ॥ १८ ॥

जें आत्मज्ञान निखळ । तें हि ये ज्ञानाचें वळ ।
तें सूर्य चिती सबळ । तैसें नोव्हे ॥

ज्ञानें श्लाघ्यतु आहे। तें ज्ञानपण धाडीले वायें।
दीप वाचूंन दिया लाहे। तें अंग भुलला चि कीं।

आपण चि आपणापाशीं। नेणता देशोदेशीं।
आपण पें गिवशीं। हें कीरु होय।

परिवहुता कां दिया। आपणापें आठवलिया।
म्हणे मी यया। कैसा रिझो॥

तैसा ज्ञानरुप आत्मा। ज्ञानें चि आपली प्रभा।
करीतसे सोहं मा। ऐसा बंधु॥

या शिवाय ज्ञानोबारायांचें ( १ ) कां सांडीसी गृहाश्रम। व ( २ ) घरदार वोखटे त्यजूं म्हणसि। हे व असले इतर अभंग हि तुकोबांनीं नीट मनन करून म्हटलें कीं:—

॥ सत्य असत्यासी मन केले ग्वाही। मानीयेले नाहीं बहुमतां॥

मानीयेलें नाहीं बहुमतां। ही गोष्ट तेव्हां आचरण्यास अवघड होती व आज हि अवघड च आहे. पण हा च तुकोबारायांचा दंडक होता. म्हणून ते परमार्थाच्या नांवानें शाक्त, संन्यासी, जटाधारी, कानफाटे, मलंग, महानुभव, जंगम, मुद्राधारी असल्या कोणत्या हि फंदांत अगर छंदांत सांपडले नाहींत. त्या सर्वांस त्यांनीं ओळखून ठेविले. पुढें जगास नीती शिकविण्याची कामगिरी अंगावर आली त्या वेळीं प्रत्येकास तुझें कोठें चुकतें आहे हें हि बुक्का लावून अचुक सांगितलें. तुका म्हणे हे मावेचे मइंद्। या पाशीं गोविंद् नाहीं नाहीं ( पं. ३९२९ ) असें दोनदां ठासून सांगितलें व वर म्हणाले कीं सोंगें छंदें कांहीं देव जोडे ऐसा नाहीं। ( पं. १५०७ )

तात्पर्य ज्ञानोबारायांचीं कांहीं वचनें पाठ केलीं त्यावरून ज्ञान च बंध कसा होतो हें तुकोबांनीं समजून घेतलें असावें, वाटेल त्या देवतेचें रोज नेवेपणानें केलेलें भजन पूजन उपयोगी पडत नाहीं, इतकें च नव्हे तर तें भजन ऐहेव जैसी। असें होतें; विखम पडे, अशा सर्व वचनांचें वर्म लक्ष्यांत घेऊन तुकोबांची सर्व भजन पूजना बद्दलची ज्ञानदृष्टी चोख झालेली असावी. अशा चोख दृष्टीनें विश्वासें आदरें जीं संत वचनें गाऊन विठु आळवीत असतील तीं ऐश्वर्याचीं वचनाक्षरें मनांत खोल रुजून—आपला प्रभाव दाखविल्याशिवाय कशी राहणार! रोज इंद्रायणींत स्नान करावें. देवपूजा करून—एकांत साधावा

म्हणून भंडाऱ्यावर ( बसून वा उभ्याने कधीं नाचून ) भजन करीत असतील त्यावेळची त्यांची एकतानता, एकविधता व उत्कटता केवढी असेल ! त्या उत्कट भजनांत डोळा लागला तर झोप; नाही तर आहे च अखंड मुखी नाम. अशा स्थितींत असतांना एका गुरुवारीं ( तो दिवस माघ शुद्ध दशमी हा होता ) तुकोबास एक दिव्य स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत त्यांनीं असें पाहिलें कीं:—आपण गंगेवर—इंद्रायणीवर—स्नानास जात आहोंत—अशा स्थितींत कोणी तरी मुद्दाम येऊन आपणांस गांठलें—व मस्तकावर हात ठेवून ( सत गुरुरायांनीं ) कृपा केली. आपलें नांव बाबाजी असें सांगितलें. राघो चैतन्य व केशव चैतन्य अशी आपल्या माळिकेची खूण सांगितली. मला रामकृष्ण हरि हा मंत्र दिला. हा मंत्र संत गुरुरायांनीं माझ्या मनाचा भाव ओळखून माझ्या आवडीचा सोपा ज्यांत कोठें गुंतागुंत नाही असा मंत्र मला सांगितला. सर्व साधुसंत हा भवसागर या मंत्राच्या साहाय्यानें च पैलपार झाले आहेत, मग तो मनुष्य जाणता असो वा नेणता असो. हा मंत्र च त्याला भवसागर तरून जाण्यास सांगड झालेला आहे असें सांगून संत गुरुरायांनीं मला कृपेचा सागर पांडुरग दाखविला व भोजनासाठीं पावशेर तूप मागितलें तें मी आणावयास गेलों. येवढ्यांत त्यांचे मनांत काय आले नकळे, पण त्यांस जाण्याची त्वरा झाली. ते गेले. मी जागा झालों. या दिवशी माघ शुद्ध दशमी होती. त्या दिवशी सत गुरुरायांनी माझा अंगीकार केला.

हा दृष्टांत संताजीच्या गाथ्यांत अभंग २१५–१६ असा आलेला आहे. गुरुकृपेचे म्हणून सर्व गाथ्यांतून चार अभंग एकत्रित केलेले आढळतात. (१) घालुनीयां भार बैसलों निश्चिंती । (२) माझीया मनाचा जाणा हा निर्धार । हे अभंग संताजींचे गाथ्यांत ४००–०१ असे आहेत. तेव्हां हे चारी अभंग एका वेळीं झालेले नसावेत असें वाटतें. २१६ व्या अभंगाचे शेवटीं २ चा आकडा घालून तो विषय संताजींनीं संपला असें दाखविलें आहे. अन्तर्गत पुराव्यानें असें हि वाटतें कीं— घालुनीया भार । हा अभंग विठोबाशी तक्रार केल्यासारखा दिसत आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं— देवा मी तुमच्यावर भार घालून निश्चिंत बसलों आहे याचें कारण असे कीं, पूर्वीं संतांनीं मला माझा माथा हातानें कुर्वाळला व विठोबा दाखविला यास मला निरविलें व सांगितलें कीं चिंता करूं नये. तेव्हां घालुनीया भार। व माझीया मनाचा जाणा हा निर्धार । हे अभंग वेगळे आहेत. तेव्हां स्वप्नांतील दृष्टांताचे दोन्ही अभंग आपण जास्त बारकाईनें पाहू.

संताजीमधील संत गुरुराये-हा पाठ गुरु हा संत कुळींचा राणा-या ज्ञानोबांच्या अभंगास ज्यास्त जुळता आहे. तेव्हां हा पाठ सत्य गुरुराये व सद्गुरुराये या पाठांतरापेक्षां निःसंशय श्रेष्ठ आहे. तुकोबांस जो गुरु हवा होता तो नुसता ब्रह्मज्ञान करून देणारा नको होता तर तो विठोबाची प्रेमखूण सांगणारा हवा होता. तसा संत गुरु बाबाजी यानें-तुका म्हणे मज दावियेला तारु। कृपेचा सागर पांडुरंग। सद्गुरुराये व सत्यगुरुराये असे पाठ आजवर कसे प्रचलीत झाले याचें मला आश्चर्य वाटतें. कारण पुढील अभगांत गुरु व संत यांतील फरक तुकोबांनीं स्पष्ट मांडला आहे. (पं. ४४०६)

॥ गुरुचीया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमु खुण वीठोबाची ॥
॥ वेदांतें वीचारा पुराणां ते पुसा । वीठोबाचा कैसा प्रेमभाव ॥
॥ तुका ह्मणे सांडा जाणींवेचा शीण । वीठोबाची खूण जाणती संत ॥

तेव्हां हातानें विठोबाकडे बोट दाखवून-विठोबावर भार घालून कसली हि काळजी करूं नको म्हणून सांगणारा नुसता गुरु नव्हता तर तो संत होता असें घालुनीया भार। या अभंगांत निरविलें संतीं। असें च म्हटलें आहे. तेव्हां सत्य गुरुराये किंवा सद्गुरुराये हे पाठ अस्सल पोथी केव्हां हि पुढें न आल्यामुळें कोणा तरी विद्वानाचे शोध आहेत. सत्य गुरुरायांनीं किंवा सद्गुरुरायांनीं तुकोबांच्या पाठीस ब्रह्मज्ञानाच्या जाणीवेचा शीण लावला असतां तो शीण हातानें विठोबा दाखवून संत गुरुरायानें चुकविला व विठोबाची प्रेमखूण हातीं दिली. या पुढील गोष्ट पहावयाची तर ती ही कीं या संतांनीं आपण होऊन तुकोबांस गाठलें. आपण होऊन त्यांनीं रामकृष्ण हरि हा मंत्र दिला. आपलें नांव, आपली गुरु परंपरा सांगितली. भवसागर तरून जाण्यास चंद्रभागेच्या तीरीं कटीं कर धरून जी नाव उभी आहे तें उत्तम तारु आहे असें सांगितलें, म्हणजे ज्ञानोबारायांनीं म्हटल्याप्रमाणें दाविलें निधान वैकुंठींचें।

सद्गुरु सारिखा सोयरा सज्जन। दावीलें निधान वैकुंठीचें ॥ १ ॥
सद्गुरु माझा जीवींचा जिवलव। फेडीयेला पांग प्रपंचाचा ॥ २ ॥
सद्गुरु हा अनाथ माऊली। कृपेची साउली केली मज ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे अवचित घडले। निवृत्तीनें दिधलें निज बिज ॥ ४ ॥

ज्ञानोबांनीं म्हटलें कीं निवृत्तिनाथांनीं निज बिज मला दिलें ही गोष्ट अवचित घडली. तसें च बाबाजी चैतन्यांनीं तुकोबांस आपण होऊन गांठलें,

स्वतःहोऊन मंत्र दिला, विठोबा दाखविला, ही गोष्ट हि अवचित घडली. स्वचरित्रपर अभंगांत तुकोबा म्हणतात कीः—

॥ मानीयेला स्वप्नीं गुरुचा उपदेश । धरीला विश्वास दृढ नामीं ॥

गुरुपदेशानें एक गोष्ट झाली ती ही कीं आपण जो मार्ग आक्रमीत आहोंत तो देवा घरीं रूजू आहे याची प्रतीति आली. गुरुपदेशाच्या अनुभवानें-साक्षात्कारानें तुकोबांचा नामावरील विश्वास दृढ झाला.

॥ बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल ॥ करावा विठ्ठल जीव भाव ।

यापुढें ती च गोष्ट गुरुपदेशानंतर ते सोसासोसानें करूं लागले असावेत व मनांत सारखी हाव भरून वाहात असावी व हा सोस एवढा वाढला असावा कीं तुका—वेडा झाला आहे, अशी समजूत प्रचलीत झाली असावी. कारण ही गोष्ट तुकोबांनीं एका अभंगांत कवतुकानें सांगितली आहे. त्या अभंगाचा मागचा पुढचा संबंध जुन्या अस्सल वह्या सांपद्धतील तेव्हां स्पष्ट होईल. तोंपर्यंत खालील अभंगाच्या आधारें आपणांस येवढें म्हणतां येईल कीं तुकोबांस नामाचा छंद एवढा जबरदस्त लागला कीं लोक हा वेडा आहे, बडबड फार करतो, असें म्हणूं लागले. या अभंगावरून तुकोबांस त्यावेळीं गुरुज्ञानाशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें-सुचत नव्हतें—दुसरी कोणती हि गोष्ट ते ऐकावयास तयार नव्हते—विद्वान् माणसांस तुका थुंकोन टाका—म्हणजे तुका हें नांव च वाचेनें उच्चारूं नका, माझें नांव सोडा असें सर्वत्रास सांगत होते. तो अभंग हा. ( पं. २८६८ )

॥ तुका वेडा अवीचार । करी बडबड फार ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ नित्य वाचे हा चि छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥ ध्रु ॥
॥ धरी पांडुरंगीं भाव । आणीक नेणें दुजा देव ॥ २ ॥
॥ गुरुज्ञान सर्वा ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥ ३ ॥
॥ बोल नाईके कोणाचे । कथे नगवा चि नाचे ॥ ४ ॥
॥ संग उपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥ ५ ॥
॥ कांहीं उपदेशीले नेणें । वाचे विठ्ठल विठ्ठल ह्मणे ॥ ६ ॥
केला बहुतीं फजीत । परी हें चि करी नित्य ॥ ७ ॥
अहो पंडीत जन । तुका टाकावा थुंकोन ॥ ८ ॥

या अभंगांत रामकृष्ण हरि हा मंत्र आहे. गुरुज्ञानाचा उल्लेख आहे. संत गुरुरायानें कृपेचा सागर पांडुरंग म्हणून सांगितलें त्या गोष्टीचा उल्लेख आहे, व

विठ्ठल विठ्ठल असा मनास छंद लागला होता असें हि म्हटलें आहे. तेव्हा हे अभंग गुरुपदेशानतरच्या व देवदर्शनापूर्वीच्या स्थितीच्या वर्णनपर आहे. तुका वेडा अवीचार असें लोक म्हणत होते. त्याबद्दल तुकोबांस काय वाटत असावें हें खालील अभंगांत लोक वेडा कोणास म्हणतात तें सांगताना स्पष्ट झालें आहे. तो अभंग खालीलप्रमाणेः– (प. ४३४८)

॥ कोटीजन्म पुण्यसाधन साधिलें। तेणें हातां आले हरिदास्य ॥ १ ॥

॥ ध्रु॥ रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन।
कायावाचा मन भगवंतीं ॥ ध्रु ॥

॥ ऐसीया प्रेमळा ह्मणताती वेडा।
संसार रोकडा बुडवीला ॥ २ ॥

॥ एकवीस कुळें जेणे उद्धरिली।
हे तो न कळे खोली भाग्यमंदा ॥ ३ ॥

॥ तुका ह्मणे त्याची पायधुळी मिळे।
भव भय पळे वंदीता चि ॥ ४ ॥

वरील अभंगांतील पहिल्या दोन चरणांत जें शब्दचित्र रेखाटलें आहे त्यास तुकोबा प्रेमळ म्हणतात व लोक वेडा म्हणतात. एवढेंच नव्हें तर यानें संसार बुडविला म्हणून नांवें ठेवतात. तुकोबा म्हणतात अरे मी सर्व पूर्वजांचा उद्धार केला आहे हें या बुद्धीहिन जीवांस कळत नाहीं. नुसता मला नमस्कार केलात, नुसते माझे चरणरज, तुमचे अंगावर आले, तर तुमचे भव भय नाहींसें होईल. तुमचें भवभय पळेल. तेव्हां आपण त्यांची पायधुळी मिळावी—त्यांचे चरणरज अंगावर यावेत म्हणून आस धरून राहूं या. वर उद्धृत केलेल्या अभंगावरून एवढी गोष्ट स्पष्ट होत आहे कीं, गुरुपदेशानंतर कांहीं दिवस तरी लोक तुका, वेडा, अविचारी, समजत होते व तुकोबा (पं. ४३४८)

**कोटीजन्म पुण्यसाधन साधीलें। तेणें हातां आले हरीदास्य ॥**
**रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन। काया वाचा मन भगवंतीं ॥**

लावून होते. अशा स्थितींत किती दिवस गेले हें कांहीं सध्यां सांगतां येत नाहीं. याबद्दल कोणी कांहीं शोध केला नाहीं. महिपतीबोवांनी कांहीं लिहिलें नाहीं या अभंगाकडे त्यांचें लक्ष्य वेधलें नव्हतें तेव्हां याबद्दल कांहीं वाद हि नाहींत. पण अशा स्थितीत कांहीं दिवस गेल्यावर स्वचरित्रपर अभंगांत तुकोबा म्हणतातः—

यावरी या जाली कवित्वाची स्फूर्ती। पाय धरील चोर्त्ती विठोबाचे ॥

तुकोबांस कवित्वस्फूर्ती स्वप्नांत दृष्टांत होऊन झालेली आहे. त्याबद्दलचा खालील अभंग स्पष्ट आहे:— ( पं. १३२० )

॥ नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें। सवें पांडुरंगें येऊनियां ॥
॥ घृ ॥ सांगितलें काम करावें कवीत्व। वाऊगें निमित्य बोलों नये ॥ घृ ॥
॥ माप टाकी सळ धरिली विठ्ठलें। थापटोनि केलें सावधान।
॥ प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी। उरले शेवटीं लावी तु का ॥

हा अभंग संताजीबोवांच्या गाथ्यांत सांपडता तर त्याचा अर्थ करणें सोपें झालें असतें. असो, या अभंगाचा अर्थ असा की—स्वप्नांत—नामदेवांनीं मला जागें केलें. बरोबर पांडुरंगराय होते. नामदेवांनीं मला थापटोनि सावधान केलें व सांगितलें, यापुढें तुम्हीं काम करावें, व्यर्थ बोलूं नये. काम जें करावयाचें तें कवित्व करावयाचें आहे. मी शतकोटी अभंग करीन म्हणून प्रतिज्ञा केली होती. तें काम माझे हातून पुरें झालें नाहीं. तें काम पुरें व्हावें अशी सळ म्हणजे अभिमान विठ्ठलानें धरिला आहे. एवढें नामदेवरायांचें भाषण होतां च " उरले शेवटी लावी तु कां " ? हे शब्द पांडुरंगरायांनीं उच्चारिले असावेत व देवाच्या तोंडचा तुका हा शब्द आपलें नाम असें सदरहु भक्तांनीं मानलें असावें असें मला वाटतें. ज्ञानेश्वर महाराजांचें "ज्ञानदेव" हें नाम गुरुकृपेनें च साधलेलें आहे.

विदेह आत्मलिंगा गुरुकृपेचा तुषारु। पूर्ण पूर्ण भरीला घटु।
हळहळू विंदु उदारु। वरुपला लिंगावरी तेणें तुष्टला श्रीगुरु।
प्रसन्न निवृत्तीराजा ज्ञान देऊनी उदारु ॥ १ ॥
या लागी ज्ञान—देव नाम गुरुकृपेनें पावलों ॥

ज्ञानेश्वर महाराजांस ज्ञान—देव असें नांव जसें गुरुकृपेनें प्राप्त झालें तशीं च निवृत्ती, सोपान, मुक्ताई हीं नांवें हि गुरुकृपेचीं आहेत. पांडुरंगरायाच्या तोंडचीं तुका हीं अक्षरें टोपण नांव—लाडकें नांव घेणें हीं कांहीं कोणा हि अनन्य भक्तांच्या ठिकाणीं वावगी गोष्ट होणार नाहीं.

कोणत्या हि घराण्यांतील पुरुषांचीं व बायकांचीं नांवें— मागील बायका पुरुषांचीं पुनः पुनः येतात. मोरे यांच्या घराण्यांत पूर्वींचीं नांवें पाहावींत तर त्यांत तुकाराम असें नांव नाहीं. बोलोबा किंवा दामशेट यांच्या पूर्वींचीं नांवें— विश्वंभर—हरि-मुकुंद-विठ्ठल—पदाजी—शंकर—कान्हया अशीं आहेत. या व्यक्तीच्या

वडील भावाचें नांव सावजी म्हणजे शंकर असें ठेविलें होतें. ही व्यक्ती जन्मली त्यावेळीं बोलोबांचे वडील कान्हया हयात असावेत. त्यामुळें तें नांव ठेवितां येईना. तेव्हां या व्यक्तीचें नांव राम असें ठेविलेलें असावें. व या व्यक्तीनें त्यास तुका जोडून उत्तम नांव बनविलें. खुद्द देहूकरांच्या घरांत या व्यक्तीच्या पूर्वीचा कागद एक हि नाहीं. समकालीन कागद हि नाहींत. तेव्हां मला सुचलेला नवा विचार येथें प्रथम च मांडला आहे. तुकाराम असें नांव या व्यक्तीच्या वेळीं प्रचलीत होतें असें समकालीन पत्रव्यवहारांत आढळलें तर मी सुचविलेल्या नव्या कल्पनेस वाव होणार नाहीं व तुकाराम असें या व्यक्तीचें प्रथम पासून नांव असेल हि. पण सरळ गोष्ट सांप्रदायिक अभिमानानें मनुष्य उलटी कशी सांगतो—याचा धडधडीत नमुना दास–विश्राम–धाम या रामदासी अगडबंब भारुडांत पहावयास सांपडतो. त्यात असें लिहिलें आहे की या व्यक्तीचें नांव पूर्वी तुका–तुकावा असें कांहीं तरी होतें. पण ही व्यक्ती समर्थ रामदास यांच्या भेटीस गेली तेव्हां समर्थ रामदासांनीं तुकोबांस तेराक्षरी ( श्री राम जय राम जय जय राम ) मंत्र देऊन सनाथ केलें व तुका याचे पुढें राम हीं अक्षरें जोडिली. तुकोबांनी केव्हां हि त्रयोदशाक्षरी मंत्र घेतला नाहीं. ते सज्जनगडावर गेले असले तरी सज्जनगड स्थापन होण्यापूर्वी, फार काय, पण नारायणाचा रामदास होण्यापूर्वी च तुकोबांस साक्षात्कार झाले होते. शिवाजी राजा त्यांचे कडे कितीतरी पूर्वी आला होता. त्याचे सैनिकांस प्रसाद म्हणून पाइकांचें अभंग झालेले होते. तेव्हां दास–विश्राम–धाम या भारुडाच्या अजब कल्पनेचा जेव्हां मी शोध करूं लागलों तेव्हां तुकाराम असें नांव जुन्या कागदांत आढळलें. तुकाराम या नांवाबद्दल दास–विश्राम–धाम कर्त्यांचे वेळीं मी वर सुचविली आहे अशा अर्थाची कांहीं दंतकथा प्रचलित असावी त्यास दास–विश्राम–धाम कर्त्यानें निराळें स्वरूप दिलें असावें असो.

नामदेवरायांनी "माप टाक" असें म्हटल्यावर तेथें हो-ना-असें कांहीं करावयाचें नव्हतें च. तशी हो ना-करावयास जागा राहूं नये म्हणून नामदेवरायांनीं आधीं च सांगून ठेविलें कीं सळ धरीली विठ्ठलें। माझी बाकी फिटावी, प्रतिज्ञा फोल होऊ नये, अशी सळ म्हणजे आग्रह विठ्ठलानें धरिला आहे. इतर लोक सळ याचा अर्थ माप असा करितात. पण कवित्वाबद्दल काळजी नको. ती बाकी कशी फिटेल याबद्दल शंका नको. या सर्व गोष्टी ध्वनित करण्यासाठीं सळ या शब्दाचा अर्थ आग्रह–अभिमान असा घ्यावा, असें वाटतें.

च तसा अर्थ जास्त व चांगला लागतो. सळ धरिली विठ्ठलें । एवढें च सांगून नामदेवराय थांबले नाहींत. तर त्यांनीं काय केलें असावें. हें सुचविणारा एक अभंग संताजीच्या गाथेंत घाल ठाव तरी । या पूर्वीं आलेला आहे; तेव्हां संताजी-मध्यें घाल ठाव तरी या अभंगापूर्वीं आलेला अभंग नामदेवें केलें स्वमामाजीं जागे या नंतर घ्यावा असें मला वाटतें. तो अभंग खालीलप्रमाणें. ( संताजी २८३ )

॥ बाप करी जोडी लेकराचे ओढी । आपली करवंडी वाळऊनी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ येकायेकीं केलों मिराशीचा धनी । कडीये बागवुनी मारखांदीं ॥ध्रु॥
॥ करुनीया पाहे डोळां अलंकार । ठेवा दावी थोर करुनीयां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नेदीं गांजुं आणीकासी । उदार जीवासी आपलीया ॥ ३ ॥

तेव्हां "उरलें तें सेवटीं लावीं तुका'? हा जो प्रश्न विचारला, त्यास हो म्हणून उत्तर देतां यावें म्हणून नामदेवरायांनीं या व्यक्तीस ( १ ) येकायेकीं केलों मीराशीचा धनी । ( २ ) करुनीयां पाहे डोळा अलंकार ( ३ ) ठेवा दावी थोर करुनीयां व आपल्या जीवावर उदार होऊन मला कोणी गांजूं नये गांजणार नाहीं असें केलें. विठ्ठलाचें नाम विठ्ठलाचें प्रेम विठ्ठलाची भक्ति–या सर्वांतून उत्पन्न होणारें भक्तिप्रेमसुख ही नामदेवरायाची मिरासी. त्याचा धनी तुकोबांस–एकाएकीं केला. जसा एखादा मुलगा दत्तक घ्यावा व तो सर्व मिराशीचा एकाएकी धनी होतो किंवा दत्तक घेणारा त्या मुलास करतो तसा, आपण जो थोर भक्तिप्रेमसुखाचा ठेवा, करून ठेविला होता तो दाखविला. करुनियां पाहे डोळा अलंकार । म्हणजे तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें–कृपा या केली संतजनीं । माझी अलंकारियेली वाणी । प्रीत ही लाविली कीर्तनीं । असा, करुनीयां पाहे डोळा अलंकार । या चरणाचा अर्थ करावा असें मला वाटतें. तेव्हां हा अभंग नामदेव-रायांनीं सर्व आयुष्यभर आपली करवंडी ( पोटाची सळगी ) वाळवून जी भक्तिप्रेमसुखाची जोडी केली तीं निमिषार्धांत तुकोबांस ( दत्तक घ्यावा ) तशी दिली. आपला मिराशीवरचा हक्क सोडून त्या गादीवर तुकोबांस बसविलें. पहिल्या अभंगांत नामदेवरायांनीं म्हटलें होतें कीं, तूं माप टाकूं लाग. तसें तुकोबा माप टाकूं लागले. तें खालील वचनानें.

॥ पांडुरंगा करूं प्रथम नमना । दुसरें चरण संतांचीया ॥
॥ यांच्या कृपादानें कथेचा विस्तारु । बाबाजी सद्गुरुदास तुका ॥
॥ काय माझी वाणी मानेल संतांसी । रंजवुं चित्तासी आपुलीया ॥
॥ या मनासी लागो हरीनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥
॥ सीण जाला मज संसार संभ्रमें । सीतळ या नामें जाली काया ॥
॥ या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आलें आकारासी निर्विकार ॥

महिपतीबोवा ताहराबादकरांनीं बालक्रीडा हा पहिला प्रयत्न व तो बाळबोध लिहिण्याचा सराव नव्हता, तेव्हां नवी वही घालून केला, असें पदरचें तिखटमीठ लावून, वर्णन केलें आहे. परतु वरील नमन व बालक्रीडेचें नमन हीं दोन्ही नमनें पाहून मला या ओव्या अगदीं पहिलें कवित्व असावें असें वाटतें. तेव्हां नामदेवरायांनीं या ओव्या पहिल्या करून घेतल्या असाव्यात. यापुढें बालक्रीडा झाली असावी व मग या भिजल्या वहींतील अभंग झाले असावेत. नामदेवरायांचे शंभर शंभर ओव्यांचे कांहीं अभंग आहेत. तसे पहिले दोन तुकोबांचे आहेत. त्यापुढें हीं ओव्यांचीं संख्या कमी होत होत–बालक्रीडेच्या अखेरीस आटोपशीर प्रमाणबद्ध अभंग होऊं लागले व तेथून या वहीस सुरुवात आहे.

नामदेवरायांनीं एकाएकी मिराशीचा धनी करण्याचे वेळीं काय क्रिया केली असेल ती त्यांची त्याम माहीत. पण तुकोबावर त्या गोष्टीचा परिणाम एवढा झाला कीं त्यांनीं अत्यंत विनयपूर्वक उत्तर दिलें ( पं. १३२१ )

**॥ घाल ठाव तरी राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ १ ॥**
**॥ आवडीचा ठाव आलोसें ठाकून । आतां उदासीन न धरावें ॥ धृ ॥**
**॥ शेवटील स्थळ नीच माझी वृत्ती । आधारें वीश्रांती पावईन ॥ २ ॥**
**॥ नामदेवापायीं तुकया स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहीलासे ॥ ३ ॥**

या अभगाचा अर्थ स्पष्ट आहे व तो हा कीं तुकोबांनीं नामदेवरायांची बाकी आपल्या कृपेनें, आपण दिलेला प्रसाद पोटीं साठवून, फेडीन असें म्हटलें.

ओव्यांच्या तीन अभंगांची ठेवण, घडण, पहावी तर ओबडधोबड शब्द ओवीमध्यें कसे तरी बसविल्यासारखे वाटतात. शिवाय विषय हि तेवढा मुद्देसूद रीतीनें, सुटसुटीतपणानें, मांडलेला नसतो. शंभर–शंभर ओव्यांचे दोन अभंग होतां च तिसरा अभंग ३१ ओव्यांचा होतो. बालक्रीडेंत जास्तींत जास्त एका अभंगांत ओव्या ३०।३१ आहेत. व शेवटास अभंग लहान लहान आटोपशीर आहेत. ओव्यांच्या अभंगाचें नमन व बालक्रीडेचें नमन यांत फरक आहे. ओव्याचें नमन समोरच्या व्यक्तीस नमन करावें तसें आहे. ओवीच्या अभंगांत आत्मचरित्रपर ओव्या बऱ्या च आहेत.—बालक्रीडा ही पूर्वीच्या संतांचीं वचनें पाठ करून जें कृष्णचरित्र मनांत साठविलें होतें, त्याचें प्रतिबिंब आहे, असें समजावयास हरकत नाहीं.

अशा तऱ्हेनें नारायणाची जोडी झाल्यावर, आपणास सर्वतोपरी आहे, आहे, आहे–सोडवी अनंता अशी जी स्थिति झाली, त्यामुळें च पूर्ण निराशेनें हरिनाम मुखानें घेऊं लागलों, व तें अट्टाहासानें घेऊं लागलों–तेव्हां विठोबानें आपणास वाट दाखवीत दाखवीत–आम्हां हें कवतुक जगा द्यावी नीत। या कामावर नेमलें–तेव्हां सहज च तुकोबांस म्हणावेसें वाटलें कीं:—( १७७ )

॥ बरें जालें देवा नीघालें दीवाळें। बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
॥ धृ ॥ अनुतापें तुझ राहीलें चिंतन। जाला हा वमन संवसार ॥ धृ ॥
॥ बरें जालें जगीं पावलों अपमान। बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ २ ॥
॥ बरें जालें नाहीं धरीली लोकलाज। बरा आलो तुज शरण देवा ॥ ३ ॥
॥ बरें जालें तुझें केलें देवाईल। लेकरें बाईल उपेक्षीली ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे बरें व्रत एकादशी। केलें उपवासी जागरण ॥ ५ ॥

ही च गोष्ट पुनः केव्हां तरी सांगण्याची वेळ आली तेव्हां ती गोड करून निराळ्या शब्दांत तुकोबांनीं सांगितली:— ( पं. २३१ )

अवघेची गोड जालें। मागीलीये भरी आलें ॥ १ ॥
॥ धृ ॥ साह्य जाला पांडुरंग। दिला अभ्यंतरी खंग ॥ धृ ॥
॥ थडीये पावतां तो वाव। मागें वाहवतां ठाव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गेले। स्वप्नींचे जागें झालें ॥ ३ ॥

मानीयेला स्वप्नीं गुरुचा उपदेश। असें जें तुकोबांनीं म्हटलें आहे-त्याचें कारण असें कीं जें मनीं वसे-तें स्वप्नीं दिसे अशी त्या गोष्टीचा निजध्यास लागून आपली स्थिति झाली नाहींना? असें साहजीक च मन साशंक झालें. पण स्वप्नांत जो उपदेश झाला होता त्याप्रमाणें वागूं लागले. तशी गुरूपदेशाच्या ज्या खुणा अनुभवांत यावयाच्या त्या खुणा त्यांस जेव्हां रोज स्पष्ट होऊं लागल्या व त्याचा कळस नामदेवराय व पांडुरंग यांच्या दर्शनानें झाला, तेव्हां म्हणाले–"मानीयेला" स्वप्नीं गुरुचा उपदेश या गुरूपदेशाच्या खुणा नामदेवरायांनीं व ज्ञानेश्वरमाउलीनीं प्रगट केल्या आहेत.

तुकोबारायास जो गुरूपदेश झाला व नामदेवराया समवेत श्रीपंढरीनाथाचें दर्शन झालें त्याचें वर्णन त्यांनीं पुढील प्रमाणें केलें आहे ( १८१ )

॥ मीच मज व्यालों। पोटाआपुलीया आलों ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां पुरला नवस। नीरसोनी गेली आस ॥ धृ ॥

॥ आलों बारावळी । गेलो मरोन ते काळीं ॥ २ ॥
॥ दोंही कडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ३ ॥

तुकोबांनीं कवित्व करावें म्हणून नामदेवरायांनीं त्यांस मिराशीचे एकाएकी धनी केलें. संतांनीं म्हणजे नामदेवरायांनीं त्यांचे वाणीवर कवित्वाचा अलंकार चढविला. तो अलंकार ते हरिकिर्तनांत मिरवूं लागल्यावर तें कवित्व जीवंत झऱ्याचें होतें म्हणून चमकूं लागलें. देव व संत यांचें गुणगान भाट होऊन करावें, असें च तुकोबांस भक्तिसुखानें डवरल्यामुळें झालें असावें. तेव्हां त्या वेळचें त्यांनीं स्वतःचें वर्णन खालीलप्रमाणें केलें आहे. ( पं. ३४९५ )

॥ मन जालें भाट । कीर्ती मुखें घडघडाट ।
॥ घडीयेली वाट । येची चाली स्वभावें ॥ १ ॥
॥ धृ ॥ बोले देवाचे पवाडे । नित्य नवेची रोकडे ।
॥ ज्या परी आवडे । तैसा तैसा करुनी ॥ धृ ॥
॥ रोखीं रहावें समोर । पुढें मागें चाले भार ।
॥ करावें उत्तर । सेवा रुजू करुनी ॥ २ ॥
॥ पूर वर्षला देकारें । संतोषाच्या अभयकरें ।
॥ अंगीच्या उत्तरें । तुकया स्वामी शृंगारी ॥ ३ ॥

माझें मन च देवाचे भाट होऊन त्याची मोठ्यानें व सतत कीर्ति गाऊं लागलें. रोज नवा देवाच्या प्रत्यक्षतेचा पवाडा स्वतःस आवडेल असा करावा, प्रत्यक्ष समोर उभा राहून म्हणून दाखवावा अशी माझी नित्याची चाली-रहणी होऊन बसली. देवाच्या प्रत्यक्ष समोर उभे राहिल्यावर मागचा पुढचा विचार करावा लागत नसे. देवांनीं हि संतुष्ट होऊन आपल्या देकाराचा पूर वाहवावा व त्यामुळें स्वतःच्या अनुभावानें तुका स्वामीस शृंगारतो आहे. तेव्हां कवित्व कसें स्फुरें याचें हें स्पष्टीकरण आहे. हा जो स्वामीच्या कृपेचा, देकाराचा, पूर त्याहीं त्याचें वर्णन तुकोबा खालीलप्रमाणें करितातः—( संताजी १०७३ )

॥ पुर आला आनंदाचा । लाटा उडती प्रेमाच्या ॥ १ ॥
॥ धृ ॥ बांधो वीठल सांगडी । पोहोन जाऊं पैलथडी ।
॥ अवघे जन गडी । घाला उडी भाई नो ॥ धृ ॥
॥ हें तो नाहीं सर्वकाळ । अमुप आनंदाचें जळ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बहुते पुण्यें । वोघ आला पंथे येणें ॥ ३ ॥

हा महापुण्यानें जो ओघ तुकोबांवर आला होता, तो आनंदाच्या जळाचा ओघ अंगावर घेऊन "डौरलों भक्तीसुखें" असें होऊन तुकोबा विठोबास म्हणत आहेत कीं, (पं. २५९४)

॥ पाठवाल तेथें गर्जेन पवाडे। कार्यी देहाकडे नांवलोकीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ म्हणवूनी मागे कंठीचा सौरस। पावतील नास वीन्ने पुढें ॥ धृ॥
॥ कृपेच्या कटाक्षें न भे काळीकाळा। येतां येत बळाशक्ती पुढें ॥२॥
॥ तुका म्हणे गुढी आणीन पायांचें। जगा होईल सोपें नाम तुझें ॥३॥

॥ धरील्या देहाचे सार्थक करीन। आनंदे भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
॥ धृ॥ लावीन निशाण जावया वैकुंठा। माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥ धृ॥
॥नामाचीया नौका करीन सहस्त्रवरी। नावाडा श्रीहरी पांडुरंग ॥२॥
॥ भाविक हो येथें धरारे आवांका। म्हणे दास तुका शुद्ध यातीं ॥३॥

अवांका हा शब्द जुना व सुंदर आहे. ही गोष्ट तुमच्या आवांक्यांतील आहे म्हणजे वैकुंठास जावयास निशाण लावणें तुमच्या हातचें आहे. तुम्हांला शक्य आहे व तें कसें शक्य आहे तें सांगतात कीं, तुम्ही मी दाखवितों त्या वाटेनें चला. (पं. ३७३९)

॥ करणे न करणें वारलें जेथें। जातो तेणें पंथें संतसंगें ॥ १ ॥
॥ धृ ॥ संतीं हें पहीलें लावीलें निशाण। ते खुणा पाहोन गर्जे नाम ॥ धृ॥
॥ तुका म्हणे तुम्ही चला याचि वाटे। भरंवशानें भेटे पांडुरंग ॥

पूर्वीच्या संतांनीं चंद्रभागेच्या वाळवंटांत पुंडलिकाचे समोर भक्तिप्रेमसुखाचें जें निशाण रोविलेंहोतें त्या पूर्वीच्या संतांच्या बोध, प्रेमाच्या निरनिराळ्या खुणा, जशा तुकोबांस प्रतीत होत, तसतसे तुकोबा त्या संतांच्या नामाचा व पंढरीनाथाच्या नामाचा कृतज्ञतेनें गजर करीत

कारण भगवंत जाणीव व नेणीव ओळखीत नाहीं. फक्त नुसतें एक नाम घे; हरीला तुझी करुणा येईल व तुला जवळ कसा करावयाचा याचा उपाय त्याचा तो च योजील. संतांचे संगतींत श्रीपती कसा आकळावा हें तुम्हांस मी शिकवितों, देव त्वरित प्रसन्न कसा होतो हें तुम्हांस सांगतों. तुम्ही मला गुरु करा असें मी मुळीं च म्हणत नाहीं. पण माझ्या स्वतःच्या अनुभवाची गोष्ट सांगतो. देव हा कांहीं एकांतांत कान फुंकून, चोरून गुपचूप दाखविण्याचा विषय नव्हे. ही जादु नव्हे, टाणाटोणा नव्हे, माझें जीवनवृत्त जरा विश्वास ठेवून ऐका तर खरें. (७४).

**॥ नेणें फुंकूं कान। नाहीं येकांताचें ज्ञान ॥**
**॥ तुम्ही आईका हो संत। माझा सादर वृत्तांत ॥ धृ ॥**
**॥ नाहीं देखिला तो डोळा। देव दाखऊं सकळा ॥**
**॥ चींतनाच्या सुखें। तुका म्हणे नेणें दुःखें ॥ ३ ॥**

अशा विश्वासानें-धैर्यानें- स्वानुभवानें-तुकोबा जेव्हां (सं. ४०२) देव घ्या कोणी। देव घ्या कोणी। आइता आला घर पुसोनी। म्हणून प्रत्येकाच्या पाठीस लागले तेव्हां देव नलगे। देव नलगें। साठवणेचे रुधले जागे। प्रत्येकजण पूर्व संस्कारानें जखडलेला होता तेव्हां तो देव नलगे। देव नलगे। म्हणून म्हणे. पण त्यांत कांहीं नव्या रक्ताचे होते, त्यांनीं म्हटलें कीं, तुकोबांच्या जिवंत वाणीचा प्रभाव काय आहे हें एकवार पहावें तर खरें. देवाच्या घरीं उपाध्यासारखा, गुरुसारखा, बडव्यासारखा, वेकील नको; आपण सरळ जाऊन त्याच्या पायीं मिठी घालावी, त्याच्या नामाचा उच्चार अट्टाहासानें करावा; म्हणजे त्याचा तो च सरळ रस्ता दाखवील, असें म्हणून तुकोबा कीर्तनांत, भजनांत, रोज नवा रंग खेळूं लागले. तेव्हां तें वक्तृत्व जिवंतपणानें प्रभावी होऊं लागलें. एकास अनुभव आला. सुख झालें, कीं, तें त्यानें दुसऱ्यास सांगावें असें होऊन, (पं. २६६४)

**॥ चंदन तो चंदनपणें। सहजगुणें संपन्न ॥ १ ॥**
**॥ धृ ॥ वेधलीया धन्य जाती। भाग्यें होती सन्मुख ॥**

अशीं नवीं माणसें सन्मुख होऊं लागलीं. तसें च (पं. २८९।९०)

**नलगे चंदना सांगावा परीमळ। वनस्पती मेळ हाकारुनी ॥ १ ॥**
**॥ धृ ॥ अन्तरीचें धांवें स्वभावें बाहेरी। धरितां ही परी आवरे ना॥ धृ ॥**
**॥ सूर्य नाहीं जागें करीत या जना। प्रकाश किरणा कर म्हुण ॥ ३॥**
**॥ तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें। लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥**

॥ चंदनाचे हात पाय हि चंदन । परीसा नाहीं हीन कोणी अंग ॥
॥ धृ ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार। सर्वांगें साखर अवघी गोड ॥ धृ ॥

× × ×

(सं. २०१)

॥ नाहीं सुगंधाची लागती लावणी । लावावीते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥
॥धृ॥ वाऱ्याहातीं माप चाले सज्जनाचे । कीर्ती मुख त्याचें नारायण॥धृ॥
प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तंव जन सकळ साक्षी ॥

× × ×

नारायणानें जशी कवित्व स्फूर्ति दिली, तसाच नारायण स्वतः तुकोबांची कीर्ति पसरविण्यास कारण झाला. त्यानें तुकोबांच्या कवित्वाची कीर्ति, संतपणाची साक्ष, वाऱ्याहातीं पसरविली. त्यासाठीं त्यांना कोणा हि वर्तमानपत्राची आराधना करावी लागली नाहीं. अशी सर्वत्र कीर्ति पसरत होती. पण जो आपला वाणी वदवितो आहे तो च ही कीर्ति पसरवीत आहे या विचारानें तुकोबा करशील काय पाहेन तें। असें विठोबास म्हणत स्वस्थ होते. ते म्हणतात, ( पं. ६९५ )

॥ कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ १ ॥
॥ धृ ॥ नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ धृ ॥
कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदवीता ॥ २ ॥
तुका म्हणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ३ ॥

तुकोबांची अशी सर्वत्र वाऱ्याहातीं कीर्ति पसरूं लागली, तेव्हां देव हा पोथ्या पुराणांत, श्रुतींत, राउळांत, ब्रह्मव्यांच्या, उपाध्यायांच्या, शास्त्रीपंडितांच्या सोवळ्या ओवळ्या आचारांत, पापपुण्याच्या विचारांत, गुरफटलेला आहे असें समजणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें धाबें दणाणलें असावें. त्यांतल्या त्यांत पुराण सांगणें, हव्यकव्य करणें, पूजा करणें, यज्ञयाग करून पोट भरणें, शास्त्राधार काढून देणें, या वृत्तींवर ज्यांचें पोट अवलंबून होतें अशांना तर तुकोबा हा सनातन धर्मास, चातुर्वर्ण्यास शत्रू च वाटला असावा. तेव्हां यांपैकीं एकानें—रामेश्वर भट वाघोलीकर यानें—ग्रामाधिकाऱ्यांकडे तक्रार केली कीं यानें धर्माचा उच्छेद मांडला आहे. याच्या प्राकृत कवित्वांत श्रुतींचा अर्थ सांगितलेला असतो. या वेळचें वर्णन महिपतीबोवांनीं केलें आहे तें असें.

रामेश्वर भट

॥ म्हणे तुका शुद्र जातीचा निश्चीत । आणि श्रुती मथीतार्थ बोलतो ॥
॥ हरिकिर्तन करून तेगे । भावीक लोकांसी घातले मोहन ॥
॥ त्यासी नमस्कार करिती ब्राम्हण । हें आम्हां कारणे अश्लाध्य ॥
॥ सकळ धर्म बुडउनी निश्चित । नाम महिमा बोले अद्भुत ॥
॥ जनांत स्थापिला भक्तिपंथ । पाखंड मत हें दिसे ॥
॥ ऐसे सांगतां रामेश्वरीं । चित्तीं क्षोभला ग्रामाधिकारी ॥
॥ मग देहूच्या पाटलास ताकीद करी । कीं तुकयासी बाहेरी दवडाया ॥
॥ चिठी देखोनि ग्रामाधिकारी । दाखविते झाले तुकयासी ॥

रामेश्वर भट हा दशग्रंथी ब्राह्मण असल्याचा लौकिक होता. त्याची वृत्ति जोशीपणाची, पुराणिकाची अशी कांहीं तरी असावी. तेव्हा पुराणास हव्य-कव्यास ही आड येणारी भानगड मिटवा म्हणून त्यानें त्या वेळच्या मोकाशास कळविणें अगदीं साहजिक आहे. त्यानें पाटलास या धर्माच्या विरुद्ध असलेल्या गोष्टीची व्यवस्था लावा म्हणून ताकीद पत्र पाठविणें हें हि रीतसर होतें. तसें पत्र देहूच्या पाटलास गेल्यावर राजाज्ञा प्रमाण म्हणून त्यानें तें तुकोबांस दाखवून तुमचीं कीर्तनें थांबवा, तुमचें कवित्व बद करा, असे म्हणणे हें त्याचें काम च होत व तें त्यानें बजावलें. पण तुकोबा कीर्तनें करीत, कवित्व करीत हें कांहीं स्वतःच्या बुद्धीनें करीत नव्हते. त्यांचा बोलविता धनी वेगळाच होता. तेव्हां पाटलानें ताकीदपत्र दाखवितां च तुकोबांस वाटलें असावे कीं मोका-शास, कमाविसदारास, दिवाणात जाऊन भेटावे व त्यांची समजूत घालावी. मी जें कवित्व करीत आहे तें विठोबाच्या आज्ञेनें करीत आहे तेव्हां ती गोष्ट पदरीची होईल कशी ? तेव्हां पुण्यास कमाविसदाराकडे किंवा मोकाश्याकडे जाण्यापूर्वी त्यांनीं खालील अभंग केला. ( प. ६७८ )

॥ काय खावें आतां । कोणीकडे जावें ।
॥ गावांत राहावें । कोण्या बळें ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोपला पाटील । गावचे हे लोक ।
आतां घाली भीक । कोण मज ॥ धृ ॥
आतां येणें चवी । सांडीली म्हणती ।
निवाडा करिती । दिवाणांत ॥ २ ॥

भल्या लोकीं यास। सांगितलीं मात।
केलों माझाघात। दूर्बळाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे याचा। संग नव्हे भला।
शोधींत विठला। जाऊं आतां ॥ ४ ॥

हें ताकिद् पत्र आल्यावर गांवच्या लोकांनीं-पंचांनीं-कीं ज्यांनी तीं कीर्तने ऐकिली असतील आशा कोणी हि किंवा त्या गांवाच्या पाटलाने असें मनांत आणलें नाहीं कीं आपण जाऊन दिवाणांत सांगावें कीं तुकोबा विटुचें सप्रेम भजन करतात. विठु कनवाळु, कृपाळु कसा आहे, किती आहे. तो केव्हां हि जीवास सोडून नसतो, असें तुकोबा सांगतात तें आम्हांस पटतें. असो, आपण कीर्तन करीत आहोंत. तें जर विठ्ठलाच्या आज्ञेनें करीत आहोंत तर मग तो अधर्म होईल कसा ? तेव्हां मी म्हणतों त्याप्रमाणें ते विठोबाचे शब्द आहेत, ते शब्द खऱ्या अवस्थेचे आहेत, असें पाहून कांहीं ब्राह्मणांनीं ते शब्द खरोखर च विठुचे आहेत असें पटून ज्या मुखांतुन ते शब्द बाहेर आले त्या देहास वंदन केलें, तर तो अधर्म होतो-असें म्हणणारा हा दुसरा देव कोणचा ? तेव्हां चला आपण मला बोलविणारा देव खरा-कीं मी कीर्तन करीत आहे म्हणून अधर्म होत आहे असें म्हणणारा देव खरा. त्याचा निर्णय करू या. असें म्हणून तुकोबा ताकीदपत्रानंतर जे ४१२ लोक त्यांस चिकटून राहिले असतील-त्यास म्हणाले असतील. शोधीत विठ्ठला जाऊं आतां—

तुकोबा व त्यांचे अनुयायी हे कमाविसदाराकडे किंवा मोकाशाकडे गेले असतील त्यांस तुकोबांनीं आपला सविस्तर वृत्तांत सांगितला असेल त्यांनीं सरळ सांगितलें असेल कीं-आम्हांस एवढ्या खोलांत शिरतां येत नाहीं. शिरण्याचें कारण नाहीं. आमच्याकडे जी फिर्याद्-अर्जी आली आहे ती ही. रामेश्वर भट यांचा अधिकार हा असा आहे. तेव्हां तुमचें म्हणणें त्यांस पटवा व आमच्याकडे तुमचें म्हणणें बरोबर आहे-तुम्ही अधर्म करीत नाहीं, असें त्यांचें पत्र आणा म्हणजे मग आम्ही ताकीदपत्र फिराऊन देऊं. तेव्हां तुकोबा रामेश्वर भटाकडे गेले असावेत. व त्यांनीं आपला सविस्तर वृत्तांत रामेश्वर भटास सांगितला असावा. रामेश्वर भटानें तुझ्या कवनांत श्रुतीचा मथितार्थ उमटतो. श्रुति उच्चारण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणांस तेवढा शाश्वतः आहे. शूद्रास तो अधिकार नाहीं. असें म्हटलें असावें. तों तुकोबा म्हणाले असणार च कीं अहो,

मी कधीं हि श्रुती ऐकिल्या नाहीत, मी वेदाचें अक्षर पाहिलें नाही, दुरून सुद्धा ऐकलें नाही एवढ्यानें रामेश्वर भटास असा विचार सुचावयास हवा होता कीं, खुद्द देहू गावांत ब्राह्मण आहेत किती, तेथें श्रुतीचा वेदघोष कोठे तरी होतो का? तसें जर नाही तर मग या स्वयंभू श्रुती तर नसतील ना? पण सत्तेपुढें कधीं शहाणपण उपयोगी पडलें आहे का? तुकोबांनी परोपरीनें सांगितलें असेल कीं. ( प १००७ )

॥ करीतो कवित्व म्हणाल हे कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १ ॥
॥ धृ ॥ माझीये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ धृ ॥
॥ काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तेचि वदे ॥ २ ॥
॥ निमित्त मापासी बैसविलें आहे । मी तो कांहीं नव्हे स्वामी सत्ता ॥३॥
॥ तुका म्हणे आहे पाइक चि खरा । वागवितो मुद्रा नामाची हे ॥ ४ ॥

तुम्ही रागावला आहात—पण मी तुम्हास खर च सांगतों कीं, तुम्हीं या कवनात श्रुतींचा मथितार्थ उमटतो म्हणून म्हणता पण मी काय बोलतों किंवा लिहितो—हें मी लिहीपर्यंत माझें मला च माहीत नसतें. ( प. १७९० )

॥ नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितो कोपाल संत झणी ॥१॥
॥ धृ ॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगे व्यापूनियां ॥ धृ ॥
॥ मज मुढा शक्ती कैंचा हा विचार । निगमादिका पार बोलावया ॥ २ ॥
॥ रामकृष्ण हरि मुकुंद मुरारी । बोबड्या उत्तरीं हें चि ध्यान ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगे भार घेतला माझा ॥ ४ ॥

या अभंगावरून तुकोबानी आपणावर प्रथम गुरुकृपा कशी झाली त्या नंतर साक्षात्कार होऊन आपण पंढरीनाथाच्या आज्ञेने कवित्व कसें करू लागलों व त्यात नामदेवानीं दिलेलें धन आपण कसें वापरतों—असें आळवून, आळवून, रामेश्वर भटास सांगितलें असेल ( प. २०१४ )

॥ बोलीलो जैसें बोलवीलें देवें । माझें तुम्हां ठावे जाती कुळ ॥१ ॥
॥ धृ ॥ करा क्षमा कांहीं नका धरु कोप । संत मायबाप दीनावरी ॥ धृ ॥
॥ वाचेंचा चाळक जाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे घडे अपराध नेणता । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ३ ॥

श्रुतींचा मथितार्थ कवित्वांत नकळत कसा उमटतो याची प्रतिती पाहण्यासाठी रामेश्वर भट्टानें एक कीर्तन आपल्यासमोर करावयास सांगितलें असावें. तेव्हा तुकोबानीं रामेश्वर भटास दंडवत घालून महिपतीबोवानीं म्हटल्याप्रमाणें—

॥ सप्रेम नामाच्या गजरें जाण । ते स्थळीं मांडीले हरिकीर्तन ॥
॥ कवीत्व बोले प्रसाद वचन । सकोच मनीं न धरीता ॥

तेव्हा आपणास जें कवित्व स्फुरतें तें कोठून स्फुरतें, कोण स्फुरवितो, हें साग॰ण्यासाठीं तुकोबानीं वक्तृत्वाचा पाऊस पाडला असावा व विश्वाचें बीज जो ॐकार तो कोणास व केव्हा स्फुरतो, याचें तुकोबानीं भावारूढ अवस्थेंत अत्यत सुरस वर्णन करून जेथून ॐकार ध्वनि उत्पन्न होतो, त्याच ठिकाणीं म्हणजे क्षीरसागर नारायण यास आपण अध्यात्मविद्या प्रगट करावी असें मनात येऊन त्यानें तें ज्ञान भक्ताच्या ध्यानात प्रगट केलें, त्याचें नाव ॐकार तच सर्व ब्रह्मज्ञानाचें गूज होय–ते जेव्हा काही भक्ताच्या अवचित कानीं पडतें तेव्हा श्रुती या सज्ञेस प्राप्त झालें, त्याच नारायणास विवेक, वैराग्य, निजशाति याची साक्षात् मूर्ति म्हणजे हा पुडलीक महामुनी आहे असें लक्ष्यात, ध्यानात, आलें तेव्हा तो नारायण पुडलीका पुढें अनत सुखाचा हारिस म्हणून पढरीस उगवला यानतर सुचलीं तीं सर्व विशेषणें लावून–देवा तू अनत अवतार धरणारा आहेस मग या च वेळीं त असा मुका का असें त्या विठ्ठलास विचारलें आहे भोळ्या भक्तास तुझ्याशिवाय–दुसरा कोणीहि सौख्य देण्यास समर्थ नाहीं. तू माझ्या मनाचा चित्तचालक आहेस भक्त कैवारी आहेस भक्त अभिमानी आहेत. जगाच जीवन अहेस सर्व काही दुसऱ्यास करावयास लावून स्वत अकर्ता राहतोस देवा तू केव्हा हि वर्णाश्रम धर्ममर्यादा पाळीत नाहींस मग या च वेळीं तू मुका का ? या भूदेवास तू साक्ष का पटवीत नाहींस ? तुझा लौकिक तू सकळ दुःखनिवारिता आहेस म्हणून आहे मग तू आता माझ्यावर का कोपलास ? देवा, तू उलट सुलट अशा वाटेल त्या गोष्टी करवितोस व त्या श्रेष्ठ म्हणून सपादून हि नेतोस, देवाची वाणी हे वेदवाक्य म्हणून किवा उपनिषद म्हणून तू प्रगट केलीस तीं च गोष्ट मी काहींहि वेदपठण, शास्त्राध्ययन न करिता माझ्या तोंडून उच्चारवितोस तेव्हा तो अधर्म होतो देववाक्य हे वेदवाणीनें, ब्राह्मणाच्या मुखानें च बाहेर पडलें पाहिजे असा तू च नियम घालून देतोंस व माझ्या तोंडून तसे खुणचे शब्द उच्चारवून ते नियम तू च मोडतोस तेव्हा ह तुझें विराट स्वरूप देववाक्य हें वेदात च प्रगट झालें पाहिजे अस म्हणणाऱ्या या भोळ्या भक्तास कळून नाही त्याला तू तुझ्या विराट स्वरूपात हा काय खेळ करून आहेस हें कळून नाहीं तेव्हा

॥ सगुण रूप धरुनि त्यासी । लावि भजनासि तुका म्हणे ॥

अशा अर्थाचे अभंग (पं.६७२-३-४५) करून तुकोबांनीं रामेश्वर भट हा भजन करूं लागला असें पुढें होणाऱ्या गोष्टींचें चित्र मनापुढें आणून आळविलें खरें. पण देव प्रगट होणार होता, रामेश्वर भटास साक्ष पटविणार होता, पण त्यास थोडा अवकाश होता. तें विराट स्वरूप स्वतःस भारी च तुकोबांच्या इच्छेप्रमाणें बांधून घेणार होतें ! त्या विराट स्वरूपास आणखी थोडा ज्यास्त खेळ खेळायचा होता; त्या विराट स्वरूपानें कांहीं हि खूण दाखविली नाहीं. तेव्हां तुकोबांस रामेश्वर भट म्हणेल तें मान्य करणें प्राप्त होतें. रामेश्वर भट म्हणाले असावेत कीं, बा, तुझें हें कवित्व लबाडी लाचाडीचें नाहीं हें खरें, तुझें माझें कांहीं वांकडें नाहीं, पण तुझ्या या कवित्वांत वेदवाणी प्रगट होते यास मी काय करावें ? हा धडधडीत अधर्म आहे. शूद्राचे तोंडून वेदवाक्य देववाक्य बाहेर पडणें ही गोष्ट केव्हां हि शास्त्रविरुद्ध आहे. तेव्हां तूं असें कर—कीं यापुढें कवित्व करूं नको. हें कांहीं तरी कर्णपिशाच्च आहे म्हण, तुला कांहीं भूतबाधा झाली आहे खास. तेव्हां यापुढें कवित्व करणार नाहीं, असें तुला कबूल असेल तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. मी तसें कमाविसदारास पत्र लिहून देईन. येवढें बोलणें झाल्यावर तुकोबांनीं विचारलें कीं पुढील कवित्वा बद्दल तुमची आज्ञा प्रमाण—पण आजवर जें कवित्व केलें आहे त्याचें काय करूं ? तेव्हां हा श्रुतिस्मृतिपुराणोक्त ब्राह्मण दुसरें काय सांगणार !! त्यानें सांगितलें कीं तें कवित्व बुडवून टाक !!! तुकोबांनीं हो म्हटलें. अशा तऱ्हेनें रूढीनें स्फूर्तीवर पहिल्यानें जय मिळविला. बहुधा या अर्थाचें पत्र कमाविसदारास रामेश्वर भटानें लिहून दिलें असावें. तें पत्र घेऊन तुकोबांनी कबूल केलेल्या अटी लक्ष्यांत घेऊन कमाविसदारानें ताकीदपत्र परत घेतलें असावें. तुकोबा देहूस परत गेले. व कबूल केल्याप्रमाणें त्यांनीं केलेलें कवित्व खालीवर दगड बांधून इंद्रायणींत बुडविलें. लोक काय बोलूनचालून दुतोंडी आहेत. त्यांनी कवित्वाची हि वाहवा केली. पुढें राजसत्ता त्याविरुद्ध आहे असें पाहतां च *कवित्व पाखांड आहे म्हणून म्हणण्यास हि ते च लोक तयार होते* ! बरें कवित्व बुडविलें तेव्हां या च मंडळींनीं तुकोबांची हुर्यो केली असेल ! व पुढें जीं कीर्तनें ऐकूं येत होतीं, आनंद भोगावयास सापडे तो मिळेना, पुनः भेटेना. तेव्हां ती च मंडळी वरवर हळहळण्याचा आव आणून म्हणूं लागली कीं तुम्हीं पूर्वीं आपल्या वाड्याचीं खतें पत्रें बुडवून संसार आटोपलात, आतां कवित्व बुडवून, परमार्थ बुडवून, स्वस्थ झालांत, तेव्हां आतां जगलांत तरी कशास ? लोक

काय बोलून चालून बेजबाबदार असतात, त्यांना काय माहीत कीं हें वाक्य या माणसाच्या मनास किती टोंचेल ! वर्मी बाण लागावा तसे हे शब्द तुकोबांच्या हृदयास काट्यासारसे टोंचूं लागले. खरं च, संसार बुडविला व परमार्थाचें फळ जें हें कवित्व तें हि बुडविलें, पुढें कवित्व करणार नाहीं, हें हि कबूल केलें, तेव्हां खरोखर च यापुढें जगून तरी काय करावयाचें ! असा विचार त्यांचे मनांत आला. तेव्हां कवित्वाबरोबर च आपण हि स्वतःस बुडवून घ्यावें तर ती आत्महत्या होईल. हा विचार आड आला. तेव्हां विठुरायाचें मनोगत काय आहे ? त्यास हें कवित्व हवें आहे का नको ? याचा निर्णय करून घ्यावा असें म्हणून त्यांनीं देवापुढें जें वृंदावन होतें त्या शिळेवर बसून वा निजून देवाचा धावा, देवाचें ध्यान, देवाचें अखंड नामस्मरण सुरू केलें. हा निर्धार वह्या बुडविल्यावर पांचव्या दिवशी झाला. अशा स्थितीत असतांना तुकोबांस स्फुरलेले अभंग ( वीस ) प्रसिद्ध आहेत. परंतु हे अभंग नंतर केव्हां तरी लिहून ठेविलेले असावेत. कारण कवित्व करणार नाहीं असें तुकोबांनीं कबूल केलें होतें. परंतु आपल्या जीवनयात्रेंतील ही मुख्य गोष्ट त्यांनीं पुढें नमूद करून ठेविली आहे. त्यांत त्यावेळीं मनांत घोळत असलेल्या विचारांचें शब्दचित्र ( पं २२२२–२२४० व २४९१ ) या वीस अभंगांत ग्रंथित केलें आहे.

मनांत विचार आणून व देवास आळवीत तुकोबा–अन्नपाणी वर्ज करून शिळेवर पडून दिवसा पाठीमागून दिवस कंठीत होते. तों रामेश्वर भटास स्वल्प श्रमानें मिळालेल्या मोठ्या जयानें हुरूप चढून ज्या आळंदीच्या अनुयायांनीं तुकोबांच्या कवित्वाचा निषेध केला होता, त्या आपल्या अनुयायांस व साथीदारांस झालेलें वृत्त सांगण्यास रामेश्वर भट हे वाघोलीहून आळंदीस यावयास निघाले. वाटेंत पुण्याजवळ एका चांगल्या तलावांत उत्तम पाणी आहे असें पाहून ते त्या तलावांत स्नानास उतरले. तों तलाव अनगडशा फकीराचा होता. त्याला या ब्राह्मणानें आपलें पाणी बाटवलें याचा आला राग. त्यानें रामेश्वर भटास शाप दिला कीं तूं ज्या शीतळ पाण्याच्या लोभानें या तलावांत शिरलास त्या पाण्यांतून बाहेर येतां च तुझ्या अंगाचा दाह होईल. तसा रामेश्वर भटास अनुभव आला. त्यानें ओलीं वस्त्रें अंगावर घेऊन आळंदीची वाट धरली. आळंदीस अजानुवृक्षाखालीं बसून अंगावर ओल्या वस्त्रांच्या घड्या घेऊन अनुष्ठान आरंभिलें. त्यास कांहीं दिवसांनीं स्वप्नांत ज्ञानेश्वर महाराजांनीं सांगितलें कीं

॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जे अवतार नामयाचा ॥
॥ त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । म्हणोनि हे बाधा घडली तुज ॥
॥ आतां येक करी सांगेन तें तुला । शरण जाई त्याला निश्चयेसीं ॥
॥ दर्शनें चि तुझ्या दोषा परिहार । हें य तो विचार सांगितला ॥

असा स्वप्नांत दृष्टांत झाला तेव्हां रामेश्वर भटानें आपले शिष्य देहूस तुकोबास हें वृत्त सांगण्यास पाठविले. शिष्यांनीं हें वृत्त तुकोबास सांगितल्यावर तुकोबांनीं खालील अभंग शिष्यांजवळ लिहून दिला. ( पं. १७५१ )

॥ चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हि न खाती सर्प तया ॥ १ ॥
॥धृ॥ विष तें अमृत अघात ते हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥धृ॥
॥ दुःख ते देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्नी ज्वाळा ॥ २ ॥
॥ आवडेल जीवा जीवाचीये परी । सकळां अंतरी एकभाव ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणीजेते येणें अनुभवें ॥ ४ ॥

तेव्हां ज्या रामेश्वर भटाच्या आज्ञेनें कवित्व करणार नाहीं म्हणून तुकोबांनीं कबूल केलें होतें त्याच्या च अंगास अग्नीज्वाळा होत होत्या त्या निवारण व्हाव्यात म्हणून तुकोबांनीं पहिला अभंग केला. तो अभंग घेऊन शिष्य आळंदीस गेले. तो अभंग रामेश्वर भटानें वाचतां च त्याचा दाह शमला. हा स्पष्ट साक्षात्कार-स्वतःच्या अनुभवाचा साक्षात्कार पाहून, रामेश्वर भटाची वृत्ति पालटली. तुकोबांचें चित्त शुद्ध होतें. तेव्हां रामेश्वर भट हा त्यांचा जो शत्रु होता तो भक्त झाला. रामेश्वर भटानें तुकोबांवर वार केला होता. तीं च गोष्ट आघाता सारखी न होतां तुकोबांच्या कवित्वाची कीर्ति सर्वत्र पसरविण्यास कारण झाली. कारण तुकोबांवर नारायणाची कृपा झाली व त्यांस श्रीहरि बाळवेश घेऊन, सगुण साकार भेटला. त्या नारायणानें तुझें कवित्व शाबूत आहे. नदीवर तरंगत आहे तें काढ जा. असें सांगितलें. त्या पूर्वीच तसें स्वप्न इतर भक्तगणांस पडलें. त्यांनीं नदीवर जाऊन वह्या तरंगत आहेत असें पाहिलें, त्या पाण्यांत उतरून बाहेर काढल्या व तुकोबांचे पुढें ठेविल्या. हें शुभ-वर्तमान तुकोबांनीं ७ अभंगांत सांगितलें आहे. ( पं. २२४१–४७ ) ते अभग एवढे स्पष्ट आहेत कीं ते मुळांत च वाचणें ज्यास्त सोईचें होईल. तूं माउलीहूनी मवाळ । या अभंगांत देवाचें स्वरूप तुकोबांस कसें भेटलें तें त्यांनीं शब्दांत आणलें आहे.

॥ तूं माउलीहून मवाळ । चंद्राहुनी शीतळ ।
॥ पाणीयाहुनी पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥

एवढें सुंदर वर्णन आपण किती जरी शोध केला तरी दुसऱ्या भाषेंत संस्कृत, इंग्रजी, किंवा इतर दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत नाहीं. या सात अभंगांत मी हीनबुद्धीचा, मतिमंद, उतावीळ अशा सर्व कबुल्या देऊन तुकोबांनीं देवास एक च अवघड प्रश्न विचारला कीं, देवा, (प. २२४४)

॥ तूं देवांचा ही देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव ।
॥ आम्हां दासां कींव । कां भाकणें लागली ॥

या प्रश्नास देवानें काय उत्तर दिलें तें तुकोबांनीं नमूद केलें नाहीं देव उत्तर काय देणार ! त्यानें तुकोबांची कीर्ति पसरावी म्हणून हा सटाटोप केला होता. चमत्काराशिवाय नमस्कार होत नाहीं. तेव्हां रामेश्वर भटासारख्या जाड बुद्धाच्या माणसास ईशसत्तेची चुणूक विठूनें दाखविली. पण या खेळांत तुकोबांचा जीव हेराण झाला. तेव्हा तुकोबांनीं तो च प्रश्न नेमका पुढें मांडल्यावर देव काय उत्तर देणार ! बहुधा देवानें लाजून मान खालीं घातली असेल !

वह्या तरल्या–कवित्वास मार्ग मोकळा झाला, जनापवाद टळला या आनंदांत तुकोबा आहेत तों च त्यांस कोणा भक्तानें सांगितलें कीं रामेश्वर भट त्याचे दर्शनास आळंदीहून येत आहेत. तेव्हां तुकोबा त्यांस सामोरे गेले. त्यावेळीं रामेश्वर भट देहूस आले ते पुनः परत गेले च नाहीत. असें महिपतीबोवांनीं लिहिलें आहे. रामेश्वर भटानीं तुकोबारायावर कांहीं अभंग व दोन आरत्या केल्या आहेत. त्यांतील एक आरती खालीलप्रमाणें:—

**तूंचि आत्माराम नव्हेसी देहधारी । स्तुती जरी होय झडो माझी वैखरी ॥**
**पातकी मूढ जन पडतील अघोरीं । या लागीं अवतार केला महीवरी ॥१॥**
**जय जय भक्तराया धर्ममुर्ति तुकया । आरती ओंवाळीभावें तुझीया पायां ॥**
**तुझे ठायीं असे भ्रम कोणा न कळे नेम । जन हे काय जाणे अनुभविती राम।**
**टाकोनी अभिमान जीवीं धरिलें प्रेम । बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ॥**
**अद्भुत महिमा तुझा काय वर्णु दातारा । उदकेंवीण अन्न दिधलें स्मीलें तरा॥**
**आतां हे ऐसी प्राती काय घडेल येरा । उदकीं कागदहीन राखिले अठरा ॥**
**ऐकतां तुझें वचन मन होय उन्मन । सच्चिदानंद गाभा तुजठायीं पूर्ण ॥**
**नित्य हें असो माझ तुझे पायीं अनुसंधान । करानि कृपादान देई इतुकें दान॥**
**शास्त्र आणि वेदांत शिष्टाचारसमस्त । आणिला एकवाक्य जनलोक कृतार्थ ॥**

विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत। विनवितो तुज आतां ठेवीं मस्तकीं हात॥

ज्या रामेश्वर भटांनीं अभंगांच्या वह्या बुडवावयास सांगितल्या त्यानें च विनवितो तुज आतां ठेवी मस्तकीं हात–असें विनवावें हीं खरोखर च अद्भुत गोष्ट आहे!! तुकोबांनीं रामेश्वर भटाचे मस्तकीं हात ठेविल्याचा उल्लेख नाहीं. या दिव्यानंतर, तुकोबांचें कवित्व हा अधर्म आहे असा शब्द महाराष्ट्रांत पुनः ऐकूं आला नाहीं. या दिव्याचा परिणाम रामेश्वर भटावर

तरी लोह हें एकें अंशे। झगटिलें होय परीसे॥
तरी एकीकडे आपैसें। सुवर्ण होए। ज्ञा. ९।४६०

या ज्ञानेश्वरींतील ओवीप्रमाणें झाला व तुकोबारायावर जों जों दूषण यावें तों तों भूषण व्हावें असें भागवतांतील ओवीप्रमाणें झाला. यानंतर–तुकोबांची कीर्ति वाऱ्याहातीं महाराष्ट्रभर पसरली व ठिकठिकाणचे लोक येऊन वह्यांच्या नकला करून नेऊं लागले असें वर्तमान महिपतीबोवांनीं सांगितलें आहे. ठिकठिकाणच्या लोकांनीं अस्सल वह्यांवरून केलेल्या नकलांपैकीं एक हि नक्कल आजवर कोणीं शोधूं नये, सांपडूं नये हें आश्चर्य आहे! स्वतः तुकोबांनीं आत्मचरित्रपर अभंगांत खालीलप्रमाणें या प्रसंगाचें वर्णन केलें आहेः—(पं. १२२३)

॥नीपेधाचा कांहीं पडिला आघात। तेणें मध्यें चित्त दुखाविलें॥१५॥
॥बुडविल्या वह्या बैसलों धरणें। केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥
॥भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा। कृपावंत ऐसा कळों आलें ॥१९॥

कवित्वाचा निषेध पडिला तेव्हां तुकोबांनीं वह्या बुडविल्या व धरणें धरलें–हीं गोष्ट स्पष्ट आहे. वह्या तरल्या हीं हि गोष्ट स्पष्ट आहे. ज्या रामेश्वर भटाच्या आज्ञेनें ह्या वह्या बुडविल्या त्यानें स्वतः आपण तुकोबांचा द्वेष केला त्यामुळें शरीरीं व्यथा बहुत झाली हें स्वतः एका अभंगांत लिहिलें आहे. त्यानतर प्रसाद म्हणून अभंग मिळाल्यावर रामेश्वर भट तुकोबांच्या संगतींत राहूं लागले तेव्हां

॥ म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें। जालें हें आराम देह माझें ॥

स्वतः रामेश्वर भटानें १८ दिवस वह्या पाण्यांत रक्षिल्या उदकीं कागद दीन राखिले अठरा असें म्हटलें आहे. स्वतः तुकोबांनीं मी तेरा दिवस डोळे झाकून पडून राहिलों–तेव्हां बाळवेशानें 'न संरित' दिगंबर मूर्ति जवळ येऊन माझें समाधान केलें, उदकीं राखिले कागद। चुकविला जनवाद। असें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां या गोष्टीच्या सत्यतेबद्दल यत्किंचित् हि संशय घेण्यास जागा नाहीं.

या प्रसंगाचा फायदा घेऊन कित्येक उपद्व्यापी लोक ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद रंगवितात. पण तसें करण्यास या कथेंत कांहीं वाव नाहीं. कारण कांहीं ब्राह्मण तुकोबांच्या पाया पडतात ही एक अधमांची गोष्ट म्हणून फिर्यादींत दाखल केली होती. केव्हां हि झालें तरी कोणत्या हि नव्या गोष्टीस जुन्याचा, रूढीचा, विरोध हा असावयाचा. ही गोष्ट आपल्या देशांत आहे व इतरत्र नाहीं असें हि नाहीं. अरिस्टॉटल–जीझस् खाइस्ट, गॅलिलीयो–कोपर्निकस्–या सर्वांना जुन्या रूढीचा त्रास झाला आहे. युरोपमध्यें सुधारणेचें युग आलें त्यावेळीं नवमतवादीयांना जिवंत जाळलें आहे. तेव्हां हा नव्या जुन्याचा झगडा आहे. अगदीं अलीकडे आपण पाहूं जावें तो खुद्द महाराष्ट्रांत लोकमान्य टिळकांनीं–( कीं ज्यांना सर्व जनता अनभिषिक्त राजा म्हणून समजत होती ) गीतेचा अर्थ निराळ्या तऱ्हेनें लावून दाखविला तर त्यांस विरोध विश्वविद्यालयीन पदवीधर व शास्त्रीपंडीत अशा उभयतांनीं केला.

तेव्हां देहूंत मंबाजीबोवा, पंचक्रोशींत चिंतामणी देव, पुणें प्रांतांत रामेश्वर भट, व महाराष्ट्रांत रामदास यांचा विरोध हा ब्राह्मण-ब्राह्मणेतर असा नसून हा जुन्या नव्याचा झगडा आहे. हा सर्व देशांत सर्व बाबतींत आहे. गेल्या लढाईत जर्मननें टॅंक्स व विमानें यांच्या जोरावर बहुतेक युरोप काबीज केला होता. परंतु टॅंक पहिल्यानें तयार केलें व लॉर्ड किचनेरसारख्या सरसेनापतीस दाखविलें तव्हां तें त्यास एक खेळणें वाटलें. तें "खेळणें" १९१४–१८ च्या लढाईच्या अखेरीस जर्मनीचा पराभव करण्यास उपयोगी पडलें. तेव्हां त्यापासून शिकावयाचे धडे फ्रेंच सेनानी शिकले व त्यांनीं Maginot Line बांधली. पण त्या च सेनानीस विमानांचा उपयोग लक्ष्यांत आला नाहीं. म्हणून फ्रान्सचा दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीस पराभव झाला. असा हा नव्या–जुन्याचा झगडा चालू राहणार च, तो मनुष्य स्वभाव आहे. त्यास कोणाचा इलाज नाहीं.

येथवर तुकोबारायांच्या आत्मचरित्रपर ५१७ अभंगांचा अर्थ सांगून झाला; रामेश्वर भटानें केलेल्या विरोधापर्यंतचें चरित्र हि सांगून झालें. त्यावेळेपर्यंतच्या चरित्राचा आढावा घेऊन तुकोबा म्हणाले कीः—(पं.१३३३)

**॥ भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ १९ ॥**
**॥ तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलवीले बोल पांडुरंगे ॥ २० ॥**

येवढ्यानें वाचकांच्या हें लक्ष्यांत येईल कीं तुकोबांचें चरित्र अभंग वाचून आपल्या जें लक्ष्यांत येईल तें च खरें चरित्र. असें चरित्र अभंगांतून निवडून काढून स्वतंत्र ग्रंथ च प्रसिद्ध केला पाहिजे, पण त्याचे आधीं तुकोबा ज्या क्रमानें अभंग लिहीत, म्हणत, प्रगट करीत, त्या क्रमानें अभंग आपणापुढें आले पाहिजेत. हा क्रम कोणास हि स्वतःचे बुद्धीनें जुळवितां येणार नाहीं. ज्या वह्या बुडविल्या होत्या त्यांपैकीं एका वहीची नकल सख्या हरी शिंपी या आस्थेवाईक वारकरी गृहस्थाकडे आढळली. ती वही मूळ पूजेंत असलेल्या वहीच्या आधारें दुरुस्त केली व त्यानंतर पंडीत यांच्या प्रतीशीं तो नकल ताडून पाहतांना जे अभंग मूळ पोथींत असून नकलकाराच्या हलगर्जीपणानें गळले असें वाटलें, ते पंडितांच्या प्रतींतून घेऊन ( या ज्यास्त अभंगांची यादी शेवटीं जोडली आहे. ) ही प्रत तयार केली आहे. या प्रतींत जेथें जशा ओळी आढळल्या त्या तशा निरूपणांत स्पष्ट करून दाखविल्या आहेत. दोन अभंग कोणत्या अन्तर्गत दुव्यानें जोडले गेले आहेत. हें हि शक्य झालें तेथें दाखविलें आहे. पुढें छापलेल्या ७५१ अभंगांत नारायणाची व गोविंदाची जोडी, कवित्व, आत्मचरित्र, शिकवण, लोहगांवचा वेढा, धरणेकऱ्यास उपदेश, देवाशीं अनन्यगतीनें केलेलीं भाषणें, भांडणें, आळवण, देवाचें भोगिलेलें सान्निध्य इत्यादि विषय आले आहेत. हे सर्व रूपांतरांत शब्दशः आलेले आहेत. तरी त्यांतील कांहीं प्रकरणें निवडून त्यांचें विवेचन—अर्थावबोध जास्त स्पष्ट व्हावा म्हणून पुढें केलें आहे.

---

## अभंग वृत्त

नामदेवरायांनीं कवित्व करण्याचा निश्चय केल्यावर त्यांस अभंग वृत्तांत कवित्व करण्यास पंढरीनाथानें जी शिकवण दिली तें वृत्त नामदेवरायांनीं खालील अभंगांत गोविलें आहे

॥ अभंगाची कळा नाहीं मी नेणत । त्वरा केली प्रीत केशीराजें ॥ १ ॥<br>
॥ अक्षरांची संख्या बोलिले उदंड । मेरु सुमचंड शर आदी ॥ २ ॥<br>
॥ सहा साडेतीन चरण जाणावे । अक्षरें मोजावीं चौक चारीं ॥ ३ ॥<br>
॥ पहिल्या पासोनी तिसऱ्या पर्यंत । अठरा गणित मोज आलें ॥ ४ ॥<br>
॥ चौक चारी आधीं बोलीलों मात्रुका । बावीसावी संख्या शेवटील ॥ ५ ॥<br>
॥ दीढ चरणाचें दीर्घ तें अक्षर । मुमुक्ष विचार बोध केला ॥ ६ ॥<br>
॥ नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी । प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ॥ ७ ॥

नामदेवराय म्हणतात कीं, मला अभंगाची कळा म्हणजे अभंग करण्याची कला अवगत नव्हती. तेव्हा श्रीहरीनें मला स्वप्नांत सांगितलें कीं, अभंगाची मुख्य गोष्ट ही कीं त्यात अक्षरें उदढ आली तरी चालतील परंतु मुख्य ( मेरु ) गोष्ट ही कीं त्यांत सहा-सहा अक्षराचे तीन चरण करून पुढील अर्ध्या चरणाचीं चार अक्षरं असावींत. अशा तऱ्हेनें ओळींतील अक्षरांची संख्या बावीस असावी. दुसरी गोष्ट जी सभाळावयाची ती ही कीं दीड चरण झाल्यावर जें अक्षर येईल तें दीर्घ असावें. [ शर आदी या शब्दांचा अर्थ नीट लक्ष्यात आला नाहीं ] हा नामदेवरायांस श्रीहरीनें घालून दिलेला नियम तुकोबांनीं पुष्कळसा पाळला आहे. उदाहरणार्थ या वहींतील खालील अभंग आपण पाहूं:—

( १ ) *लेकरा आईतें, पीत्याची जतन । दावी नीज धन, सर्व जोडी त्यापरी आमचा, जालासे सांभाळ । दे.*

येथें प्रत्येक ओळींत सहा सहा अक्षरांचे तीन चौक व चवथा चौक चार अक्षराचा अशी प्रत्येक ओळ असून-दीड चरण झाल्यावर दीर्घ अक्षर दे हें आलें आहे.

( २ ) शुद्ध चर्या हेंच सतांचे पूजन व ( ३ ) चीत्ताच्या सकोचे कांहींच न घडे या अभगातून हि हा नियम पाळला आहे असे स्पष्ट होईल

अभगांच्या या प्रकाराशिवाय तुकोबानी आणखी हि अभगांचे निरनिराळे प्रकार केले आहेत व त्याची म्हणण्याची पद्धत हि वेगवेगळी आहे. उदाहरणार्थ

( १ ) होतों तें चितीत मानसीं
( २ ) एका हातीं टाळ, एका हातीं चिपळीया ।
( ३ ) कोण आता कळीकाळा । येऊ वळा देईल ।
( ४ ) अंगी देव खळे ।
( ५ ) माझे मज आता न देखे निरसतां ।
( ६ ) खेळ मांडीला वाळवंटी घाई ।
( ७ ) पागुळ जालो देवा । नाहीं हात ना पाय ।

याशिवाय आणखी २१४ प्रकारचे अभग आहत

# कवित्व



श्रीतुकोबाराय कवित्व करूं लागल्यावर प्रथम त्यांनीं ओंव्याचे अभंग केले, त्यांतून कवित्वाचा जो अनुभव आला, त्या अनुभवानें बालक्रीडा बनली. यानंतर श्रीहरीचे कीर्तनास सुरवात झाली. हें कीर्तन सुरू झालें तेव्हां प्रेममूर्ति श्रीपंढरीनाथ व बोधरूपी नामदेवराय यांच्या मूर्ति तुकोबांच्या मनश्चक्षूपुढें उभ्या होत्या, असें त्याच्या अभंगातील शब्दयोजनेवरून वाटत आहे. ताप हें हरण श्रीमुख । या अभंगांची शब्दयोजना तशी आहे. गुरूपदेश झाल्यावर आपणास देवदर्शन व्हावें म्हणून (७५१) तुकोबाराया जो टाहो करीत होते तो पाहून रखुमादेवीवरांनीं त्यांचे हातीं प्रेमाचें भातुकें दिलें, बोलावयास बोल शिकविले ते बोल तुकोबांच्या तोंडून नीट बाहेर पडलेले पाहून तुकोबांचें पंढरीनाथांनीं कौतुक केलें, अशा तऱ्हेनें आपली करमणूक पढरीनाथ करून घेत आहेत अशी तुकोबांची निष्ठा होती. नामदेवरायांनीं आपणास एकाएकीं आपल्या मिराशीचा धनी करून आपल्या वाणीस कवित्वाचा अलंकार चढविला, असें हि तुकोबांस वाटत होतें. ज्ञानीयाचे गुरु ज्ञानेश्वर माउली यांनीं, त्यांचेकडे धरणेकरी आला तेव्हां त्यास तुकोबांकडे पाठविलें, त्या कार्यास्तव "भातुकें" दिलें म्हणून क्रीडा करीत असताना—म्हणजे अभग स्फुरत असतांना ज्ञानेश्वरमहाराज आपणास आढ घालन बोललेत (२३८) (तुजवीण सत्ता नाहीं वाचा वदविता । तुका म्हणे आढ । केलें मी हे तुझें कोड ) अशी तुकोबांची खात्री होती. त्यांस असें हि वाटें का, (२३४) आपल्या डोळ्यांत कृष्णांजन मायबापांनीं घातलें आहे. त्यामुळें आपली दृष्टि सोज्वळ झाली, तेव्हां कोणता हि जिन्नस बरा किंवा वाईट, सरस कीं निरस आपणास चटकन कळतो. श्रीहरीस, जनास निरोप मांगण्याची त्वरा झालेली असते तेव्हां तो गडबड फार करतो, माझी वाणी मला आवरत नाहीं असें होतें. तसेंच मला स्वामीच्या सत्तेनें (११६) रोज नव्या नव्या गोष्टी स्पष्ट होत जातात. श्रीहरी आपलें मन माझ्या मनांत निळवितो व त्यामुळें अंतरांत प्रत्येक गोष्टींतील वर्माची खूण प्रगट होते. आपणास नारायणाची जोडी झाली आहे. ही जोडी म्हणजे हातीं वैरागारमणी यावा तशी आहे. या वैरागारमण्याच्या पोटीं रत्नांच्या खाणी (१४८) आहेत. तेव्हां येथें तर्कवितर्कास थार नाहीं. या रत्नांच्या खाणी ज्या

भांडारांत ठेविल्या आहेत त्या भक्तिप्रेमसुखाच्या भांडाराची किल्ली माझे हातीं आहे. तेव्हां तें भांडार उघडून मी हा त्या धन्याचा माल विकावयास ( १५१ ) आणला आहे. त्यासाठीं ऐसपैस दुकान घातलें आहे; त्यांत निरनिराळे–उत्तम–मध्यम–कनिष्ट–असे जिन्नस ( २०० ) निवडून सांठविले आहेत. तुम्ही जेवढ्या मोलाचा जिन्नस घ्यावयास याल तेवढ्या मोलाचा जिन्नस देण्यास तुका दुकानीं बसला आहे. सर्वत्रांस विनवणी करून अहो श्रोते–वक्ते तुमच्या पायांवर मी मस्तक ठेवून एक च गोष्ट सांगतों कीं ( १५१ ) माल खरा घ्या व तो बरा पारखून घ्या. येथें ( ७०१ ) माझें असें सांगावयास कांहीं नाहीं. पण ( ६९३ ) तुम्हांस एवढें च सांगतों कीं यासारखे जिन्नस कोठें मिळाले नाहींत, पुढे मागें कधीं हि मिळणार नाहींत. कारण मीं भांडारांतील सर्व माल झाडून आणला आहे. तेव्हां तुम्हांस जी जी गोष्ट हवीशी वाटेल अशी प्रत्येक गोष्ट माझ्याजवळ सिद्ध आहे. या: सर्व जिन्नसा मला गोळा करून आणतां आल्या याचें कारण एक च कीं माझ्या अंतरांत चिन्मणी दीप लागला असल्यामुळें त्या दिव्याच्या दिव्य प्रकाशांत–मी धन्याचा इमानी नोकर असल्यामुळें–मला या भांडारांत विश्वासानें हा चन्मणी दीप हातीं देऊन सोडलें, मीं सर्व जिन्नस गोळा केले. संतजनांनीं माझ्यावर कृपा केली. ( १ ) माझ्या वाणीवर कवित्वाचा अलंकार चढविला. पंढरीनाथानें मला मोठ्या कौतुकानें ( २२४ ) जगास नीति काय हें सांगण्याच्या कामावर नेमलें. इतकेंच नव्हें तर जे चुकत असतील त्यांची फजिती करावयास हि सांगितलें आहे. ( पं. १७७५ )

॥ सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण। जोवरी हा प्राण जाय त्याचा।१
॥ ध्रु ॥ आर्णीकांच्या धाक न धरावा मनीं। नीरोपा वचनी टळो नये ॥ध्रु॥
॥ समय सांभाळूनि आगळे उत्तर। द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ २ ॥
॥ तुका ह्मणे तरी ह्मणवावे सेवक। खादलें तें अन्न हक होय ॥ ३ ॥

त्या जगदीशाची सत्ता माझ्या पाठीशीं असतांना–कोणी रागावेल कीं काय अशी भीति बाळगण्याचें मला कारण नाहीं. रागावोत बापडे! त्यांची पर्वा नाहीं. या जगदीशाचा निरोप लोकांस सांगतांना–रामकृष्ण नाम हा तीक्ष्ण बाण माझे हातीं असतांना अविद्या आंत शिरेल कशी? येईल कोठून? तशी वेळ आली तर वज्रा प्रमाणें कठीण उत्तर योजावें अशी श्री विठ्ठलाची आज्ञा आहे या दुकानीं फक्त खऱ्याचा च विकरा होणार–येथें खोटा माल खऱ्यासारखा खपविण्याचें कारण नाहीं. शिवाय या दुकानीं सर्व

माल (२३१) सवंग आहे. येथें (पं. ३३९५) आम्हां घरीं शब्दांचीं रत्नें मिळतात. तुम्हांस कांहीं शस्त्र हवें तर आम्ही शब्दच देतों. हे शब्द (१५०) देवाच्या कृपेचा प्रसाद आहे. तो जगांत आनंद वाढवावा म्हणून देवांनीं माझे हातीं दिला आहे. मी एक मोठें जहाज भरून हा माल या मनुष्य देहाच्या बंदरांत आणला आहे. हे जिन्नस अलभ्य आहेत व मी ते तुम्हांस फुकट देत आहे. शींग लावून जिह्वा व कान या मार्गांनीं पुरेपुर माप भरून घ्या. मी (१०९) हीं जीं शब्दरत्नें तुम्हांस देत आहे तीं (९०९) नारायणमिश्रित आहेत. त्यांत वचना वचनाला तुम्हांस नारायण भेटेल. माझ्या अंतरांत मनाच्या सिंहासनावर देवादिदेव पंढरीनाथ विराजमान झाले आहेत. (१५२) मी हात वर करून सर्वत्रांस हीं गोष्ट सांगत आहे कीं जो जो येथें येईल तो कोणती हि इच्छा मनांत धरून येवो त्याची येथें हौस फिटेल. कारण एकाच्या कैवाडें म्हणजे पुंडलिकाच्या व माझ्या कैवारानें—सकळांच्या जीवित्वाचें कोडें येथें फिटणारें आहे. पांडुरंगाचे चरणीं पण सकळांच्या शिरावर बसून मी वचनें उच्चारीत आहे. (६०७) माझी वाणी प्रेम अमृतानें ओलावली आहे. (६०७) रामनामानें पिकली आहे. (पं ३९१९) व विठ्ठल विठ्ठल गजरानें गोडावली आहे. येथे सकल मंगलें बोळलीं व येथें आनंदाची च वृष्टि मेघवृष्टीसारखी अनिवार होत असते. भाग्यवंत जे असतील (३०८) त्यांनीं एवढें च करावें कीं आपल्या वाणीनें विठ्ठल नामाचें माप भरून घ्यावें. म्हणजे ते आनंदानें पुष्ट होतील व माझ्या बरोबर त्यांचा हि उद्धार होईल. माझे घरीं ब्रह्मरस पिकास आला आहे. तेव्हां पंगतीस सुकाळ आहे. (४१९) माझें भाग्य फळलें, गोविंदाची भेटी झाली. त्यानें आपला सर्व ठेवा माझे हातीं अवचित दिला. आतां दैन्य कसलें? चिंता तरी कसली करावयाची? आम्हीं या नर देहाच्या क्षेत्रांत (६१२) संन्याशासारखे दिसत असलों, तरी इतर संन्याशाप्रमाणें आम्हीं आशा, काम, यांची होळी केली नाहीं. सर्व अंग प्रेमानें भरलेले—भारलेले आहे, पण मी वेशधारी संन्याशासारखा उगा च कांहीं तरी आहे असें समजूं नका-तर मी वेदांची बरी वाईट रंडें निवडतों. (१५३) क्षर अक्षरा वेगळा होऊन वेदांच्या सर्व कला पाहतो. विठ्ठलाच्या प्रसादानें तुम्हांस सांगत असतो. हे हातचुकें म्हणजे अटकळीचे शब्द नाहींत. हे कोणाचे उसने आणलेले बोल नाहींत; येथें मतांतरें गोळा केलेलीं नाहींत, तर अन्तरीच्या ध्यानांत माझ्या जें अनुभवास आलेलें असतें, तेवढेंच सांगतों. माझ्या अंतरांत सुखाचा झरा लागला आहे. तेव्हां

माझ्या मुखावाटे जीं अमृतवचनें बाहेर पडत आहेत (२५६) त्या शब्दांच्या ओळी दिसल्या तरी त्या रत्नांच्या माळा आहेत. हें लक्ष्यांत ठेवा. सूर्य प्रकाशला (२५७) म्हणजे त्याचीं किरणें जशीं सर्वत्र पसरतात तशी या शब्दरत्नांची प्रभा पसरलेली तुम्हांस दिसेल. हे शब्द बोबडे आहेत असें तुम्हांस वाटलें तरी प्रेमानें ते बोबडे आहेत म्हणून च देव गोड करून घेत आहे. त्यास शब्दरत्नांनीं वाहिलेली पूजा ही मोलाच्या मोत्यांनीं पूजा करावी अशी वाटते. हे शब्द तुम्हांस फुलासारखे सुशोभ्य दिसतील. (२९२) तसे च हे शब्द तुम्ही आदरयुक्त मनानें कानांत विसावलेते तर तुमच्या अन्तःकरणांत त्यांचा परिपाक होईल. त्यांचा परिणाम तुमचा तुम्ही च पाहून घ्या. श्रीहरीस तुमच्या हिताचा कळवळा आहे. तुम्ही काळाचे हातीं पडूं नये, म्हणून, तुमच्यांतील दोष निवडून, मी त्यांवर राम नाम बाण सोडतों. माझ्यासारखा तुम्हांस सखा दुसरा कोणी भेटणार नाहीं. मी सहज बोलत जातों. त्यांत तुमचे अंगीं जे दोष असतील त्यांची निंदा होते ती तुमच्या कोणाच्या वर्मास झोंबते. मी कांहीं एखाद्या सांप्रदायिकाप्रमाणें वाटेल (२१०) ती बाजू घेऊन हट्ट धरणारा खळ नव्हे; फक्त सत्याच्या सखेनें उपदेश करीत आहे. माझ्या शब्दांची जो साक्ष पाहील त्यास त्याचा परिणाम कळेल. (२५६) हा शब्द ब्रह्मांडास पुरून उरेल एवढा सामर्थ्यवान आहे. गंगा जशी आपल्या ओघानें वाहात जाते—तसा—मी गात जात आहें. तो बोल च लोकांना उपदेशासारखा पुरेल. जे कोणी भाग्यवंत असतील—त्यांस या उपदेशामृतांचें (५५२) सेवन होईल. पण हे लोक असे खमंग आहेत, कीं तोंडांत घास घावयास जावें तर तोंड पळवितात; पळवोत तोंड बापुडे—मी ही जी वाणी वदत आहे ती दुसऱ्या कोणासाठीं नाहीं. मी स्वतःच्या आवडीनें विठुरायाची रोज पूजा नवी नवी करीत असतों. माझे शब्द हे एवढे स्पष्ट, सोपे, आहेत कीं माझ्या वचनांची शब्दसृष्टि वाढवून कोणीहि उकल करावयास नको. (पं. १७७५)

प्रेममूर्ति पांडुरंग हें जगाचें जिव्हार म्हणजे मर्म अन्तःकरण—बीज—आमच्या वाट्यास बहुतांच्या भाग्यानें आलें आहे. (३६) त्यास मीं एकविधभावानें घट्ट धरून ठेविला आहे; त्यास रूपास आणून मीं जवळ उभा करून ठेविला आहे. तो माझ्या शब्दानें अंकित होऊन—वैकुंठ, क्षीरसागर सोडून या भूतलावर—चंद्रभागेच्या तीरीं उभा आहे. तेव्हां आमच्या फडावर येऊन त्यास देव भेटला नाहीं असें म्हणून कोणास हि निराश होण्याचें कारण नाहीं. (पं. ३७६७)

जगाचें जिव्हार, जगाचे हातीं देण्यासतव, सहज सुलभ अशा अभंग वृत्तांत तुकोबांनीं आपली शिकवण साठविली आहे. या अभंगांत विषयपरत्वें अक्षरांची संख्या कमी जास्त करून, चरणांत कांही चमत्कृती करून–व प्रतिपाद्य विषयास अनुरूप अशा लहानमोठ्या आकाराचे अभंग करून तुकोबांनीं आपलें लोककल्याणाचें कार्य केलें. भजनास वा कीर्तनास सुरवात झाल्यावर–प्रतिपाद्य विषयांत नवा मुद्दा सुरू करतांना त्या मुद्याकडे श्रोत्यांचें लक्ष्य वेधलें जावें म्हणून तुकोबा वृत्त बदलतांना दिसतात. कीर्तन वा भजन करीत असतांना समोरच्या श्रोत्याची विषय आकलन करण्याची पात्रता ओळखून शब्दरचना ही नेहमीं च सोपी–साधी–परंतु कधीं थोडीफार संस्कृतप्रचुर, कधीं मृदु, मवाळ, तरी कधीं तिखट, कधीं कठोर तर कधीं अनन्य अशी नित्य नवी करीत होते असें वाटतें. भजन करीत असतांना–मध्यें कोणत्या हि विषयाचें गद्यांत निरूपण करावयाचें नसतें–तेव्हां त्या अभंगाची घडण ही टीपबंद, रेखीव आहे असें आढळेल. कीर्तनांत जे अभंग होत असतील त्यांस जोडणारा दुवा गद्यांत होत होता व तो लिहिला गेला नसल्यामुळें कांहीं अभंग एका च विषयावर व एका च धोरणाचे, तत्त्वाचे-दिसले तरी त्यांची बांधणी तेवढी टीपबंद, रेखीव असणार नाहीं. तेव्हां तुकोबांच्या अभंगांच्या अन्तर्गत दुव्यात थोडा फरक आढळेल. जे भजनाचे अभंग आहेत, ते सुतास सुत जोडावें–उसाच्या एका कांड्यातून–दुसरें कांडें निघावें–तसें जुळलेले आढळतील. कीर्तनांत एवढी सुसूत्रता आढळली नाहीं, तरी एका प्रसंगानें, एका तत्त्वाचे ते अभंग एकमेकांस जोटलेले आहेत असें प्रत्ययास येईल. याशिवाय तुकोबांकडे पुष्कळ माणसें–कीर्तनानें किंवा भजनानें आकर्षिलीं जाऊन–माउली, आमचा उद्धार करा, असें येऊन म्हणत असतील व आपल्या जीवांत जें सांकडें असेल, ज्या मानसिक, शारीरिक-सांपत्तिक–संस्कारांच्या–संसाराच्या अडचणी असतील त्या मोकळ्या मनानें सागत असतील. अशा प्रत्येक आर्त–अनन्य–अनिद्क, व्यक्तीस त्याच्या त्याच्या जरूरीप्रमाणें माउलीपणानें तुकोबा एक–दोन–तीन–चार–असे सुट्टे सुट्टे अभंग करून उपदेश वा प्रसाद म्हणून लिहून देत असावेत. आपल्या वह्यातून हि असले अभग नोंद करून ठेवीत असावेत. असे बरचसे सुट्टे सुट्टे अभंग–क्वचित् दोन दोन अभंगांचा, क्वचित् तीन अभंगांचा, एकेक गट्ट, असे पुष्कळसे गट संताजीच्या वह्यांत आहेत. या प्रत्येक गटाचे पाठीमागें एकेक आर्त. अनन्य–जिज्ञासु व्यक्ति उभी आहे, असें आपण समजून घेतलें पाहिजे. त्या माणसाचें सांकडें फेटण्यासाठीं तो बोध अवतरला आहे. व त्याचें साकडें फिटलें आहे.

असें आपण समजावें. तुकोबाराय मृदंग लावून गात नाचत विनोदें । टाळ घागऱ्यांच्या छंदें । भजन करीत तेव्हां पूर्वींच्या संतांचा कोणता तरी गोडसा अभंग घेऊन त्याचा विस्तार स्वतःच्या अभंगांनीं करीत, किंवा पूर्वीचें वडिलोपार्जित धन हें पोटीं घेऊन स्वत.चा व्यापार वाढवीत, हें सांगण्यास आज तरी साधन उपलब्ध नाहीं भजनास सुरवात करीत असतांनाचा पहिला अभंग हा असा सुरवातीची साक्ष पटवील अशा कांहीं खुणा कोणी नोंद करून ठेविल्या नाहींत. या वहीतील पहिला अभंग पहा:– होतों तें चिंतीत मानसीं । आजी नवस फळलें नवसीं । 'जोडी ते नारायणा ऐशी । ही निःसंशय सुरवात आहे. अशी च (४१६) सुरवात पुढें गोविंदाची जोडी झाली हें सांगण्यास केली आहे. एकवार सुरू झालेला ओघ थांबतो कोठें–हें समजण्यास त्यावेळच्या भक्तगणास कांहीं तरी खुणेचे शब्द माहीत असतील पण ते त्यांनीं लिहून न ठेवल्यामुळें आज आपण त्याचें अनुमान च केलें पाहिजे. अशा दृष्टीनें इंदुप्रकाश, संताजी व साम्प्रदायिक अशा गाथ्यांचा जरा बारकाईनें अभ्यास केला पाहिजे. तसा अभ्यास करूं लागावें तों भजन वा कीर्तन मोठें असलें–तर उपक्रमोपसंहार हा मीमांसेंतील नियम तुकोबांनीं सहज च संभाळला होता असें दिसतें. इंदुप्रकाश प्रतींत. १६५९ व्या अभंगाची सुरवात

॥ मथुरेच्या राया । माझे दंडवत पाया ॥
॥ तुमच्या कृपेचें पोसणें । माझा समाचार घेणें ॥

अशी आहे. व पुढें १६९१ व्या अभगांत–तुका म्हणे जे हें साराचे हि सार । माझा अंगीकार तेणें केला । म्हणून या भजनाचा किंवा कीर्तनाचा किंवा काव्याचा शेवट १६९२ व्या अभंगात केला आहे. आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ । याती हीन कुळ दैन्यवाणा ॥ धृ ॥ माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ।– हें निरूपण १६५९ या अभंगांत अमुक एक व्हावयास पाहिजे. म्हणून म्हटलें व १६९२ मध्यें तीं गोष्ट सिद्ध झाली असें स्पष्ट सांगितलें आहे. तुकोबांची भजनाची रीत काय होती हें जसें त्यावेळच्या भक्तांनीं लिहून ठेविलें नाहीं. तसें च त्यांनीं कीर्तनाची रीत हि लिहून ठेविली नाहीं. तुकोबा कीर्तनास कशी सुरवात करीत असावेत. ते पूर्वींच्या संताचा अभंग कीर्तनास घेऊन त्याच्या निरूपणासाठीं स्वत.चे अभंग वापरीत किंवा, तुकोबा पूर्वीं झालेले अभंग वापरीत किंवा

कीर्तनांत स्फूर्तीनें आलेले अभंग म्हणत ही गोष्ट कोणी तत्कालीन माणसानें नमूद केली नाहीं. महिपतीबोवांनीं लिहिलें आहे कीं, तुकोबा स्फूर्तीनें अभंग करीत व ते संताजी तेली व गंगाराम मवाळ लिहून घेत. पण ही गोष्ट मला शक्य वाटत नाहीं—या दोन्हीं व्यक्ती फारशा शिकलेल्या नव्हत्या. त्यांतल्या त्यांत संताजी तेली यांस अक्षर ओळख किती होती हें आपण प्रत्यक्ष पाहून महिपतीबोवांनीं लिहिलेली गोष्ट अशक्य आहे, असें एका व्यक्तीपुरतें निःसंशय विधान करूं शकूं. या दोन्हीं व्यक्ती कांहीं लघुलेखकाची कला शिकलेले नव्हते. तेव्हां एक तर अगोदर करून ठेविलेले अभंग तुकोबा कीर्तनांत किंवा भजनांत वापरीत असावेत किंवा हें भजन वा कीर्तन झाल्यावर तुकोबा हे अभंग स्वतः लिहून ठेवीत असावेत. स्वयंस्फूर्तीनें अन्तर्प्रतीतीनें प्रभावी व प्रयोगी शब्दरचना होऊन कीर्तनांत वा भजनांत ऐश्वर्याचीं वचनाक्षरें तुकोबांच्या मुखावाटें बाहेर पडत असावीत, त्या अभंगांचे आरंभ हे लेखक लिहून तरी किंवा ध्यानांत ठेवीत असावेत व त्या दिवशी किंवा दुसऱ्या दिवशीं तुकोबा स्वतः ती शब्दसृष्टि लेखनिविष्ट करीत असावेत. तुकोबा कीर्तन वा भजन करीत तेव्हां रसपरिपोष कसा करीत, रंग कसा भरीत, उपमा—अलंकार—दृष्टांत—कोठें व किती व कोणचे वापरीत—देवाची व संतांची आळवण कशी करीत-हें समजण्यासाठीं आज कांहीं हि साधन नाहीं. फक्त धरणेकऱ्याचे अभंग आपणापुढें आहेत. त्यांत सुरवातीचे सात अभंग नमनाचे आहेत. पुढील अकरा अभंग उपदेशाचे आहेत. हे अभंग तुकोबांनीं धरणेकऱ्यास दिले व तो ते टाकून गेला. त्यानंतर तुकोबांनीं, जे तेरा अभंग, ज्ञानोबांस पत्र, म्हणून केले. त्यांत सात व अकरा या अभंगाचेद्वारें हरिकथा केली असें म्हटलें आहे व तेथें या हरिकथेचें अति गोड वर्णन केलें आहेः— (सं. ९६२)

॥ परम अमृताची धार। चाले देवा हे समोर ॥ १ ॥
॥ धृ ॥ उर्ध्ववाहिनी हरीकथा। मुगुटमणी सकळां तीर्थां ॥ धृ ॥
॥ शीवाचें जीवन। जाळी महादोष कीर्तन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हरी! स्तुती वाणी इची थोरी ॥ ३ ॥

तेव्हां त्या धरणेकऱ्यासाठीं तुकोबारायांनीं कीर्तन केलें असावें—व ते अभंग लिहून त्यास दिले असावेत. येथें एक गोष्ट पाहण्याजोगी आहे व ती ही कीं तुकोबांनीं पंढरीनाथांची व ज्ञानोबांची आळवण पहिल्या सात

अभंगांत केली आहे. या सात अभंगांत वापरलेलीं विशेषणें लक्ष्यांत घेतलीं तर पुढें जें कार्य करावयाचें आहे–त्यासाठीं शक्ति–स्फूर्ति–देऊन सांगावयाची गोष्ट काय तें सांगा अशी आळवण केली आहेसें दिसतें त्या आळवणीप्रमाणें–माझ्या बापानें भातुकें दिलें म्हणून मी क्रीडा केली--मीं जी आळी घेतली ती तुम्हीं पुरविलीत व हें उत्तम दान हातीं आलें म्हणून म्हटलें (२५०). हें उत्तम दान हातीं आलें तें पाहून पुढील अभंगांत तुकोबा म्हणतात–मायबाप–ज्ञानीयांचा तुं राजा महाराव–म्हणती ज्ञानदेव ऐसें तुम्हां। तुम्हीं मला तुमच्या योग्यतेस आणून बसवितां यास काय म्हणावें ! पायींची वहाण पायीं असलेली बरी ! आम्ही तुमचे पायाजवळ असावें तुम्ही मला आपुले पदीं बसवितां यास काय म्हणावें ! मला कांहीं तुमच्यासारखी खोल युक्ति साधत नाहीं. तेव्हां आतां तुमचे पायावर डोकें ठेवतों. मी जी वेडींवाकडीं वचनें-माझा अधिकार काय हें *लक्ष्यांत न घेतां बोलला, हा माझा अपराध क्षमा करा. असें हें तुकोबांनीं* नमूद केलेलें कीर्तन सुसूत्र आहे. प्रमाणबद्ध आहे. परंतु या गोष्टींचा आजवर कोणी हि अभ्यास केला नाहीं. तेव्हा त्याबद्दलचे ज्यास्त शोध कोणी केले नाहीत. हें सांगावयास च नको.

तुकोबारायांची शब्दसृष्टि पढिक विद्वानाची नव्हती. त्यांनीं विश्वासानें, आदरानें–जीं कांहीं संतांचीं वचनें पाठ केलीं होतीं, तेवढी च त्यांची शब्द-सृष्टि ! तीं संतांचीं वचनें कानांत विसावून मनांत परिपाक होऊन त्यांच्या अंतरांत जेव्हां सुखाचा झरा लागला, आनंदाला पूर आला तेव्हां प्रेमामृतानें ओलावलेल्या, हरिगुणगानानें गोडावलेल्या, विठ्ठल गजरानें पिकलेल्या वाचेच्या-द्वारां तो प्रेमाचा पूर–तो सुखाचा झरा–वाट काढूं लागला; तेव्हां त्या नि:शब्दाचे शब्दांनीं आलें करून परब्रह्म कवळावें अशी स्थिति झाली. प्रत्येक शब्द हा अवस्थेच्या प्रतीतीनें स्थानापन्न असल्यामुळें तो ज्या कळकळीनें उच्चारला जाई तेवढ्या च आर्ततेनें त्या समोरच्या श्रोत्यांच्या आर्त मनोभूमींत रुजे. त्यामुळें तुकोबांचें कीर्तन वा भजन परिणामकारक होई. अगदीं बालपणांत च शिव छत्रपती त्यांच्या वक्तृत्वाच्या प्रभावांत सांपडले. त्यांनीं इतर उपदेशकांनीं सांगितल्याप्रमाणें सर्वसंग परित्याग करून भजन पूजन कीर्तनांत आयुष्य वेचावें असें मनांत आणलें व तसा क्रम सुरू केला. तुकोबांस ही गोष्ट कळली तेव्हां तुम्हीं स्वराज्यस्थापनेच्या कामावर रहा आम्ही भजन कीर्तन द्वारां लोकांची अवनत स्थिति सुधार-

ण्याच्या, त्यांच्या अंतरांत रवीचा प्रकाश पाडण्याच्या, त्यांच्या हातून पाप कृत्य होणार नाहीं, अशा तऱ्हेनें त्यांच्या विचारांची दिशा बदलविण्याच्या कामावर राहूं असें आपण एकमेक एकमेकांस सहाय्य करू व सर्व जण सुपंथ धरतील असें वागूं; असें म्हणून तुमच्या कार्याच्या पाठीशीं मी आहें याची खूण म्हणून तुमच्या सहकाऱ्यांना प्रसाद म्हणून अभंग देतों, असे हे पाइकीचे अभंग आहेत. आज जरी स्वराज्य आहे तरी सध्याचे सरकार त्या अभंगांचें निरूपण पटवून घेऊन पचवितील अशी मला खात्री देववत नाहीं. असो, तात्पर्य काय, कीं अभंगवाणी ही फार प्रतापवंत व प्रभावी होती. याची साक्ष रामेश्वर भटाची फिर्याद, व "गुरुत्व गेले नीच याती" अशी रामदासांची पोटदुखी, मंबाजीबोवांचा तडफडाट, व चिंतामणी देवांची परीक्षा अशा गोष्टी देत आहेत. अशीं आणखी हि कांहीं उदाहरणें झालीं असतील. पण अशा अडथळ्यांस न जुमानतां देवा हातीं रूप धरवूं आकार। नेदु निराकार होऊं त्यासी। या बाण्यानें तुकाराम महाराज वागत होते.

तुकोबारायांनीं अभंग रचण्यास सुरवात करण्यापूर्वीं, अभंग हें जो तो निरनिराळ्या तऱ्हांनीं परंतु अक्षरांची संख्या कमीजास्त करून करीत होते. त्यांत गोडवें म्हणजे धृपद कोठें यावयाचें यास नेम नसे. नामदेवरायांचे असे कित्येक अभंग आहेत कीं, त्या अभंगांत पहिलें चरण च गोडवे होण्याच्या लायकीचें आहे. ज्ञानेश्वर माउलीच्या कांहीं अभंगांच्या चाली चरणा-चरणास बदलाव्या लागतात. निवृत्तिनाथांचे अभंग हे कोणी गाऊन म्हटले असतील असें मला वाटत नाहीं. तीच गत सोपानकाकांच्या अभंगांची व मुक्ताबाईच्या अभंगांची. त्यावेळीं कांहीं सांगावयाचें तर तें पद्यात सांगावें लागे म्हणून या मंडळींनीं आपलें म्हणणें छंदोबद्ध केलें आहे एवढेंच. या उलट मृदंग लावून गात नाचत विनोदें। टाळ घागऱ्यांच्या छंदें। असं म्हणून सर्व महाराष्ट्रास सादावीत तुकोबाराय निघाले व कीर्तन व भजन हें एवढें च साधन अभंगद्वारा ते वापरूं लागले, तेव्हां, आपलें सांगणें परिणामकारक व्हावें येवढ्यासाठीं त्यांनीं अभंगांची मांडणी व्यवस्थित केली. सात्विक व प्रेमळ असे दृष्टांत घेऊन-घरगुती नातीं-गोतीं, नित्यपरिचयांतील प्रत्येक चीजवस्त-चंद्र सूर्य, राजाराणी, यच्चावत प्रत्येक गोष्ट, त्यांनीं दृष्टांतास वापरली. प्रत्येक दृष्टांतांत द्रष्टा जो श्रीहरी तो कोठें पहावा हें लोकांस शिकवलें. राजापासून रंकापर्यंत सर्व दर्जाचे लोक त्यांचेकडे उद्धारार्थ येत. तेव्हां त्यांनीं

मानव जातींतील सर्व वर्णाचे, सर्व दर्जाचे, लोक दाखल्यास घेतले. बाल-शिवाजीराजा व मातोश्री जिजाबाई यांस एका च अभंगांत दृष्टांतासाठीं घेऊन लोक, शहाजीराजांनीं बायको टाकली, मुलगा वांड निघाला म्हणून जें कांहीं वावदुकपणानें, बेजबाबदारपणानें, बोलत होते त्यांच्या तोंडास कुलूप घातलें. ( पं. २३९३ )

॥ प्रीती नाहीं राया वर्जिली ते कांता । परी तिची सत्ता जगावरी ॥
॥ ध्रु ॥ तैसे दंभी जालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहती ॥ ध्रु ॥
॥ राजयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणीका दंडवेल ॥
॥ बाहात्तर खोडी तरी दे रमणी कंठीं । तैसा जगजेठी म्हणे तुका ॥

पक्षिणी व पिलें, दुकान–धनको–ऋणको–गाय व वत्स, माउली व लेकरूं, पति–पत्नी, सासू, जार–जारिणी. हे सर्व दृष्टांतास घेतले आहेत. मानवी प्राण्याच्या सर्व खोड्या लक्ष्यांत घेऊन दृष्टांतासाठीं वापरल्या आहेत.

मानवी नात्यागोत्याचे घरगुती दृष्टांत तुकोबा येवढ्या बारीक नजरेनें वापरीत कीं त्या दृष्टांतांतून तुकोबा द्रष्टा, पांडुरंग, न सांगतां श्रोत्यांस न समजतां, हातीं देत, तेंव्हां तो पुनः श्रोत्यांच्या हातून निसटत नसे.

सर्व धंदे दृष्टांतास घेतलेले आहेत. प्रत्येक धंद्यातील कला–कुसरी लबाड्या–लाचाड्या सर्व कांहीं दृष्टांतात वापरलें आहे. रोज खावयाचा भात दृष्टांतास घेऊन भक्ति, ज्ञान, व वैराग्य यांची मिळणी एका अभंगांत स्पष्ट केली आहे ( भक्ती ते, नमन, वैराग्य तो त्याग ! ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्म तनु ।
आम्हां घरीं धन । शब्दाचीच रत्नें ।

तुकोबारायांनीं, अभंग, हें सहज सुलभ असें वृत्त वापरलें, सर्व जग दृष्टांतास घेतलें तशी त्यांची शब्दसृष्टि त्या वेळच्या शेतकरी–कुळंबी–माळी–सुतार, गंवडी, पाथरवट व थोड्या फार अंशानें पांढरपेशा वर्ग यांच्या नित्याच्या वापरांत असलेली होती. ते कांहीं पढीक शास्त्री पंडीत नव्हते, पुराण–कीर्तन ऐकून व कांहीं संतांचीं वचनें विश्वासानें, आदरानें पाठ केलेले बहुश्रुत असे गृहस्थाश्रमी मराठे पण व्यवसायानें वाणी असे गृहस्थ होते. मर्यादित शब्दसृष्टीच्या भांडवलावर अफाट व्यापार करणारे ते स्फूर्तिवंत वक्ते होते. त्यांची स्फूर्ति जिवंत होती. यामुळें नित्याच्या वापरांतील साध्यां शब्दांना त्यांनीं धीरगंभीर अर्थ सूचित करण्याचें साधन बनविलें. उदाहरणार्थ माउली हा एकच शब्द घेऊं. हा शब्द

साडेचार हजार अभंगांच्या गाथ्यांत २५।३० वेळां आला आहे, तेव्हां माउली हा शब्द कोठें आला तर तो एकगुणविशिष्ट असा स्थानापन्न आहे. असें समजावें. तुकोबांनीं आम्हां घरीं धन। शब्दाचीच रत्नें। म्हणून म्हटलें, त्यांतील हा अत्यंत देदीप्यमान हिरा आहे रत्नासारखे चमकणारे तुकोबाच्या शब्द-सृष्टींत खालील शब्द आहेत. त्या प्रत्येकास विशिष्ट अर्थ आहे.

भक्तिप्रेमसुख, प्रेमबोध, प्रेमखुण, सतांचा पढिया, सोलीव सुख, तीळ तांदळया, नि.शब्दाची वाणी, प्रेमपान्हारस, नामामृतगोडी, निज, सोय इ, आळी, जोडी, लटिवाड, कौतुक, डोरणें, दसरा, सोवळा, माहेर, निजबोध, वोरस, इ. इ.

याप्रमाणें त्यांनीं विषय, प्रतिपादनाच्या, सहज ओघानें शेंपन्नास शब्दांच्या व्याख्या साधल्या आहेत त्यांतील नमुन्यासाठीं कांहीं खालीं देत आहे. त्या एखाद्या कायद्याच्या पुस्तकांत सुरवातीस जशा शब्दांच्या व्याख्या दिलेल्या असतात तशा रेखीव व स्पष्ट आहेत असे दिसून येईल अभंगांचें रूपांतर करतांना अशा व्याख्या भिजल्या वहींत जेवढ्या आल्या त्या स्पष्ट करून दाखविल्या आहेत.

पंडित ॥ आचरणा ठाव। नाहीं अंगीं स्वता भाव ॥ १ ॥
॥ धृ ॥ करवी आणिकांचे घात। खोडी काढुनि पंडित ॥ धृ ॥
॥ श्वानाचिया परी। मिष्टान्नासी विटाळ करी ॥ २ ॥

आवडी ॥ जिवीच जाणावे या नांवें आवडी।
आचार्य ॥ भाग्यवंता हे चि काम। भापी नाम वैखरी।

आनंदाची पुष्टी अंगीं। श्रोते संगे उद्धरती।
पिकला तया खाणे किती। पंगतीस सुकाळ।

गाढव ॥ आधीच आळशी। वरी गुरुचा उपदेशी।

मग त्या कैंची आडकाठी। विधीनिषेधाची भेटी ॥

नाचरवे धर्म। न करवे विधी कर्म।
तुका म्हणे ते गाढव। घेती मनासरे धांव

चाट ॥ कानीं धरी वे ल बहुतांचीं मते। चाट त्या परते आणीक नाहीं ॥
देव ॥ नामाची आवडी तो चि जाणावा देव।

अशा च सहजसुलभतेनें अभंगांतून कित्येक म्हणी साधल्या गेल्याचें आढळेल. अशा म्हणी साडेचार अभंगांच्या गाथ्यांत ५।८ शें आहेत, व भिजल्या वहींत जेथें जेथें आल्या आहेत तेथें त्याचेकडे लक्ष्य वेधावें म्हणन त्या म्हणी वेगळ्या दाखविल्या आहेत. येथें ४।५ नमुना म्हणून देत आहे.

( १२ ) क्षणभंगूर हा येथीचा पसारा । आलीया हाकारा अवघे राहे ।
( ७१ ) नेम नाहीं लाभ हानी । अवचीत घडती दोन्ही ।
( १०३ ) क्षीर मागे तथा रायते वाढी । पाधाणी गधडी ऐशा नांवें ।
( १०४ ) विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे आंगीं ।
( १०४ ) मधुरा उत्तरीं । रावां खेळे उरावरी ।

याशिवाय तुका म्हणे माझी केळवते वाणी । असे कांहीं नवे शब्द-प्रयोग हि अभगांतून आहेत. अभंगांत ठिकठिकाणीं विनोद, थट्टा वक्रोक्ति, उपहास, या वक्तृत्वाच्या अंगांना हि स्थान मिळालेलें आहे.

---

## कारुण्यरस—करुणापर अभंग

अभंगवाणीनें तुकोबारायांनीं श्रीपंढरीनाथाची पुष्कळशी आळवण केलेली आहे; ती आळवण करुणापर अभंगांत सर्वत्र पसरलेली आहे. त्यांतून कारुण्यरस वाहात असलेला आढळेल. हा कारुण्यरस काय आहे याबद्दलची कल्पना स्पष्ट नसल्यामुळें हें अभंग अपूर्ण स्थितींतील असे शेरे कांहीं पदवीधर व्यक्तींनीं मारले, कवित्वाच्या स्फूर्तीचें मूळ लक्ष्यांत न ठेविल्यामुळें त्यांची ही गैरसमज झालेली होती. पंडित गाथ्यांतील ५२५–३७ अभंगावरील चर्चा अभंग चर्चा या पुस्तकांत ( २२९–४१ ) पाहावी तर त्या चर्चेत भक्ती प्रतिपाळे, दीनवो वत्सले, विठ्ठले, कृपाळे, माये, हीं विशेषणें प्राप्त पुरुषानें अनुभवलेलीं, अनुभवानें सिद्ध झालेलीं विशेषणें, आहेत असा विचार त्या थोर विद्वान पंडितास शिवला नाहीं. कमुदिनी व भ्रमर हा दृष्टांत प्राप्त पुरुषाशिवाय कोण वापरू शकेल! असा विचार ती चर्चा करणाऱ्या विद्वानांस शिवला नाहीं.

तुकोबारायांनीं अभंग द्वारां जी विठ्ठलाची करुणा भाकली ती कशा-बद्दल भाकली ? ती अशाबद्दल भाकली कीं, सर्व सत्ता हातीं आल्यावर ज्ञानानें दृष्टि चोख झाल्यावर असें लक्ष्यांत आलें कीं, सर्व कांहीं बा विठ्ठला तुझें आहे. सर्व सत्ता तुझी आहे, मी, माझे, हे शब्द फोल आहेत, असें असून हि जिव्हेस लागलेली संवय सुटत नाहीं. ते शब्द समोर येतात च तेव्हां तशी वृत्ति जागृत होऊं नये, तसा शब्द मुखावाटे बाहेर पडूं नये म्हणून श्री.

विठ्ठलाची करुणा भाकावयाची. करुणा म्हणजे भीक नव्हे. समोर आई दिसते आहे. स्वतःस थंडी लागत आहे, आई मला थंडी लागत आहे म्हणून उचलून कडेवर घेण्यासाठीं घाई करीत आहे. ती उचलून कडेवर घेणार आहे याबद्दलहि खात्री आहे अशा वेळीं त्या सोनुल्या बालकाचे तोंडून जे कांहीं हट्टाचे--कांहीं रागाचे–कांहीं सत्तेचे शब्द बाहेर पडतात–ती करुणा समोर ताटांत पेढा दिसत असतांना तोंडात लाळ येऊन "वाटा पेढे लवकर" म्हणून जेव्हां एखादा मनुष्य सत्तेनें सांगतो त्याचें नाव करुणा. पाट तांटें मांडलीं आहेत, जेवण सर्व सिद्ध आहे, त्या जेवणाचा परिमळ बाहेर येत आहे अशा वेळीं घरचा मालक, पानावर बसून बायको, मुली, सुना या आपलें कर्तृत्व दाखविण्यासाठीं चटण्या, कोशिंबिरी वाढण्यांत च वेळ फुकट दवडताहेत, तेव्हां कांहीं प्रेमानें कांहीं रागानें बोलतों त्याचें नाव करुणा. मूल आईच्या कडेवर आहे पण ती शेजारणीशी गप्पांचा पट्टा चालविण्यांत गुंग आहे. तिचें अशावेळीं मूल रडून–रागावून–तोंड धरून–तिच्या सर्व लक्ष्यांस वेध मी व्हावा म्हणून इच्छा करून जेव्हां तो बालहट्टाचे बोबडे शब्द उचारतो, त्याचें नांव करुणा. प्रत्येक नात्यांत नित्य नवा रंग भरावा, व त्यामुळें सुख वाढीवर असावें, म्हणून प्रेमाच्या सत्तेनें जेव्हा माणसें–कधीं हासून, कधीं रुसून–कधीं खेळत–त्तर कधीं खोड्या करीत प्रेम भोगतात, आनद लुटतात, त्या वेळीं जी शब्द सृष्टि निर्माण हाते ती करुणा. तेव्हां तुकोबांचें म्हणणें असें कीं देवा, शास्त्रें तुम्हीं निर्माण केलींत, त्यांत ससार नाईट म्हणून तुम्ही शिकवलेत. आम्ही ते अनुभवाने शिकलों. पण तुम्ही ससाराची गोष्ट नित्य नवी गोडी उत्पन्न करून समोर उभी करता हा तुमचा नष्टपणा, खाष्टपणा, कृष्णावतारांतील खोडकर स्वभाव! आतां या भोगास काय करावें! म्हणून बा. तुझी करुणा भाकतों. तुला नित्य भेटावें, तुझ्याशीं च नित्य बोलावें–तुझ्या सगतींत सदा असावें- असा साच सकल्प असतांना देवा तुम्ही त्या सकल्पाप्रमाणें मन-बुद्धि अचल राहू देत नाहीं म्हणून करुणा. लहान मुलास आपण मांडीवर बसविलेलें असावें त्याच्या अंगाभोवतीं आपले हात असावेत. पण त्यास कांहीं कारणानें जी प्रेमाची उकळी आलेली असते ती एवढी अनिवार असते कीं आपले हात ओढून तो राजा जेव्हां स्वत.स जयास्न आवळून घेतो त्यावेळीं त्या बाळाचे मुखावाटा जी गोड वाणी बाहेर पडते तिचें नांव करुणा. प्रीयु व प्राणेश्वरी (अशा नात्यानें वागणारी पतिपत्नी किती असतील!) हीं अधीर होऊन एकमेकांपाशीं ज्या गोडीनें बोलत असतात-ती करुणा. प्रीयु

एखादी अति गोड गोष्ट-सुखावह वृत्त, प्राणेश्वरीस सांगण्यास अधीर झालेला असतो. तें वृत्त काय आहे हें ओळखून-ती कांहीं तरी कामांत गुतल्यासारखी दाखवून एकांतास उशीर करते त्यावेळी उत्पन्न होणारी शब्दसृष्टि करुणा. आई बरा च वेळ बाहेर गेलेली असावी, मूल दारांतच वाट पाहात बसलेलें असतें-एवढ्यांत आई परत येते व आपल्याच रंगांत इतर गोष्टींत दग होते, पण बाळास उचलून आवळून कवळून घेत नाहीं त्यावेळी, रागाचें, रडण्याचें, जे शब्द बालाचे मुखावाटा बाहेर पडतात ती करुणा. आपली प्रेमाची सत्ता असतांना ती सत्ता चालविण्यास उशीर झाला कीं करुणा उत्पन्न होते. तात्पर्य उत्कटत्वाची अधीरता, अतिस्नेहाच्या पोटीं उपजणारी अनिश्चितता, सत्तेची निश्चितता-अशा सर्व गुणांत झुळझुळ वाहणारी अनन्यता-अशा सर्व गुणांनीं सुखानें च पण घायाळ झालेली मनाची स्थिति-ती करुणा. या कारुण्यरसानें मन जेव्हां घायाळ अवस्थेंत प्रेमानें वाहत असतें तेव्हां त्या प्रेमाच्या पुरात देवास जन्म घेण्यास जागा होते

॥ सांपडे भरलीये वाहीं । भाव शुद्ध पाहीं याचे भातुकें ।(१)

म्हणून तुकोबांनी आपला अनुभव नमूद केला आहे. तुका वेडा अविचार। या अभंगांत तुकोबांनीं आपली घायाळ स्थिति वर्णिली आहे. पण ही अवस्था काय आहे. याचे आकलन नीट न झाल्यामुळें, प्रार्थना समाजाच्या सभासदांनीं चालविलेल्या तुकाराम चर्चा मंडळानें लाविलेले अभंगाचे अर्थ चुकीचे आहेत. तसेंच खिश्चन मिशनऱ्यांना या अभगांत पापाची कबुली, दुर्गुणांची कबुली दिसली.

(१) पतीत मी पापी शरण आलों तुज
(२) पतित पतित । परी मी त्रिवाच्या पतित ॥

असल्या अभंगांचा अर्थ, कारुण्य म्हणजे काय रस आहे हें न कळल्यानें त्यांचे अर्थ चुकले आहेत असो, या रसांत सारखे अठरा दिवस देवाचा धावा करीत तुकोबा शिळेवर पडून राहिले. तेव्हां पांडुरग बाळमूर्ति प्रगट झाली. वह्या रक्षिल्या आहेत म्हणून म्हणाली. तेव्हां देवा हातीं रूप-धरवूं आकार-ही गोष्ट ज्या रसानें सिद्ध होते तो रस केवळ्या उत्कटवांत-केवळ्या अनन्यत्वाच्या घायाळपणांत उत्पन्न होतो हें या उदाहरणानें लक्षांत यावे. ही गोष्ट आपण कोणा तज्ज्ञ माणसाचे तोंडून समजून घेतली पाहिजे, इतकेंच नव्हे तर तशा घायाळ स्थितींत असणाऱ्या एखाद्या महापुरुषाची गांठ पडणें जरुरीचें

आहे. त्या महापुरुषास आपला विश्वास पटला पाहिजे, आपण सांगू त्या गोष्टीचा हा श्रोता विपर्यास करणार नाहीं, भलती च शंका मध्यें घेणार नाहीं, असं त्यास अंतरांत पटलें पाहिजे, शिवाय तो मनमोकळा असावा, चोरटा नसावा, तसा तो महापुरुष उदासीन हि नसावा, या दृष्टीनें संतभेटी बहु अवघट आहे असें तुकोबारायांनीं म्हटलें आहे. असा महापुरुष च अनुभवलेलें सुख पोटीं घेऊन जेव्हां अभंगांचें निरूपण करील, तेव्हां च या अभंगांचें वर्म पढे ठवें । त्या शिवाय

॥ उड रे उड रे काऊ । तुझें सोन्याने मढवीन पाऊ ।

हीं स्थिति समजणार नाहीं. तें भावगीत वाटेल तसें तें चरण भावगीत नाहीं. ती अन्तर्यामींची विरहावस्था आहे. त्या अभंगाचा शेवटचा चरण

॥ ज्ञानदेव म्हणे जाणीजे ये खुण । भेटती पंढरीराणे शकुन सांगे ॥

अंतर्यामीं हीं एवढी घायाळ स्थिति झाली आहे का? तर मग पंढरीराणे भेटतील च अशी खात्री असूं द्यावी, असें ज्ञानदेव म्हणे. हा कारुण्य रस तुकोबाच्या कवित्वांत सर्वत्र पसरलेला आहे च पण या ७५१ अभंगांत तर तो ओतप्रोत आहे. आजवर हे करुणापर अभंग सुट्टे सुट्टे वापरले जात. परतु या वहीच्या आधारानें आपणास यापुढें या कारुण्यरसाचा परिपोष अभंगा–अभंगानें कसा होत गेला हें सुरवातीपासून अखेरपर्यंत पहावयास सांपडेल. आजवर ही गोष्ट वक्त्याच्या, कीर्तनकाराच्या मर्जीवर असे. तो अभंगांची निवड करून विषय प्रतिपादन करितांना जसा रंग भरील तें तुकोबांचें निरूपण असें समजावें लागे. आतां या ७५० अभंगांपुरतें तसें करावयास नको. उदाहरणार्थ, स्त्री पुत्रादिकीं राहिला आदर हा अभंग घेऊं. पूर्वी हा अभंग वैराग्य अंगीं बाणावें म्हणून घेऊन वक्ता त्याचें रसभरित वर्णन चरणा--चरणास करीत असे–आतां निरूपण निराळ्या तऱ्हेनें करावें लागेल. या अभंगाच्या वरचा अभंग गंगेचिया अंतावीण काय चाड असा आहे. त्यांत वर्णिल्याप्रमाणें आनंदसोहळ्यांत असतांना देवा–मध्येंच स्त्रीपुत्रादिकांबद्दल मनांत आदर डोकावतो याचें कारण काय, असें म्हणून देवास धावा म्हणतात–धावा म्हणण्याचें कारण मी असा स्वतंत्र पाईक नाहीं–कीं–या गोष्टी स्वतः करूं शकेन. पुढें २४-२५-२६ २७-२८-२९-३० एवढे अभग एकापुढें एक पण चढत्या प्रमाणांत होऊन पुढें म्हणतात

॥ भोगावरी आम्ही घातला पाषाण ।- मरणा मरण आणियेलें ।-

स्त्रीपुत्रादिकीं राहीला आदर अशी सुरवात होऊन एकापुढें एक चढत्या प्रमाणानें अभंग होऊन

॥ आम्हुच्या हें आलें भागा । जिऱ्हार या जगाचे ॥

म्हणून सांगितलें तेव्हां या ८।१० अभंगातील रसपरिपोष नवीन आहे. हा प्रथमच या स्वरूपांत आपल्यापुढें येत आहे. असो. येथें, स्त्रीपुत्रादिकीं राहीला आदर, या अभंगापासून कारुण्यरसास जी सुरवात आहे. त्याच रसांच्या ओघांत तुकोबा ७५१ व्या अभंगापर्यंत आहेत.

---

## शिकवण



तुकोबारायांचीं लोकजागृतीचीं साधनें, भजन व कीर्तन हीं होतीं. या साधनांची मांडणी अशी आहे कीं, यांत मुळांत भजनद्वारा एकांत व्हावयाचा श्री विठ्ठशीं व त्या भजनांत जो बोध पदरांत पडेल तो जनतेस द्यावयाचा हरिकीर्तनांत. जेव्हां कोणी आपलें मन उघडें करून स्वतःचें साकडें तुकोबारायास सांगून तें निवारण्याचा उपाय विचारावयास येई, तेव्हां त्या अडचणीतीं सांकडीं-ते अवघड प्रश्न विठुरायास सादर करावयाचे व तल्लीनतेंत-त्या प्रश्नांस जें उत्तर भावारूढ स्थितींत स्फुरे तें प्रगट व्हावयाचें कीर्तनांत तुकोबा स्वतः "नव्हे माझी वाणी पदरींची!" अशी पदोपदीं ग्वाही देत असतांना आढळतात. तेव्हां जें कांहीं तत्त्वनिदर्शन व्हावयाचें, संतबोध प्रगट व्हावयाचा-तो कोणाच्या तरी गरजेनें-एखाद्याचें कोडें सोडविण्यास्तव-त्या त्या व्यक्तीच्या गरजेपुरता व्हावयाचा. तुकोबा कांहीं ग्रंथकार नव्हते-कीं तेवढ्यासाठीं कोणत्या हि विषयाचें सांगोपांग विवेचन त्यांनीं करावें! त्य चेकडे आलेल्या प्रत्येक व्यक्तीचें जीवाचें कोडें ते उकलीत होते. एकाच्या कैवाडे उगवे बहुतांचें कोडे। या नियमानुसार त्याच्या बोधवाणींत इतरांना "कल्याणाचा ठाव" सांपडे. तात्पर्य तुकोबारायांच्या अभंगांत केव्हां हि हा बोध, ही भक्ति, हें ज्ञान, हें वैराग्य, हा व्यवहार, हा उपदेश अशीं सदरें घालून अभंग केलेले सापडणार नाहींत तर एका च अभंगांत गोडव्यांत अगर ध्रुपदांत तत्त्व सांगितलेलें व त्या ध्रुपदाच्या वरच्या खालच्या चरणात त्या तत्त्वाचा विस्तार केलेला, त्यापुढें १।२ दृष्टात समोरच्या श्रोत्यास पटतील असे व अखेर तुका म्हणे असें म्हणून या सर्व निरूपणाचा तूं बोध काय घे-हें सांगितलेलें असावयाचें. अशा २।४ अभंगांत

शिकवण सांठविलेली, ती हि हंसत, खेळत, सहज हातीं दिलेली असावयाची. तेव्हां तुकोबारायांच्या शिकवणींतलि बोधरत्नें हीं प्रत्येकानें आपापल्या जरुरी-प्रमाणें गाथ्यांत (बोध रत्नांच्या खाणींत). ज्याची त्यानें आपल्या नडी प्रमाणें आपल्या जरूरी प्रमाणें, आपल्या योग्यते प्रमाणें निवडून घ्यावीत.

॥ माझा मज उपदेश। इतरां नाहीं त्याचा रीस॥
॥ नाहीं मज कोणी उरला दुर्जन। माय बापाविण ब्रम्हांडांत॥

समोरच्या प्रत्येक व्यक्तीस प्रेमस्वरूप पांडुरंग, सच्चिदानंद गाभा,-असे पाहण्याची तुकोबांची रीत. जगांत वाईट मनुष्य असतोच कां-तर हा विठु कृष्णावतारांत फार खोड्याळ होता त्यास पूर्वाश्रमींची आठवण होऊन-आमची नजर चुकवून हा कांहीं तरी उपद्व्याप करून तें गाऱ्हाणें, तें कोडें, ती उपाधी, आमचेपुढें उभी करतो. हेतु हा कीं त्या उपाधींत हें चैतन्य, हें सांवळें परब्रह्म, कसें गुप्त आहे तें, आम्हीं शोधून काढावें. तात्पर्य, तुकोबांच्या ज्ञान व प्रेम यांच्या संमिश्रणानें बनलेल्या बोधदृष्टींतून केव्हां कोणती गोष्ट सुटली आहे असें होत नाहीं. त्यांनीं अभंगद्वारा येवढा मोठा आरसा प्रत्येकाचे पुढें उभा केला आहे कीं, त्यांत प्रत्येकास आपला चेहरा पहावयास सांपडेल. तसा स्वतःचा चेहरा पाहिला कीं आपण संतबोध पदरांत घेऊन आपली चर्या-म्हणजे राहणी शुद्ध कशी करावी याचा हि बोध आढळेल 'व हें सर्व, कांहीं हि मोल न घेतां सवंगपणानें कोणी वर्म हातांत द्यावें, तसे तुकोबा स्वतः देत आहेत असें आढळेल. ज्ञानेश्वरींत-ज्ञान सांगेन सहज। विज्ञानेंसी- असें जें म्हटलें आहे, त्याप्रमाणें तुकोबा प्रत्येकाचा प्रश्न-ज्ञान व विज्ञान सांगून सोडवितांना आढळतील. असे एकेक, दोन दोन, तीन तीन, अभंगांचे सुटे सुटे गट संताजीच्या गाथ्यांत व्यवस्थितपणें पहावयास सांपडतात. ती सर्व शिकवण च आहे. या वहींत हि सुरवातीपासून अखेरपर्यंत नुसती, शिकवण काय, म्हणून कोणी शोधील त्यास २१४ अभंगांत मिळून कोठें तरी स्पष्ट शिकवणीच्या शब्दांच्या ओंवणी रत्नांच्या माळा आढळतील. कोणा हि व्यक्तीस त्याच्या नटस्तित्व गतिसारखा ग्रंथ सांगावा लागत नाहीं. व समरांगणांत ७००।७५० श्लोक सांगितले नसावेत. तेथें झालेल्या संवादाचा तो व्यासांनीं केलेला विस्तार आहे. परंतु जेवढा प्रश्न अवघड-तेवढें विषयप्रतिपादन विस्तृत व सखोल तुकोबांचें झालें आहे असें आढळेल. तुकोबारायांची बोध दृष्टि जेव्हां एखाद्या प्रश्नावर पडे "हा दिठोवा जयावरी उठके' म्हणजे च पाखरू माथां पाखरे। तो जीव चि

परी तुके महेशेंशीं. । तेव्हां ज्ञानस्वरूप नारायणानें तो प्रश्न सोडवून, बोधस्वरूप सदाशिवाचे हातीं तो लखोटा द्यावा, व त्या महेशानें तो बोध तुकोबांच्या मुखा वाटा ( तूं बोलसी माझे मुखें ) बाहेर द्यावा, स्पष्ट करावा, अशा अखंड समाधींत–तुकोबा होते. अशा स्थितींत तुकोबा असतांना त्यांच्याकडे बीड परगण्यांतील एक देशपांड्या ब्राह्मण आला व त्यानें स्वतःचें वृत्त तुकोबांस सांगितलें. तें खालील प्रमाणें:–मी पंढरपुरीं धरणें धरून बसलों होतों, हें धरणें मी उपशी राहून करीत होतों, हेतु, हा कीं, मला व्युत्पत्तिज्ञान होऊन–पुराण सांगतां यावें. तसा मी दहा दिवस बसल्यावर मला दृष्टांत झाला कीं–तुला जी कांहीं आराधना करावयाची ती आळंदीस जाऊन ज्ञानेश्वरांची करावी. व ते जे युक्ति सांगतील त्याप्रमाणें तूं वागलास तर तुझे मनोरथ पूर्ण होतील.. त्याप्रमाणें मी आळंदीस आलों व तेथें अन्नपाण्याशिवाय धरणें धरून बसलों. तेथें दृष्टांत झाला मी तुमचे कडे यावें व तुम्हीं मजवर अनुग्रह कराल, तो मीं मानावा.

हा वृत्तांत ऐकून व त्या माणसाचें वयोमान, बुद्धिमत्ता–सर्व कांहीं लक्ष्यांत घेऊन तुकोबांस मोठें संकट पडलें असावें. परंतु पंढरीनाथाचें कार्य ज्ञानराजां-कडून आपणाकडे आलें तेव्हां तेथें हो ना करण्याची सोय नव्हती. तेव्हां तुकोबांनीं देवाच्या व संतांच्या सेवेस्तव कीर्तन केलें. त्यांत पहिल्या ७ अभंगांत पंढरीनाथाची व ज्ञानेश्वर माउलीची अत्यंत कळकळीची आळवण आहे व त्यापुढें त्यांस जो बोध स्फुरला तो अकरा अभंगांत साठविला आहे या अकरा अभंगांत तुकोबांनीं खालीलप्रमाणें बोध केला आहे:—बा, तुझें वय झालें आहे. तेव्हां तूं कांहीं साधन करून मोक्ष मिळविण्याच्या किंवा ग्रंथाध्ययन करून ज्ञान मिळविण्याच्या भानगडींत पडूं नकोस–साधनें हीं काळाच्या मुखांत नेऊन तुला घालतील. व ग्रंथ पाहून वेदपठण करून जी, गोष्ट व्हावी ती, मी तुला सांगतों कीं, तूं ग्रंथांच्या भानगडींत पडूं नकोस–साध-नांच्या खटपटीस लागूं नकोस, मोक्ष हीं उधारीची व मेल्यावरची गोष्ट आहे. तर तूं एक च कर कीं:—

॥ देवाचिये चाडे आळवावे देवा । वोस देहभावा पाडोनीया ॥

हें तुला सांगण्याचें कारण असें कीं हा पांडुरंग नामासाठीं उडी घालतो व तसा तो तुझ्या हांकेसरसीं धावून आला कीं तो तुला भवनदीच्या पैलपार नेईल. या तुला मोक्ष मिळावा अशी जी इच्छा झाली आहे ती तृप्त करावी म्हणून पांडुरंगाचे

मनांत आलें तरी मोक्ष हें असें एखादें डबोलें—गाठोडें—नाहीं, कीं, जें तो तुला सहजचे उचलून हातांत देईल. त्यासाठीं आपलें मन आपल्या ताब्यांत येऊन इंद्रियें हीं आपल्या हातीं यावीं लागतात. असें आपलें मन निर्विषय होतें. म्हणजे कोणत्या हि विषयाचें त्या मनावर बळ चालत नाहीं. उपासतापास करून, अक्षरांची आटाआटी करून व सत्कर्म करून जें साधावें म्हणून साधनें करतात तीं एवढ्याचसाठीं. तेव्हां कोणत्या हि गोष्टीचा आत्यंतिक आदर धरिला नाहींस कीं जी गोष्ट सहज आहे त्याचें दुःख होणार नाहीं. तूं इतरांचे शब्द ऐकून स्वप्नांत जसा एखादा मनुष्य—मेलों मेलों म्हणून विव्हळत असतो—तसा भावबंध—वगैरे शब्द शास्त्रीपढितांचे ऐकून विव्हळतो आहेस—तेव्हां तुला जें फळ प्राप्त व्हावें अशी इच्छा आहे तें फळ ज्या मूळ—ईश—शक्तीस देतां येईल त्या ईशसत्तेस तूं शरण जा. म्हणजे 'देवाचिये चाडे आळवावे देवा। वोस देह भावा पाढोनीयां॥—म्हणजे तुझें काम होईल. इतर साधनें करतांना कांहा सोडा—कांहीं धरा—अशी सांडी मांडी करावी लागते; तसें आपण कांहीं टाकून दिले, सोडून दिलें, असा जनांत डंका पिटवून उपयोग होत नाहीं. तेव्हां आपण देवास करुणा भाकून आळवावें. आपण देवाची करुणा साच भावानें भाकीत आहोंत किंवा नाहीं.—यांस आपलेंच मन आपणास साक्षी असतें. त्यासाठीं आपण कोणत्या क्षेत्रास जावयास नको. आपल्या अंतरांत—हृदयस्थ—जो आहे—तो आपल्या मनांत जो विचार उत्पन्न होतो—तो कोठून होतो काय विचारानें होत आहे, हें ओळखून असतो. हा जो हृदयस्थ आहे, तो कृपासिंधु आहे व तो आपणास बांधणारा भवबंध तात्काळ तोडतो, येवढ्यासाठीं मीं तुला सांगितलें कीं 'देवाचीये चाडे आळवावें देवा। वोस देहभावा पाडोनीयां।' अशी आळवण करून जर गोविंद—गोविंद हा एवढा च तुझ्या किंवा कोणाच्या मनाचा छंद होऊन बसला तर ती काया च गोविंद होते—त्या व्यक्तींत व देवांत भेदभाव उरत नाहीं. याची खूण अशी कीं हा स्वतः च गोविंद झाल्यानें मन आनंदित होतें व डोळ्यावांटा प्रेमाचे पाझर वाहूं लागतात. बा, आळी जशी त्या फुलपाखराच्या ध्यासानें फुलपाखरूं होते,—तिला वेगळें राहतां येत नाहीं—तसें ज्या माणसास ज्यांचा ध्यास लागेल तसें त्याचें मन होतें—तेव्हां इतर सर्व कांहीं बाजूस सार व पांडुरंग हा मनीं दृढ धर—त्याचीं सम पाऊलें विटेवर उभीं ठाकलीं आहेत. तो आकाशाहून मोठा व अणुहून हि लहान असा आहे. ग्रंथ पाहून वेदाध्ययन करून हरिगुणगान करावें अशी बुद्धि झाली तर ठीक, नाहीं तर ती नुसती सोंडपिटी व्हावयाची, तपतीर्थाटणें करून हरिनामीं बुद्धि स्थिर झाली तर ठीक, नाहीं

तरती पायपिटी व्यर्थ जावयाची. यज्ञयाग, दानधर्म, करून कंठीं नाम स्थिर झालें तर ठीक नाहीं तर आयुष्य व्यर्थ जावयाचें. तेव्हां या कोणत्या हि काबाडाचें भरीस न पडतां मी या सर्वांचें तुला जें सार सांगत आहे तें मनीं धर. तूं उपाशीं राहून जें धरणें धरतोस तसें करूं नकोस—खुशाल पोटभर अन्न खा—व दिवसभर त्या पांडुरंगाचें चिंतन कर—म्हणजे ज्यानें तें अन्न आपणास दिलें, ते त्याचें त्यास पावेल व आपल्या पदरांत त्या चिंतनाचें फळ पडेल. हा जो देणारा आहे त्याचें नांव विश्वंभर आहे—हा जगाचा आधार आहे. याची सत्ता नाहीं असा रिता ठाव त्रिभुवनांत नाहीं. तेव्हां मला हें एवढेंच हवें—असें म्हणून—स्वतःचा संकोच करून, लहान कां होतोस—सर्व ब्रह्मांड एका आपोष्णानें गट्ट कर—असें पारणें तूं कर व संसारास तूं आंचव—म्हणजे संसारांतून संसाराच्या नांवानें हात धुवून मोकळा हो. हें करण्यास तूं उशीर लावूं नकोस. मी—माझें असें लहानसें घरकुल करून अंधारांत कां सांपडतोस? त्यानें फार कासाविसी होते. तेव्हां आई जशी एखादी गोष्ट लांब झुगारून दिल्यासारखें दाखवून खाकेंत ती गोष्ट लपवितें—तसें हा पांडुरंग सर्व जगाचा पसारा दाखवून मूळ गोष्ट—वर्माची गोष्ट—आपल्या जवळच लपवून ठेवितो. तेव्हां

॥ देवाचीये चाडे आळवावें देवा। वोस देह भावा पाडोनीया।

बाप श्रीज्ञानेश्वर माउली यांच्या पुढें मीं तुझी आळी मांडली व त्यांनीं मला जो खाऊ दिला त्या आनंदांत मीं क्रीडा केली. त्याचें फळ म्हणून हें दान माझे हातीं आलें तेव्हां यांत जो तुझा विभाग आहे तो घेऊन तूं आपल्या स्थळास काळ व्यर्थ न दवडतां जा. तेथें ज्ञानेश्वर माउलीच्या नांवानें तूं समुदाय गोळा केलास कीं मी तुमचे व त्यांचे पाय वंदण्यास तेथें येईन.

तूं ज्ञानीयांचा राजा, महाराव, तुम्हांस लोक ज्ञानदेव, असें म्हणतात. तेव्हां ज्ञानाचें दान तुम्हीं द्यावेंत. हें थोरपण मला कशाला? माउली, पायींची व्हाण पायीं असावी हें बरें. मला तुमच्या युक्तींची खोली कोठें साधणार? तेव्हा तुमच्या पायांवर मला डोई ठेवूं द्या. महाराज, मी *माझा अधिकार काय हीं* गोष्ट लक्ष्यांत न घेतां आलीं तशीं वेडीवांकडीं उत्तरें म्हणजें वचनें बोललों. महाराज तुम्हीं सिद्ध च आहांत तेव्हां तो अपराध क्षमा करा व बा ज्ञानेश्वरा, या आपल्या पायाच्या सेवकास तेथें च पायीं राखा.

* या अकरा अभंगांत तुज व्हावा जरी देव। तरी हा सुलभ उपाव असा हा स्वयें अंगें ब्रह्म होण्याचा सुलभ उपाव सांगितला आहे. हा बोध माझ्या

बापानें मला जें भातुकें पाठविलें त्या बळानें मीं क्रीडा केली व त्यांत हे अभंग झाले. तेव्हां ज्ञानेश्वर माउलींनें जो खाऊ पाठविला तो कोणता असावा असा साहजिकच प्रश्न उद्भवेल. तो खाऊ हरिपाठ होय. हरिपाठांत ज्ञानेश्वर माउलीनें जो बोध केला आहे, तो च बोध थोड्या फार फरकानें या अकरा अभंगांत आहे व तीच गोष्ट पंढरीनाथानें पंढरपुरच्या ब्राह्मणांस ज्ञानोबाच्या मुखानें एक वार सांगितली होती. ही गोष्ट नामदेव रायाच्या तिर्थावळीच्या अभंगांतील शेवटच्या दोन तीन अभंगांवरून स्पष्ट होईल, पंढरीनाथ ज्ञानोबा यांच्याकडे जाऊन जसा धरणेकरी तुकोबांकडे आला तसाच पंढरीच्या ब्राह्मणांस करावयाचा बोध ज्ञानोबांच्या मुखानें होऊन तो हरिपाठांत गोवला गेला त्याचें सार तुकोबांनीं त्या धरणेकऱ्यास अकरा अभंगांच्या रूपानें दिलें, अशी या अकरा अभंगांस ज्ञानदेव व नामदेव यांच्या बोधाची बैठक आहे. परंपरा आहे. या अभंगांत काय सांगितलें याचें थोडें ज्यास्त स्पष्टीकरण करतों. या अकरा अभंगांत सर्व पुस्तकी ज्ञान सांडावयास सांगून देवाचीये चाडे आळवाव देवा। वोस देहभावा पाडोनीया अशी पहिली गोष्ट सांगितली आहे.

ही गोष्ट ज्ञानेश्वरींत

**तेव्हां देवाचीये चाडे आळवावे देवा।**
**तैसा मी तो यजावा। मींच म्हणौनि॥**

म्हणून ( अ. ९।३४५ ) सांगितली आहे व वोस देवभावा पाडोनीयां याचें स्पष्टीकरण जरा पुढें आहे.

**मग मीची डोळां देखीला। जीहीं कानीं मीच आइकिला।**
**मनीं मी भावीलां। वानीलां वाचा॥ ३५५॥**

**सर्वांगें सर्वठायीं। नमस्कारिलां मीचि जिहीं।**
**दान पुण्यादी जे कांहीं। तें माझीया मोहरा॥ ३५६॥**

**जिहीं मातें अध्ययन केलें। जे आंतु बाहेरि मियांचि धाले।**
**जेयांतें जीवीत जोडलें। मज चि लागीं॥ ३५७॥**

**जे अहंकार वाहांत आंगीं। आम्हीं हरिचे हे भुपावया लागीं।**
**जे लोभीण्यें एक चि जगीं। माझें नि लोभें॥ ३५८॥**

**जे माझेनि कामें संकाम। जे माझेनि प्रेमें सप्रेम।**
**जे माझिये भुली संभ्रम। नेणती लोकु॥ ३५९॥**

जेयांची मातें चि जाणति शास्त्रें । मी जोडे जेयाचेनि मंत्रें ।
ऐसोनि चेष्टामात्रें । भजले मज ॥ ३६० ॥

ते मरणा ऐलीकडे । मज मिळौनि गेले फुडे ।
मग मरणीं आनीकडें । जातील केवीं ॥ ३६१ ॥

ग्रंथाध्ययन केलें, वेदपठण केलें, तीर्थयात्रा केल्या तर त्यानें अंगीं अहंकार उत्पन्न व्हावयाचा, ज्ञानीयांचे घरीं चोजवितां देव। तेथें अहंभाव पाठीमागें।–तेथें देवाचीये चाडे आळवावे देवा ही गोष्ट भेटावयाची नाहीं. पंडित झालास तर शब्दांचें पांडित्य करशील, एका शब्दाचे दहा अर्थ सांगशील, व विद्वान् म्हणून तुझी वाहवा हि होईल पण ती विद्वत्ता अंगें ब्रह्म व्हावयाचें वर्म तुझ्या हातीं देणार नाहीं. तू यज्ञयाग केलेस तर तुला दीक्षित असें म्हणतील. पण ज्ञानेश्वरींत म्हटल्याप्रमाणें तें पुण्याच्या नांवानें पाप केल्यासारखें होईल. ती गोष्ट तुला श्रीहरीच्या पायावर नेऊन घालणार नाहीं. तूं गाणें शिकलास तर नव्या नव्या ताना घेशील. हाव भाव करून गाशील हि; त्यानें तुझी प्रसिद्धी हि होईल–पण ती गोष्ट तुला जीवाच्या जिव्हाळ्याची ओळख करून देणार नाहीं–तूं धन कुबेरासारखें मिळविलेस–तरी त्यांतील एक कवडी हि तुझ्याबरोबर येणार नाहीं. राज्य मिळविलेस तर जेथें देवादिकांचे अवतार उरले नाहींत तेथें तुझा काय पाड! या सर्व गोष्टी व येथें न सांगितलेल्या अनेक गोष्टी हि तुझ्या देहभावाच्या कल्पना वाढवितील पण त्यांपैकीं कोणती हि गोष्ट तुला 'जेणें अंगें चि ब्रह्म व्हावें.' हें सांगणार नाहीं. ती गोष्ट मी तुला अगदीं सुलभ करून सांगतों कीं:–

देवाचिये चाडे आळवावे देवा । वोस देहभावा पाडोनियां ।

अशा तऱ्हेनें तुझ्या मनास दुसरा कसला हि वेध न लागतां तुझ्या सर्व देहभावांस एकीएक गोविंद गोविंद हा एवढाच वेध राहिला–म्हणजे साहजीक च तूं म्हणशील कीं:–( सं. ७३४ )

॥ येणें मुखें तुझें वाणी गुणनाम । तेंची मज प्रेम देई देवा ॥ १ ॥
॥ डोळे भरुनीयां पाहे तुझे मुख । तेंची मज सुख देई देवा ॥ धृ ॥
॥ कान भरुनीयां आईके तुझी कीर्ती । ते मज विश्रांती देई देवा ॥ २ ॥
॥ वाये रंगीं टाळी नाचेन उदास । हे देई हातांस पायां सुख ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चींतुं त्यासी॥४

व असें होण्यास्तव सहज च तू म्हणशील की, (प ७५६)

॥ घेई घेई माझे वाचे। गोड नाम विठोबाचे ॥ १ ॥
॥ तुम्ही घ्या रे डोळे सुख। पाहा विठोबाचे मुख ॥ ध्रु ॥
॥ तुम्ही ऐका रे कान। माझ्या विठोबाचे गुण ॥ २ ॥
॥ मना तेथे धाव घेई। राहे विठोबाचे पायी ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे जीवा। नको सोडूं या केशवा ॥ ४ ॥

अशा एकविधतेत व उत्कटत्वात कोणाच्या हि तोंडून एक च शब्द बाहेर पडणार व तो असणार कीं (स. ७२५)

॥ तूं माझा मायबाप। सकळ वीत्त गोत। तूची माझे हीत। करितां देवा॥१॥
॥ ध्रु॥ तूं माझा देव। तू माझा जीव। तू माझा भाव। पांडुरंगा ॥ ध्रु॥
॥ तू माझा आचार। तूं माझा वीचार। तू चि सर्व भार चालवीसी ॥ २॥
॥ सर्व भावें मज। तूं होसी प्रमाण। येसी तुझी आण। वाहातुसे ॥ ३॥
॥ तुका म्हणे तुज। वीकला जीव भाव। कळे तो उपाव। करी आता ॥४॥

॥ गोविंद गोविंद मना बैसलीया छंद ॥
॥ ज्याचें जया ध्यान। तेच होय त्याचें मन॥

हे दोन अभग या अकरा अभंगाचे सार आहे. याच मार्गानें जाऊन श्री ज्ञानेश्वर माउलींने म्हटले कीं,

॥ विठ्ठल म्हणतां हरलें पाप। पदरीं आले पुण्य माप।
॥ मन हे धालें मन हे धालें। पूर्ण विठ्ठल चि झाले।

सर्व संतांचा हि हा च अनुभव असल्यामुळें सार सार सार विठोबा नाम तुझें सार असें सतांच्या सर्व शिकवणींचे सार काढून तुकोबानीं त्या धरणेक ऱ्याचे हातीं दिलें. हेतु हा कीं, त्याच्या वाणीवर विठ्ठल नामाचा उच्चार ठेवून दिला कीं, तें लहानसें रोप असलें तरी त्याचा वेल गगनापर्यंत जाऊन भिडावा. परतु हा बीड येथील ब्राह्मण देशपांड्या, विश्वास, हें मुख्य, भांडवल बरोबर घेऊन आला नव्हता. त्यास एका क्षणात चमत्कार होऊन त्याचे तोंडीं संस्कृत भाषा यावयास हवी होती. त्यास या मराठी अभगाची प्रतीति पहावी अशी हि बुद्धि सुचली नाहीं. तो ते अभंग टाकून गेला. त्यानतर कोंडभट लोहकरे या नांवाचा एक ब्राह्मण तुकोबाकडे आला, त्यानें ते अभग व त्याबरोबर तुको-बोंनीं ज्ञानेश्वर महाराजाकडून आलेलें श्रीफळ (नारळ) दिले तें घेतलें त्या नारळात त्यास जडजवाहीर सांपडून त्याचें दैन्य फिटलें व हे अभग पाठ

करून त्याम सर्व ज्ञान झालें, तो शिवछत्रपतींच्या दरबारीं हुद्यावर चढला अशी कथा महिपतीबोवांनीं वर्णिली आहे. असो, ती कथा बाजूस ठेवून आपण येवढें च पहावयाचें की या अकरा अभंगांत तुकोबारायांनीं स्वयें अंगेंची ब्रह्म होण्याची युक्ति सांगितली आहे. हीच युक्ति त्यांनीं स्वतः अनुभवाने सिद्ध केली होती. नुसत्या नामानें त्यांचें सर्व सांग झालें होतें.

॥ नामाचिया बळें कैवल्य साधन । उगेंचि निधान हातां चढे।

असा स्वतःचा अनुभव होता. तोच सुलभ उपाय त्यांनीं या अकरा अभंगांत सांगितला आहे. ऐके रे जना ( प. ११४२ ) या अभंगाचा शेवटचा चरण खालीलप्रमाणें आहे.—

॥ तुका म्हणे अनुभवें । आम्ही पाडीयेले ठावे
॥ आणीक हीं दैवें । सुख घेती भावीकें।

तेव्हां जे दैववान व भावीक असतील ते या शिकवणीचा अनुभव घेतील.

या अकरा अभंगांत संतबोधाचा गाभा तुकोबारायांनीं महाराष्ट्राच्या हातीं दिला आहे. बुटता हें जग न देखवे डोळां—व त्या जगाच्या हिताचा कळवळा त्यांस येई तेव्हां ज्ञान म्हणजे काय व त्याचा विहार कसा—व त्यामुळें व्यवहार कसा करावा हीं शिकवण अभंगांतून ठिकठिकाणीं सांठविलेली या भिजल्या वहींत आढळते.

---

## गृहकलह



गोणी आली घरा (९४) येथपासून माउलीची चाली लेंकराची ओढी (१०२) असे हे ७८ अभंग तुकोबारायांनीं पासरें राखण्याची नोकरी पत्करली. ती नोकरी नीट झाली नाहीं. तेव्हा त्या शेतकऱ्यास—पंचाईत होऊन नवीन करार लिहून दिला व अखेर धान्य निघाल्यावर तें धान्य बरें च वाढलेलें आढळले, तेव्हां दस्तारप्रमाणें होईल येवढें धान्य घेऊन बाकीचें धान्य तुकोबांच्या घरीं आलें—तेव्हां तुकोबा तें धान्य घेईनात. तुकोबांचें म्हणणें कीं मला ज्या कामावर नेमलें तें काम माझे हातून नीट झालें नाहीं, तेव्हां ते धान्य मला घेतां च येत नाहीं. माझा व त्याचा यातील एक हि कण नाहीं. हें म्हणणें जिजाबाईस कसें काय पटणार होतें! तेव्हां भरी लोकांची पाटोरी । हा

त्यांच्या रागाचा पहिला फणकारा ! व असा तोंडाचा पट्टा सुरू झाल्यावर पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें–मेला चोरटा–खाणोरी ( ऐत्ता खाणारा ) अशी पुष्पांजली त्यांनीं वाहिली व तुकोबा गोणी–( एक वा अनेक ) परत करित असावेत. तेव्हां त्यांच्या हातास जिजाबाई झोंबल्या असाव्यात हा एका दृष्टीनें अति प्रसंग च होतां–तेव्हां रागावून तुकोबांनीं–मेला या स्वतःस मिळालेल्या विशेषणाचा उपयोग करून जिजाबाईस म्हटलें असावें कीं–अग रांडे (विधवा) (तेव्हां तुकोबा मेल्यावर ची स्थिति,) संचिताच्या साठा खोटा असतो. हा साठा कांहीं उपयोगी पडत नाहीं. तो दुष्काळ आला होता, तेव्हां आपण कांहीं हि न करतांना सांठा गेलेला तूं पाहिलास ना ? तेव्हां आपल्या तहानभुकेची काळजी ज्यानें आपणास जन्मास घातलें त्याला आहे च प्रत्येक तहानभुकेला त्याची आठवण व्हावी. त्याची आठवण करावी–जरूरीपुरतें तो देईल. तें घ्यावें खावें. साठा करून उपयोगी पडत नाहीं. ही टेंच एकवार लागल्यावर तीच ती गोष्ट पुनः काय म्हणून करावी ? बरें खाण्यापिण्याची निश्चिंती असली कीं श्रीपतीची आठवण कोठें होते ? तेव्हां मला सकळ वैभव हें विटाळ आहे असें वाटतें. त्यावर जिजाबाईचें उत्तर–रोज गांवें काय, हा घेईल तें, तें घ्यावें काय, हा वांझ आहे. हें जे तुमचे भोवती लोक आहेत ते तरी काय करणार आहेत ? यावर तुकोबांनीं आपलें स्वतःचे वैष्णवांबद्दलचें मत असें सांगितलें कीं साखर म्हटल्यानें–जशी गोडी आठवते तसें वैष्णव म्हटल्यानें–ज्यांनीं मोक्ष गांठीं बांधून भजनीं सोस धरला आहे अशा माणसांच्या सहवासांत भोगलेलें प्रेमसुख मला आठवते व ह्या विठाईमावलीचें चित्त माझ्या खाण्या-पिण्याची चिंता वाहून सदा माझ्याबद्दलच्या मोहानें मोहलेलें आहे च–ती आपल्या प्रेमाचा वोरस देऊन आपले दास संभाळते. ही अनुभवाची सिद्ध गोष्ट तुकोबा सांगत आहेत व ती जिजाबाई पटवून घेत नाहींत मानीत नाहींत. अशी ही परिस्थिति आहे. ३२३-२६ तुकोबारायांकडे भजनास व कीर्तनास जी मंडळी येत त्यांचा हि जिजाबाईस मोठा त्वेष वाटे, आपल्या मालकांस हे लोक भजन–कीर्तनांत गुंतवून बिघडवितात अशी त्यांची समजूत. तेव्हां तुकोबांनीं त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केलेला दिसत आहे. ते जिजाबाईस म्हणाले कीं आपण मोठ्या अगत्यानें आमचे घरीं बोलाविलें तरी आपल्या घरीं यावयास ज्यांना सवड नाहीं–असे लोक केवळ माझ्यावर प्रीति म्हणून आपल्याकडे येतात.

व अशा रीतीनें भजन-कीर्तनानें सर्व ब्रह्मांड माझें सोयरें झालें आहे. ते लोक दुसरें कांहीं तुझ्याजवळ मागत नाहीत. फक्त एका सुखाच्या, आदराच्या, गोड शब्दाची अपेक्षा करतात-तर त्यांच्यागी कोमल शब्दानें बोलण्यांत तुझ्या पदराला काय खार लागणार आहे ? कोवळ्या उत्तरें काय वेचें ? काय ज्याचा त्याला धंदा नाहीं ! ते आमच्या घरी कशासाठीं येतात; विचार करून पहा तर खरें ! परंतु या रांडेला तेवढें हि माझें भूषण सोसत नाही. ती श्वान-कुतरें-पिसाळलेलें कुत्रें पाठीस लागावें डसावे तशी पाठीस लागते. तेव्हां देवा मला खरेंच तुमच्या अंगांत लपवा. आणि हिच्या हातून सोडवा. उडी घालून मला हिच्या हातून मला सोटवा. मी या लीगाडांत सापडलों आहे. माझें मन चरफडतें पण कांहीं इलाज चालत नाहीं. गृहकलहाचें तिसरें उदाहरण. ४५२-६६ एकदां तुकोबा कीर्तन करीत होते तेव्हां श्रीविठुराया हा प्रत्येक ठिकाणीं जीवमात्रास केवढ्या अनन्यत्वानें सरसा सरसा असतो याचें वर्णन करूं लागले. त्यांनीं देव बासर ( अमर्यादित ) आहे-निरंतर आहे, खोळंबा ( अडकलेला ) आहे, झळंबा ( लोंबकळत ) आहे. देव लागट आहे, निढळ आहे, जाणता आहे, अकुळया आहे, चतुर आहे, सेवेला तत्पर आहे, मजूर आहे, भ्याड आहे, दयाळ आहे, उदार आहे, थोड्या भक्तीसाठी फार भाग्य देतो, चांगला आहे, भाजीच्या एका देठासाठीं उडी घालणारा बराडी आहे, देव भ्याड आहे, बळीच्या दारांत उभा आहे, भाविक आहे, दासांचा सेवक होऊन राहतो, व तुम्हीं म्हणाल तसा होतो. देव अणुपेक्षांहि लहान आहे, देव भला आहे, देव बळी आहे. त्यास भूमंडळात जोडा नाहीं. तेव्हां आपण चला देव पाहूं-त्यासी जीवभाव सांगूं, तो आपल्या मनीची गोष्ट ओळखून पुरवील. तो आपल्या सर्वांचा आहे, आंत बाहेर भरलेला आहे, देव गोड आहे. तो आपले कोड पुरवील, तो कळीकाळास कासेत मारून नेतो, असा त्या देवाच्याहि देवानें तुम्याचा सांभाळ केला आहे तेव्हां आपण त्याच्या गांवास जाऊं तो आपणास विसावा देईल, तो आपली तहानभूक निवारील. तो सुखाचा सागर आहे, आपण त्याच्या पायापाशीं जडून राहूं-आपण या देवाचीं लडीवाळ बाळें आहोंत. जेथें अशा भावनेचे भक्त असतात तेथें प्रेम वस्तीस येतें, तें आपण होऊन या वैष्णवांचें घर शोधीत येतें. असें तुकोबांनीं अति रसभरीत कीर्तन केलें-तेव्हां जिजाबाईनी-उलट विचारिलें की-या तुमच्या देवानें माझें चांगले ते काय केलें ? त्यानें माझ्या नवऱ्याचें रूप घेऊन मागील जन्मीचें वैर साधलें-मी सर्व काळ दुःख तरी किती सोसूं ? प्रत्येकापुढें तोंड

तरी किती वासूं ? या विठ्ठलानें माझ्या संवसारांत धड असें काय केलें ? सत्र सुखें घरीं चालून येतात–पण माझी फजिती कांहीं चुकत नाही–संवसारांत मी आपदा तरी किती काढूं ? मुलें सारखीं तोडीत असतात ? घरांत कांहीं राहून देत नाहींत–घर सारवीन म्हणतें–तर सारविण्यास शेण हवें. तेवढें एक हि ढोर घरांत नाहीं–या फणकाऱ्यांत जिजाबाईनीं विठ्ठलास शिवी हि दिली. पण त्यांत सर्व सुखें घरा चालोनियां येती । अशी कबुली हि दिली–तुकोबांना देवास शिवी दिली त्याचा राग येणें साहजिकच होतें. तसा राग हि आला व पुढें बायकोची कींव हि आली-तेव्हां म्हणाले–तुका म्हणे येती बाइले आसडे फुंदे कांहीं रडे कांहीं हासे । असें एका अभंगांत म्हणाले व दुसऱ्या अभंगांत म्हणाले–कीं–सर्व सुखें घरा चालोनीया येति याचें वर्म काय तें जर ही लक्ष्यांत घेत नाहीं तर हिला काय सांगावें ? हीं सर्व सुखें घरां चालून कां येतात याचा तर हिनें थोडा विचार करावा! ( ४६३ )

॥ तुका म्हणे रांड न करितां विचार । वाहोनीया भार कुंये माथा ॥

रांड या शब्दाचा सध्यां जो अर्थ प्रचलीत आहे तो तुकाबांचे वेळीं नव्हता. सध्यां हि खेड्यांतून आई अविवाहित मुलीला रागानें किंवा लोभानें हि रांडे म्हणून हाक मारतांना किंवा उल्लेख करतांना ऐकूं येते.

मी हिला सांगतों कीं हा भार माझा आहे असें म्हणून तूं डोक्यावर घेऊं नको,तो ज्याचा आहे त्याचा तो घेईल, पण हिला हें पटत नाहीं, विचार करवत नाहीं यास मी काय करूं? तेव्हां विचार काय करावयाचा हें पुढील अभंगांत सांगताहेत. असा हा अभंग दुसऱ्या कोणत्या हि गाथ्यांत मज चि भोवता केला यानें जोग । या अभंगानंतर आलेला नाहीं. अशी या वहींची अपूर्वता आहे. तुकोबा विचार काय करायचा तें असंदिग्धपणें सांगताहेत कीं:—सर्व सुखें घरा चालून कां येतात याचा थोडा विचार कर नां!

(४६४) ॥ देव सखा तरी । जग अवघे कृपा करी ॥

असा अनुभव असतांना जीवानीं कासावीशी कां करावी ! प्रल्हादासी अग्नि वधूं शकला नाहीं. याला कारण त्याला देवाची जतन होती हें नां? मग तो आपली जतन करणार नाहीं असें कसें होईल! तेव्हां तें प्रल्हादाचें चरित्र आठवून, व आपणा स्वतःस देवानें कसें सहाय्य केलें तें आठवून म्हणतात कीं

(४६५) ॥ वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ।
॥ विश्वासीच घडे लाभ । देईल तरी पद्मनाभ ॥
॥ भाव शुद्ध तरी । सांगितले काम करी
॥ तुका म्हणे देव । भोळा–तरी नागवी संदेह ॥

या पुढच्या विचार तुकोबा सांगतात. सर्व सुखें घरा चालोनीयां येती–तीं आपण संचय करून ठेवावा म्हणून नाहीं, तर–माणूस भुकेला असला तर त्याची जात गोत हें न विचारतां–त्यास आपण अन्न द्यावें. व्याजीं पैसे द्यावयाचे असतील किंवा मुलगी द्यावयाची असेल तर त्याचें कुळ कोणतें त्यांचा धंदा काय याची चवकशी करावी–तेव्हां केव्हां कसें वागावें याचें वर्म कळणें हा खरा धर्म आहे. कांहीं पुण्य गांठीं असेल तर च उचीत काय तें गांठीं पडेल. असा हा गृहकलह तुकोबांनीं कीर्तन करून गोड करून घेतला. जी जी वृत्ति जशी उठेल–तशी ती देवास नेऊन भिडवावयाची हा तुकोबांचा प्रघात. देवाच्या वाट्यास शिवी आली–ती हि त्यास समर्पण केली व आपण कोणता विचार करतो कसा विचार करतो हें हि देवास सांगितलें. तुकोबारायांचें देशाउर–स्थित्यंतर झालें होतें–जिजाबाईचें झालें नव्हतें. संतांचे ते आप्त नव्हती संत । तुकोबांनीं जेव्हां जेव्हां वेळ येई तेव्हां तेव्हां वर्माची गोष्ट जिजाबाईस सांगण्याचा प्रयत्न केला. स्त्री भ्रतार संवाद म्हणून एक अकरा अभंगांचें प्रकरण आहे. त्यावरून तर एवढें म्हणावेसें वाटतें कीं तुकोबांनीं जिजाबाईस आपिल्या बरोबर मार्ग दाखवून उद्धरण्याचा शिकस्त प्रयत्न केला. तेथें तुकोबांनीं आपलें मन उघडें करून कोणता हि आडपडदा न ठेवतां आपण स्वतः कोणत्या पदावर आहोंत हें स्पष्ट केलें. सत्य देवें माझा केला अंगीकार । असें सांगितलें. या अकरा अभंगांत तुकोबांनीं आपल्या वक्तृत्वाची शिकस्त केली; त्या वक्तृत्वाचा परिणाम हि कांहीं वेळ झाला असें महिपतीबोवांनीं म्हटलें आहे. परंतु तो टिकला नाहीं.. व तुकोबारायांच्या पाठचा गृहकलह निर्याणापर्यंत सुटला नाहीं. हें असें थोड्याफार प्रमाणानें असावयाचें च. दोन व्यक्तींच्या दृष्टींतील अंतर हें कांहीं सांगून शिकवून नाहींसें होत नाहीं. ही गोष्ट विश्वासानें साधते–शुद्धभावानें होते. एरव्हीं संदेह आला कीं तो नागवणूक करतो. जेथें देवाच्या घरीं शुद्धभावाचें सांकडें–तेथें इतरांची काय कथा !

---

# लोहगांवचा वेढा



लोहगांव हें तुकोबारायांचें आजोळचें गांव. येथें तुकोबारायांस बरेच भक्त व अनुयायी लाभले. तुकोबारायांच्या निर्याणापूर्वी लोहगांवकरांनीं तुकोबांस जवळ जवळ एक महिनाभर ठेवून घेतलें. रोज तुकोबांचें सकाळीं भजन व रात्रीं कीर्तन असा कार्यक्रम असे. अशा रीतीनें लोहगांवकर भक्तिप्रेम-सुखाची लूट करण्यांत दंग होते अशा वेळीं मोगलांचा लोहगांवावर छापा पडला, त्यांनीं सर्व गांव लुटून नेला. जें नेतां आलें नाहीं तें जाळून खाक केलें. हा लोहगांवकरांवर जो परचक्राचा फेरा आला तो तेथें तुकोबा भजन कीर्तन द्वारा, हरिप्रेमाचा रंग लुटवीत होते, त्यावेळीं आला, म्हणून तुकोबांस अति दुःख झालें. त्याची मजल देवा मला यापुढें जगांत ठेवूं नको असें म्हणण्यापर्यंत गेली. हा छापा जो पडला त्याचें मुळांत कारण असें असावें कीं तुकोबारायांचीं लोहगांवास कीर्तनें चालूं आहेत व तीं जवळ जवळ महिनाभर चालूं आहेत ही बातमी आजूबाजूच्या मुसलमान मुलखांतील अधिकाऱ्यास लागली असावी. राजा शिवाजी यास तुकोबांच्या कीर्तनांत पुण्यास पकडण्याचा प्रयत्न फसल्यानंतर हा दुसरा प्रयत्न झाला असावा. आज हि पाकिस्तान हिंदुस्थान यांच्या सीमेवरचीं कितीतरी खेडीं पाकिस्तानी सेनेनीं वा गुंडांनीं-उध्वस्त केलीं असतील! पण आपत्काळीं ऐवढा खोल विचार कोण करतो! जो तो म्हणूं लागला असावा कीं, केलेत हरिभक्तीचे उत्सव-व झाला गांव उद्ध्वस्त. लोक तैसा ओक. लोकांच्या तोंडास कधीं कोणास सत्तेशिवाय कुलूप घालतां आलें आहे! तेव्हां तो झालेला आकांत, त्यामुळें होत असलेली ही भक्तांची निंदा तुकोबांस कांहीं सोसली नाहीं. विठ्ठल सखा-विठ्ठल दुःखा तुकया मुखा विठ्ठल। हा तुकोबांचा नियम असल्यामुळें त्यांनीं विठुरायाचा धावा अत्यंत कळकळीनें केला आहे. ते अभंग ५६४-७९ पर्यंत आहेत. तुकोबा म्हणतातः—देवा, तुम्हांस सत्ता नाहीं. नामांत वीर्य नाहीं, व कोणाचें तरी पाप उभें राहतें ते तुमच्या आड उभें राहतें हें आम्हांस आतां कळलें. देवा कोण्या पापाचा उदय झाला व मला हा प्रळय पाहवा लागला! देवा हे कांहीं मला सोसवत नाहीं. तुमचें नांव बुडतें. आम्ही हीनवर ठरलों. तेव्हां आतां त्वरा करून धावा. देवा माझी वाणी तुम्ही लाजविलीत! तुमचा सर्वत्र वास असतांना ही गोष्ट तुमच्या लक्ष्यांत आली नाहीं! हरिदासांच्या घरीं परचक्र

यावें कां ? हें मी हरिकिथेचें फळ मानूं का? असें जर परचक्र येऊं लागलें—तर तुझी भक्ति तरी लोक कशी करतील! मला मरण येईल तर त्याचें मला दुःख वाटणार नाहीं. पण या लोकांचें दुःख मला पहावत नाहीं. आमची तशी परंपरा नाहीं; देवा भजनांत विक्षेप यावा! हें आमचें मरण च म्हणावयाचें. भजनाशिवाय असा एक हि क्षण वाया जाऊं नये; पण तशी वेळ आली खरी. तेव्हां जेथें आघाताचा वारा लागणार नाहीं अशा स्थळीं मला ठेवा. असे एकाहून एक जास्त कळकळीचे अभंग करुण रसानें ओथंबलेले तुकोबांच्या मुखावाटा बाहेर पडत होते. ५७८ वा अभंग संतांच्या तोंडून तुझी कीर्ति ऐकून तर आम्ही या मार्गास लागलों, या स्थळास पावलों. त्यांनीं जी तुझी कीर्ति गाइली आहे, त्याप्रमाणें आम्हांस कांहीं प्रतीति यावी अशी विनंती केली आहे. ५७९ व्या अभंगांत आम्ही समर्थाचीं बाळें आहोंत या अभिमानानें आम्ही भिति न बाळगतांना वागत होतों. देवापाशीं कधीं कळी काळ बळ करूं शकेल का? तेव्हां मी दंड थोपटतों. पंढरीराया तूं हि दड थोपट अशी पंढरीराजास विनंति केली आहे अशी विनंति आपल्या इष्टदेवतेस भक्तानें केल्याचें दुसरें कोठें उदाहरण आहे का ? अशा रीतीनें समोर असलेल्या मूर्तीस आव्हान करतांच त्या विठुरायानें कांहीतरी खूण काय दाखविली असावी! पण महिपतीबोवांनीं ती खूण काय होती हें कांहीं नमूद केलें नाहीं. दुसऱ्या कोणी तशी नोंद केल्याचें आपणास माहीत नाहीं. परंतु कांहीं तरी खूण पटविली असावी हें निश्चित. कारण यापुढील दोन अभंग ती गोष्ट स्पष्ट करीत आहेत. ( ३७९।८० )

॥ डोळा भरीलें रूप। चीत्तां पायांपें संकल्प॥ १॥
॥ धृ ॥ अवघी घातली वाटणी। प्रेम राहिलें कीर्तनीं॥ धृ॥
॥ वाचा केली माप। रासीं हरी नाम अमूप ॥ २॥
भरूनीया भाग। तुका बैसला पांडुरंग॥

आम्हां आहे नाहीं। न कळे आळीकरा कांहीं॥ १॥
॥ धृ ॥ देसी पुरवुनी इच्छा। आतां पंटरी नीवासा॥ धृ॥
नेणें भाग सीण। दुजें कोणी तुम्हाविण॥ २॥
आतां नव्हे दुरी। तुका पार्यों मीठी मारी॥ ३॥

आजवर लोहगांवच्या वेढ्याचे ३ अभंग सर्व प्रती देत आल्या आहेत. परंतु अभंग ५६४–५८० हे सत्रा या प्रकरणाचे अभंग आहेत. तुका म्हणे

पंढरीराया । थापटीतों ठोक बाह्या । हें पंढरीरायास केलेलें आव्हान–या संदर्भानें डोळ्यापुढें आलें–कीं याचा अर्थ काय करावा असा विचार करावयास लावील असा प्रश्न पुढें उभा राहतो. थापटीतो ठोक बाह्या असें जें तुकोबाराय म्हणताहेत, याचा पुष्कळांना अचंबा वाटेल. पण आम्हां महाराष्ट्रीयांचा हा स्वभाव आहे. हें वचन तुकोबांच्या टीकाकारांच्या पाहण्यांत कधीं आलें नसावें. एरव्हीं त्यांनीं संत–राष्ट्रहितविन्मुख असतात म्हणून सरसकट टीका केली आहे ती केली नसती. प्रल्हादानें–क्षमेसाहि अपवाद आहे म्हणून म्हटलें तें याच तत्त्वानें. ५७९।८० या अभंगांत जी खूण पटत आहे, ती अश्रुतपर्व आहे. ऐतिहासिक दृष्टया या लोहगांवच्या वेढ्याची तारीख-मिति ठरविली पाहिजे. तसें च त्यांत कोणाकोणाच्या झटापटी झाल्या हें पाहिलें पाहिजे. माझी अशी समजूत आहे कीं, थापटीतो ठोक बाह्या–म्हणून जें म्हटलें आहे, त्या सुमारास या परचक्राची वातमी कळून शिवाजी राजांनीं सैन्य पाठवून वेढा उठविला असेल. हें प्रकरण आतां ऐतिहासिक दृष्टया नीट पाहिलें पाहिजे.

संताजीच्या गाथ्यांत १५–२० हे अभंग हि याच अर्थाचे आहेत. तेव्हां ते अभंग या बरोबर घ्यावे लागतील. हे सर्व अभंग एका प्रसंगाचे आहेत. म्हणून एकाच वेळीं झाले असतील असें नाहीं. तेव्हां संताजीसारख्या आणखी कांहीं अस्सल वह्या किंवा या भिजल्या वहीच्या नकलेसारख्या आणखी कांहीं वह्या मिळतील तेव्हां या गोष्टींचा निर्णय ठरवितां येईल. सध्यां एवढें म्हणतां येतें कीं या लोहगांवच्या परचक्रानें तुकोबारायांच्या मनास फार मोठी जखम झाली व ती पुष्कळ दिवस वाहत राहिली असावी.

न घडे यावरी ोत धरवे धीर। पीडीलीया राष्ट्र देखोनी जग।
हे शब्द राष्ट्रहिताबद्दल विन्मुखता दाखवितात काय?

---

## तुकोबारायांची मनोभूमिका



देहूस डोहावर, भंडाऱ्यावर किंवा भामनाथावर तुकोबा एकांतांत बसून प्रथम विठुरायाची आळवण करीत होते व पुढें मुक्ताबाईशीं स्वयंवर करून खेटींमेटींनें कालक्रमणा करीत होते. त्या स्थळाची, त्या मानसिक अवस्थेची, त्या आनंदाची आजवर कोणास च कल्पना नव्हती. स्वतः तुकोबारायांनीं अभंगांची स्फूर्ति केव्हां व कशी होई याचें वर्णन स्वतःच करून ठेविलें असेल अशी

आजवर कोणासहि कल्पना नव्हती; असें आजवर जीं चरित्रें प्रसिद्ध झालेलीं आहेत, त्यावरून वाटतें. प्रत्येकानें त्यांच्या संसाराची पांगापांग कशी झाली तें वर्णावें व अमक्या अमक्या वेळीं तुकोबांनीं असें कीर्तन केलें असें म्हणून महिपतीबोवांनीं उद्धृत केलेले अभंग उद्धृत करावेत असा सर्व चरित्रकारांचा क्रम असे. पण चरित्रकारांनीं वर्णन केलेल्या विपन्नावस्थेंत शब्दरत्नें बाहेर पडा-वींत कशीं? शब्दांच्या ओवणी रत्नांचिया माळा–याव्यात कोठून–तीं शब्दरत्नें ज्या खाणींत सांपडत ती-मनोभूमि कशी असावी. असा आजवरच्या चरित्रकारांना विचार करावा, शोध करावा अशी कल्पना शिवली नाहीं. परंतु या भिजल्या वहींत तुकोबारायांनीं स्वचरित्र आठवून विठुरायास परिहार दिला आहे. कवित्व स्फूर्ति झाल्यावर जेव्हां ते आपल्या धन्याची चाकरी बजावीत होते तेव्हां धन्यानें दिलेल्या मुशाहिन्यावर त्यांनीं पारमार्थिक संसार कसा थाटला, ते कोणत्या सुखांत होते, ते काय करीत होते. कसे वागत होते. त्या सुखाचें काव्यमय–रसभरीत–तुकोबांनीं स्वतःच केलेलें वर्णन वृक्ष वेली आम्हां सोइरीं वनचरें–(१५८) येथपासून–(१७४) जाणवोनि गेला हांडोरीया पोरा–सावध इतरां करूनी तुका।–आपणास पहावयास सांपडतें. त्या अभगांचें रूपांतर करणें म्हणजे सुद्धां त्या अभंगांशीं उद्धटपणानें वागावें त्यांची अवज्ञा करावी अशासारखें आहे. एवढे ते अभंग मुळांत रसभरीत गोड सकुमार आहेत. दुसऱ्या वचनांचा भार तेथें सपत नाहीं एवढे ते शब्द नाजूक व साजूक आहेत. तेव्हां प्रत्येकानें मृदंग लावून टाळ–विणा घेऊन तालसुरांत ते अभंग गोड म्हणून ऐकावेत. त्यांचा आपल्या मनावर जो ठसा उमटेल तो तसा च असूं द्यावा. तेथें तर्कवितर्क करूं नये. त्या शब्दचित्राची दुसऱ्या कोणत्याहि शब्द-चित्राशीं तुलना करूं नये. मध्यें विद्वत्ता आणूं नये. हे गोड गाइलेले–गोड ऐकिलेले अभंग मनावर काय ठसा उमटवितात तें आपल्याशींच पहावें. परंतु अलीकडे मराठी भाषेच्या अभ्यासाची एवढी हेळसांड झाली आहे कीं पुष्क-ळांना अभंग वाचून अभंगाचा अर्थ लक्ष्यांत येत नाहीं. यामुळें या अभंगांत वर्णन केलेली स्थिति गद्यांत रूपांतर करून सांगावी लागली. तुकोबाराय आपल्या एकांताच्या स्थळाचें वर्णन करीत आहेत कीं:–

मी जेव्हां मुक्ताबाईचें पाणिग्रहण करून तिच्याबरोबर एकांतांत खेळी-मेळी करावयास जातों–तेव्हां वृक्ष, व वनचरें–वेली हीं आम्हांस सोयऱ्या धायऱ्यासारखीं–वाटतात. निरनिराळे पक्षी हे आम्हांस सुस्वर आलापानें सुख-वितात–आकाश हें आम्हांस लग्नमंडपासारखें होतें. पृथ्वी हें आमचें आसन

असतें. अशा सुखावस्थेंत आम्हांस एकांतवास फार रुची देतो. तेव्हां आम्हीं निःशंकपणें वाटेल तेथें क्रीडा करतो. वारा हा आम्हांस काळ वेळ किती झाला तें सांगतो. हरि नाम हें आमचें भोजन. आम्ही निरनिराळे प्रकार करून रुचीरुचीनें सेवन करतो. तेथें आम्हीं आपल्याशीच संवाद करतो—हा जो मुक्ताबाईसमवेत आम्ही संवसार थाटला आहे त्यांत आमचा भोग कोणता, आमची संपत्ति कोणती—आमचा काम कोणता हें तुम्हांस सांगू का ? त्या एकांतांत माझा देवाशीं भोग होतो. त्यास मी आलिंगन देतों. त्याच्या चरणारविंदांचें चुंबन घेतों व संसारांत जशा मी दोन बायका केल्या—तशा या एकांतांत जरी मुक्ताबाईस बरोबर घेऊन जातों तरी शांतीशीं संयोग करतों—त्यामुळें माझा सर्व ताप-भेद-बुद्धी लयास गेली हें माझें व हें दुसऱ्याचें हे विचार मावळून आम्हीं रामराज्यांत वागत असतो. तेथें राजा व प्रजा हा एवढा हि फरक राहात नाहीं. तेथें एका मंगलावांचून दुसरा शब्दच उमटत नाहीं व ही स्थिति अखंड असते. तेथें सारखा आनंद च दुमदुमलेला असतो. तेव्हां स्वामी-सेवक हा भेद च उरत नाहीं. मला देवाचें नाम गावें यापरतें कामच उरत नाही. तें काम हि त्या ज्ञानस्वरूप नारायणानें अंतरीच्या प्रेमदानानें आभ्वासिलें असल्यामुळें कल्याण होईल. दुर्दें नाश पावतील—या पलीकडे कांहीं सांगावें लागत नाहीं. तेथें कसली हि चिंता नसते. मी हरिनाम गाऊं लागलों कीं हिताची गोष्ट आपोआप पुढें उभी राहते. तेव्हां तें हरीनाम सद्गदित अवस्थेंत कंठ दाटून येऊन, हृदय फुटून बाहेर पडतें. यापुढें सात अभंगांत देवाची करुणा भाकून पुढें म्हणतात कीं शेवटींचा दिवस गोड व्हावा म्हणून ही आटाआटी केली. आतां मी निश्चिंतीनें विसांवा पावलों आहे. माझ्या मनांत केव्हांहि तृष्णा उद्भवत नाहीं. आजवर किती तरी दिवस फुकट गेले याचें आश्चर्य वाटतें. आतां या मुक्ताबाईशीं लग्न लावलें आहे. तेव्हां तिच्याशीं खेळीमेळीनें दिवस सुखांत घालवित आहे. मुक्ताबाईचें पोट आहे भक्तीचें. तेव्हां तिच्या पोटीं रत्नांच्या खाणी उत्पन्न होतात व त्यांत प्रत्येक गोष्ट ब्रह्मांच्या ठेवण्यांतली आहे असें वाटतें. या मुक्ताबाईस नाही हा शब्द माहीत नाहीं. तिला ज्ञान, प्रेम, बोध भक्ति—यांपैकीं मी केव्हां हि कांहीं हि मागो, तिचे "हो" हे मला तिच्या रायास उत्तर हजर असते, अशा स्थितींत मी भावारूढ होऊन सर्वत्र देव कसा विराजमान आहे हें जगाला दाखवीत असतो. अशा स्थितींत मला जें ज्ञान होतें, तें तुम्हांस सांगून काय होय ? त्या गोष्टी तुम्हांस सांगून अनुभव कसा येईल ? तुम्ही भजन करा. हरिकथेवर चित्त ठेवा असें तुका सर्व जीवमात्रास सावध करण्यास्तव सांगत आहे—

तुकोबारायांचें संसारानें गांजलेला–दरिद्री भिकारी–अशी एक व्यक्ति असें सर्व ग्रंथकारांनीं–चरित्रकारांनीं चित्र रेखाटलें आहे. पण व्यावहारिक परिस्थिति कांहीं हि असली तरी तुकोबारायांनीं आपली मानसिक अवस्था कशी होती मुक्ति व शांती या आपल्या सेवेस कशा तयार होत्या, भक्तीचे पोटीं ज्या रत्नांच्या खाणी होत्या—त्यांत ज्या बालकांच्या हारी–ओळी — लागत — ते हे अभंग होत. आपण हरि–नामाचें भोजन करीत होतों असें येथें सांगितलें आहे. तसेंच दुसऱ्या एका अभंगांत आपण आनंदाचे लाडू ( पं. ४०९९ ) खातों ते तुम्ही घ्या, चरफडूं नका, असें सांगितलें आहे. तेव्हां लेखकांनीं विपरीत संसाराबद्दल कींव करण्याचा आव आणण्याचें कांहीं कारण नाहीं. तुकोबाराय सर्व समाजापासून अलग होऊन विठूशीं एकांत करीत शांतीशीं संयोग करीत, व मुक्तीशीं खेळीमेळी करीत प्रसन्न चित्तानें अभंग प्रसवत होते. फार काय एवढें गोड वाङ्मय त्यांचे मुखावाटे बाहेर आलें तीं अमृत वचनें मनाच्या प्रसन्नतेचे मळे आहेत, येवढें आपण निश्चिंत समजावे.

---

## भजन

( ५ ) कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ जाला । पद्मनाभ सेवा ऋणी ।
( ३५ ) सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनी नाचा ॥
( १५८ ) हरी नाम भोजन प्रवडी वीस्तार । करूनी प्रकार सेऊं रुची ॥
( ९८ ) साखरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥
॥ मोक्ष गांठीं असे ठेवीला बांधोन । सोस तो भजनीं आवडीचा ।
( ६ ) तुका म्हणे गीत गाऊनी गोविंद । करूं ब्रह्मानंद एकसरें ।
( ७ ) एका हातीं टाळ । एकाहातीं चिपळीया । घालीताती हुंबरी एक वाहाताती टाळीया
॥ध्रु॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं मोक्षपदीं चाड भजनीं आवडी॥

हीं व या सारखीं वचनें या वहींत व महाराजांच्या गाथ्यांत सर्वत्र पसरलेलीं आहेत. तेव्हां हें भजन म्हणजे काय याचें संक्षेपतः निरूपण येथें करतों. नाम, गाणें व भजन कीर्तन हें वारकरी सांप्रदायाचें साधन आहे. या साधनाबद्दलची कल्पना व त्याचा तसा पुरेपुर भोग आपणास व्हावा म्हणून "ज्ञानराज माझी योग्यांची माउली" यांनीं जेव्हां योगसाधनानें प्रगट होणाऱ्या

सर्व खुणा देहदंड न करतां–बायको मुलें न सोडतां–नामदेवरायांच्या अंगीं उमटलेल्या पाहिल्या तेव्हां ज्ञानराजांनीं नामदेवरायास बरोबर घेऊन तीर्थावळी केली. असे उभयतां पंढरी सोडून यात्रा करीत दोघे जण सुखानें एकमेक परस्परांची संगत आवडीनें भोगीत जात होते एके दिवशीं ज्ञानराजांनी नामदेवरायास विचारलें कीं बा.

॥ ज्ञानदेव म्हणे परीयेसी नामया । अद्वैत आत्मया प्रेममूर्ति ॥
॥भक्तीभावें तुवां जोडीलें अविनाश । सांगपा सेविला कैसा सुमार्ग त्याचा॥
॥ कैसा तो सांगावा सांग भजनविधि । कैसी मन बुद्धीसत्वशीळ ॥
॥ कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार । हा सर्व विचार सांग मज ॥
॥ कैसें तें श्रवण कैसें तें मनन । कैसें निज ध्यासन दृढ होय ॥
॥ कवण ते भक्ति कवण ते धृती । कवण ते विश्रांती दावी मज ॥
॥ बहु उत्कंठीत या सुखाकारणें । तें मज पारणें करवीं आ जी ॥
॥ सांगे हा अनुभवो साधन उपावो । विनवी ज्ञानदेवो नामयासी ॥

ज्ञानदेवांनीं नामदेवास स्पष्ट प्रश्न विचारले आहेत कीं, नामदेवा, तुम्हीं अनुभवांनीं भजन हा जो उत्तम उपाय केला आहे. त्या भजनांचा विधि कसा, त्यांत मन बुद्धी हीं सत्वशीळ कशी होतात, निर्विकार ध्यान कसें–श्रवण–मनन–निजिध्यासन कसें–भक्ती कशी साधते त्यांतून धृति (धैर्य) कशी उत्पन्न होते, तुमची स्वारी कोणत्या विश्रांतिस्थळीं रममाण असतें तें मला सांगावें. ज्ञानराजांचें हें म्हणणें नामदेवास अवघड वाटलें. ही अशी उलटी गोष्ट तुम्ही कशी बोलतां–मी बहुश्रुत नाहीं. मी ज्ञानशीळ नाहीं. मी सर्वस्वीं नेणता आहे. आपण मला या गोष्टी विचारणें म्हणजे कृपणाच्या द्वारीं कल्पतरूनें याचक म्हणून यावें किंवा कामधेनुनें कींव भाकावी तशा सारखी आहे. मी नेणता म्हणून मला पंढरीनाथानें आपल्या हातीं दिला. आतां माझें कवतुक करून आपणास सुख भोगावयाचें आहे तेव्हां जिव्हेस जसे शब्द येतील तसे बोलेन या नामदेवांच्या म्हणण्यास ज्ञानदेव म्हणाले अशी गोष्ट बोलूं नका. माझ्या ठिकाणीं भलताच मोठेपणा आहे असें कल्पून भलतीच शंका मनांत आणूं नका. आमच्या योगाकडे ज्ञानाकडे पाहूं नका.

॥ ज्ञानदेव म्हणे शंका न धरीजे मनीं। दृष्टी दुजेपणीं न ठेवावी
॥ सुखें सुख घ्यावें अनुभवोनीं अनुभवावे। आहे तें अवघें ब्रह्मरूप
॥ त्या सुखाचा अनुभव करी सुखरूप। सुख वस्तुच्या दीपा नामदेवा
॥ सुखाचीये ताटीं सुखाची वोगरी। तृप्ती होईल थोरी क्षुधातुरा ॥ १ ॥

॥ पंढरी रायाचा तूं प्रेम भांडारी। आशा पूर्ण करी मज याचकाची।
॥ विश्रांतीसी पात्र तूंची विष्णुदासा। हा मज भरंवसा आहे तुझा ॥
॥ म्हणोनी तुझा संगू धरिली थोर आस। झणीं होसी उदास भक्तराया
॥ सिंधुहूनि सखोल सुरस तुझे बोल। आनंदाची वोल नित्य नवी।
॥ ते मज सादर ऐकवी सत्वर। श्रवण क्षुधातुर झाले माझे।
॥ जाणीव नेणीव तरीच शोभे सर्व। जरी होय आयुर्भाव वैराग्याचा।
॥ ज्ञानदेव म्हणे तूं भक्त अंतरंग। नलग तूज पांग बहुज्ञतेचा ॥

या वचनांनीं ज्ञानराजांनीं आपली भूमिका जेवढी स्पष्ट करावयास हवी तेवढी केली आहे- हेतू हा कीं आपली अंतरंगांतील अनुभवाची गोष्ट स्पष्ट करून सांगण्यास नामदेव रायांनीं संकोच करूं नये. समोरचा मनुष्य आपली परीक्षा पाहात आहे. लहान मुलास खेळवितात तसा हा थोर पुरुष आपणास खेळवीत आहे, असा कमला हि किंतु मनांत आला तर मनुष्य आपल्या जीवाची आवडीची गोष्ट मोकळेपणानें बोलत नाहीं. तेव्हां ज्ञानराजांनीं परोपरीनें नामदेवरायांस आपला शुद्ध भाव पटावा म्हणून प्रयत्न केलेला आहे.

सिंधुहूनि सखोल सुरस तुझेबोल। आनंदाची वोल नित्य नवी।
ते मज सादर ऐकवी सत्वर। श्रवण क्षुधातुर झालें माझे

या ज्ञानराजांच्या शब्दास नामदेवरायांनीं खालीलप्रमाणें उत्तर दिलें.

॥ येर कर्म धर्म सर्व ही पाल्हाळ। श्रमूची केवळ जाणीवेचा।
॥ ऐसा संत भेटे विरळा भाग्य योगें। जो आथीला वैराग्यें सप्रेमळा॥
॥ सर्व भूतीं दया सर्व भावें करुणा। जेथे मी तूं पणा मावळला।
॥ नाम संकीर्तन वाटे मज गोड। येर ते कावाड वाया वीण ॥
॥ नमन तें नम्रता न देखे गुणदोष। अंतरीं प्रकाश आनंदाचा ॥
॥ येर ते दांभीक जाणावी मायावी। विश्वास मी जीवीं न धरी त्यांचा
॥ ध्यान तया नांव निर्विकार निके। जे विश्वीं माझ्या देखे विठोबासी॥
॥ अखंड हृदयीं ते चि आठवण। साजीरे समचरण विटे वरी ॥
॥ नादीं लुब्ध जैसें आसक्त हरिण। जाय विसरोन देह भाव॥
॥ यापरी तल्लीन दृढ राखे मन। या नांवें श्रवण आवडीचें॥
॥ व्यवसायीं चित्त ठेऊनी कृपण। लाभाचे चिंतन सर्वकाळ ॥
॥ यापरी अखंड स्वहित विचारण। करिजे तें मनन सत्वशीळ ॥
॥ परपुरुषीं जैसी आसक्त व्यभिचारिणी। न लागे तिच्या मनीं
काम धाम ॥

॥ कीटकीं भृकटीचे जैसें अनुसंधान । निके निजध्यासन एक विध ॥
॥ सर्व भावें एक विठ्ठलची ध्याये । सर्वांभूतीं पाहे रूप त्याचें॥
॥ सर्वाहुनी निराळा रजतमा वेगळा। भोगी प्रेमकळा तेची भक्ती ॥
॥ सत्वाचा सुभटु असग एकटु । वैराग्य उद्भटु एकनिष्ठ ॥
॥ प्रारब्धाचा भोगी तणें देहस्मृती । अखंड ते श्रुतिनिर्विकार ॥
॥ निर्वासना मन निजल.भें संपूर्ण । नेणें स्वरूप ज्ञान संकल्पाचें ॥
॥ अनुरागें गोविंद ध्यायीजे एकांतीं । या परती विश्रांती आणीक नाहीं ॥
॥ कायावाचामनें हा माझा अनुभव । सांगितला सर्व आवडीचा॥

—नामदेवरायांनीं नमन तें नम्रता येथपासून ज्ञानराजानीं विचारलेल्या प्रत्येक प्रश्नास उत्तर या अभंगांत दिलें आहे. तें उत्तर अनुभवानें सिद्ध झालें होतें तें सांगितलें आहे. जो कोणी या वचनांचा अनुभव घेण्यास तयार होईल त्यास हि तोच अनुभव येईल असा अनुभव नामदेवरायांच्या संगतींत ज्ञानराजांनीं घेतला व त्यांस नामसंकीर्तन हें साधन येवढें श्रेष्ठ वाटलें कीं "ज्ञान गिळुनी गावा गोविंद" अशी शिकवण त्यांनीं सुरू केली. एका अर्थानें तीर्थावळीनंतर ज्ञानराजांनीं योग व ज्ञान हे मार्ग सोडून चैतन्य सांप्रदाय स्वीकारला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. या स्थितीचें वर्णन नामदेवरायांनीं

॥ धन्य ज्ञानदेव योग साधूनीयां । भक्ती आचरोनिया दावी लोकां॥

असें अत्यंत कौतुकानें केलें आहे. तीर्थावळीनंतर ज्ञानेश्वर माउली-कडे चैतन्य सांप्रदायाचें आचार्यपद आल्यासारखें दिसतें. ज्ञानेश्वर महाराजांपूर्वीं या सांप्रदायाचीं काय लक्षणें असतील, नामदेवराय राउळात जाऊन भजन करीत असें परंपरागत वृत्त आपण ऐकतों परंतु ते नुसते च नाम-स्मरण करीत किंवा स्वत.स स्फुरलेले अभंग म्हणत किंवा त्यांच्यापूर्वी या चैतन्य सांप्रदायाचे कोण आचार्य होते त्यांचें कोणतें वाङ्मय होतें हें आपणांस सध्यां तरी माहीत नाहीं. फार काय ज्ञानेश्वर माउलीचा

॥ रूप पाहतां लोचनीं । सुख जालें हो साजणी ॥

हा अभंग होण्यापूर्वी खुद्द नामदेवराय—जनाबाई भजनास सुरवात कशी करीत हें हि आपणास माहीत नाही. ज्ञानराजास हा चैतन्य सांप्रदाय पटल्या-नतर त्यांनी आपल्या वाङ्मयानें या सांप्रदायास फार समृद्ध केलें. ज्ञानेश्वर हरिपाठ हा वारकरी संप्रदायाचा नित्यक्रम होऊन बसला. या सांप्रदायास ज्या ज्ञानाची जोड हवी होती ती जोड ज्ञानेश्वरी व अमृतानुभवानें दिली व मनांत

नित्य उठणाऱ्या वृत्ति नेऊन हरीस भिडविण्याचें काम ज्ञानेश्वर माउलींचे अभंग करूं लागले. असे नामदेव व ज्ञानदेव हे चैतन्यसांप्रदायाचे आद्यप्रवर्तक झाले. ज्ञानराजांनीं योगानें व ज्ञानानें जे जे सिद्धांत सिद्ध झाले होते, जे निवृत्तीनें तत्वता हातीं दिले होते, ते नामदेवरायाच्या संगतींत स्पष्ट झालेले सगुण-पणानें पाहिले, भोगले. तेव्हां ते गहन विषय सोपेपणानें प्रत्येकाच्या हातीं येतील, अशा युक्तीनें–ज्ञानेश्वरींच्या व अमृतानुभवाच्या ओवींत व अभंगांत गुंफून ठेविले. नामदेवरायाच्या संगतींत ज्ञानराजांनीं जी तीर्थावळी केली त्या समागमांत चैतन्य सांप्रदाय हा इतर सांप्रदायापेक्षां श्रेष्ठ आहे याची साक्ष ज्ञानेश्वर महाराजांस–नामदेवराय याना तहान लागून जीव कसावीस झाला त्यावेळीं पटली, असें वर्णन नामदेवरायांनीं तीर्थावळींत केलें आहे. ती कथा मी येथें देत नाहीं. या दोन थोर विभूतींनीं जी संगत कांहीं काळ तीर्थावळीच्या निमित्तानें केली, त्याची खुण सांभाळावी म्हणून सध्याची आषाढीची, कार्तिकीची पाई वारी आहे. वारींत कांहीं दिवस स्वत:स मी जगापासून वेगळे करून घेऊन, हरीनाम गात ध्यात, संत संगती भोगीत आले आले रे हरीचे डोंगर । असें म्हणत वारकरी पंढरींत प्रवेश करतात. त्यावेळीं ज्ञानेश्वर महाराजांस जी साक्ष पटली–त्याचें वर्णन —

॥ बरवा संत समागमु । प्रगटले आत्मारामु ।

असें केल्या सारखें दिसतें, व या संत समागमाचें वर्णन खालील अभंगांत असावेसें वाटतें.

पूर्वजन्मीं सुकृतें थोर केली । तीं मज आजी फळासी आलीं ॥
॥ परमानंदु आजी मानसीं । भेटी झाली या संतांसीं ॥ धृ ॥
॥ मायबाप बंधु सखे सोईरे । याते भेटावया मन न धरें ॥
॥ एक एका तीर्थाहुनी आगळे । तयामाजी परब्रह्म सांवळे ॥
॥ निर्धनासी धनलाभु झाला । जैसा अचेतनीं प्राण प्रगटला ॥
॥वत्स विघडलीया धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मीनली ॥
॥ हें पियुषा परीस गोड वाटत । पंढरीरायाचे भक्त भेटत ॥
॥ बापरखुमादेवीवर वीठ्ठले । संत भेटतां भवदुःख फीटले ॥

असो. चैतन्य सांप्रयादाचा आचार–विधि हा तीर्थावळींत सिद्ध झाला. 'एकाचें ज्ञान व दुसऱ्याची भक्ति या उभयतांच्या अनुभवाच्या पायावर वारकरी सांप्रदायाचा आचार उभारलेला आहे. तुकोबारायांनीं या दोन्हीं संतांचीं वचने विश्वासें आदरें पाठ केलीं. त्या वचनांनीं च त्यास प्रत्येक वेळीं पुढील

पायरी, तो या दाखवील वाटा या वचनाप्रमाणें स्पष्ट होत गेली. या दोन्हीं संतांचें दान तुकोबांनीं खालील अभंगांत स्वकिारल्यासारखें दिसत आहे. हा अभंग कोणत्या हि छापील गाथ्यांत नाहीं परंतु तो मला जयराम स्वामी वडगांव-कर यांच्या मठांतील गाथ्यांत सांपडला आहे. म्हणून मी तो मान्य करतों.

॥ नामदेव आणी ज्ञानदेव । वहु चक्रपाणी आवडनी॥ १॥
॥कलीयुगा माझारी भक्तांचा हारास । जाणोनी जगदीश अवतार घे॥
दामशेट शिंपी शुद्ध याचा भाव। पोटा आले देव आपणची॥.
नामदेव मुखें कीर्तनाचा गजर। करुनी श्रीधर जग उद्धरी॥
संन्यास आश्रमीं विठ्ठल रुक्मीणी। पोटा आले ज्ञानी आपणची॥
जयाच्या महिमा वर्णिता अगाध। रेडा बोले वेद ज्याचे वचन॥
गीतेवरी टीका करूनी ज्ञानदेव। उद्धरी जडजीव श्रवणमात्रें॥
अर्थ करोनीयां वाचितां अनुभवी। तया होय पदवी सायोज्याची॥
दोहींचा महिमा वर्णिला आवडी। भक्तां ज्ञानगुढी उभवीली॥
तुका म्हणे मी त्या अनन्यशरण। जाईन वोवाळुन पायावरुनी

भजनात तुकोबारायांनीं मनांत जी जी वृत्ति स्फुरे ती ती वृत्ति विठ्ठरायाशीं नेऊन भिडविली आहे. असें या वहींत सुरवातीपासून अखेरपर्यंत केल्याचें निदर्शनास येईल.

॥ विठ्ठल सुखा, विठ्ठल दुःखा। तुकया मुखा विठ्ठल॥

येथवर भिजल्या वहींत आलेल्या कांहीं विषयांचें—कवित्व—अभंग वृत्त, कांहीं शब्दांच्या व्याख्या,—म्हणी,—शब्दरत्नें,—कारुण्यरस, चरित्र—गृहस्थिति-लोहगांवचा वेढा. निरूपण केलें. या वहींत वर्णिलेल्या ( १ ) नारायणाची जोडी ( ४१६ ) गोविंदाची जोडी या मुख्य विषयांचे निरूपण तसें पाहूं गेलों तर सर्व वहीभर आहे असें आढळून येईल तसेंच ( १२ ) ज्या संतीं केशीराज साधियेला, असें म्हणून पुढें ६१७ अभंगात संतांचें वर्णन आहे त्या संतांचें वर्णन हि

( ३९ ) तृष्णकाळे उदके भेटी। पडे मिठी आवडींची।
॥ ऐसीयांचा हो कां संग जिवलग संतांचा।
व ( ६९१ ) हे तो येक संतां ठाई। लाभ पाई उत्तम।

सर्व वहीभर आहे तसेंच

( १० ) आम्हां आवडे नाम घेतां।

असें नामाचें माहात्म्यहि वहींत सर्वत्र आहे व (५) कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ, अशी नामाच्या वर्णनांत भजनाची जोड वहींत सर्वत्र पसरलेली आहे. (७४) नाहीं देखिला तो डोळां देव दासत्वं सकळा असें म्हणून सर्व वहींत देव दर्शन घेतल्याचें व तें कसें घ्यावें हें सांगणारे अभंगहि वहींत सर्वत्र आहेत. या मुख्य विषयांचें निरूपण अभंगांच्या रूपांतरांत थोडें थोडें आलें आहे. परंतु वरील प्रत्येक विषयावर आलेलीं वचनें एकत्रित करून व त्यांच्या जोडींस या वही बाहेरील वचनें घेऊन (अशी गाथ्यांतील इतर वचनें या विषयांचे विवेचनास घेणें जरूर आहे.) वर जसें निरूपण केलें आहे तसें करावयाचें तर ग्रंथाचा विस्तार फार वाढेल. तेव्हां तो मोह किती हि अनावर असला तरी या प्रस्तावनेपुरता आवरला पाहिजे. दुसरी एखादी नवी वही मिळून ती प्रसिद्ध करण्याचा योग जमून आला तर गाथ्यांबद्दलची चर्चा व चरित्र येथें आलें आहे तें गृहित धरून—नारायणाच्या जोडीपासून च त्या ठिकाणीं लिहावयास सुरवात करूं. या प्रस्तावनेंत तो मोह आवरला पाहिजे. या चारी विषयांपैकीं कोणत्याहि विधयावर लिहावयास सुरवात केली कीं तें लिहणें आवडी व गोडीनें हौस पुरेपर्यंत लिहावें लागेल. तेव्हां त्या विषयास येथें सुरवात करित नाहीं. परंतु या वहीचें महत्त्व दुसऱ्या कांहीं गोष्टी नमूद करून सांगणें जरूरीचें आहे.

पातंजलयोगदर्शनांत समाधी पादांत तेविसावें सूत्र ईश्वर प्रणिधानात् वा ।— असें आहे. याचा अर्थ असा कीं योगसाधन करून ज्या सिद्धी परम योग्यास प्राप्त होतात व जें ज्ञान आपोआप लाभतें असें विभूति व कैवल्यपादांत सांगितलें आहे, त्या सिद्धी व तें ज्ञान ईश्वराच्या भक्तीनें हि प्राप्त होतें. या वहीस सुरवात नारायणाची जोडी झाल्याचें वर्णनापासून आहे. तेव्हां योग्यांचें जें ध्येय मुक्ति—तेथून तुकोबांच्या कवित्वास सुरवात आहे. तेव्हां

॥ नामाचिया बळें कैवल्य साधन । उगे चि निधान हातां चढे ।

हे तुकोबांचे चरण ग्रंथांतरीं पाहिलेले नव्हे तर स्वतः सिद्ध केलेलें आहे.

नारद भक्तिसूत्रांत ८२ व्या सूत्रांत भक्ति एकरूप असून अकरा प्रकारची आहे असें म्हटलें आहे. तुकोबाच्या अभंगवाणींत सर्व प्रकार पहावयास सांपडतील. परंतु

॥ माझे पाय तुझी डोई । ऐसे करी गा भाक देई ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ पाहता तव उफराटें । घडे तरी भाग्य मोटें ॥ ध्रु ॥

॥ बहुसाधन मोलाचें । यासी दुजें जोडा कैचें ॥ २ ॥
॥ नका अनमानु वीठला । तुका म्हणे धडा घाला ॥ ३ ॥

या अभंगास त्या अक्रा प्रकारांत स्थान नाहीं. म्हणून तुका झालासे कळस। या अभंगाचें निरूपण अमृतानुभवांतील नवव्या, सिद्धरहणीच्या प्रकरणांत, ३४ व्या ओवीत देवच भक्त झाला म्हणून वर्णन आहे तेथें आहे. असें तुकोबा कवित्व करूं लागल्यापासून ( १०९ ) वदे साक्षेत्वेसी वाणी नारायेणी मीश्रीत म्हणून सुरवातीस व या वहीच्या शेवटास ( ६८१ )

देव आड जाला । तो भोगीता मी उगला ॥

असें म्हणून

प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस ॥

म्हणून म्हणाले त्यांत आहे.

पंचदशीच्या चवदाव्या अध्यायाचा किंवा प्रकरणाचा शेवट धन्योहं धन्योहं अशा सहा श्लोकांनीं केला आहे. त्याचा सारांश असा कीं "मी आपल्या आत्म्याला नित्य साक्षात् जाणतो, व त्यामुळें मला ब्रह्मानंदाचा स्पष्ट प्रत्यय येत आहे. खरोखर मी धन्य आहे. माझा जन्म सफळ झाला. मला संसारिक दुःख मुळींच भासत नाहीं—माझें आत्म्याविषयींचें अज्ञान पार पळालें. आतां मला कांहीं येक कर्तव्य उरलें नाहीं. मला जें कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें होतें तें सर्व प्राप्त झालें आहे. माझ्या तृप्तीला उपमाच नाहीं. मी धन्य धन्य धन्य झालों. कृतकृत्य झालों. हीं पंचदशीमध्यें प्राप्त पुरुषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत—त्या सर्व लक्षणांनीं युक्त तुकोबाराय होते असें या वहींत आलेल्या अभंगांच्या निरूपणावरून लक्ष्यांत येईल. हे पंचदशींतिल शेवटचे उद्गार आहेत. तेथून या भिजल्या वहीस अविनाश—अवीट अशा नारायणाची जोडी आज माझे नवस पुरून झाली, अशी तुकोबांच्या अभंगगाणास सुरवात आहे व तो धन्यतेचा व प्रसन्नतेचा ओघ सर्व वहींतून वाहतो आहे. ६४६ वा अभंग

॥ समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस ओवीया मंगळीं ॥ धृ ॥
॥ धार अखंडीत । वोघ चालयेला नित्य ॥ २ ॥

* * *

॥ वाजतील तुरे । येणें आनंदे गजरे ।

असा ६१८ वा अभंग आहे. या वहींत पहिल्या अभंगांत नारायणाची व ( ४१६ त ) गोविंदाची भेटी झाली, आपली अवस्था पालटली, हें सुख सांग-

ण्यास, संतांची व पंढरीनाथाची कीर्ति गाण्यास मुख पुरत नाहीं असें तुकोबा म्हणाले. तेथें आपला काय पाड ! तेव्हां तुकोबांच्या वचनानें गंगेच्या पाण्यानें गंगेस अर्घ्योदक द्यावें तसें आपण तुकोबांचें वचन हें च त्यांचे चरण म्हणून त्यावर डोकें टेकावें व

बहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली हे हातीं
असें म्हणून खालील अभंग म्हणावेत.

॥ बरवें देखाउर जालें । काये बोलें बोलावें ॥ १ ॥
॥ धृ ॥ लाभे लाभ दुणावला । जीव धाला दरशनें ॥ धृ ॥
॥ भागे जाली संत भेटी । आवडे पोटीं होती ते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ३ ॥

॥ सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥ १ ॥
॥ धृ ॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचे धरूं जीवीच ॥ धृ ॥
॥ उपमा या देतां लाभा । कासया शोभा सारिखी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुचली डोई । ठेविली पाईं संतांचे ॥ ३ ॥

या वहीच्या प्रकाशनानें तुकोबारायांचे अभंग कोणत्या स्वरूपांत, कोणत्या ओळीनें प्रगट होत असावेत याची थोडीशी कल्पना जनतेस होईल. पण कोठें तुकोबांची अपार कविताशक्ति व कोठें हे ७५१ अभंग ! तुकोबांचे अभंगवाणीच्या ग्रंथभांडाराचा शोध करून, आज आहेत त्या सर्व हस्तलिखित प्रती गोळा करून, त्यांच्या नकला करवून—संशोधन झालें पाहिजे.

हें काम माझ्यासारख्या एकट्या माणसाचे हातून पार पडणें शक्य नाहीं. तें काम शिवचरित्र कार्यालयासारखें मंडळ स्थापून त्याचेमार्फत झालें पाहिजे. तंजावर, ब्रिटिश म्युझियम, इंडिया ऑफीस, येथें हि कांहीं प्रती आहेत. त्या प्रती जर पेशवाईपूर्वीच्या असतील तर आपलें पुष्कळसें काम होईल. हे सर्व ग्रंथ आणवून, त्यांचे फोटो घेववून नकला करवून त्यांतून काय हातीं लागतें तें पाहिलें पाहिजे. शिवाय भारत इतिहास—संशोधक—मंडळ, श्रीसमर्थ मंदिर, श्री. बाळासाहेब प्रतिनिधी औंधकर, यांच्या संग्रहीं असलेला अभंगसंग्रह तपासला पाहिजे. त्यांनी तो संग्रह नकल करून घेण्यास या मंडळाचे स्वाधीन कांहीं दिवस केला पाहिजे. शिवाय देहू पासून पंढरपुरापर्यंत २।४ संशोधकांनीं व वारकऱ्यांनीं प्रत्येक खेडें शोधीत गेलें पाहिजे. कांहीं प्रमुख घराणीं निजाम हद्दींत हि गेलीं आहेत तेव्हां तो प्रांत हि शोधला पाहिजे.

नुसत्या भाषेच्या दृष्टीनें पाहूं लागावें तों साडेचार हजार अभंगांत ६००। ७०० सुंदर म्हणी आहेत, सुमारें १००।१२५ रेखीव व्याख्या आहेत, नवीन शब्दप्रयोग आहेत. कांहीं जुने प्राकृत शब्द आहेत. आजचें आपलें लिहिणें बोलणें बरेचसें संस्कृतोद्भव शब्दांनीं, इंग्रजी शब्दांनी व त्यांच्या भाषांतरानें होत आहे. परंतु अभंगवाणी ही प्राकृत बोलांची खाण आहे. तुकोबारायांची अभंगवाणी ही अत्यंत प्रभावी होती म्हणून तर त्यांचेवर बलवत्तर आघात झाले. ती वाणी आपले वाणीवर चढली तर फक्त भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तरी आपले वाणीस तेज येईल. अभंगवाणीनें तुकोबांना देव घ्या कोणी। देव घ्या कोणी। असें पाठीस लागून प्रत्येकाचे हातांत –करतळीं आवळा तैसा–हरि, दिला. येवढें अभंग वाणींत तेज आहे.

या कामीं एका व्यक्तीस जेवढें कांहीं करतां येणें शक्य आहे तेवढें कार्य केलें आहे. अशी एखादी दुसरी वही शोध करतां करतां हातीं आली तर त्या वहींचें सशोधन–संपादन एकटा करूं शकेन व करीन. संताजीच्या वह्यांचे शब्दश. रूपांतर मीं केलें आहे. परंतु वर उल्लेखिलेलें कार्य चार माणसांच्या सहकारानें व पुष्कळशा पैशानें होणारें आहे. तसें कार्य स्वराज्य झालें आहे, तेव्हां आपलें वैभव, शोधून काढून पहाण्यास सवड आहे. शिव-छत्रपतींच्या सैनिकांस पाईकीचे अभंग महाराजांनीं दिलें व शिवरायास निष्ठावंत माणसें लाभलीं म्हणून स्वराज्य स्थापतां आलें. त्या निष्ठावंत माणसांनीं स्वराज्य अवनत अवस्थेंत सभाळलें. आज स्वराज्य आहे पण निष्ठावंत माणसांची वाण आहे. तेव्हां तुकोबारायांनीं घालून दिलेली शिस्त संभाळणारे पाईक सध्यां सर्वत्र हवे आहेत. महाराष्ट्रास हें निज धन, वडिलांची जतन, हवीं असेल–तर तें अभंग रत्न भांडार आपण शोधून काढलें पाहिजे. आधींच ३०० वर्षे गेलीं आहेत. तेव्हां या पुढें तरी आळस, उदासीनता या कामीं नको.

---

देहुकराच्या वहींतील अक्षरें, शब्द व आजचीं अक्षरे, शब्द यामधील फरक दाखविणारा तक्ता. प्रस्तावना पृ. २५

इ–ई=मोठी इ ओ=वो श=स ल=ळ ज्ञ=ग्न ऋ–ऋ–री
ख=ष ष=श ळ=ल्ळ र=न.

शब्द

| | |
|---|---|
| अन्न=अनं | कासावीस=कासीवीशी |
| अधीर=अधर | कलह=कळह |
| अविद्येचा=अविदेचा | करुणा=कारुणा |
| अलभ्य=अलभे | कर्णधार=करणधार |
| आग्रह=अग्र | कुबेर=कुबीर |
| आक्ष=अक्ष | कळेल=कळेरु |
| आश्चर्य=अस्चीर | गाठोडें=गाठोळें |
| आज्ञा=अज्ञा | गुह्य=गुहीये |
| आवश्यक=अवसेक | घडते=घडेते |
| आर्ष=अरुश | चित्त=चीत |
| आकृती=अकृती | जिव्हा=जीहुवा |
| उच्छिष्ट=उचीस्ट | जाणतो=जाणोतो |
| उपाय=उपाये | जिव्हाळा=जीव्हुवाळा |
| उधार=उधीर | जिन्नस=जीणस |
| उद्देश=उदेस | ठेव=टव |
| उसनें=उशीणें | ठाई=डाई |
| ऋण=रीण | तुच्छ=तुसें |
| ऐकत=आईकत | त्यजुनी=तजुनी |
| ऐसे=असे | दर्शन=दरुशन |
| ऐती=आइति | दुर्बळ=दुबळ |
| ओळख=वोळखे | दिवाळें=डीवाळें |
| ओढे=वोढे | दुष्काळ=दुहकाळें |
| कवित्व=कवीत्व | देशाउर=देसाउर |
| कृपा=कृपा | दुःख=दुख |
| कार्य=कारीये | दुर्बुद्धी=दुरबुद्धी |

दिले=दिल्हे
दास्यत्वें=दासेत्वे
दैन्य=देनें
दृष्टि=द्रुस्टी
धनी=धणी
धन्य=धने
धैर्याची=धीर्याची
न्यहाळी=न्याहाळी
निष्फळ=निर्फळ
नाना=नाणा
नारायण=नारायेण
न्युन=नउिन
नवरी=नोवरी
नष्ट=नस्ट
निर्विषय=नीरवीश
निद्र=नींद्
नकटे=नपटें
निष्काम=नीहकाम
पाषाण=पाश्याण
पुढारें=पुऱ्हाडे
पुष्प=पुश्य
पाहतसे=पाहतुसे
पृथ्वी=प्रुथुवी
परवडी=प्रवडी
पोषण=पोसन
पिश्या=पींस्या
प्रतिष्ठा=प्रतेस्टा
परिश्रम=पराश्रम
बडगा=वरगा
बाष्कळ=बाशगळ

बोलतसे=बोलतुसे
भक्ति=भगती
भूषण=भूशेण
मन–मन
मास=माउस
मुक्ति=मुगती
मनुष्य=मनुस
मौन्य=मोनें
म्हणून=म्हुण
महाराज=म्हाराज
मार्गी=मारगी
मानावी=मणावी
मानी=मणी
यत्न=येत्न
युक्ति=युगती
युद्धाच्या=योद्धाच्या
लाभ=लभे
लाजे=लजे
लौकर=लोकर
लौकीक=लोकीक
वाण=वान
विठ्ठल=वीठळ
वार्ता=वारता
वृक्ष=व्रुक्ष
वेली=वळी
वीट=ईट
वत्स=वर्छ
विषम=वीशम
वर्णी=वर्णी
वृष्टी=व्रुस्टी

विश्रांति=वीसरांती
वर्ते=वते
वर्तता=वतता
व्हावा=व्होवा
व्यंग=वेंग
वेश्या=वेस्या
शशी=ससी
शरीर=शेरीर
शब्द=शेब्द
शरण=शेरण
शांति=सांती
शून्य=सुन्य
शक्ति=शेक्ती
श्रीपति=त्रीपती
शुद्ध=सुध
क्षीण=सीण
सत्यत्वेसी=सतेत्वेसी

सिद्ध=सीध
संबंध=समंध
समर्थांचा=समंर्थ्याचा
स्वप्न=स्वपण
स्वाती=संवाती
स्तन=स्थनां
सद्गदित=सदगदीत
सिंहासन=सेहासन
संदेह=संधे
सूत्र=शूत्र
सुख=सुप
स्पष्ट=पस्ट
स्मशान=समशान
हृदय=ह्रदये
हीन=हीण
क्षण=त्क्षण
ज्ञान=ग्नान

॥ श्री विठ्ठल ॥

## श्री तुकोबारायांचे अभंग

# भिजल्या वहीचे अभंग

॥ १ ॥

॥ होतो ते चिंतीत मानसीं। आजी नवस हे फळले नवसीं।
॥ जोडी ते नारायणा ऐसी। आवीट ज्यासीं नाश नाहीं ॥ १ ॥
॥ धृ० ॥ धरीले जीवीं न सोडी पाय। आले या जीवीत्वाचे काय।
॥ कइ हे पावीजती ठाय। लाविली सोय सचिताने ॥ धृ० ॥
॥ मज तो होती पडली भुली। चित्ताची अपसव्य चाली।
॥ होती मृगजळे गोवी केली। दृष्टी उघडली वरे जालें ॥ २ ॥
॥ आतां हा सिद्धी पावो भाव। मध्ये चांचल्ये न व्हावा जीव ॥
॥ ऐसी तुम्हां भाकीतसे कींव। कृपाळुवा जगदानीया ॥ ३ ॥
॥ कळो ह येते आपुले बुद्धी। ऐसे तो न घडते कधीं।
॥ केवढे आघात ते मधीं। लज्जा ऋद्धी आड उभी ठाकोनी ॥ ४ ॥
॥ कृपा या केली संतजनीं। माझी अलंकारीयेली वाणी।
॥ प्रीती ही लावीली कीर्तनीं। तुका चरणीं लोळतुसे ॥ ५ ॥

(१) भिजल्या वहींतील पहिला अभग–होतो तें चिंतीत मानसीं। आजी नवस फळलें नवसीं।–हा आहे या अभगात अनेक गोष्टी सागितल्या आहेत–आजवर–नारायणाची जोडी व्हावी म्हणून नवस करून मी चिंतन करीत होतों, ती गोष्ट आज झाली ही नारायणाची जोडी, अशी आहे कीं–त्या जोडीचा कधीं हि वीट येत नाहीं व ही जोडी एकवार झाली कीं कधीं हि नाश पावत नाहीं म्हणजे एकदा अवस्थातर झालें–कीं, झालें या नारायणाचे पाय मीं जीवात धृढ धरले आहेत तेव्हा आता या जीवित्वाचा विचार करण्याचें कारण मला नाहीं कारण आपलें कसें होईल–काय होईल, असा विचार या पुढें मीं

करावयास नको. संचितानें उत्तम सोय लाविली व नारायणाची जोडी झाली. आतां सर्व काळजी नारायणास. आजवर मृगजळानें, अशाश्वत गोष्टींनीं मला भूल पडे—चित्त वाकड्या मार्गानें जाई—व तीं एक अडचण, गुंताळा—गोवी—होई. पण या नारायणाच्या जोडीनें माझी दृष्टि उघडली, ही गोष्ट, बरी झाली. आतां या नारायणाची जोडी संभाळून राहावें—हा माझ्या मनांत उत्पन्न झालेला भाव—बा, नारायणा,—तुमच्या कृपेनें—सिद्धि पावो—शेवटास जावो. मन चंचल होऊन त्यांत कांहीं गोता येऊं नये—अशी तुमची हे जगदानी व कृपाळु नारायणा कींव भाकीत आहे. ही गोष्ट मी करून होणारी नाहीं कारण लाज, संपन्नता असल्या अडचणी मध्यें उत्पन्न होतात, मन चचल होतें—तेव्हां हा माझा भाव तुमच्या च कृपेनें सिद्धीस जाईल—जावो. या माझ्या मार्गांतील—नारायणाच्या जोडीच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन या—समोर दिसत असलेल्या—सत-जनांनीं माझेवर कृपा केली.—माझ्या वाणीस—कीर्तनाची आवडी—प्रीति लावून अलंकार केला, व माझ्या वाणीवर प्रयोग करून कवित्वाचा ओघ सुरू केला, तेव्हां तुका, या नारायणाच्या व संताच्या चरणावर लोळण घेत आहे.

असा हा पहिल्या अभंगाचा शब्दशः अर्थ आहे. या अभंगांत नारायणाची जोडी झाल्याचें शुभ वर्तमान सांगितलें आहे. व त्याचा परिणाम म्हणजे आपली दृष्टि उघडली आहे, असें म्हटलें आहे. नारायणाची जोडी होणें व दृष्टि उघडणें या गोष्टी एका च वेळीं व्हावयाच्या असतात. नारायणाची जोडी होणें हें मनुष्याचें ध्येय आहे. तें ध्येय आज सिद्ध झालें, असें म्हटलें आहे. जीव निरनिराळ्या योनींत हिंडत असतांना—त्यास योनी बदलण्याची सवी सापडत नाहीं—इतर योनींत नारायणाची जोडी होण्याचें साधन नाहीं. ती गोष्ट मानव-देहांत साध्य करितां येते. *बरवें झालें आलो या जन्मासी। जोड जोडीली मनुष्य देहा ऐसी। महालाभाची उत्तम रासी। जेणें सर्व सुखासी पात्र होईजे।*—तेंहा मनुष्य देह लाभला ही पहिली बरवी गोष्ट झाली म्हणून सांगितलें. कारण या देहांत महा लाभ करून घेतां येतो व सर्व सुखास पात्र होतां येतें. *दीलीं इंद्रियें हात पाय कान। डोळे मुख बोलावया वचन। जेणें तूं जोडसी नारायण। नासे जीवपण भवरोग।* या मनुष्य देहांत हात—पाय—कान—डोळे—मुख—वाणी—या सर्व इंद्रियां करवीं नारायणाचें भजन करून नारायणाची जोडी करून घेता येते. मनुष्य देह मिळाला हा पहिला लाभ व त्यात नारायणाची जोडी झाली हा महा लाभ—या आनंदास दुसरी तोड नाहीं. तेव्हा ही नारायणाची जोडी

झाल्यानें—पूर्वी ज्या गोष्टींत—(लज्जा—ऋद्धि—या सारख्या) मन रमत होतें—त्या गोष्टी मृगजळा सारख्या फसव्या आहेत असें वाटूं लागलें. तेव्हां आज जी नारायणाची जोडी झाली आहे त्यांत कोणत्या हि कारणानें अंतराय होऊं नये. जीवाला चंचलपणा येऊं नये—ही उत्कट इच्छा—व त्या उत्कटत्वाच्या पोटीं भय वाटून—आपणास ही गोष्ट कशी साधणार अशा भयभीत स्थितींत च—नारायणास च विनंति करतात कीं, बा—नारायणा, हा माझा भाव तुमच्या कृपेनें सिद्धीस जावो—अशी तुमची कींव भाकतों. तुमच्या समवेत आलेल्या संत नामदेवरायांनीं माझ्यावर कृपा केली व माझ्या वाणीस कवित्वाचा अलंकार चढविला—व तुमच्या कीर्तनाची माझ्या मनास प्रीती लाविली—तेव्हां तुका—संतांच्या समवेत—नारायणा, तुमच्या चरणावर लोळण घेत आहे.—ही जी नारायणाची जोडी झाली ती आपण आपल्या कर्तृत्वाने, काही जप—तप—करून सिद्ध झालेली गोष्ट आहे का—असा तुकोबा आपल्याशीं च विचार करूं लागले—तेव्हां आपण कांहीं पाठ केलेली संतांची वचनें—हें खरें—पण आपलें श्रम किती व आपणास नारायणाची जोडी, हा महा लाभ—कोठें—कशास कांहीं प्रमाण! तेव्हां ही गोष्ट—संचितानें कांहीं तरी सोय लावली म्हणून झाली—असें सहज सुचणारें उत्तर—तुकोबांनीं परिहार देतांना पुढें केलें. एरव्हीं कळो हें येतें आपुलें बुद्धी। ऐसें तों न घडते कधीं।—सर्व जगाचें सूत्र हालविणाऱ्या नारायणानें च हें घडवून आणलें—असें पुढें स्वतःच्या मनाचा विकास होईल तेव्हां म्हणणार आहेत च—पण सध्यां संचितास भलेपणा व यश देत आहेत. एरव्हीं ऐक पांडुरंगा एक मात। कांहीं बोलणें आहे एकांत। आम्हां जरी तारील संचीत। तरी उचीत काय तुझें।—या अभंगांत संचित तुकोबा किती मानीत होते—तें स्पष्ट केलेलें आहे. तेव्हां संचितास दिलेला हा मान पोशाखी आहे व त्याचा अर्थ एवढा च करावयाचा कीं, ही गोष्ट माझ्या कर्तृत्वानें झालेली नाहीं. तर संतांनीं कृपा केली म्हणून, व नारायणा, तुमच्या मनांत आलें म्हणून, झालेली आहे. नारायणाची जोडी होतां च आपली दृष्टि उघडली—असें तुकोबा म्हणताहेत.

दृष्टि उघडली बरें झालें।—असा नारायणाच्या जोडीचा परिणाम सांगितला आहे. परमार्थ साधन म्हणून जर कांहीं साधावयाचें असेल—तर—आपली दृष्टि उघडून कोणती हि गोष्ट—ही तिच्या खऱ्या स्वरूपांत आपणास दिसावी, तिचा व आपला संबंध काय, हें स्पष्ट व्हावें, व त्या वस्तूचा आपणावर पगडा बसूं नये,—तर चंद्र—सूर्यापासून प्रत्येक गोष्ट ही जीवाच्या सुखासाठीं—त्यास हवी

म्हणून—परमात्म्यानें निर्माण केली आहे,—हेतु येवढा च कीं, जीव, हा जो शिवाचें भातुकें आहे—त्यास हर एक गोष्ट पाहून शिवाच्या जीवाबद्दल प्रेमाचें ज्ञान व्हावें. जीवानें ज्ञान व प्रेम यांनीं सर्व विश्व भरलें आहे असा भोग भोगावा व माझा मायबाप उभा विटेवरी—कवतुकें करी कृपादान असें एकवार स्मरावें. जीवास सर्व कांहीं ज्ञानांत व प्रेमांत सामावलेलें आहे—असें वाटूं लागलें कीं त्याची दृष्टि उघडली म्हणून समजावें. ही प्रतीति ज्याची त्यास च व्हावयाची आहे. पण शब्दानें लिहिण्यास ही प्रतीति जेवढी सोपी आहे—तेवढी अनुभवानें पटणें सोपें नाहीं. मनुष्यास ही दृष्टि सारखी चकवीत असते. या दृष्टीचें वर्णन निरनिराळ्या साधुसंतांनीं मोठ्या कवतुकानें अनेक रूपकें करून केलें आहे. ज्ञानेश्वर माउलीनें—डोळ्यांतील बाहुली करितां नये वेगळी। सखी म्हणून अंजुळी धरितां नये। असें एका अभंगांत गाइलें. तें ज्ञान पै गा बरवें। असें श्रीज्ञानेश्वरींत चवथ्या अध्यायांत सांगितलें, व पुढें—आतां माझें निज देखीजे। ते दृष्टी देऊँ।—असें दिव्यं ददामि ते चक्षुः।चें निरूपण केलें आहे—ती दृष्टि—निजत्व—पाहण्याची दृष्टि, आपणास आली ही गोष्ट तुकाराम महाराज या अभंगांत प्रतीतीनें सांगताहेत. एकनाथ महाराजांनीं या दृष्टीचें वर्णन कोल्हाटिणीचें रूपक करून केलें आहे:— सगुण गुण माया। आली कोल्हाटीण खेळाया।—धृ॥ प्रपंचाचा रोविला वेळु। चहू शुन्यांचा मांडिला खेळ। ब्रह्मा विष्णु जयाचे बाळ। लागती पाया॥ धृ॥ आला गडे निर्गुणीचा कोल्हाटी। सोहं शब्दें ढोलगे पिटी। चैतन्याची उघडून दृष्टी। चला जाऊं पहा या॥ २॥

चैतन्याच्या दृष्टीनें श्रीहरीचा खेळ पाहता येणें म्हणजे दृष्टि उघडली बरें झालें. तुकोबारायांनीं हें च रूपक घेऊन तें ज्ञानश्वेर माउलीच्या शब्दांनीं रंगविलें आहे. श्याम सुंदर सावळी। उभी नयनाचे राउळीं। ती आकाश ब्रह्मांड गिळी। ॥ धृ॥ दादांनो ठकडी बायको आली। भल्या भल्यासी ठकवुनि गेली ॥ धृ॥ ॥चारीं शुन्याचे वरती। ज्ञानदृष्टीनें न्याहाळीती। चारी सूत्रें तिचे हातीं॥ ॥ बायको न्हे पुरुष नव्हे। दावी नाना रंग नट भावे। जैशीं आकाशीं वीज वालवें। ॥ जे जे पाहु गेले तिसी। तिनें झोडपीले तयासी। तुकाराम शरण तिसी। जे जे पाहू गेले तिसी। तिनें झोडपिलें तयासी। म्हणजे मज तो होती पडीली भूली। चित्ताची अपसव्य चाली। होती मृगजळें गोवी केली।—व तसें त्व केवढे आघात ते मर्मी। लज्जा ऋद्धी आड उभी ठाकोनी। तेव्हां भूली, चित्ताची अपसव्य चाली, लज्जा, ऋद्धि, या सर्व गोष्टी बाजूस सरून,

नारायणाची जोडी झाली. दृष्टि उघडली—संतजनांनीं कृपा केली—वाणी अलंकारियेली—कीर्तनीं प्रीति लाविली—या सर्व गोष्टी आठवून—तुका—समोर दिसत असलेल्या—मूर्तीच्या चरणीं लोळतुसे—असें पहिल्या अभंगाचे शेवटी म्हटलें आहे. तेव्हां हा दिवस केवढा पवित्र व श्रेष्ठ असेल! पण त्या दिवसाची तिथि, वार, शक आपणास माहित नाहीं. कविन्व स्फूर्ति—झाल्याचे दोन अभंग—प्रसिद्ध आहेत. पण गुरूपदेशाची माघ शुद्ध दशमी गुरुवार ही जशी महाराजांनीं मिति सांगितली तशी कवित्व स्फूर्तीची मिति सांगितली नाही. नामदेवरायांनीं स्वप्नांत येऊन थापटून जागें केलें. बरोबर पंढरीनाथ हि होते व नामदेवरायांनीं सांगितलें कीं शतकोटी अभंग करण्याची मीं जी प्रतिज्ञा केली होती ती पूर्ण झाली नाही, तेव्हां तें काम तुम्ही शेवटास न्या; तें काम पुरें व्हावें अशी सळ (म्हणजे अभिमान) पंढरी राजांनीं धरिली आहे. तेव्हां या पुढें कारणा शिवाय वाणी खर्चू नये व माप टाका. तुकोबारायांनीं या आज्ञेस विनय पूर्वक हो म्हणतां च नामदेवरायांनीं आपली सर्व कवित्व शक्ति—तुकोबांस दान दिली—त्यांस हरिभजनाची गोडी, आवडीनें होता,—त्यांस कीर्तनाची प्रीति दिली—ही गोष्ट, एका एकी केलो मिराशीचा धनी।—असें म्हणून तुकोबांनीं सांगितली आहे. तेव्हां असा मिराशीचा धनी केल्यावर कोणी झाला तरी काय करणार! या कृपाळु दात्यांच्या चरणावर लोळण घेणें येवढें च त्यांस करावयास उरलें होतें. तशी तुकोबांनीं विठुरायाच्या व नामदेवरायांच्या चरणांवर लोळण घेतली. लोळतुसे हे उकार घालून लोळतसे याचे गोडवें रूप केलें आहे. ही लोळण मनमुराद झाल्यावर, मान वर करून—समोर नारायणाचें जें रूप दिसूं लागलें—त्याचें वर्णन, उठून, उभे राहून, करीत आहेत कीं—ताप हें हरण श्रीमुख।—नामदेवरायांनीं कवित्व स्फूर्ति देऊन कवित्व करण्याचा तुकोबांचे वाणीवर प्रयोग केला. तो प्रयोग—तुका जवळा चरणसेवक अभंग म्हणून उभा राहून,—ताप हें हरण श्रीमुख,—म्हणून मुखा वाटा अमृत वचनें उच्चारू, लागले—तेव्हां नामदेवराय यांस काय वाटत असेल! आपण नामदेवरायाचा पण सिद्धीस जावा म्हणून अभिमान धरिला—तो अभिमान सिद्धीस सांगितल्याप्रमाणें तुकोबा पार पाडीत आहेत म्हणून पढरीनाथास काय वाटत असेल! व या कृपाळु संताबद्दल व जगदानी नारायणाबद्दल तुकोबांस केवढा भक्तिभाव वाटत असेल! ज्या क्षणी ही गोष्ट सिद्ध झाली ती वेळ केवढी मंगल असेल—व त्या दर्शनाचें सुख तरी केवढें असेल!

॥ २ ॥

॥ ताप हे हारण श्रीमुख । हारी भवरोगा ऐसें दुःख ।
॥ अवलोकितां उपजे सुख । उभे सन्मुख दृष्टीपुढें ॥ १ ॥
॥धृ॥ न पुरे डोळीयांची धणी । सखोल कृपेची च खाणी ।
॥ स्तवीतां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधी ॥ धृ॥
॥ रामकृष्ण ध्यान वामन नरसिंही । उग्र आणि सौम्य कांहीं च नाहीं॥
॥ सापडे भरलीये वाहीं । भाव शुद्ध पाही याचे भातुके ॥ २ ॥
॥ गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण ॥
॥ व्यापक तरी त्रिभुवन । मन मोहन लावण्य हे ॥ ३ ॥
॥ ठाण हें साजीरें सुंदर । अविनाश अवीकार ॥
॥ अनंत आणि अपरंपार । तो हा कटीं कर धरीताहे ॥४॥
॥ जयाची वाणी सुमन माळा । परम अमृत जिव्हाळा ॥
॥ अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरण सेवक ॥ ५ ॥

( २ ) सन्मुख उभे राहून — तुकोबा म्हणताहेत कीं, ताप हें हरण श्रीमुख।— लक्ष्मीच्या प्रेमाच्या प्रसन्नतेमुळें — हें मुख चकमत आहे, हें पाहता च सर्व तापांचे हरण होतें. भवरोगासारखें दुःख हि हरण होतें व हें श्रीमुख जो जो पहावें — तों तों सुख च उत्पन्न होतें. हें श्रीमुख किती वेळ — व किती वेळां पाहिलें तरी डोळ्यांची हौस फिटत च नाहीं. हें श्रीमुख — कृपेची खोल खाण च आहे व हा समचरणावर जो कृपानिधि — विठुराया उभा आहे त्याची स्तुति करण्यास वेद पुरा पडत नाहीं. तेव्हां मी तें वर्णन कितीसें करणार ? हें रामकृष्णाचें ध्यान वामनाच्या ध्यानासारखें सौम्य, किंवा नारसिंहासारखें, उग्र नाहीं — पण हा कृपानिधि — सापडे भरलीये वाहीं। — भावशुद्ध पाही याचे भातुकें। — हा भक्ताचा शुद्ध भाव पाहतो — शुद्ध भाव हें याचें भातुकें म्हणजे खाऊ आहे व भक्ताच्या अंतरांत शुद्ध भाव आहे असें पाहिल्यावर — भक्ताच्या अन्तःकरणातील शुद्ध भाव पूर येऊन वाहूं लागला कीं त्या शुद्ध भावाच्या पुरांत हा सांपडतो. हा नारायण गुणांनीं गंभीर — चतुर — सुजाण — शूर — धीर — उदार — असा आहे — हा त्रिभुवनाला व्यापून उरलेला आहे आणि याचें लावण्य मन मोहणारें आहे. हें ठाण — म्हणजे जागा — जेथें मी आतां चरण सेवक उभा आहे व ज्या चरणांवर मीं लोळण घेतली होती — तें ठिकाण — साजिरें — सुंदर अविकार — अविनाश — अनंत व अपरंपार — असें आहे. हा कटावर कर ठेवून

जो कृपानिधि उभा आहे – त्याची वाणी – म्हणजे शब्द, जशी कांहीं फुलांची माला च आहे – परम अमृत हें या वाणीचा जिव्हाळा आहे. अशा या अनंताच्या अंगीं अनंत कला आहेत. म्हणून तुका जवळ च या चरणांचा सेवक म्हणून उभा आहे.

असें हें दुसऱ्या अभंगाचें शब्दशः रूपांतर आहे. पहिल्या अभंगांत नारायणाची जोडी झाल्याचें व ती जोडी झाल्यानें आपली दृष्टि कशी उघडली – आपलें स्थित्यंतर कसें झालें, तें सांगितलें. दुसऱ्या अभंगांत नारायणाचें रूप कसें तें सांगितलें, नारायणाचें ध्यान सांगितलें, नारायणाचें लावण्य सांगितलें – आपणास याची जोडी – भरलीये वाही – झाली – शुद्ध भाव हें याचें भातुकें असून याची वाणी – सुमन माळा - परम अमृत जिव्हाळा – अशी आहे – म्हणून सांगितलें. विटेवरील पाउलें – हें ठिकाण साजिरें, सुंदर – अविकार – अविनाश – अनंत – अपरंपार – आहे म्हणून सांगितलें – या अभंगांत केलेलें वर्णन – कीर्तन, हें प्रत्यक्ष भोग घेत असतांना केल्यासारखें दिसत आहे. हें श्रीमुख – तो – हा, लावण्य – हें, – ठाण हें, तो हा, कटीकर धरीता हे। – ही शब्दयोजना – समोर मूर्ति पाहून बोलावें अशी आहे. शिवाय या मूर्तीचे शब्द जे कानावर आले – त्या शब्दांचें वर्णन – जयाची वाणी सुमन माळा – परम अमृत जिव्हाळा असें केलें आहे. असें हें नारायणाच्या प्रत्यक्षतेच्या सान्निध्याचें वर्णन दुसरीकडे कोठें हि पाहावयास मिळणें शक्य नाहीं. हे दोन्ही अभंग कोणत्या हि छापील गाथ्यांत एका पुढें एक आलेले नाहींत. तसें च आज माहीत असलेल्या हस्तलिखित पोथ्यांत हि नाहींत. आजवर हे अभंग एका पुढें एक कोणी पाहिले किंवा ऐकिले नाहींत. महाराजांच्या अभंगांची जी ओळ सापडली पाहिजे– ती ही ओळ आहे – आजवर तरी ही ओळ दुसऱ्या कोणास जुळवितां आली नाहीं.

दुसऱ्या अभंगाचा शेवट – तुका जवळा चरण सेवक – असा आहे. तेव्हां धन्याचें रूप, गुण, वर सांगितल्याप्रमाणें मनांत भरल्यावर, सेवक धन्यास साहजिक च म्हणणार कीं तुमचे स्तुति योग्य कोठें माझी वाणी। –

॥ ३ ॥

॥ तुमचे स्तुती योग्य कोठे माझी वाणी। मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥
॥धृ॥ भक्ती भाग्य तरी नेदी तुळशी दळ। जोडोनी अंजुळ उभा असे ॥धृ॥

॥ कैंचें भाग्य ऐसें पावीजे सन्नीध। नेणें पाळुं वीध करुणा भाकी ॥ २॥
॥ संतांचे शेवटीं उच्छिष्टाची आस। करूनिया वास पाहातुसें ॥ ३॥
॥ करीं इच्छा मज म्हणोत आपुलें। एखादिया बोलें निमित्ताच्या ॥ ४॥
॥ तुका म्हणे शरण आलों हें साधन। करितों चींतन रात्रदिस ॥ ५॥

( ३ ) देवा, तुमचें कीर्तन करावयास मला नामदेवरायानीं सांगितलें खरें-पण तुमची योग्य ती स्तुति करता येईल असें बळ माझे वाणीत नाहीं. म्हणून तुमच्या चरणांवर मस्तक ठेवितो — येवढें च मला करता येईल आपल्या पायांजवळ आलों हें माझें भाग्य — भक्तीनें — उदित झालें, हें खरें,— पण तुम्हांस अर्पण करावयास — पत्र पुष्प फल तोयम् — असे म्हणून, अर्पण करावयास — माझे जवळ तुळशी पत्र हि नाहीं, म्हणून दोन्हीं अजुळ — म्हणजे = प्रवृत्ति निवृत्ति बाजूस सारून, हात जोडून उभा आहे. असें माझ काय भाग्य उदयास आलें तें काहीं समजत नाहीं — कीं ज्याच्या जोरावर मी, आपल्या चरणा जवळ आला मी स्वत.कडे पाहू लागलों तर मला एक हि विधि पाळता येत नाहीं म्हणून मी तुमची करुणा भाकीत आहें. यापेक्षा मला दुसरें काहीं हि करता येत नाहीं. तेव्हा मी संताचा एखादा उच्छिष्ट प्रसाद मिळावा म्हणून आस करून आहे व कोणत्या तरी कार्याचें निमित्त होऊन त्यांनी मला आपला असें म्हणावें अशी वाट पाहात आहे. देवा, मी तुमचें रात्रदिवस चिंतन करीत आहें व तुम्हांस शरण आलों आहें. हें एक च साधन मला माहीत आहे. शरण हा शब्द संताचा — श्रीज्ञानेश्वर माउलीचा — उच्छिष्ट आहे. त्याचा अर्थ.

पै आपुलेनि भेदें वीण। माझें जाणीजे एकपण।
त्याची नांवें शरण। मज येणें गा ॥ ज्ञा. अ. १८।१३८९

आळंदीस बेचाळीस दिवस धरणें धरून ब्राह्मण बसला होता त्यास जेव्हा ज्ञानेश्वर महाराजानीं तुकोबाकडे पाठविलें तेव्हा — म्हणोत आपुलें। एखादीया बोले नीमीत्ताच्या॥ ही गोष्ट सिद्ध झाली. तसेंच त्या धरणेकऱ्यास काय उपदेश करावयाचा याचें स्फुरण जेव्हा झालें तेव्हां तुकोबा म्हणाले कीं, माझ्या बापें मज दीधलें भातुकें॥ म्हणुनी कवतुकें क्रीडा करी। — ही ज्ञानेश्वर महाराजानीं जें भातुकें पाठविलें होतें त्यानें क्रीडा केली. तेव्हा उच्छिष्ट मिळावें ही इच्छा तृप्त झाली. या अभगाचा शेवट — तुका म्हणे शरण आलों हें साधन। करीतों चिंतन रात्र दिवस। — असा आहे हें साधन करून काय साधलें — तें पुढील अभंगांत सांगताहेत कीं.—

॥ ४ ॥

॥ सर्वंवीशीं आम्हीं हेचि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥१॥
॥ध्रु॥ पाहीलें चि नाहीं मागें परतोनि । जिंकीला तो क्षणीं क्षण काळ ॥ध्रु॥
॥ नाहीं पडो दिला विचाराचा गोवा । नाहीं पाठी हेवा येऊं दिला ॥ २ ॥
॥ केला लाग वेग अवघींच तांतडी । भावना ते कुडी दुराविली ॥ ३ ॥
॥ कोठें मग ऐसे होतें सावकाश । जळो तया आस वेव्हाराची ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी कशाची ही ॥५॥

( ४ ) स्वामीची चरणसेवा साधिली—ही चरणसेवा म्हणजे च सर्व गोष्टींची जोडी केली—असें करीत असतांना वळून मागें पाहिलें नाही—म्हणजे ज्या गोष्टी सोडून—टाकून आलो त्यांचे कडे कांहीं पुनः वळून पाहिलें नाहीं. आणि अशा तऱ्हेनें क्षणोक्षणीं काळ जिंकिला. इतर कोणत्या हि विचाराचा गोवा पडूं दिला नाहीं व इतर अमस्यास असें, देवा, तुम्हीं दिलेंत, मला हें असे कां, असा हेवा हि मला शिवला नाहीं. लागवेग म्हणजे अति त्वरा केली, तातडी केली, कुडी=कपटी= वाकडी भावना दूर सरली—अशा स्थितींत सावकाश या शब्दास वाव च नव्हती— व वेव्हाराची आस जळो अशी वृत्ति झाली. यामुळें स्वामीची साधिली चरण-सेवा—हा लाभ पालवीं म्हणजे पदरांत घेतला—आतां कशाची हि गोवी= गुतागुंत—उरली नाहीं. या अभंगांत तुकोबांच्या हृदयाचा ठसा एवढा स्पष्ट उमटला आहे कीं तुकोबा भामनाथावर मनाच्या कोणत्या स्थितींत होते याबद्दल कल्पना करावयास नको—पाहीलेंचि नाहीं मागें परतोनी।—अवस्था लक्ष्यांत येण्यास शब्द जेवढा स्पष्ट असावा असें वाटेल त्याहून हि हें वचन जास्त स्पष्ट ची घालून केलें आहे. व त्याबद्दल शंका राहूं नये म्हणून पुढील प्रत्येक चरण जास्त जास्त च स्पष्टता करीत आहे. स्वामीची साधिली चरणसेवा—हा जो लाभ पदरांत बांधून घेतला, त्या लाभास—

॥ ५ ॥

॥ ब्रह्मादिक तया लाभासी टेंगणें । बळीये आम्ही भले शरणांगत ॥ १ ॥
॥ध्रु०॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । जाला पद्मनाभ सेवा ऋणी ॥ध्रु०॥
॥ बैसलीये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटी वरते भेदी ऐसें ॥ २ ॥
॥ कामधेनुचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचीये वाहीं वरुपावें ॥ ३ ॥
॥ हारी नाहीं आम्हां विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे बहु लाठे हे भोजन । नाहीं रिता कोण राहत राहो ॥ ५ ॥

(५) त्या लाभास ब्रह्मादिक ठेंगणे आहेत व आम्ही शरणागत बळीये आहोत, असें सांगताहेत. ठेंगणा, हा शब्द ब्रह्मादिकांना लाविला आहे. ब्रह्मादिक म्हणजे ज्ञानानें, योगयागानें, तपाचरणानें, देव मिळवू असें, देवावर स्वपराक्रमानें मात करूं, असें म्हणणारे – हे या लाभास ठेंगू आहेत म्हणून सांगितलें. त्याच्या हातीं लागणार नाहीं असा हा लाभ आहे म्हणून सांगितलें. हात वर करून द्राक्षें तोडण्याचा बुटक्या माणसानें प्रयत्न करावा व द्राक्षें आंबट म्हणून टाकून जावें – तसे ब्रह्मादिक – या नारायणाच्या जोडीस, ठेंगू आहेत, म्हणून नेति नेति – हें नाहीं हें नाहीं – असें म्हणतात – तो हा, असें म्हणत नाहींत. ठेंगू हा शब्द तमाशातील आहे. त्यात ठेंगूराव असतो – तो हिजडा असतो, त्यानें तमाशांत किती जरी कामाच्या चेष्टा केल्या तरी त्यास काम वृत्तीचा उदय व्हावयाचा नाहीं व सौख्य हि लाभावयाचें नाहीं. तसें ब्रह्मादिकांनीं देवप्राप्तीच्या वाचाळ पचविशीनें किती हि चेष्टा केल्या तरी ते या लाभास ठेंगणे पडणार असें हा अर्थपूर्ण शब्द वापरून सांगितलें आहे. ठेंगणा याच्या उलट शब्द बळीया – म्हणजे सामर्थ्यवान – दांडगा – तेव्हा ज्यांचे शरण हें साधन असतें ते च देवावर बळीये होऊन भले म्हणवून घेतात. कामना म्हणजे इच्छा, मागणी, देवावीण आम्हांस दुसरी कसली च इच्छा नसल्यामुळें – भजनाचा लाभ झाला. पद्मनाभ ऋणी झाला. बसल्या ठिकाणीं भजनात एवढी उत्कटता आली कीं तें भजन त्रिपुटी परतें गेलें, म्हणजे ध्येय – ध्याता – ध्यान – ज्ञेय – ज्ञाता – ज्ञान – या पलीकडे गेलें. भजन हीं च आमुची कामधेनु व त्या भजनाचा परिणाम – कामधेनुचीया क्षीरा पार – मर्यादा – नाहीं, असा, व त्या बरोबर च इच्छेचिये वाढी म्हणजे आम्हांस हवें तेव्हा – हवें तसें – हवें तितकें – दूध यावें अशी स्थिति झाली. आम्ही भेद करून (तू स्वामी मी सेवक) भजन करणाऱ्यांच्या अगीं नारायण विसावला आहे. परंतु आम्हां विष्णुदासांना हारि नाहीं म्हणजे केव्हा हि हार माघार खावी लागत नाहीं. तुका म्हणे, या कामधेनूच्या क्षीरानें होणारें हें भोजन फार लाठें = मोठें – बळिष्ठ – विपुल – असें असतें येथें कोणी हि रिता राहूं म्हणेल तरी त्यास रिता पोकळ उपाशी राहता येणार नाहीं. जेयातें कामधेनु ऐशी माय। तयासी अप्राप्य काहीं आहे। (ज्ञा. १।७९) या ओवीचा येथें उल्लेख आहे. कामधेनूचें वर्णन निराळें करण्याचें कारण नाहीं. पण नारायणाच्या जोडी बरोबर कामधेनूचा उल्लेख व्हावा हें यथाक्रम च आहे.

॥ ६ ॥

॥ पोट धाले आजां जीवनीं आवडी । पुरवावे परवडी बहुतांचे ॥१॥
॥धृ॥ काय आंचवणा तांतडीचे काम । मागील तीं श्रम न पवावीं ॥धृ॥
॥ वाढतीया पोटीं बहु असे वाव । सांभाळीतां ठाव काय वेचे ॥२॥
॥ दावील्या वाचुनी नाहीं कळो येत । तेथें हि दुश्चीत एकपणें ॥ ३ ॥
॥ नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हलु भारी तये ठायीं ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे गीत गाउनी गोविंद । करूं ब्रह्मानंद एकसरे ॥ ५ ॥

( ६ ) हें जें लाठें = विपुल, असें भोजन झालें त्यानें पोट धालें – भरलें – तृप्त झालें. आतां त्या जीवनाची म्हणजे ज्या नारायणाच्या जोडीनें प्रत्येक जण समजून वा न समजून जगतो आहे – त्या ज्ञानाच्या जीवंतपणाच्या ऐन वस्तूची आवडी, गोडी, बहुतांना कौतुकानें पुरवावी एवढें च काम मला राहिलें–तेव्हां हात धुवून मोकळें होण्याची तांतडी करण्याचें काय काम आहे ? तशी तांतडी केली तर मागाहून जे येतील त्यांना हि ते च श्रम पडतील. श्रीपंढरीशाचें (कृपेचें) पोट एवढें विस्तृत आहे कीं त्यांत पुष्कळांना सांभाळण्याची शक्ति आहे व त्या सांभाळांत तेथें खर्च हि होणार नाहीं. देवाचें यथार्थ स्वरूप काय आहे हें आतां माझ्या जसें लक्ष्यांत आलें आहे तसें कोणास स्पष्ट करून दाखविल्यावाचून लक्ष्यांत यावयाचें नाहीं, कारण तेथें एकपणानें, एककल्लीपणानें, माणूस दुश्चित असतो. नावेंत एक मनुष्य बसो, किंवा जास्त बसोत तो भार पाण्यास व्हावयाचा, त्याचा भार नावेवर नाहीं. म्हणून तुकोबा म्हणतात गोविंद गीतीं गाऊन एकसरें। एकदम ब्रह्मानंद करूं या. नावेचा भार तो उदकाचे शीरीं । काय हळु भारी तये ठायीं ।– ही म्हण किती सहज सुलभतेनें साधली आहे. या अभंगांत आपणांस जो लाभ झाला तो लाभ दुसऱ्यास व्हावा अशी कळकळ आहे. त्यांत देवाला कांहीं तोशीस नाहीं व स्वतःस हि कांहीं त्रास नाहीं. असा भाव नावेचा दृष्टांत देऊन प्रगट केला, आणि लोकांना ही गोष्ट स्पष्ट करून सांगितल्यावांचून समजणार नाहीं, एकटेपणानें माणूस केव्हां हि दुश्चित = खिन्न असतो, असें सांगितलें आहे. मागील तीं श्रम न पवावीं म्हणून लोककल्याणाची केवढी ही कळकळ ! तेव्हां एकसेर ब्रह्मानंद करावयाचा तो

॥ ७ ॥

॥ एका हातीं टाळ एका हातीं चीपळीया ।
घालीताती हुंचरी एक वाहाताती टाळीया ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें।
नाहीं मोक्षपदीं चाट भजनीं आवडी ॥ ध्रु ॥
॥ हाका आरोळीया गीत वाद्य सुख सोहळे।
जाय ते न कळे केव्हां रजनी दिवस ॥ २ ॥
॥ तीर्थी नाहीं चाट नलगे जावें वनांतरा।
तुका म्हणे हरि हरात्मक चि पृथिवी ॥ ३ ॥

(७) मागिल अभंगाचा शेवटचा चरण, गीतीं गाउनी गोविंद। करूं ब्रह्मानंद एकसरे। असा आहे – तेव्हां हा सर्व जणांनीं मिळून ब्रह्मानंद एकदम कसा भोगावयाचा? तो सांगताहेत, कीं, एकाच्या म्हणजे कांहींच्या, हातांत टाळ, कांहींच्या हातांत चिपळीया, कांहींनीं नुसत्या टाळ्या वाजवून हुंबरी घालावयाची; हुंबरी हा एक गवळ्यांचा खेळ आहे, त्याचें हें रूपक आहे. तेव्हां असा खेळ खेळत, मातले वैष्णव – नटती नानाछंदें – येथें मोक्ष पदाची चाड म्हणजे मातब्बरी नाहीं. पण भजनीं मात्र आवडी फार. हाका देत, आरोळ्या ठोकीत, गीताचा, वाद्याचा, सुखसोहळा भोगीत, दिवस व रात्र केव्हां जाते हें हि कळून नाहीं. हाका मारणें – आरोळ्या ठोकणें – गाणें – वाद्यें वाजविणें – हे सर्व प्रकार हुमरी – या खेळांत येत असावेत. या गोष्टी करतात त्यांना तीर्थाची चाड = परवा नाहीं – त्यांना वनांतरास हि जावयास नको. ही अवघी पृथ्वी = हरीहरात्मक असतांना, तीर्थास किंवा वनांतरास जाण्याचें प्रयोजन काय?

सहाव्या अभंगांत – मागील तीं श्रम न पवावीं पाठीमागून येणाऱ्या लोकांस श्रम होऊं नयेत, त्यांना दावील्यावाचून नाहीं कळो येत। – अशी जी कळकळ वाटली त्या कळकळीस मूर्त स्वरूप हुंबरीच्या खेळानें या अभंगांत दिलें. या हुमरीच्या खेळांत जे सामील होतात, ते श्रीकृष्णाचे साहजिक च गडी होतात. *तेव्हां या अभंगांत वर्णिल्या प्रमाणें जे हुमरी खेळतात – त्यांचा देव* सखा होतो, तसें च, गुरु ज्या मार्गानें कष्ट, सायास, योग, याग, करीत गेला तो च मार्ग तो शिष्यास दाखवितो, व आपणास आलेले अनुभव शिष्यास केव्हां तरी येतील असें सांगतो. पण या हुमरीच्या खेळाचा दृष्टांत घेऊन – आपणास झालेला लाभ, जाणत्या, नेणत्या, लहान, थोरास, एकदम, अनायासें, खेळांत, देत आहेत.

॥ ८ ॥

॥ देव सखा आतां नव्हे ऐसे कांहीं। येणें सकळ हीं सोयरीं च ॥ १ ॥
॥धृ॥ भाग्यवंत जालो गोत सपुरतीं। आतां पुण्या नीती पार नाहीं ॥धृ॥
॥ पाहतां दिसती भरलीया दिशा। ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ २ ॥
॥ अविनाश जोडी आम्हां भाग्यवंता। जाली होती सत्ता संचिताची ॥३॥
॥ पायावरी डोई ठेवाया आरोथा। जाली होती सत्ता क्षेम ऐसी ॥४॥
॥ तुका म्हणे जीव पावला विसावा। म्हणवितां देवा तुमचीसी ॥५॥

(८) देव सखा झाल्यावर आपणास एखादी गोष्ट नाहीं, अमुक एक सुख नाहीं, अशी स्थिति असणें शक्य आहे का? आतां सर्वजण हुमरी खेळणारे आपण एकमेकांचीं सोइरीं च आहोंत. आतां सर्व बाजूंनीं सांग झालेलें असें हें आपलें भाग्यवंत गोत आहे. आतां आपल्या पुण्यास पार नाहीं – आतां आपल्या नीतीस हि पार नाहीं. कारण देवास साक्षी ठेवून आम्हीं कांहीं केलें तरि ती नीति च. कारण त्रिभुवनांत आम्ही कोठें हि पाहूं लागलों तरी त्याचा च ठसा उमटला आहे अशा सर्व दिशा त्याच्या रूपानें भरलेल्या दिसतात. आमच्या सचितानें, आमची सत्ता झाली असल्यामुळें, आम्हां भाग्यवंतांस अविनाश जोडी, नारायणाची जोडी झाली. तुझ्या पायावर डोकें ठेवण्यास आम्हांस स्थान झालें, तुला आलिंगन द्यावें अशी आमची सत्ता झाली, देवा आम्ही दुसरें कांहीं केलें नाहीं, नुसतें आम्ही तुमची आहोंत एवढें म्हणालों, एवढ्यानें जालें काय? तर आमचा जीव पावला विसावा. । – ज्ञानी – जपी – तपी, असें म्हणतात कीं परमार्थ हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. आपण आपल्यापुरतें पाहावें, आपणांस इतरांची पंचाईत करण्याचें कारण काय, असें मत प्रतिपादन झालेलें आपण पाहातों व ऐकतों. हुमरी खेळावयास पुष्कळ माणसें हवींत – तेव्हां आपणांस जो लाभ झाला तो भाग्यवंतांनीं दुसऱ्यांस खेळांत घेऊन अनायासें पदरीं बांधून देण्याचा हा उद्योग आहे.

॥ ९ ॥

॥ कोण आतां काळी काळा। येऊं बळा देईल ॥ १ ॥
॥ धृ ॥ सत्ता जाली त्रिभुवनीं। चक्रपाणी कोवसा ॥ धृ ॥
॥ लडीवाळाचा भार वाहे। उभा आहे कुढावा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे घटीका दीस। नीमीष हि न विसंबे ॥ ३ ॥

(९) एकदार देवा, आम्ही तुमचीं असें म्हणवून घेतल्यावर आता कळी काळास बळी होऊन कोण देणार ? ज्याच्या हातीं ( सुदर्शन ) चक्र आहे, असा चक्रपाणी हा आमचा कोंवसा, आधाराचें स्थान, झाल्यावर आमची सत्ता त्रिभुवनात झाली हा चक्रपाणी कसा आहे म्हणून विचाराल—तर तो लटींवाळाचा भार वाहतो व त्यास धीर देण्यास—कुढावा=उभा राहतो. तो आपल्या लडीवाळास घटिका—दिवस—एक निमीष हि, विसंबत नाहीं. या तीन चरणात देवाचीं आपणास कोणती प्रतीति आली, आपण देव कसा भोगला, ते सांगितलें आहे त्या च देवभक्ताच्या नात्याची आणखी स्पष्टता करीत आहेत.

॥ १० ॥

॥ आम्हां आवडे नाम घता। तो ही पीता संतोषे ॥ १ ॥
॥ धृ ॥ उभयतां एक चित्त। तरी प्रीत वाटली ॥ धृ ॥
॥ आम्हीं शोभों नीकट वासे। अनारीसे न दीसो ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पांडुरंग। अवघी अंग निववीली ॥ ३ ॥

(१०) आम्हा आवडे नाम घेता, आई आई, पाडुरंगे पाडुरंगे, म्हणून आधारानें, आवडीनें, गोडीनें, सत्तेनें, हाक मारणें आम्हास आवडतें, म्हणजे रसनेस भोग होऊन गोड लागतें. व आमची आळवण ऐकून, आमचा शुद्ध भाव त्याचे लक्ष्यात येऊन, त्या पित्यास हि संतोष वाटतो, अशा तऱ्हेन आम्हा पितापुत्राचें एकचित्त आहे, त्यामुळें आमची प्रीति वाढीवर आहे आम्ही अशी वागू—व तो वागवून घेईल कीं, त्याच्या सान्निध्यात आम्ही शोभून दिसू, ओंगळ, अनारिसी, उसनी आणल्यासारखी, कमी दर्जाचीं, अशीं दिसणार नाही कारण पांडुरंगानें आमचीं अवघीं अंगें निववीलीं आहेत हीं अवघीं अंगे निववीलीं म्हणजे झाले काय ? केलें काय ? म्हणून तुम्हीं विचारणार च ते हा सागतों ऐका:—आम्हास कृपेच्या सिंहासनीं अधिष्ठित केलें,

॥ ११ ॥

॥ न देखीजे ऐसे केल। या वीठ्ठले दुःखासीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ कृपेचीया सिंहासनीं। अधीष्ठानीं बैसवीले ॥ धृ ॥
॥ वाजतां तो नलगे वारा। क्षीरसागरा शेषशायनीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अवघे ठायीं। मज पायीं राखीले ॥ ३ ॥

(११) बसविलें, या विठ्ठलानें आम्हांस दुःख दिसूं च नये ऐसें केलें; तुका म्हणे प्रत्येक ठिकाणीं—क्षीरसागरीं—शेषशयनीं—मला पायीं राखिलें, दुःखाचा वारा सुटला असला तरी मला तो केव्हां हि लागूं दिला नाहीं. अभंग—९।१०।११ हे तीन अभंग तुकोबा व विठोबा यांच्या नात्याचे—सुखाच्या वर्णनाचे—आहेत. कृपेच्या सिंहासनावर मला बसविल्याचा व मला सर्व ठिकाणीं विठुरायानें पायीं राखल्यानें त्याचा संसार, त्याची घडामोड, उलथापालथ, त्याची लीला, खेळ, विनोद, सर्व लक्ष्यांत आलें व वाटूं लागलें कीं हा देहभोगाचे आधीन आहे. याचें सुख व शीण दोन्ही हि क्षणभंगुर आहेत.

॥ १२ ॥

॥ देह तंव असे भोगाचे आधीन । याचे सुखशीण क्षणभंगुर ॥ १ ॥
॥धृ॥ अवीनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळां हा ॥धृ॥
॥ क्षणभंगुर हा येथींचा पसारा । आलीया हाकारा अवघे राहे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येथें सकळ विश्रांती । आठवावा चित्तीं नारायण ॥ ३ ॥

(१२) हा देह धारण करून देवापायीं भाव राहण्यास जी सोय झाली तेवढी च अविनाश जोडी व हा (देवापायीं भाव हा) एवढा च सकळांना कल्याणाचा ठाव आहे. बाकी इतर, अवांतर सर्व पसारा, क्षणभंगुर आहे. आणि काळाचा हाकारा आला कीं अवघे, सर्व कांहीं, जागच्या जागीं, राहतें, तेव्हां तुका म्हणे येथें, या मृत्युलोकीं, या संसारांत, चित्तीं नारायण आठवावा ही एवढी च सकळां, सर्वांस, सर्वतोपरीं, विश्रांति आहे. (१) क्षणभंगुर हा येथींचा पसारा (२) आलीया हाकारा अवघे राहे. या दोन सुंदर म्हणी येथें साधल्या आहेत.

॥ १३ ॥

॥ येथें नाहीं उरो आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥
॥धृ॥ विषयांचे झणी व्हाल लोलींगत । चेवीलीया अंत न लगे मज ॥ धृ ॥
॥ वाहोनीया भार कुंथशील वोझे । नव्हे ते चि मागे थिता त्याग ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधीयेला ॥ ३ ॥

(१३) क्षणभंगुर हा येथींचा पसारा म्हणून वरच्या अभंगांत म्हटलें त्याचें स्पष्टीकरण करीत आहेत कीं दशावतार येथें राहिले नाहींत, तेथें पामर जीव किती व कसे राहावयाचे! हा विचार जर तुम्हांस शिवला नाहीं व विष-

यासक्त होऊन तुम्ही जीवित कंठीत राहिलांत, व एकदां त्या विषयांचा चेव आला कीं, त्यांचा अंत केव्हां लागेल हें कांहीं मला कळत नाहीं. जें स्वतःचे म्हणून आहे त्या ( निजत्वा ) चा त्याग होईल व जें तुझें नाहीं ( म्हणजे हा येथीचा पसारा ) त्याचा भार वाहून कुंथशील मात्र. याची तुला ( स्वतःला जीवमात्राला ) लाज कशी वाटत नाहीं ? ही अशी लाज ज्यांना वाटली त्या संतांनीं केशीराज साधियेला. ८।९।१०।११ या अभंगांत देव सखा असला कीं केवढा लाभ होतो हें सांगितलें, हा लाभ देह अनुकूल असला, मन अनुकूल असलें, तर व्हावयाचा, पण देह जर नश्वर भोगाचे आधीन होऊन मन क्षणभंगुर सुखांत रमूं लागलें तर विषयांचा अंत कधींच लागणार नाहीं—तेव्हां संतांच्या संगतींत—नित्य काय—अनित्य काय—जीवास सकळ विश्रांति—कोणती, ती विश्रांति ज्यास लाभते, त्यांस दुःख दिसूं नये अशी व्यवस्था श्रीविठ्ठल कशी करतो, या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन, तेराव्या अभंगांत येथीचा पसारा क्षणभंगुर आहे—हें पटविण्यास—येवढे दशावतार जेथें शिल्लक राहिले नाहींत, तेथें इतर गोष्टींची काय मातब्बरी बाळगतोस ?—इतर गोष्टींची मातब्बरी वाटावी—याची खरोखर च माणसास लाज वाटावयास पाहिजे. कारण नित्य काय व अनित्य काय हें ओळखून—संतांनीं केशीराज साधियेला—आपलासा केला. असें सांगून या संतांच्या वर्णनास—कीर्तनास—सुरूवात होते.

॥ १४ ॥

॥ हीं च त्यांचीं पंच भूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥
॥ धृ० ॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ धृ० ॥
॥ हा च काळ वर्तमान । साधन हीं संपत्ती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दिवस राती । हें चि खाती अन्न ते ॥ ३ ॥

( १४ ) प्रेम हें च ज्यांचें भातें म्हणजे पोटगी, खाऊ, असें ज्यांचें जीवन, जिवंतपणा रक्षण्याचें साधन; प्रेम हीं च त्यांचीं पंचभूतें — कळवळा हा च ज्यांचे *निगुती = निःसंशय, कैवाड = धीर, विठुरायाबद्दलचा कळवळा, किंवा* विठुरायास आपल्याबद्दल कळवळा आहे हा ज्यांच्या मनानें निःसंशयपणानें धीर—अवसान—धरिलें आहे. वर्तमान काळ हा एवढा च काळ जे जाणतात, प्रेम हें एक च साधन, ईशप्राप्तीचें साधन, ईशप्राप्ती एवढी च संपत्ती म्हणून ओळखतात, दिवस रात्र, सदोदित, प्रेम — हें एवढें च अन्न ते खातात. कृपा या केली संतजनीं—म्हणून ज्यांना परिहार पहिल्या अभंगांत दिला त्यांची राहणी

कशी असते, निद्रान तुकोबांस ती कशी पटली होती, ती या अभंगांत सांगितली आहे. या संतांनीं गांढेपण = खेडवळपणा – अरण्यवास – पत्करला पाहिजे असें हि नाहीं.

॥ १५ ॥

॥ न करितां चि गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ भवसिंधूचा थडवा केला । बळाविला पाहिजे ॥ ध्रु० ॥

॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैचे आडथळे ॥ २ ॥

॥ तुका म्हणे खरें खोटें । न म्हणे मोठे लहान ॥ ३ ॥

( १५ ) हा उल्लेख प्रत्येक संत सर्वस्वाचा त्याग करून वनांतरास गेला व मग त्यास देव भेटला अशा तऱ्हेचा जो लोकांत भ्रम आहे त्यास उत्तर आहे. नारायणाच्या सोईनें पहिलें पाऊल टाकलें कीं मग वाटेंत अडथळे कसचे येणार! मग खरें खोटें कांहीं वाटत नाहीं म्हणजे तसें द्वैत पुढें उभें च रहात नाहीं. लहान मोठें दिसत नाहीं, भवसिंधु म्हणजे एक थडवा, डबकें आहे असें वाटतें, आणि भक्तांना, संतांना, नारायण शेजारी उभा असल्यानें बळाविला पाहिजे, म्हणजे बळ वाढतें, चढतें. नारायण जवळ उभा असल्याचें च वर्णन पुढें चालू आहे.

॥ १६ ॥

॥ दीप न देखे अंधारा । आतां हें चि करा जतन ॥ १ ॥

॥ध्रु॥ नारायण नारायण । गांठीं धन वळकट ॥ ध्रु॥

॥ चिंतामणी पाशीं चिंता । तत्त्वता हीं न येल ॥ २ ॥

॥ तुका म्हणे उभय लोकीं । हे चि निकी सामुग्री ॥ ३ ॥

( १६ ) दिव्याला कधीं अंधार दिसत नाहीं, भेटत नाहीं. तेव्हां नारायण नारायण येवढें धन गांठीं बांधा व जतन करा. तत्त्वतः पहाल तर चिंतामणी-पाशीं चिंता कधीं येईल कां ? कधीं हि येणार नाहीं, तेव्हां नारायण जवळ उभा असणें ही उभय लोकीं, निकी, चांगली, खरी, सामुग्री आहे. नारायण हा असा संतांजवळ उभा असतो म्हणून सांगतात कीं:–

॥ १७ ॥

॥ धन्य काळ संत भेटी । पायीं मिठी पडली तो ॥ १ ॥

॥ध्रु॥ संदेहाची सुटली गांठी । जालों पोटीं शीतळ ॥ ध्रु ॥

॥ भव नदीचा जाला तारा । या उतारा प्रसादें ॥ २ ॥

॥ तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहुनी ॥ ३ ॥

( १७ ) प्रत्येकाच्या आयुष्यांत संतांची भेटी होऊन त्यांच्या पायीं मिठी पडणें, हा धन्य काळ आहे. यामुळें – संत भेटींत – संदेहाची गांठ सुटते, पोटीं शीतळ होतें, व त्यांच्या आधाराच्या शब्दानें भवनदीचा उतार होतो. तुका म्हणे आतां या हुनी, म्हणजे या संताहून, अधिक मंगळ असा दाता कोठें आहे ?

॥ १८ ॥

॥ दीन रजनी हा ची धंदा । गोवींदाचे पवाडे ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ संकल्पीला देह देवा । सकळ हेवा ये ठायीं ॥ ध्रु ॥
॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रीयां ॥ २ ॥
॥ कीर्ती मुखे गर्जे तुका । करी लोका सावध ॥ ३ ॥

( १८ ) गोविंदाचे दीन रजनी पवाडे गावयाचे एवढा च हे ( संत ) धंदा करितात; त्यांनीं ( संतांनीं ) आपला देह देवाला संकल्पिला, वाहिलेला असतो, व जीवीतांत त्यांना जो कांहीं हेवा असेल तो देवापायीं असतो. त्यांना इंद्रियांची जोडी करण्यास घडीभर हि अवसान, अवकाश, फुरसत नसते. मुखानें या संतांची कीर्ति, तुका गर्जून करीत आहे व त्या द्वारानें लोकांना सावध करीत आहे. या पुढील अभंग हे – मुखें गर्जे तुका – ते आहेत.

॥ १९ ॥

॥ भाग्यवंता हे परवडी । करीती जोडी जन्माची ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आपुलाल्या लाहो भावें । जें ज्या व्हावें ते आहे ॥ ध्रु ॥
॥ इच्छा भोजनाचा दाता । न लगे चिंता करावी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आल्या थाऱ्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥ ३ ॥

( १९ ) भाग्यवंत जे असतात ते चातुर्यानें ( परवडी ) किंवा निरनिराळ्या प्रकारांनीं जन्माची हीं जोडी – ( नारायण – नारायण गांठीं धन हीं ) आपल्या लाहो – छंदानें – भावानें – करितात – कारण नारायणा जवळ – जें ज्या व्हावें ( हवे असेल ) तें आहे. नारायण हा इच्छाभोजनाचा दाता आहे म्हणून आतां कोणीं कसली चिंता करूं नये. तुका म्हणे – मोलाच्या बऱ्या वस्तु – येथें थाऱ्यास, रहाण्यास, आल्या आहेत. १४–१९ हे अभंग संत राहणी सागताहेत, ही ओळ अशी दुसऱ्या कोणत्या हि गाथ्यांत नाहीं. हे सहा अभंग एका च वृत्तांत आहेत. आतां या मोलाच्या वस्तु कोणत्या, कशा, आहेत, तें सांगत आहेत.

॥२०॥

॥ खरे नानवट नीक्षेपीलें जुनें । काढीले ठेवणे समर्थाचे ॥ १ ॥
॥ धृ॥ मजुराच्या हाते मापाचा उकल। मी तो येथे फोल सत्ता त्याची॥धृ॥
॥ कुलालाच्या हाते कुंभाची आकृती । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥२॥
॥ तुका म्हणे जीवन ते नारायणीं । प्रभा ते कीर्णी प्रकाशाच्या ॥३॥

(२०) सतत्रोध, प्रेमबोध, हें समर्थांचें (पढरीरायाचें) ठेवणें, जुनें, आहे तें खरें आहे, तें नानवट शेटजींनीं–(ज्याची काहीं माहिती सागता येत नाही इतकें जुने पण त्या पेढीचे शेटजी) निक्षेपीलें–पुरून ठेविलें हे ते हें पुडलीकाच टेवणें, मी आता बाहेर काढिलें आहे, आता या मजुराच्या हातानें मापाचा उकल व्हावयाचा आहे येथें सत्ता त्याची आहे मी तो येथें फोल–क पदार्थ आहे तेव्हा माझ्याकडे पाहू नका–मी नुसता त्या पढरीरायाचा हमाल आहे येथें माझी काही सत्ता नाही माझ्या हातानें नुसतें माप पदरात पडेल कुभाराच्या हातानें घटाची आकृति व्हावयाची, त्या प्रमाण तुम्ही प्रश्न विचारून जो बोध पदरात घ्याल व वापराल तो भाग तुमचा आहे म्हणजे कुभ हा पाकस्थळास पाठवावयाचा का दुसरें काय करावयाचें, हें, तो कुभ घेणायानें ठरवावयाचें आह तुका म्हणे नारायण हें जीवन आहे व प्रकाशाची किरणें ही त्या नारायणाची प्रभा आहे.

हा अभग म्हणजे आपण काही जगास उपदसुभाप्रमाणें नवीन गोष्ट सागत नसून, ही पुडरिकापासूनची गोष्ट आहे तेव्हा ही जुनी गोष्ट च सागत आहे. िचा लोप झाला होता, बुरसा चढला होता, तो साफसूफ करून, तुम्हास देत आहे पण हें ठेवणें नानवट आहे–म्हणजे आमच्या कोणत्या पूर्वजाचें ठेवणें आहे तें काहीं आम्हास माहीत नाहीं त्यावर सत्ता माझी नाहीं हा माल मी बनविला नाही. फक्त माप टाकीत आहे कुलालाचा अधिकार–घटास आकार देण्याचा पण जशी त्यास माती बनविता येत नाहीं किवा जो घट होतो तो कोठें जातो–जावा–हें जसें सागण्याचा त्यास अधिकार नाहीं, तसा मी तो येथें फोल सत्ता त्याची, विठुरायाची, आहे. या अभगाच्या आधारें मच्छिंद्र–गोरक्ष–(या सर्वांच्या बोधाच्या ससरा, या प्रत्येकानें बोध स्पष्ट कसा केला–उकल–केला, तें सागता येईल आता हें नानवट–जुनें–ठेवणें आहे

॥ २१ ॥

॥ गंगेचीया अंतावीण काय चाड । आपुले तें कोड तृषेपाशीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ वीठ्ठल हे मूर्ती साजिरी सुंदर । घालूं नीरंतर हृदय पुटीं ॥ धृ ॥
॥ कारण ते असे नवनीतापाशीं । गवाळ ते सोशी इतर कोण ॥ २ ॥
॥ बाळाचे सोईतें घास घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥ ३ ॥
॥ गाऊं नाचूं करूं आनंद सोहळा । भावची आगळा नाहीं आतां ॥ ४ ॥
॥ तुका म्हण अवघे जाले एकमय । परलोकाची काय चाड आतां ॥ ५ ॥

( २१ ) म्हणून म्हणतां च इतिहास संशोधकांस अवसान चढून चेव येईल व मूळ वस्तूकडे दुर्लक्ष होईल म्हणून बुद्धीस फाटा फुटूं नये म्हणून पुढें सांगतात. (या अभंगाचे कितीही निरूपण केलें तरी तें कमी च होईल ) ही गंगा, ही बोधगंगा-कोठून निघाली–कोठें जाणार याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? तुम्हास तहान लागली आहे ना, तेव्हां घोटभर पाणी प्या, व समाधान पावा. तेव्हां आपण विठ्ठल ही साजिरी सुंदर मूर्ती निरंतर हृदयपुटांत घालूं–पोटीं सांठवूं –कारण आपलें काम *नवनीतापाशीं–लोण्याशीं–तें लोणी पदरांत घेतल्यावर,* हें *लोणी* कोणत्या म्हशीच्या दुधाचें केलें–दूध किती, लोणी किती, म्हशींस रोज कडबा किती, आंबोण किती, या गबाळाची कटकट काय म्हणून सोसावी ! आई ही केव्हां हि बाळास सातां येतील येवढाले घास करून त्यास भरविते. त्यासाठीं त्या बाळानें अट्टाहास करावयास नको, चिंता करावयास नको. तसा विठुराया आमच्या सोईप्रमाणें लहानमोठे घास करून आम्हांस भरविल. त्याची आम्हीं चिंता करावयास नको. तेंव्हा आम्ही जर चिंता करावयाची नाहीं, तर काय करावें म्हणतां ? तर गावें, नाचावें आनंदानें सोहळा करूं–या एका भावाशिवाय निराळा भाव आम्हांस उरला नाहीं. तुका म्हणे अवघे जाले एकमय, :तेव्हां आतां कोठें च दुजाभाव उरला नाहीं. तेव्हां आतां येथें हा असा सुखसोहळा असतांना–आम्हांस परलोकाची काय चाड आहे ? तुका म्हणे अवघे जाले एकमय–तेव्हां भेद भाव च उरला नाहीं.

॥ २२ ॥

॥ स्त्रीपुत्रादीकीं राहिला आदर । वीषयीं पडीभर अतीशयें ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां सोडवणें धावा नारायणा । मज हे वासना अनादर ॥ धृ ॥
॥ येऊनीया आड ठाके लोकलाज । तों हें दीसे काज अंतरलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ॥ ३ ॥

(२२) तेव्हां आपलें व्यंग देवास सांगण्यास अडचण कसली! तेव्हां सांगतात, देवा, अवघे जाले एकमय ही गोष्ट पटली. खरी आहे. त्याबद्दल मी निःशंक आहे. पण माझें व्यंग तुला सांगूं कां—माझ्या ठिकाणीं स्त्रीपुत्रादिकीं फार आदर राहिला आहे. (या सर्व झाल्या गेल्या अशा गोष्टी आहेत. मागील गोष्टी आठवून कौतुकानें महाराज परीहार देत आहेत. असा हा उल्लेख आहे.) शिवाय विषयीं म्हणजे स्त्रीसुखाबद्दल हि मला घडीभर-घडीवार-मातब्बरी फार वाटते. तेव्हां तुम्ही धांवून मला सोडवा. मला ही वासना अनावर वाटते. दुसरी अडचण माझी अशी कीं मला लौकिकाची मोठी लाज वाटते. व त्यामुळें तुमच्या कर्तव्यांत अंतर पडतें. तुका म्हणे म्हणून देवा तुम्ही असें करा कीं जेथें जेथें मला गोत्रा असेल तेथें तुम्ही सांभाळींत चला. या सर्व गोष्टी नाराय-णाच्या जोडीबरोवर बाजूस सरल्याचें पहिल्या च अभंगांत म्हटलें आहे.

॥ २३ ॥

॥ नव्हे मी स्वतंत्र आंगाचा पाईक। जो हे सकळीक सत्ता वारूं ॥ १ ॥
॥धृ॥ तुम्हां आळवावें पाउला पाउलीं। कृपेची साउली द्यावी वरी ॥धृ॥
॥ शक्तीहीन तरी जालों शरणागत। आपुला वृत्तांत जाणोनीयां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भया भेणें धरीले पाय। आणीक उपाय कांहीं नेणें ॥ ३ ॥

(२३) स्त्रीपुत्रादिकांची, विषयाची, सत्ता मी वारूं शकेन असा मी स्वतंत्र, मूळचा, जातिवंत, पाईक, शिपाई, नाहीं. तेव्हां मी तुम्हास पावला पावलाला आळवीत जाईन व तुम्ही माझ्यावर कृपेची साउली करावीत. आम्ही शक्तीहीन आहोंत हें आम्हांस कबूल — पण तुमचा वृत्तांत ऐकून, तुमची कीर्ति ऐकून, शरणागत जालों, या विषयांच्या ससेला घाबरून तुमचे पाय धरीले, आणि या शिवाय मला कांहीं हि उपाय माहीत नाहीं, मी ओळखीत नाहीं. तुमचे पाय अशासाठीं धरले कीं—

॥ २४ ॥

॥ कांहीं येक तरी असावा आधार। कासयानें धीर उपजावा ॥ १ ॥
॥धृ॥ म्हणविल्या साठीं कैसें पडे रुजु। धणी नाहीं उजु सन्मुख तो ॥धृ॥
॥ येचल्या दीसांचा कोणावरी लेखा। घालावा हा सुखासुरा आम्ही ॥२॥
॥ नाहीं मनोगत तों वरी हे देवा। तुका म्हणे सेवा नेघीजे तों ॥ ३ ॥

(२४) मी भयभीत होऊन देवा तुमचे पाय धरिलें-तें अशासाठीं कीं मला संसारांत धीर धरावयास कांहीं आधार व्हावा, पण जोंवर स्वामी सन्मुख नाहींत, म्हणजे माझें मन भीतीपासून मुक्त नाहीं, तोंवर माझी सेवा रुजू झाली आहे, असें मी कसें समजूं? झाल्या गेल्या दिवसांचा भार कोणावर घातल्याशिवाय, म्हणजे देवावर भार घातल्याशिवाय, आम्हांस-सुखास वाव कोठें होणार! तेव्हां जोंवर माझें मनोगत माझें हातीं आलें नाहीं तोंवर देवा तुम्ही माझी सेवा स्वीकारीत नाहीं असें च मी समजतों.

॥ २५ ॥

॥ मनाचीये साक्षी जाली सांगो मात। सकळ वृत्तांत आपुला तो ॥ १॥
॥ धृ॥ तुम्हां परामृष घेणें सत्तावळे। धरीतां नीराळे केसी वाचो ॥ धृ॥
॥ मी माझें सांडून यावया पसारा। आणीक दातारा काय काज ॥ २॥
॥ तुका म्हणे तुजवीण एका। नीढळ लौकीला माजी असो ॥ ३॥

(२५) मनोमय साक्षीनें-माझी मात, वृत्तांत, हकीगत सर्व वृत्तांतासह तुम्हांस सांगून झाली. आतां तुम्ही आपुल्या सत्ताबळानें परामृष=समाचार घ्या. तुम्ही आम्हांस तुमच्यापासून वेगळें करूं म्हणाल तर आम्ही कसें काय वाचूं? मी माझें-हा माझा पसारा सांडून तुझ्याजवळ येण्यास दुसरें काय कारण आहे? एका तुम्हांवीण आम्ही लौकिकामध्यें निढळ=कपाळ रहित निर्दैवी-असणार. तू असलास अनुकूल तर सर्व ठीक, नाहीं तर लौकीकांत काय राम आहे?

॥ २६ ॥

॥ घालुनी लोळणी पडीलों अंगणीं। सींवा सींचवणी तीर्थ वरी ॥ १॥
॥ धृ॥ वोल्हावेल तनु होईल शीतळ। जाली हळहळ वहु ताप ॥ धृ॥
॥ पावेन या ठाया कई जालें होतें। आलों अवचीतें उस्त्यावरी ॥ २॥
॥ तुका म्हणे कोणी जाणवा राउळीं। येईल जवळी पांडुरंग ॥ ३॥

(२६) तेव्हां लोळण घेऊन तुमच्या अंगणांत = द्वैत दशेच्या अंगणांत, दंडवत घातलें आहे. माझी तनु आजवर बहुत ताप होऊन हळहळली आहे. आजवर या ठिकाणीं द्वैत दशेच्या अंगणांत विठुरायाच्या सान्निध्यांत केव्हां येईन, त्याच्या उच्छिष्टाचा एखादा घास केव्हां मिळेल, असें मला झालें होतें. तेव्हां आतां माझ्या अंगावर तीर्थ शिंपडा त्यानें माझें अंग शांत होईल. तुका

म्हणे आतां मी रावळा जवळ, देवाचीये द्वारीं, आलों आहें. तेव्हां राउळांत (हीं अत्यंत आदर व प्रीति दासत्विण्याची रीत आहे) कळवा कीं तुका येथवर आला आहे. म्हणजे मग प्रेमस्वरूप पांडुरंग जवळ येईल. माझी गोष्ट मनावर घेईल. तेव्हा माता लांबवर आहे असें पाहून बाळानें कळवळून हांक मारावी तसें म्हणतात.

॥ २७ ॥

॥ धांव घाली आई । आतां पाहातेसी काई ॥ १ ॥
॥ धृ ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालों वीयेगे हींपुटी ॥ धृ ॥
॥ करावें शीतळ । बहु जाली हळ हळ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे डोई । कई ठेवीन हे पायीं ॥ ३ ॥

(२७) धांव घाली आई। आतां पहातेसी *काय* (*माझा अंत* कां पहातेस, वाट कोणाची पहातेस) — मला यत्किंचित् तुझ्याशिवाय धीर निघत नाहीं. तुझ्या वियोगानें मी हिपुटी=कष्टी=झालों आहे. बा, मला भेट देऊन शितळ कर—मला हळहळ फार वाटत आहे. देवा, मी तुझ्या पायांवर डोई कधीं बरं ठेवीन. एवढा सोपा अभंग—एवढा कळकळीचा, कळवळून म्हटलेला अभंग, दुसरीकडे क्वचित्च आढळेल. हा अभंग म्हणतां च अगावर रोमाच आले पाहिजेत. ज्यांनीं कोणी एखाद्या वेल्हाळ, लडीवाळ, बाळास— "ए आई ग" म्हणून प्रेमळपणें हांक मारतांना ऐकलें असेल त्यांना च या अभंगाचा रस चाखतां येईल.

॥ २८ ॥

॥ पडीलों भोवर्णी । होतो बहु चींतवणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ होतों चुकलो मारग । लाहो केला लाग वेगें ॥ धृ ॥
॥ इंद्रीयांचे संधीं । होतों सांपडलों बंदी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बरे जालें । वीठ्ठलसें वाचे आलें ॥ ३ ॥

(२८) मी फार काळजींच्या चक्रात सांपडलों होतों, माझा रस्ता हि चुकला होता. त्वरेचे छंद हि फार केले. इंद्रियांच्या सद्धींत बंदी होऊन पडलों होतों, एवढ्या सर्व अडचणींत कांहीं बरें झाले व विठ्ठल हें नाम वाचेस आलें.

॥ २९ ॥

॥ तुम्हां ठावा होता देवा । माझे अंतरीचा हेवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ होती कासयानें सुटका । तरी हे वैकुंठ नायका ॥ धृ ॥

॥ नसतें सांभाळीलें । तुम्ही जरी आश्वासीलें ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कृपाळुवा । बरवा केला सावा धावा ॥ ३ ॥

( २९ ) देवा तुम्हांस माझ्या अंतरीचा हेवा ( उत्कट इच्छा ) ठाऊक होता व त्यापासून माझी सुटका कशी होईल हें हि वैकुंठनायका तुम्हांस ठाऊक होतें. तुम्ही जर सांभाळिलें नसतें, आश्वासिलें नसतें—तर मी काय करूं शकलों असतों ? पण कृपाळुवा, तुम्ही चांगलें साहाय्य केलेत. म्हणून

॥ ३० ॥

॥ देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥

॥ धृ ॥ पाहतां कासया तूं सारीखा । तीहीं लोकांच्या जनका ॥ धृ ॥

॥ आरुष हे वाणी । गोड करुनी घेतां कानीं ॥ २ ॥

॥ आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहळे ॥ ३ ॥

( ३० ) हे पुरुषोत्तमा, आवडीनें मी तुम्हांस कसली उपमा देऊं ? तूं तिन्ही लोकांचा जनक आहेस, आतां तूं अमक्यासारखा असें, कसें म्हणावयाचें ! माझी ही आर्ष वाणी तुम्ही गोड करून कानीं घेतां, ऐकतां, म्हणून तुका आवडीनें तुम्हांपुढें खेळतो आहे. आतां तुम्ही त्याचे सोहळे पुरवावेत.

॥ ३१ ॥

॥ दर्शनाची आस ! आतां न साहे उदास ॥ १ ॥

॥ धृ ॥ जीव आला पाया पाशीं । येथें असे कलीवरेंसीं ॥ धृ ॥

॥ आतां कांहीं च नाठवे । बैसले ठायीं नुठवे ॥ २ ॥

॥ जीव आतां नाहीं पायीं । तुका ठकावला ठायीं ॥ ३ ॥

( ३१ ) देवा मला दर्शनाची आस लागून राहिली आहे. आतां तुम्ही मला उदास करतां हें कांहीं सोसत नाहीं. माझा जीव तुमचे पायाशीं आला आहे. शरीरानें मात्र मी येथें आहे. आतां मला कांहीं हालचाल सुचत नाहीं; बैसल्या ठिकाणाहून उठवत नाहीं. आतां या कुडींत जीव नाहीं. तुका जागच्याजागीं ठकावला—फसला—दमला आहे. येथें वृत्त बदललें.

॥ ३२ ॥

॥ भोगांवरी आम्ही घातला पाषाण । मरणा मरण आणीयेलें ॥ १ ॥

॥ धृ ॥ वीश्व तूं व्यापक काय मी नीराळा । कशासाटीं बळा येऊं आतां ॥ धृ ॥

॥ काय सारूनियां काढावे बाहेरी । आणुनी भीतरी काय ठेऊं ॥ २ ॥

॥ केला तरी उरे वादची कोरडा । वळें घ्यावी पीडा स्वपनाची ॥ ३॥
॥ अवघेची वाण आले तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोजकीर्ती ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे म्हणे आतां नेणो लाभ हाणी । असेल तो धनी राखो वाडा ॥५॥

( ३२ ) देवा, आम्ही भोगावर पापाण घातला. म्हणजे तिकडे पाठ फिरविली, व आम्ही आपल्या ( देहबुद्धीच्या ) मरणानें मरणास मरण आणिलें म्हणजे माझें मरण मरोनि गेले, माझें जीव-पण, तुझ्यांत सामावलें गेलें. तूं जर विश्वव्यापक आहेस, तर मी काय विश्वाच्या बाहेर आहें? तेव्हां आतां काय म्हणून वळा येवूं? म्हणजे स्वतःला मोठेपणानें मिरवूं? मी अशी कोणती गोष्ट निवडून वाईट म्हणून टाकून देऊं व चांगली म्हणून एखादी गोष्ट अन्तार्यामांत ठेवूं? बरें याबद्दल कांहीं बोललें तर नुसता कोरडा वाद उरणार, व त्यापासून स्वप्न पडल्यासारखी नुसती पीडा व्हावयाची. देवा, तुमच्या घरीं सर्व वाण आहेत-फक्त मजुरास मजुरी देण्यापुरती रोजकीर्द लिहावयाची म्हणजे-दिलें-नांवें, येमदें म्हणावयाचें कीं सर्व गोष्टी आपोआप होताहेत, तेव्हां आतां देवा, आम्ही लाभहि पहात नाहीं व हानी हि पहात नाहीं. जो या वाड्याचा धनी असेल तो हा वाडा राखो. असेल तो धणी राखो वाडा । — ही म्हण शरीरास उद्देशून आहे. या अभंगातील मनाच्या स्थितीचें कोण वर्णन करूं शकेल? असेल तो धनी राखो वाडा । असें म्हणणारे दादा महाराज वेळ जवळ आली म्हणून देह ठेवण्यास आळंदीस निघालेले ज्यांनीं पाहिले त्यांस हे चरण सगुण-पणें भेटले.

॥ ३३ ॥

॥ बरें जाले आली ज्याची त्याच्या घरा । चुकला पान्हेळा ओढाळांचा ॥ १ ॥
॥धृ॥ बहु केलें दुःखी याचीया सांभाळें। आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ धृ ॥
॥ त्याचीया अन्यायें भोगा माझें अंग। सकळ ही लाग घ्यावा लागे ॥ २ ॥
॥ नाहीं कोठे स्थीर राहो दीलें क्षण। आजीवरी शीण पावलों तों ॥ ३ ॥
॥ वेगळाल्या खोडी केली तडातोडी। सांभायास घडी नाहीं सुखा ॥ ४ ॥
॥ निरवुनी तुका चालीला गोवारें। देवापाशीं भार सांडवोनी ॥ ५ ॥

(३३) देवा हीं इंद्रियें ज्याची होतीं त्याच्या घरीं आलीं व या ओढाळांची संगत ( पान्हेरा ) सुटली हें बरें झालें. हीं इंद्रीयें संभाळतांनां मी फार दुःखी झालों आणि त्यामुळें काळीमा यावयाची, व ते सर्व त्रास मला सोसावे लागत व त्यांच्या अन्याय्यानें मला भोगास माझे अंग यावे लागे. आजवर मला इंद्रिय भोगांनीं

कोठें स्थिर राहूं दिलें नाहीं, आजवर त्यांचा मला शीण च झाला. त्या इंद्रियांनीं वेगवेगळाल्या खोड्या केल्या—व त्या सागण्यास वेळ नाहीं किंवा सुख मोकळें ठेविलें नाहीं. तेव्हां गोवारी जसा जनावरें मालकाची मालकाच्या ताब्यांत देऊन मोकळा होतो, तशीं सर्व इंद्रियें आतां तुमच्या ताब्यांत देऊन मी मोकळा झालों आहे.

॥ ३४ ॥

**॥ न करावी आतां पोटासाठीं चीता । आहे त्या संचीता माप लाउं ॥१॥**
**॥ ध्रु ॥ दृष्टी ते घालावी परमार्थां ठायीं । क्षुल्लका उपायीं श्रम जाला ॥ ध्रु ॥**
**॥ येथें तंव नाहीं घेईजेसे सवें । कांहीं नये जीवें वेचों मीथ्या ॥ २ ॥**
**॥ खंडण ची नव्हे उद्वेग येरझारी । बापुडे संवसारी सदा असो ॥ ३ ॥**
**॥ शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥ ४ ॥**
**तुका म्हणे आतां सकळाचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥ ५ ॥**

( ३४ ) आतां आम्ही पोटासाठीं कांहीं चिंता करणार नाहीं—तर ज्या सचीतानें नारायणाची जोडी करून दिली तें सचीत खर्चून, परम अर्थ, जे विठोबाचे पाय, त्यावर दृष्टी ठेवूं; क्षुल्लक उपायांनीं या जीवास फार श्रम झाले आहेत. येथून कांहीं बरोबर नेता येत नाहीं. तेव्हां जीव व्यर्थ वेचूं नये. तसें केलें तरी, येरझारा—जन्ममरणाच्या—यात खंड पडत नाहीं. आणि संवसारांत नेहमीं दीनपणानें असतो—जर आपणास कांहीं पैलतीरास नेणार असेल तर ती एक च गोष्ट आहे व ती म्हणजे चंद्रभागेच्या तीरावर जी नाव उभी आहे ती पैलतीरास नेईल. पुरव्हीं आपण स्वत.च्या पराक्रमानें कष्टी होऊ. तेव्हां सर्व सागण्याचें सार हें कीं यापुढें जो व्यापार करावयाचा तो:—शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें । या ( ही म्हण केवढी अर्थपूर्ण आहे ) धोरणानें करावयाचा.

या वरील अभंगांत इंद्रिय भोगाचा अडथळा कसा होतो तें सांगून ते अडथळे दूर करा अशी श्रीपंढरीरायाची प्रार्थना केली आहे. या सर्व प्रार्थना प्रीतीच्या पोटीं भीति असते म्हणून आपल्या मागील खऱ्या—खोट्या—काल्पनिक—अडचणींबद्दल आहेत. या सर्व प्रार्थना अगोदर च तृप्त झालेल्या आहेत. कारण पुढील अभंगांत म्हणताहेत कीं:—

॥ ३५ ॥

॥ आमच्या हें आलें भागा । जीव्हार या जगाचे ॥ १ ॥
॥ धृ ॥ धरूनीयां ठेलो जीवे । बळकट भावे एकवीध ॥ धृ ॥
॥ आणुनीयां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अंकीत केला । खलीं आला वचनें ॥ ३ ॥

. ( ३५ ) या जगाचें मर्म अंतःकरण—बीज, दृष्टी ते घालावी परमार्थी ठायीं। च, शेवटा पावती नावेचें बैसणें—हें—आमच्या भागा=वाटयास आलें आहे; व तें एकवीध भावानें बळकट=वट्ट धरून ठेविलें आहे. त्यास रूप धरावयास लावून—जगतास सोपासा करून—जवळ उभा केला आहे. तुका म्हणे आम्ही त्यास (प्रेमाने, एकवीध भावानें,) अंकीत केला व तो आमच्या वचनासरसा (स्वर्गांतून) खालीं आला. एकवीध वृत्तीनें नाम गाणें—या साधनानें आपणास जगाचें जीव्हार —नारायण—कसें लाभलें तें सांगितलें. त्या बरोबर च नारायण सोपा केवढा आहे—आपला अंकीत होऊन—जवळ कसा उभा आहे तें हि सांगितलें. या स्वतःस जी प्रतीति होती, त्याच्या प्रत्यक्ष खुणा सांगितल्या. या उलट आपण जर, वेदांत्याप्रमाणें, ज्ञानमार्गीयाप्रमाणें—योग्यांप्रमाणे—आत्मा वारे मंतव्यः। — असें म्हणत बसलों असतों—तर जगाचें जीव्हार—नारायण—जो हातीं आला आहे तो आला नसता—उलट—वेदांत्याप्रमाणें

॥ ३६ ॥

॥ करुनी राहो जरी आत्मा ची प्रमाण । नीश्चळ नव्हे मन काय करू ॥१॥
॥ धृ ॥ जेवील्या वीण काशाचे ढेकर । शब्दाचे प्रकार शब्द ची ते ॥ धृ ॥
॥ पुरे पुरे आतां तुमचे ब्रह्मज्ञान । आम्हांसी चरण न सोडणे ॥ २ ॥
॥ वीरोधे वीरोध वाढे पुढतो पुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ३ ॥
॥ सांडी मांडी आंगी वसे पुण्य पाप । बंधन संकल्प याची नांवें ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण वळी नीरसी देह ॥ ५ ॥

( ३६ ) आत्मा प्रमाण=शेवटचें ध्येय। करून बसलों असतों तर मन निश्चळ होत नाहीं—काय करावें—अशी हळहळ करीत बसलों असतों. पोटभर जेवण झाल्याशिवाय ढेकर कसे यावेत. तेव्हां वेदांत्यांचीं आत्मा प्रमाण म्हणून जेवढीं प्रवचनें ऐकावींत—ते सर्व शब्दाचे खेळ आहेत. आतां तुमच्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी पुरेत. आम्ही या विठोबाचे चरण घट्ट जीवीं धरून बसलों

आहेत—तें कांहीं आम्ही सोडीत नाहीं. या तुमच्या ज्ञानमार्गीयांच्या गोष्टी बोलूं लागावें तो विरोधानें विरोध वाढत जातो—व वासनेचेमुळें गर्भवास भोगावे लागतात. या वाद्‌विवादांत कांहीं संकल्प उद्भवले कीं त्यापासून कांहीं बधनें उत्पन्न होतात. त्यांत कांहीं सोडावें लागतें, कांहीं धरावें लागतें, त्यापासून पाप, पुण्य, उत्पन्न होतें. तुका म्हणे—आत्मा प्रमाण म्हणून जी मुक्ति मिळवावयाची म्हणून तुम्ही सांगतां— ती मुक्ति— तशी मोकळी—सुट्टी नाहीं. कारण मुक्तता मिळवावयास देह निरास व्हावा लागतो व असा कोण बळी व शूर आहे कीं—जो आपल्या देहाचा निरास करूं शकेल ?

॥ ३७ ॥

**॥ सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं। टाळ दींडी हातीं घेउनी नाचा ॥१॥**
**॥ धृ ॥ समाधीचें सुख सांडा ओवाळोनी। ऐसा हा कीर्तनीं ब्रह्मरस ॥ धृ ॥**
**॥ पुढती घडे चढते सेवन आगळें। भक्ती भाग्य बळे नीर्भरता ॥ २ ॥**
**॥ उपजोची नये संदेहचीत्तासी। मुक्ती चारी दासी हरीदासांच्या ॥३॥**
**॥ तुका म्हणे मन पावोनी वीश्रांती। त्रीवीध नासती ताप क्षणें ॥४॥**

( ३७ ) ज्ञानदेव व नामदेव या संतांनीं देहनिरास करण्याचें सोपें वर्म आम्हांस सांगितलें कीं कीर्तनांत टाळ दिंडी हातीं घेऊन नाचा; कीर्तनांत जो ब्रह्मरस उत्पन्न होतो त्यावरून समाधीचें सुख(—जें—काहीं असेल तें ) ओवाळून टाका, या ब्रह्मरसाचें सेवन हें ज्यास्त ज्यास्त वाढत च जातें. व त्यामुळें भक्ती-भाग्याचें बळ वाढत जाऊन निर्भरता अंगीं येतें. हरी मुखें म्हणा—हरी मुखें म्हणा—असें म्हणून देवाचीं ये द्वारीं उभा क्षणभरी। तेणें मुक्ती चारी साधीयेल्या हा जो ज्ञानेश्वर माउलींनीं आधाराचा शब्द उच्चारला आहे—त्याबद्दल चित्तांत केव्हां हि संदेह उपजूं च नये. कारण या हरीगुण गानांत—मन विश्रांती पावते. व त्रिविध ताप एका क्षणांत नाश पावतात. आत्मा प्रमाण म्हटल्यावर मन निश्चळ व्हावें हीं जी पहिली ( ज्ञान किंवा योग मार्गांतील ) पायरी—ती च सिद्ध होत नाहीं, तेव्हां ती गोष्ट कशी साधावी याचें सोपें वर्म आम्हांस संतांनीं सांगितलें व तें हें कीं—टाळदिंडी हातीं घेऊनी नाचा। कीर्तनांत ब्रह्मरस एवढा उत्पन्न होतो कीं, त्यावरून समाधीचें सुख ओवाळून टाकावें. ज्ञानमार्गानें जाऊं लागावें, तर त्यांतील ध्येय जी समाधी, ती मन निश्चल झाल्याशिवाय साधत नाहीं. तेव्हां—वेदांतपर चर्चा, वादे वादे जायते तत्त्वबोधः। म्हणून केलेली चर्चा, हे सर्व शब्दांचे प्रकार आहेत. त्यानें कांहीं

पोट भरत नाहीं, मन विश्रांति पावत नाहीं, वाद्विवादानें ब्रह्मरसाचें सेवन घडत नाहीं, तेथें ब्रह्मरस पिका येत नाहीं. तेथें विरोधें विरोध वाढे पुढतो पुढती–व त्यांत कांहीं वासना उत्पन्न होऊन त्या वासना पूर्ण होण्यास पनः गर्भवास घ्यावा लागतो. मग कांहीं घरावें लागतें, कांहीं टाकावें लागतें, म्हणजे पाप–पुण्य, या द्वैताच्या रहाट गाडग्यांत मनुष्य सांपडतो. त्यास भक्ति भाग्यबळें निर्भरता येते तशी येत नाहीं. असा हा, ज्ञान व भक्ति, निर्गुण व सगुण, उपासनेमधील फरक या दोन अभंगांत स्पष्ट केला आहे. अवघ्या दशा येणें साधती। मुख्य उपासना सगुण भक्ती। प्रगटे हृदयीं मूर्ती। भाव चोखीं शुद्ध जाणोनीयां। –या नाट्याच्या अभंगांत दोन्हीं अभंगांचें सार सांगितलें आहे:— येथें एक गोष्ट अति स्पष्टपणें लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, (२२) स्त्रीपुत्रादिकीं राहीला आदर। – येथ पासून जी तक्रार सांगण्यास सुरव त केली–ती (३२) भोगावरी आम्हीं घातला पाषाण – येथे संपली आहे व अशा तक्रारी मिटल्याचें फळ म्हणून (३५) जमाचें जिव्हार आमच्या – आपल्या हातीं–आलें म्हणून म्हटलें व त्यांत हि चैतन्य मार्ग श्रेष्ठ कसा तो सांगितला. येवढ्या तक्रारी करून करुणा भाकली–कारुण्य रसात च लाभ काय झाला तो सांगितला व पुनः कारुण्य रसांत च पुढील आळवण आहे.

॥ ३८ ॥

॥ तरी भले वाया गेलों। जन्म आलों मागुता ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ म्हणउनी ठेलो दास। सावकाश निर्भय ॥ ध्रु ॥
॥ उणे पुरे काय माझें। त्याचे ओझें तुम्हांसी ॥ २ ॥
॥ सांभाळावें तें स्या काई। अवो आई वीठ्ठले ॥ ३ ॥
॥ भोगे जया जाईन स्थळा। तुज गोपाळा वीसरेना ॥ ४ ॥
॥ आपुलें स्या एकसरें। करूनी बरें घेतले ॥ ५ ॥
तुका म्हणे नारायणा। आतां जाणा आपुलें ॥ ६ ॥

(३८) माझा मागील जन्म व्यर्थ गेला हें एका अर्थानें बरें झालें,' कारण त्यामुळें पुनः जन्म झाला व तो हा जन्म झाला–या जन्मांत सावकाश नारायणाचे दास होऊन निर्भय असे होऊन ठेलों. आतां मला नारायणाची जोडी झाली. तेव्हां गोपाळा, आतां माझें जे कांहीं उणें–पुरें, असेल त्याचें ओझें–तुम्हांवर. आतां अहो, विठ्ठले आई, त्या उण्यापुऱ्याचा मी सांभाळ कसा काय करणार ? मी आपल्या भोगानें कोणत्या हि स्थळास जावो–तेथें तुम्हांला विसरणार

नाहीं. अशा रीतीनें मी गोपाळा, आपलें एकदम—एका—जन्मांत वरील सांगितल्या-प्रमाणें संतांनीं जें वर्म, सोपेपणानें, सांगितलें त्यामुळें, बरें करून घेतलें. तुका म्हणे—नारायणा आतां जाणा आपुलें—तुमचें काम तुम्ही करा. नारायणाची जोडी झाली तेव्हां काय व्हावयाचें—काय करावयाचें तें, ज्याचा तो, ज्ञानस्वरूप नारायण, जाणतो आहे च. तेव्हां आतां काय व्हावयास हवें असेल तर फक्त एकच कीं सदा संत संग व्हावा व तो—

॥ ३९ ॥

॥ तृषा काळें उदकें भेटी। पडे मीठी आवडीची ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ ऐसीयांचा हो कां संग। जीवलग संतांचा ॥ ध्रु ॥
॥ मीष्टान्नाचा योग भुके। म्हणतां चुके पुरेसें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माते बाळा। कळवळा भेटीचा ॥ ३ ॥

( ३९ ) तहानेच्या वेळीं जशी पाण्याची गांठ पडावी तशी संतसंगाची गोडी लागून त्या आवडीनें संत भेटी, जिवलग संतांची, होऊन त्यांचा संग व्हावा. भूक लागली असतांना मिष्टान्न मिळावें व तसें मिळालें असतांना—पुरें, असें म्हणणें, जसें चुकेल, तसें संतांच्या संगास पुरे म्हणणें चुकेल. कारण मातेला जसा बाळाच्या भेटीचा कळवळा असतो तसा संतांना आपल्याबद्दल असतो. या उलट ज्यास संतसंगाची आस लागली नाहीं, बोधप्रेमाची, भक्तीसुखाची, ज्यास तहान लागली नाहीं. अशा

॥ ४० ॥

॥ कुचराचे श्रवण। गुण दोषांवरी मन ॥ १ ॥
॥ धृ ॥ असोनीयां नसे कथे। मुर्ख अभाग्य ते तेथे ॥ धृ ॥
॥ नीरर्थक ते कारणीं। कान डोळा वेची वाणी ॥ २ ॥
॥ पापाचे सांगाती। तोंडा ओंढाळांचे माती ॥ ३ ॥
हीताचीया नांवें। ओस पडीलें देहभावें ॥ ४ ॥
॥ फजीत करुनी सोडी। तुका करी वोडा वोडी ॥ ५ ॥

( ४० ) त्या कुचराचें कीर्तन—श्रवण, हें, तो कीर्तन ऐकावयास बसून सद्धर्म—प्रेमबोधावर लक्ष्य न टिकतां—त्याचें लक्ष्य—इतरांच्या गुणदोषांवर टाळीत असावयाचें—तेव्हां हें असलें श्रवण मूर्खपणाचें व अभाग्याचें आहे व श्रवणास बसून कान, डोळे व वाणी यांस तो निरर्थक श्रम देतो. ओंढाळ लोकांच्या तोंडीं—

पडून पापाची संगती होऊन निरर्थक माती तोंडीं पडते व देहभावावर नजर असल्यानें हे हिताच्या दृष्टीनें बोस पडतात; त्यांचे श्रम व्यर्थ होतात. अशा लोकांस फाजित करून व त्यांची बोडंती करून, तुका त्यांस सोडून देतो. ही गोष्ट मी मुद्दाम करतों असें नाहीं.–उलट सर्व जग हें आम्हीं देवासमान मानतों.

॥ ४१ ॥

**॥ जग तरी आम्हां देव। परी हे निंदीती स्वभाव ॥ १ ॥**
**॥ धृं ॥ येतो हीताचा कळवळा। पडती हातीं म्हणुन काळा ॥ धृ ॥**
**॥ नाहीं कोणी सखा। आम्हां नीपराध पारीखा ॥ २ ॥**
**॥ उपक्रमे वदे। तुका वर्मासी तें भेदें ॥ ३ ॥**

( ४१ ) अम्हांस सर्व जग देव च आहे. पण आम्हांस या जगाच्या हिताचा कळवळा येतो म्हणून व हे निंद्य स्वभावाचे लोक काळाच्या हातीं पडतील म्हणून, त्यांची कीव येऊन, स्वाभाविक च निंदा करतो. आम्हांस कोणी सखा नाहीं–व विनाकारण (निपराध) परका हि नाहीं–सहज तुका बोले व ज्याचें अंतरंग वाईट आहे त्याच्या वर्मास तें झोंबतें. ही गोष्ट आम्ही मुद्दाम करतों असें नाहीं. आम्ही सहज जी गोष्ट बोलतों ती त्याच्या वर्मीं लागते. हें त्याचा गुण वाईट म्हणून होते. येथें स्वतःच्या कवित्वाबद्दल केवढी स्पष्टता केली आहे! तेव्हां:—

॥ ४२ ॥

**॥ आपण चालक बुद्धीच्या संचारा। आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥**
**॥धृ॥ काय जाले तुम्ही नेघा तरी भार। आणीक कोणा थोर म्हणों सांगा॥**
**॥ पंचभूते तंव चर्माचीया मोटा। येथें खरा खोटा कोण भाव ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे नाहीं बोलावया जागा। कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ३ ॥**

( ४२ ) देवा, सर्वांच्या बुद्धीचे चालक तुम्ही असतांना, आमच्या गळ्यांत हा व्यवहार कां अडकविला ! तुम्हांस असें काय काम लागलें आहे कीं हा तुमचा भार तुम्हीं सांभाळूं नये व आम्हांस दुसऱ्या कोणास मोठें म्हणावें लागावें. पंच भूतें–यांचा एवढा बाऊ काय म्हणून? तुमचा त्यांत वास आहे म्हणून, त्यास देह म्हणतात, एरव्हीं तीं पंच भूतें सरळ कातड्याच्या पिशव्या आहेत, त्यांत खरें तरी काय पहावयाचें व खोटें तरी काय पहावयाचें ! येथें बोलण्यास कांहीं वाव नाहीं; तेव्हां व्यर्थ श्रम तरी कां करूं ?

॥ ४३ ॥

॥ एका एक वर्मे लाउनीयां अंगीं। ठेवितो प्रसंगी सांभाळीन ॥ १ ॥
॥ धृ ॥ नेघावा जी तुम्ही वाव बहु फार। धरुनी अंतर ठाया ठाव ॥ धृ ॥
॥ वेव्हारें आलें तें समानची होते। वळ नाहीं येथें चालों येत ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां नीवाडा च साठीं। संवसारें तुटी करुनी ठेलों ॥ ३ ॥

( ४३ ) माझ्या अगींची सर्व वर्मे प्रसंगीं म्हणजे प्रसंगा प्रसंगानें, संधि साधून, तुमच्या अंगीं लावून तुम्हांवर भार घालून, मी स्वतःचा सांभाळ करीन, असें म्हणून वागत आहे. तुम्ही तुमच्या माझ्या मध्यें, अंतर फार ठेविलेंत–तुम्ही आपल्यावर माझें ओझें, भार, येईल तें घ्यावयास तयार होत नाहीं. वेव्हारानें पाहिलें तर तुम्ही आपला भार उचलला–तर सर्व कांहीं समान होईल. येथें खुशीचा व्यवहार आहे. येथें कांही वळ केले तर चालेल कां–आता तुमच्या आमच्या तंट्याचा ( प्रेमकलहाचा ) निवाडा व्हावा म्हणून मी संवसाराशीं तुटी करून बसलों आहे.

॥ ४४ ॥

॥ आतां येथें खरें। नये फीरतां माघारें ॥ १ ॥
॥ धृ ॥ होईल हो तैसी आबाळी। देह नीमीत्य या बळी ॥ धृ ॥
॥ तुम्हां सर्व गांठी। देवा जीवाचीया साठीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लंड। करूं चौघामध्यें खंड ॥ ३ ॥

( ४४ ) आतां देवा, मला माघारी फिरून, संसारांत गुरफटतां येणार नाहीं, कांहीं निमित्य करून या देहाचा तुम्हांस बळी दिला आहे, आतां त्याची आबाळी काय व्हावयाची ती होवो. पण वर म्हटल्याप्रमाणें चार चौघांत जो आपला निवाडा व्हावयाचा त्यांत खंड ठरवून घेऊं, कीं, आपल्या उभयतांमध्यें अधीक कपटी ( लंड ) कोण आहे तें हि ठरवूं. देव अधीक कपटी असें गृहीत धरून म्हणतात.

॥ ४५ ॥

॥ कां हो वाळ्वीतां देवा। मज घरीं च समजावा।
॥ केवढा तो गोवा। फार केले थोड्याचें ॥ १ ॥
॥ धृ ॥ ठेवीन पायांवरी डोई। यासी तुमचें वेचे काई।
॥ जालों उतराई। जाणा येक येकाचे ॥ धृ ॥

॥ नीवाड आपणीया पासीं। आसोन का व्हावे अपेशी।
॥ होती गांठी तैसी। सोडूनीया ठेवीली ॥ २॥
॥ तुका म्हणे गोड। होत जालीया नीवाड ॥
॥ दर्शन ही चाड। आवडी च वाढेल ॥ ३॥

(४५) देवा, आपला हा वाद का वाढविता—मला घरींच समजावा—येवढ्या तेवढ्याचा केवढा गवा केलात? तुमच्या पायावर मी माझी डोई ठेवीन, त्यात तुमचे काहीं वेचणार आहे का? बरें येवढें तुम्ही मला करू दिलेंत तर आपण एकमेकाचे उतराई होऊ, मी आपणापाशीं (चरणसेवक) असून आपण मला अपयशी का करिता—तुमची आमची जशी गाठ पडली आहे—तशी गाठ सोडून ठेवावी (म्हणजे त्यास विरोध नसावा) हा तुमचा आमचा असा निवाडा झाल्यानें गोड होतें, होईल—दर्शनाची मला चाड आहे व त्या मुळें आवडी वाढीस लागेल घरीं च समजावा म्हणून जें अभगाच्या सुरवातीस म्हटलें—तोच ओघ पुढें चालू आहे.

॥ ४६ ॥

॥ नव्हो सभा धीट। समोर बोलायचे नीट।
॥ एकली एकट। दुजे नाहीं देखीले ॥ १॥
॥ ध्रु॥ आता अवघ तुम्हीं जाणा। तुमचे माझ नारायणा।
॥ येईल करुणा। ते चीं पाहा तुम्हांसी ॥ ध्रु॥
॥ ताळ नाहीं माझ बुद्धी। धरली न धरवे शुद्धी।
॥ आता वळ कधीं। कोण्या जन्म नीवाड ॥ २॥
॥ आतां शेवटीच। उत्तर ह चीं साच।
॥ शरण आले त्याचे। तुका म्हणे सांभाळा ॥ ३॥

(४६) देवा, मी मोठा सभाधीट लागून गेलों नाहीं—कीं, चार चौघात जाऊन तुमच्या विरुद्ध तकार करून माझ्यासारखा निकाल करून घेईन, मला तुमच्या समोर हि नीट बोलतां येत नाहीं मला एक तुमची सगत—दुसरें कोणी पाहिलें नाहीं—माहीत नाहीं, तेव्हा माझे जे काहीं गुणदोष असतील ते तुम्ही लक्ष्यात घ्या—तुमचें आमचें नातें हि लक्ष्यात घ्या—व मग तुमची तुम्हास च काय करुणा येईल ती पहा—माझ्या बुद्धीला काहीं ताळतत्र आहे का? व केव्हा कोणाशीं कसें वागावें याची मला शुद्ध तरी आहे का? तेव्हा अशा

स्थितींत मी कशाचें बळ धरावयाचें ? व कोणत्या जन्मांत माझ्यासारखा निवाडा व्हावयाचा ! तेव्हां शेवटीं चें एक साच खरें वचन बोलतो कीं–तुम्हांस मी शरण आलों आहें तेव्हां सांभाळा–एवढेंच

॥४७॥

॥ ऐसा तंव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ १ ॥
॥ धृ ॥ मागत्याची टाळाटाळी । झींज्या वोढोनी कपाळीं ॥ धृ ॥
॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जाला । उसीर नाहीं तो वीठ्ठला ॥ ३ ॥

(४७) गोपाळा, मागतकरी दारांत पाहिला कीं कपाळावर झिज्या ओढून त्याची टाळाटाळ करावी असा तर तुमच्या मोळा ( रीत–चाल ) नसेल ना? कां देवा, टाळाटाळीची ही तुम्हीं नवी रीत काढली आहे ! एरव्हीं माझें देणें देण्यास तुम्हांकडून उशीर झाला नसता ! ही सावकारी करीत असतांना ऋणकई ओटख पटूं नये म्हणून कशीं सोंगें करीत ती गोष्ट आठविली आहे. देव ऋणको व तुकोबा धनको असा हा दृष्टांत आहे.

॥ ४८ ॥

॥ माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा सरलेसें नेणें ॥ १ ॥
॥ धृ ॥ नये वचन बाहेरी । उभें तीष्ठतसे दारीं ॥ धृ ॥
॥ काय सांगा यास वेचे । रींद आरंभीं ठाईंचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे किती । भीड धरावी पुढती ॥ ३ ॥

(४८) किंवा माझ्या कपाळाच्या गुणानें–दुर्दैवानें तुमचे ( गांठीचें प्रेम ) सरलें तर नाहीं ना ? मी दारांत उभा आहें व तुमच्याकडून वचन येत नाहीं, हें, असें कसें व्हावें ? नुसतें उत्तर देण्यास तुमचें काय वेंचतें ? तें सांगा, मी मात्र धरणेकरी आरंभीचा व पूर्वीपासूनचा आहे. तेव्हां देवा आतां यापुढें तुमची भीड तरी किती धरावी ? रींद म्हणजे धरणेकरी. हा अर्थ श्री. दादामहाराज सातारकर यांनीं सांगितला, हा शब्द कोशांत नाहीं. या शब्दाचा अर्थ लागला नव्हता म्हणून सर्व प्रतींनीं रितें असा पाठ बदलला आहे. व अभंगाच्या सरळ अर्थाचा अनर्थ केला आहे.

॥ ४९ ॥

॥ करावा उद्धार कींवा घ्यावी हार । एका बोलें स्थीर राहे देवा ॥ १ ॥
॥धृ॥ नीरासेन माझा होईल संदेह । अवघे चि आहे मूळ पाई ॥ धृ ॥

॥ राहीलो डींकोन कांहीं च न कळे । कोणा नेणे वेळे उदय भाग्य ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां संचीताचा वाटा । वोढवला घ्यावा जैसा तैसा ॥ ३ ॥

( ४९ ) तेव्हां, देवा, आतां उद्धार तरी करा, किंवा हार तरी द्या, तुम्ही नुसता एक शब्द बोला, तेवढ्यानें मी शांत होईन, त्या एका शब्दानें माझ्या संदेहाचें ( माझा उद्धार करणार कां नाहीं ) निरसन होईल—व या सर्वांचें मूळ या पायाजवळ आहे. मी नुसता डिंकोन ( स्तभित होऊन ) राहिलों आहे. मला कांहीं कळत नाहीं. कोणत्या वेळीं भाग्य उदयास येईल हें हि कळत नाहीं. तुका म्हणे आतां संचिताच्या वाटा जसा पदरीं पडेल तसा घ्यावा. येथें निवाडा केला, सचिताचा वांटा घेण्याची वेळ आली, तर आपला भाग मोठा होईल हा अभिप्राय.

॥ ५० ॥

॥ एक वीध वृत्ती न राहे अंतरीं । स्मरणीं च हरी वीस्मृती हे ॥ १ ॥
॥ध्रु॥ कैसा हा नवलाव वाटतो अनुभवे । मज माझ्या जीवें साक्षीत्वेसी ॥ध्रु॥
॥ न राहे नीश्चळ जागवीतां मन । कीती क्षण क्षणा सांभाळावे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बहु केले वेवसाव । तेणे रंगे जीव रंगलासे ॥ ३ ॥

( ५० ) देवा, तुम्ही माझा उद्धार केला असें म्हणता—मला हि नारायणाची जोडी झाली असे वाटतें—मग अतरात तुझ्या एका वीण दुसरा विचार येऊं नये—पण तें तसें होत नाहीं. तुझें अखड स्मरण रहावें असें वाटतें पण वारंवार विस्मृति पडते—तेव्हां या मनाचें हें काय नवल आहे ! असें मला वाटतें. मन जागें ठेवून निश्चळ ठेवू पहावें तर तसें हि राहात नाहीं, त्यास क्षणोक्षणीं साभाळावें तरी किती !—तुका म्हणे—मी आजवर फार वेवसाय—धदे, केले—त्यांच्या रगानें हा जीव रगला आहे.

या अभगात मनाचें गाऱ्हाणें स्पष्ट मांडलें आहे. पण मनाचा स्वभाव काय हें स्पष्ट झाल्यावर तें गाऱ्हाणें कौतुकानें माडलें आहे. अत्यत प्रेम तेथें अत्यत धास्ती त्या मनस्थितीचें हें शब्दाचित्र आहे. निश्चल मनानें हें चचल मनाचें वर्णन केलें आहे ! परतु ३५ मध्यें हीं गाऱ्हाणीं मिटल्याचे पूर्वी च सागितलें आहे.

॥ ५१ ॥

॥ गंगा न देखे वींटाळ । ते च रांजणी ही जळ ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ अल्प महदा नव्हे सरी । वीटाळ तो भेद धरी ॥ ध्रु ॥

॥ काय खंडीली भूमीका । वरणा पायरी कां लोकां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आगी वीण । बीजें वेगळाली तों भीन्न ॥ ३ ॥

(५१) गंगेला कांहीं विटाळ नसतो, तें च पाणी रांजणांत सांठविलें कीं त्यास शिवल्यानें विटाळ होतो. लहानास मोठ्याची सर कशी येणार! लहान व मोठा यांत जो फरक आहे तो विटाळ धरतो. भूमीवर सर्व वर्णांचे लोक चालताहेत म्हणून काय पृथ्वीचे तुकडे वर्णाप्रमाणें व पायरी पायरीनें केलें आहेत! तुका म्हणे अग्नीपासून बीजें भिन्न आहेत तोंवर वेगळी आहेत नाहीं तर मग सर्व एक च आहे. तेव्हां सर्व दोष माझ्याकडे आहेत याचें कारण मी वेगळा आहें. जीव हा शिवाचा च अंश खरा—पण तो अंश आहे म्हणून गाऱ्हाणें आहे. एकदां सामाऊन घ्यां म्हणजे मला कांहीं विटाळ राहणार नाहीं. या अभंगांत ऐक्य भोगण्याची उत्कंठा च दिसत आहे. वेगळेपण, अंतर, त्रास देत आहे.

॥ ५२ ॥

॥ सत्य माप वाढे । गवाळ्याची चाली खोडे ॥ १ ॥
॥धृ॥ उतरे ते कळे कसीं । वीखरोन सर्व देशीं ॥धृ॥
॥ धरामध्यें राजा । नोहे होता पट पूजा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे साचें । रूप तें दर्पणीचें ॥ ३ ॥

(५२) सत्याचें माप वाढीवर असतें. गवाळाची चाली खोडीची असते. जें कसास उतरतें तें सर्व देशांत पसरतें. तसें च राजा असेल तर त्यास नुसतें राजा म्हणून भागणार नाहीं. त्यास नगारे लावून पट्टाभिषेक केला पाहिजे. आरशांत दिसतें तें खरें रूप नाहीं. तें प्रत्यक्षतेंत च पाहिजे. हा च विषय आणखी दृष्टांत देऊन स्पष्ट करिताहेत.

॥ ५३ ॥

*॥ महुरा पेसी फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥ १ ॥*
॥ धृ ॥ पक्वदशे येती थोडीं । नाश आढी वेचे तां ॥ धृ ॥
॥ वीरुळा पावे वीरुळा पावे । अवघड गोवे शेवटींचे ॥ २ ॥
॥ उंच नींच परीवार देवीं । धन्या ठावी चाकरी ॥ ३ ॥
॥ झळके तेथें पवे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ४ ॥
॥ पावेल तो पैल थडी । म्हणो गडी आपुला ॥ ५ ॥
॥ तुका म्हणे उभाऱ्यानें । खरें कोण मानीतसे ॥ ६ ॥

(५३) मोहोर जेवढा येतो तेवढीं कांहीं फळें लागत नाहींत, कांही फळें आलीं तर पक्व दशेपर्यंत येऊन आढींत नासतात, तात्पर्य फळ उत्तम पक्व होऊन शेवटपर्यंत पावावयास, गोवे-अडचणी च फार. देवाच्या किंवा राजाच्या उंच व नींच पदाच्या परीवार फार असतो, पण खरोखरी च शस्त्र झळकल्यावर त्याचें ( आणि म्हणजे शस्त्राचें टोक ) कामास येतील म्हणजे जीव बक्षी देतील असे थोडे. जो गडी पैल तिरास पोहोचलेला असतो तेवढा च आपला सखा. तुका म्हणे "वीरश्रीनें अवसान पुष्कळ दाखवितात पण ढौल खरा कोण मानतो ! तशा परमार्थाच्या गप्पा मारणारे फार; तसा ढौल दाखविणारे फार, मानदंभाच्या, लौकिकाच्या, ऋद्धीसिद्धींच्या, नादीं लागणारे फार, मंत्र, तंत्र, टाणाटोणा, करणारे त्याहून जास्त,-अंगारे धुमारे, भुतें खेतें करणारे, पुष्कळ, पण मी तो यजावा ! मीच म्हणुनी ! असा एखादा विरळा च, तेव्हां तुकाराम महाराज म्हणतातः कीं मला कांहीं खूण पटली पाहिजे कीं मी पैलतिरास पावलेला गडी आहे, एवढ्यांत ४५ या अभगापासून मला घरीं च समजावा म्हणून म्हणत होते, त्याप्रमाणें हवें होतें तें ध्यान समोर येतां च म्हणतात कीं:-

॥ ५४ ॥

॥ राहो आतां हे ची ध्यान। डोळां मन लंपट ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोंड कोंडुनी धरीन जीवें। देह भावें पूजीन ॥ धृ ॥
॥ होईल येणे कळसा आले। स्थीरावलें अंतरो ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गोजीरीया। वीठोबा पाया पडो द्या ॥ ३ ॥

(५४) माझ्या डोळ्यांपुढें हें चि ( म्हणजे प्रत्यक्ष पाहात आहे तें ) ध्यान सदोदित असो, माझें मन भ्रमण न करो-तर डोळे व मन या च (हा प्रत्यक्ष-तेचा भोग आहे ) ध्यानावर लंपट राहो मी हें ध्यान कोंडकोंडुनी धरीन जीवें व देहभावें पूजीन. त्यामुळें अतरांत कळसास प्रेमाचा कल्लोळ येऊन प्रेम स्थिरावेल. तुका म्हणे विठोबा, तुमच्या गोजीरीया पाया मला पडो द्या. तुकोबांस राजा होऊन जें मिळवावयाचें होतें तें हें च. ४५ व्या अभगापासून ५३ पर्यंतच्या आळवणीस-करुणेस फळ लागलें असें येथें म्हटलें आहे.

॥ ५५ ॥

॥ माझी आतां सत्ता आहे। तुम्हां पाया हे वरती ॥ १ ॥
॥ धृ ॥ एका वीण नेणे दुजा। पंढरी राजा सर्वांग ॥ धृ ॥
॥ पुरवावी केली हे आळी। जें जें काळीं मागेन तें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सुटसी केसा। धरुनी दीशा राहीलो ॥ ३ ॥

(५५) माझी या तुमच्या ( ही गोष्ट प्रत्यक्षत्वाची साक्ष देत आहे ) पायांवर सत्ता आहे. पंढरी राजा, मी तुम्हा एका कडे सर्वांगानें पाहिलें आहे. व दुसरा कधीं कोणी–मनांत कशास हि येऊं दिला नाहीं, येथें एखादी पतिव्रता म्हणेल कीं दुसरा पुरुष माझ्या मनास शिवला नाहीं. तसें पतिव्रते जैसा प्रतार प्रमाण–आम्हां नारायण तैशापरी हें वचन पोटीं धरून हे शब्द वापरले आहेत. म्हणून मी ज्या ज्या वेळीं जी जी आळी करीन ती ती पुरविणें तुम्हांस भाग आहे. या मागणींतून तुम्हांस कांहीं सुटतां येणार नाहीं. कारण मी सर्व दिशा व्यापून–रोखून–धरून बसलों आहें.

॥ ५६ ॥

॥ फावले तें तुम्हां मागें। नव्हतो लागे पावलों ॥ १ ॥

॥ध्रु॥ आलो आतां उभा राहे। जवळी पाहे सन्मुख ॥ ध्रु ॥

॥ घरीं होतों गोवी जाली। कामें बोली न घडे ची ॥ २ ॥

तुका म्हणे धडफुडा। जालों झाडा देई देवा ॥ ३ ॥

(५६) देवा आजवर तुमचा लाग लागला नव्हता–आतां तुमच्या जवळ आलों, जें हवें असेल तें तुमच्या जवळ मागेन, हा पहा मी आतां जवळ आलों आहे–तेव्हां सन्मुख, उभा रहा. घरीं फार गोवी ( गुतागुंत ) होती, व कामें ( म्हणजे अवांतर गोष्टींत किंवा स्त्रीपुत्रादिकांत गुरफटलों होतों ) होतीं म्हणून आपली बोली होत नव्हती. तुका म्हणे–मी आता ( धडफुडा ) खरा झालों आहे तेव्हां आतां झाडा दे.

॥ ५७ ॥

॥ नाहीं खंड जाला। माझा तुमचा वीठ्ठला ॥ १ ॥

॥ध्रु॥ कैसें कैसें हो दुश्चीत। आहे चौघा पासीं नीत ॥ ध्रु ॥

॥ मुळींचे लीहीलें। मज आतां सांपडलें ॥ २ ॥

॥ तुका म्हणे मज। न लगे बोलणे सहज ॥ ३ ॥

(५७) माझा तुमचा कांहीं अद्याप खंड–ठराव–मक्ता ठरलेला नाहीं. असें असतांना, तुम्ही हे असे निष्काळजी कसे ! चार चौघांत व्यागण्याची कांहीं रीत असते. ती टाकून तुम्ही असे दुश्चित कसे. आतां मला तुमचा मुळचा लेख सांपडला आहे–तेव्हां मला सहज च ( फार ) कांहीं बोलावयास नको.

तुकोबा व्यवसायानें वाणी, सावकार, होते तेव्हां सर्व दृष्टांत ( मागील २–३ अभंगांतील ) सावकाराचे आहेत. पुढील अभंगांत हि एखादा कणको

बोलत नसला, टाळाटाळ करीत असला तर त्यास गोड बोलून बोलका कसा करावा ती युक्ति (सावकारानें वापरावयाची) वापरून देवास म्हणतात.

॥ ५८ ॥

॥ हे ची वादकाची कळा । नाहीं देऊं येत बळा ॥ १॥
॥धृ॥ धीर करावा करावा । तरी तो आहे आम्हां देवा ॥ धृ ॥
॥ रीघावें पोटांत । पाया पडोन घ्यावा अंत ॥ २ ॥
तुका म्हणे वरी । गोडा आणावा उत्तरीं ॥ ३ ॥

(५८) देवा, वाद असा करावा कीं दुसऱ्यास हातघाईवर येऊं देऊं नये. तेव्हां धीर धरून, पाया पडून, पोटांत शिरून, गोड बोलून, त्यास बोलका करावा, या कला व हा धीर माझ्या जवळ आहे.

*तेव्हां त्या कलांचा युक्तीनें, धीरानें, उपयोग करावा तसे पुढील अभंग* आहेत.

॥ ५९ ॥

॥ अवघ्या उपचारा । एक मन ची दातारा ॥ १ ॥
॥धृ॥ घ्यावी घ्यावी हे ची सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥ धृ ॥
॥ अवघीयाचा ठाव । पायावरी जीवभाव ॥ २ ॥
॥ चीत्ताचें आसन । तुका करीतो कीर्तन ॥ ३ ॥

(५९) हे देवा, सर्व उपचार एका मनानें, व्हावयाचें, तेव्हां तें मन च तुला, हे दातारा, अर्पण करितो. व देवा, या दुर्बळाची सेवा तुम्हीं घ्यावीत, पुनः म्हणतो, तुम्ही माझी सेवा घ्यावीत, सर्व जीवींतास एक च ठाव आहे व तो म्हणजे तुमच्या पायावर जीवभाव ठेवावा. तुम्हांस मी आपल्या चित्ताचें आसन बसावयास घालून तुम्हां समोर कीर्तन करीत आहे. हें कीर्तन म्हणजे—

॥ ६० ॥

॥ आळी सलगी पायापाशीं । होईल तैसी करीन ॥ १ ॥
॥धृ॥ आणीक आम्हीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ धृ ॥
॥ आवघ्या नीरोपणा भाव । हाची ठाव उरलासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पाळी लळे । कृपाळुवे वीठले ॥ ३ ॥

(६०) देवा, या पायांपाशीं सलगीनें, होईल ती आळी करीन येथें तुमच्या पायाजवळ जीवें भावें वेचलों आहे, तेव्हां हें ठिकाण सोडून आम्हीं

आणखी कोठें जावयाचें ! आम्हांस जें कांहीं हवें असेल, बरें वाईट वाटेल, तें मागण्यास व सांगण्यास हा एक च ठाव उरला आहे. तेव्हां तुका म्हणे, कृपाळुवे वीठले—ल्ळे पाळी. व,

॥ ६१ ॥

॥ आतां नये बोलों अव्हेराची मात । बाळावरी चीत्त असों द्यावें ॥१॥
॥धृ॥ तुज कां सांगणें लागे हा प्रकार । परी हें उत्तर आवडीचें ॥ धृ ॥
॥ न वंचीं हो कांहीं एक ही प्रकार । आपणा आंतर नको मज ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मोहो राखावा सतत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥ ३ ॥

( ६१ ) देवा, आतां अव्हेराची मात बोलू नये, बाळावर चित्त असों द्यावें आम्हीं या गोष्टी बोलल्यावर कां तुम्हांस कळणार आहेत ! पण माझे बोलणें हें आवडीनें होत असतें. बोलल्याशिवाय रहावत नाहीं म्हणून बोलावयाचें ! तेव्हां आतां कांहीं प्रकार करून बोलत नाहीं—पण आपणांत व माझ्यांत अन्तर नको. तेव्हां पांडुरंगा, माझा अंत पाहुं नये तर तुमच्या अन्तःकरणांत माझ्याबद्दल सतत मोह असावा.

—अभंग १–६१ पर्यंतची ओळ एक आहे. तेव्हां हा झरवणीसारखा ओघ कसा वाहतो तो नीट पाहून घ्यावा. या पुढील ४१५ अभंग हे कवित्वाची स्फूर्ति झाल्यावर कीर्ती पसरल्यानें ज्ञानी–पंडीत तार्कीक ज्या शंका काढीत त्यांस उत्तर आहे. हा भाग बाजूस सारला तर अभंग ६७ पासून हा च स्वचरित्रपर ओघ चालूं आहेसें आढळेल.

॥ ६२ ॥

॥ एके परी बहीरे बरे । परी तीं ढोरें ग्यानगंडे ॥ १ ॥
॥ धृ ॥ कपाळासी लागली आगी । अभागी कां जीतसे ॥ धृ ॥
॥ एक परी बरे वेडे । तार्कीक कुडे जळो ते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ३ ॥

( ६२ ) एके परीं—बहीरे बरे—परंतु हीं ग्यानगंडे—( पंडीत, वाचक, ज्ञानी ) ढोरें आहेत. यांच्या कपाळास आग लागलेली असते, हे.वेडे, अभागी जगतात तरी कशास !—२के परीं वेडे बरे पण हे कुडे—दुष्ट, तार्कीक जळोत "एकदाचे ! तुका म्हणे—हीं ग्यानगंडें, हे तार्कीक—उकीरडा फुंकणारे आहेत. त्यांना अमृताची ओळख पटणार नाहीं.

या मंडळींचा तुकोबास त्यांच्या विद्वत्तेनें फार त्रास पोहोंचला असावा.- कारण

॥ ६३ ॥

॥ अनुभवे वदे वाणी। अंतर्ध्यानीं आपुले ॥ १ ॥
॥ धृ ॥ कैची चीका दूध चवी। जरी दावी पांढरें ॥ धृ ॥
॥ जाती ऐसा दावी रंग। बहु जग या नांवें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खद्योत ते। ढुंगा भोवते आपुलीया ॥ ३ ॥

( ६३ ) मी अतरींच्या ध्यानानें, अनुभवाची वाणी बोलतो, तें कामधेनूचें दूध असतें, पण हे ज्ञानी व तार्कीक निराळें च कांहीं तरी सांगतात. पण चीक पांढरा दिसला म्हणून दूध होईल का? दूध दूधाचा रंग दावील–चीक–चीकासारखा राहील–असे जग पुष्कळ रंग दाखवीतें–तुका म्हणे–खद्योत म्हणजे काजवा आपल्या ढुंगाभोंवतीं उजेड पाडतो. तसे हे ज्ञानी–तार्कीक–आपल्या ढुगणाभोंवतीं उजेड पाडोत–त्याचा इतरांना काय उपयोग होणार। त्याचे शब्द अनुभवाचे, नाहींत, विद्वत्तेचे, हात तुके, अटकळींचे आहेत. ज्ञान हा हि बंध आहे म्हणून.

॥ ६४ ॥

॥ उपाधीच्या नांवे घेतला सींतोडा। नेदो आतां पीडा आतळों हे ॥१॥
॥धृ॥ काशासाठीं हात भरुनी धुवावे। चालतीया गोंवे मारगासी ॥ धृ ॥
॥ काय नाहीं देवे करूनी ठेवीले। ऐसे तें आपुले ते ते ठायीं ॥
॥ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार। तेव्हां आपपर बोळवीले ॥ ३ ॥

( ६४ ) मी त्या उपाधीच्या नांवानें स्नान करून मोकळा झालों आहे. आतां मी स्वतःला कसली हि पीडा लावून घेऊ शकत नाहीं. म्हणजे मी अतःपर उपाधीचा दास नाहीं, अंकीत नाहीं, उपाधीच्या आहारीं जाणार नाहीं. कारण कोणत्या तरी उपाधींत सांपडा, हात भरवा–र मग ते धुवा हें कोणी सांगीतलें आहे! हें असें करणें म्हणजे आतां जो मार्ग सांपडला आहे, त्यात गोवा उत्पन्न कराल. देवानें ठिकठिकाणीं काय करून ठेविलें नाहीं? त्यानें जें कांहीं निर्माण केलें आहे, योजून ठेविलें आहे, तें सर्व आपल्यासाठीं च आहे. तुका म्हणे–जेव्हां अहंकार–अहं कर्तृत्वाची जाणीव जाईल–तेव्हां साहजीक च स्वतःचे व दुसऱ्याचे हे भेदभाव विरघळून जातील, म्हणून सांगताहेत कीं नारायणाचीं जोडी झाल्यानें माझ्यात आपपर भावाचें शून्य झालें आहे. काशासाठीं हात भरूनी धुवावें! हा

सुंदर शब्दप्रयोग येथें सहज साधला आहे. उपाधी कशी टाळली ही च गोष्ट ज्यास्त खुलासेवार पुढे सागताहेत.

॥ ६५ ॥

॥ परपीडक तो आम्हां दावेदार। वीश्वीं वीश्वंभर म्हणउनी ॥ १ ॥
॥धृ॥ दंडु त्यागुं बळें नावलोकुं डोळा। राखोत चांडाळा ऐसा दूरी ॥धृ॥
॥ अनाचार कांहीं न साहे अवगुण। बहु होय मन कासावीस ॥२॥
॥ तुका म्हणे माझी एकवीध सेवा। वीमुख ते देवा वाळीं चीत्तें ॥३॥

(६५) विश्वांत विश्वंभर सामावलेला असल्यामुळें–दुसऱ्यांना पीडा करणारे आमचे दावेदार होत. आम्हीं जोर करून त्यांचें शासन करू, त्याचा त्याग करूं, डोळ्यानें त्यांस पहाणार नाहीं, व चांडाळासारखा दूर ठेवू आम्हांस कसला हि अनाचार व अवगुण सहन होत नाहीं. म्हणजे परपीडक समोर आले कीं त्यामुळें मन फार कासावीस होतें. तुका म्हणे–माझी सेवा एकविध आहे यामुळें देवास जे विमुख–त्यास मी चित्तापासून वाळतो, बाजूस सारतो या उलट आज जगांत साधु म्हणून जे मिरवत आहेत ते कसे आहेत ते पहा. त्यांच्यांत व संतांत फरक आहे साधुजन कांही घरसोंत कांहीं टाकतात. अनाचार कांहीं न साहे अवगुण।–ही स्वत.ची रहणी सांगितली आहे

॥ ६६ ॥

॥ देह आणि देह संबंधे नींदावीं। इतरें वंदावी श्वान शुकरें ॥ १ ॥
॥धृ॥ येणे नांवे जाला मी माझ्याचा झाडा। मोह नांवे खोडा गर्भवास॥धृ॥
॥ गृह आणि वीत्त स्वदेश वीटावे। इतरां भेटावे श्वापद झाडा ॥२॥
॥ तुका म्हणे मी हे माझे नयो वाचे। येणे नांवे साचे साधुजन ॥३॥

(६६) देह व देहसंबधीं (माता पितर–स्त्री पुत्र) हीं नींदावींत म्हणजे निंद्य म्हणून टाकावींत व श्वान शुकरें वंदावीत अशी स्थिती झाली कीं म्हणावयाचें कीं मी व माझें यांचा झाडा जाला–नाहीं तर मोह आहे म्हणून समजावें व गर्भवासाचा खोडा आहे च. गृह, वित्त आणि स्वदेश यास विटावें व इतर श्वापदांना व झाडांना भेटावें. मी व माझें हें ज्यांच्या वचनांत न येईल हे खरे साधु जन म्हणून ओळखावेत, परंतु तुका म्हणे जगांत साधुजन• म्हणून वरीलप्रमाणें ओळखले जातात. पण खऱ्या संतांची रहाणी खालीलप्रमाणें असते. वरील अभंगांतील रहाणी साधुची व खालील अभंगांतील रहाणी

संतांची. ६२–६६ हे अभंग ६७ स पार्श्वभूमी सारखे समजावेत. ६७ पासून पुढें संत–हृदयाचें शब्दचित्र पहावयास सांपडत आहे.

॥ ६७ ॥

॥ खेळों मनासवें जीवाच्या संवादें। कवतुकें वीनोदें नीरंजनीं ॥१॥
॥ध्रु॥ पचीं पडीलें तें रुचे वेळों वेळां। होतसे डोहळा आवडीसी ॥ ध्रु ॥
॥ एकांताचे सुख जडलें जीव्हारीं। वीट परीचारीं वरा आला ॥ २॥
॥ जगा ऐसी बुद्धी नव्हे आतां कदा। लंपट गोविंदा झालो पायीं ॥३॥
॥ आणीक ते चींता नलगे करावी। नीत्या नीत्य नवी आवडी ते ॥४॥
॥ तुका म्हणे धडा राहीला पडोन। पांडुरंगीं मन वीसांवलें ॥ ५ ॥

(६७) मनाशीं, जीवाशीं, संवाद, प्रकाशरूपांत कौतुकानें विनोदानें करूं या–किंवा करीत असतो. जी गोष्ट एकदां पचीं पडली ती वेळोवेळां आठवते व आवडीस डोहाळे होतात. म्हणजे पचीं पडलेल्या, आवडलेल्या, गोष्टीचा कांहीं नित्य नवा प्रकार मनश्चक्षूपुढें दिसूं लागतो. अंतरांत–विठुरायाशीं–जो एकांत होत असतो त्याचें अंतरांत सुख जडलेलें असतें व इतर परीचाराचा–व्यवहाराचा वीट येतो, आतां जगाच्या सारखी आपली–परीचाराची बुद्धी कधीं व्हावयाची नाहीं. गोविंदाचे पायीं हें मन लंपट झालें आहे. आतां दुसऱ्या कशाची हि चिंता करावयास लागणार नाहीं, कारण हे मन जें गोविंदाचे पायीं लंपट झालें आहे, त्यास नित्य नवी (भोग भोगण्याची) आवडी उत्पन्न होत असते. तुका म्हणे–आतां हा च धडा, शिरस्ता, क्रम, पडून राहिला आहे.–कारण माझें मन पांडुरंगीं विसावले आहे. हा निरंजनीं वास करणारे लोक कोठें रममाण असतात–कोठें वास करीत असतात–तें काय करीत असतात–स्वस्थ बसलेले दिसले तरी त्यांच्या मनाचा व्यापार कोणता चाललेला असतो, याचें हें शब्दचित्र आहे. ऐसा एखादा महानुभाव दैववशात् भेटला असला, त्याचें आपणांस प्रेम लाभलें असेल, तो आपलें स्वरूपाची ओळख करून देण्यास तयार असेल तर च या अभंगांतील प्रत्येक शब्दाची ओळख पटेल, रहस्य कळेल; एरव्हीं–न बोललेलें बरें.

आपलें मन पांडुरंगी विसावलें आहे म्हणून सांगून त्या स्थितीचें आणखी खुलासेवार वर्णन करीतात कीं:–

॥ ६८ ॥

॥ आणीक दुसरें मज नाहीं आतां। नेमीलें या चीत्ता पासोनीया ॥१॥
॥ध्रु॥ पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं। जागृतीं स्वपनीं पांडुरंग ॥ ध्रु ॥

॥ पडीलें वळण इंद्रीया सकळां। भाय तो नीराळा नाहीं कोण्हां ॥ २॥
तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण। तटस्थ हे ध्यान वीटेचीया ॥ ३ ॥

( ६८ ) आतां एक गोष्ट निश्चीत ठरलेली आहे कीं मला-माझ्या चित्तास एका पांडुरंगाशिवाय दुसरें कांहीं सुचत नाहीं. मनांत ध्यास पांडुरंगाचा, मनांत ध्यान पांडुरंगाचें, जागृतींत पहावयाचा पांडुरंग-स्वप्नांत पहावयाचा पांडुरंग-सर्व इंद्रियास वळण पांडुरंगाच्या ध्यानाचें लागलेलें आहे. एका हि इंद्रियास दुसरा भाव माहीत नाहीं. तुका म्हणे विटेवर जें तटस्थ ध्यान कटावर कर ठेवून उभे आहे त्या ध्यनाची नेत्रांनीं ओळखण केलेली आहे.

पांडुरंगीं मन विसावल्यानें जी एकतानता-तन्मयता उत्पन्न होते त्याच्या अनुभवाचे हें शब्दचित्र आहे. त्याची पुढील पायरी ( ज्याचें जया ध्यान तेंच होय त्याचें मन या न्यायानें ) जी आपण गांठली ती दाखवितोहेत.

॥ ६९ ॥

॥ जाली झडपणी खडतर देवता। संचरली आतां नीघो नये ॥ १॥
॥धृ॥ मज उपचार झणी आतां करा। न साहे दुसरा भार कांहीं ॥ धृ॥
॥ नेउनीया घाला चंद्रभागें तीरीं। जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥२॥
॥ तुका म्हणे कळो आले वर्तमान। माझें तें वचन आच्छादले ॥ ३॥

( ६९ ) एखाद्यास भूतानें झडपावें तशी माझी आतां झडपणी झाली आहे. खडतर देवता अंगीं संचरली आहे. व आतां कांहीं केल्या ती देवता बाहेर निघत नाहीं. आतां झटकन् ( झणी ) मला कांहीं उपचार करा-मला आतां दुसरा कसला हि भार सोसत नाहीं. मला येथून नेऊन चंद्रभागेच्या तीरावर पोहोंचवा, आतां मला दुसऱ्या कोणत्या हि गोष्टीची उरी नाही. तुका म्हणे माझें वर्तमान तुम्हास कळलें कां ? नेऊनियां घाला चंद्रभागेतीरीं-हें माझें वचन आच्छादिलेलें आहे. प्रिय पति मुंबईस असला की जशी नवी नवरी मुंबईचें पत्र आलें ! न आलें असें म्हणते व तें तिचें वचन झांकलेले असतें तसे *चंद्रभागातीरावर मला* नेऊन सोडा हें वचन आच्छादलेलें आहे म्हणजे मी हरीरता आहे-असा भावार्थ [1] हा भाषाप्रयोग, विनय, आदर, दाखविण्यासाठी वापरला आहे.

॥ ७० ॥

॥ आंगीं देव खेळे। कां रे तुम्हांसी न कळे।
॥ कोणाचे हे चाळे। सुख दुःख न मानीतां ॥ १ ॥

॥ध्रु॥ मी तो आतां येथे नाहीं। ओळखी वचनाच्या ठायीं ॥
॥ पालटाचा घेई। भाव खरे लोपे ना ॥ ध्रु ॥
॥ आपुलले तुम्ही पुसा। सोस वायां च सरीसा।
॥ स्थीरावल्या कैसा। काय जाणे वीचार ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लाभकाळ। तेथे नसावे शीतळ।
॥ मग तैशी वेळ। कोठे जाते सांपडो ॥ ३ ॥

(७०) अरे, माझ्या अंगात देव खेळतो आहे हें तुमच्या कसें लक्षांत येत नाहीं? सुखदुःख विरहीत अशी जी माझी अवस्था झाली आहे ते माझे चाळे आहेत असें का तुम्हांस वाटतें? मी तो आता येथें नाहीं! तुमच्यात बसलेला—तुमच्यांत राहणारा—असा दिसलो तरी मी तसा नाहीं—माझी ओळख तुम्हास फक्त वचनावरून होईल. कारण खरा भाव कधीं लोपत नाहीं—तेव्हा वृत्ति जशी पालटेल तसें वचन हि पालटेल. तुम्हांस स्वहिताची काय गोष्ट विचारावयाची असेल ती विचारून घ्या. उगा च शेजारीं बसून भलता च सोस, बरोबरीच्या नात्याचा करू नका—न जाणो ही वृत्ति स्थिर झाल्यावर—काय दुसरा विचार होईल तें काय सांगावें? कारण मी तो आतां येथें नाहीं. तुका म्हणे बाबानो, हा तुम्हास लाभकाळ आला आहे—परवणी आली आहे. तेव्हां येथे शीतल थंड राहू नका, कारण ऐशी सधी पुनः येणार नाहीं येथें स्वत.ची ओळख किती स्पष्ट शब्दात करून दिली आहे! एवढ्या स्पष्ट शब्दात आपले स्वरूप प्रगट करून हि तें किती जणास पटलें असेल!

॥ ७१ ॥

॥ उचीताचा काळ। साधावया युक्तीबळ।
आपुले सकळ। ते प्रसंगी पाहिजे ॥ १ ॥
॥ध्रु॥ नेम नाही लाभ हानी। अवचीत घडती दोन्ही।
वीचारोनी मनी। पाहीजे ते प्रयोजावे ॥ ध्रु ॥
॥ जाळ जाळा काळे। करपो नेदावे आगळे।
जेवीतां वेगळे। ज्याची तेथे ते शोभे ॥ २ ॥
॥ पाळी नांगर पाभारी। तन निवडुनी सीकरी।
• तुका म्हणे धरीं। सेज जमा गेवटीं ॥ ३ ॥

(७१) उचीत काळ आला, शुभ परवणी आली, तर त्या वेळीं आपल्या अगांतील सर्व शक्ती व युक्ती त्याप्रसगीं कार्य साधण्यास वापरली पाहिजे. कारण

कोणती वेळ कशी येणार हें काय सांगून घडत असतें? त्याचा कांहीं नेम नसतो. लाभ व हानी हीं अवचित–अनपेक्षितपणानें घडतात. तेव्हां युक्ती किंवा बळ हे समय ओळखून वापरावे. जाळ भांड्याखालीं लावून वर पदार्थ शिजत लावला तर तो शिजेल, पण तो जाळ अशा युक्तीनें लाविला पाहिजे कीं पदार्थ करपू देता कामा नये. उलट तो पदार्थ असा शिजवला पाहिजे कीं तो जाळ–ती ज्ञानाची आच जागच्या जागीं शोभून दिसेल. हा ज्ञानमार्गीयांना उपदेश आहे. ते कोणत्या हि गोष्टींतील गोडी ज्ञानाग्नीनें भस्मसात् करतात. तुका म्हणे–जमीन नांगरावी–पेरणी करावी, गवत निवडून काढून–धान्य राखावें ( सोंकरी ), तुका म्हणे तें जमा करावें व भरून ठेवावें. धान्याचा नाश होईल–धान्याची रोपटीं उपटलीं जातील–अशी बेतणी करावयाची नसते. शरीर भाजून लाही करावयाची नाहीं. वृत्ती जळून जातील असें वागावयाचें नाही. हा भावार्थ–वृत्ति मारण्याचे काम साधुपुरुषांचें पण संत वृत्तीस युक्तीनें गवसणी घालतात.

॥ ७२ ॥

॥ पडीलीया ताळा। मग अवघा नीर्वाळा।
॥ तेथे कोणी वळा। नाहीं येत कोणासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जोडीले ते लागे हातीं। आप आपली नीश्चींतीं।
॥ हरुष आणी खंती। तेथ दोनी नासली ॥ धृ ॥
॥ सहज सरलीया कारण। मग एकला आपण।
॥ दीसे तरी भीन्न। वचनाचा प्रसंग ॥ २ ॥
॥ करुनी झाडापाडा। तुका वेगळा लीगाडा।
॥ नीश्चींतीच्या गोडा। गोष्टी म्हणे लागती ॥ ३ ॥

(७२) ताळा पडल्यावर, प्रतीति आल्यावर–सर्व गोष्टींचा निकाल लागतो, निर्वाळा होतो, येथें कोणी कोण वर बळ करू शकत नाहीं. आपण जें खरें च जोडलें असेल, तें आपली स्वत.ची निश्चिती होऊन आपल्या हातीं लागतें. तेथें हर्ष आणि खंती या दोन्ही गोष्टी नाश पावलेल्या असतात. हर्ष आणि खती यांचें कारण सरल्यावर म्हणजे देहभावांचा निरास झाल्यावर आपले आपण एकटे च असतो; कोठें कांहीं भिन्नता उत्पन्न झाली तर वचनाचा प्रसग येणार. तेव्हां सर्व गोष्टींचा बारकाईनें छडा लावून मी सर्व लिगाड्यापासून आतां मोकळा झालों आहे. त्यामुळें निश्चिती झाल्यानें सर्व गोष्टी गोड वाटतात. या गोड गोष्टी पुढील ९ अभंगांत सांगितल्या आहेत. हे ९ अभंग याच क्रमानें सताजी तेली

जगनाडे यांच्या वहींत याच क्रमानें २२२–३० आले आहेत. तेव्हां एका च मूळ वहीवरून या दोन्ही नकला केलेल्या आहेत हें स्पष्ट आहे.

॥७३॥

॥ अहो कृपावंता । होय बुद्धीच्या ये दाता ॥ १ ॥
॥ धृ ॥ जेणे पावीजे उद्धार । होय तुझ्या पायीं थार ॥ धृ ॥
॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । माझे अंतर वसवा ॥ ३ ॥

( ७३ ) अहो कृपावता मला बुद्धी द्या, बुद्धी कशी द्यावयाची ? जेणें मी उद्धार पावेन, उद्धार म्हणजे, तुझ्या पायीं थारा मिळेल. पांडुरंगाबद्दल ही वाचा साच बोलू दे आणि देवा, तुम्ही अंतर्यामीं वसतीस या.

॥ ७४ ॥

॥ नेणों फुंको कान । नाहीं एकांताचे ज्ञान ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुम्ही आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ धृ ॥
॥ नाहीं देखीला तो डोळा । देव दासउं सकळां ॥ २ ॥
॥ चींतनाच्या सुखे । तुका म्हणे नेणे दुःखे ॥ ३ ॥

( ७४ ) मी कान फुंकून मंत्र कसा द्यावयाचा तें जाणत नाहीं, किंवा चोरून ज्ञान कसें सांगावयाचें हें हि ओळखत नाहीं. अहो संत जन, माझा वृत्तात तुम्ही सादर ऐका, त्यात काहीं लपवालपवी छपवाछपवी, गुप्त, चोरून, असें कांहीं नाहीं. आजवर ज्या मत्र घेतलेल्यांनीं व ज्ञानबोध झालेल्यांनीं देव डोळ्यांनीं पाहिला नाहीं, तो त्याना, व इतर सगळ्यांना, मी दाखवीन. ते देव स्वत:च्या डोळ्यानें पाहतील, व या देवाच्या एका च विचाराच्या चित्तनानें मी सुखी आहे, मला दुःख कसें तें माहित नाहीं.

या अभंगांत स्वतःच्या अंगी केवढी शक्ति निर्माण झाली आहे याची स्पष्ट कल्पना असल्याचें व गुरुमार्गी व ज्ञानमार्गी लोक कसे चांचपडत आहेत. त्यांना विचारलें तुमचें देवांशी जमले कां–देव तुमचा सखा आहे का ?–तर नकारार्थी उत्तर येते. त्यांना हि देव डोळां दाखवीन म्हणून ग्वाही दिली आहे. या अभंगत आपलें अवतार कार्य–नाहीं देखीला तो डोळां । देव दाखवू सकळा । स्पष्ट सांगितलें आहे. आपणांस बाबाजी चैतन्यांनीं दिलेला, आवडीचा, सोपा, मंत्र जपल्यानें आपलें कार्य कसें झालें तें आठवून–सागतात.

॥ ७५ ॥

॥ नाहीं म्या वंचीला मंत्र कोणापाशीं । राहिलो मानसीं धरुनी तो ॥ १ ॥
॥ धृ ॥ वीटेवरी भावे ठेवीयेलें मन । पाउले समान चींतीतसे ॥ धृ ॥
॥ पाववीलां पार धरीला वीश्वास । घालुनीया कास बळकट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मागें पावले उद्धार । तीं ही हा आधार ठेविलासे ॥ ३ ॥

( ७५ ) मी माझा—रामकृष्ण हरि—हा मंत्र कोणापाशीं वंचिला नाहीं म्हणजे कोणास हि त्या मंत्रांतून वगळलें नाहीं. तो मंत्र हवा असून त्यास दिला नाहीं,—असें केलें नाहीं,—राम कृष्ण हरी हा मंत्र उघड आहे व तो मनाशीं घट्ट धरून मी आहे. विटेवर जीं पाउलें आहेत त्यावर—पूर्ण भावानें मी मन ठेविलें आहे. व त्या पाउलांचें सतत मी चिंतन करीत असतों. पूर्ण विश्वासानें बळकट कास घातल्यानें मी पैल पार झालों. तुका म्हणे — मागें श्रीज्ञानेश्वर—नामदेव उद्धार पावले त्यांनीं हा आपणास आधार ठेविला आहे. त्यांनीं जो आधार ठेविला,—सोपें करून जें वर्म सांगितलें तें स्वतः स्पष्ट करून सांगताहेत

॥ ७६ ॥

॥ चंचळें चंचळ नीश्चळें नीश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ सोपें वर्म परी मन नाहीं हातीं । हा हा भूत चीत्ती भ्रमगाढा ॥ धृ ॥
॥ रवी बींब नाहीं तुटत उदका । छायेची ती नका सरी धरूं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भय धरी रज्जुसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ३ ॥

( ७६ ) पाणी हें चंचल म्हटलें तर चंचल आहे,—निश्चळ म्हटलें तर निश्चळ हि आहे,—व खडकावर खळखळ करुन वाचतें हि. तसें मन हि म्हटलें तर चंचल आहे. पण तें चंचल असून हि निश्चळाचा अनुभव घेऊं शकतें. तेव्हां मनाचा धर्म जरी चंचलत्वाचा आहे तरी तें निश्चळाचा निश्चळ भोग घेऊं शकतें. तेव्हां मन हातीं नाहीं यांतील सोपें वर्म असें कीं तें निश्चळ असें कधी च राहूं शकत नाहीं. तेव्हां निश्चळ जो नारायण त्याच्या ध्यानांत त्यास ठेवणें म्हणजे—( सोपें वर्म आम्हां सांगितलें संती टाळ दिंडी हातीं घेऊनी नाचा— ) तें निश्चळ राहील. असें हें सोपें वर्म असून या भूतमात्राच्या ठिकाणीं केवढा गाढा भ्रम या चंचलत्वाचा व निश्चळत्वाचा पसरलेला आहे ! पाण्यामध्यें, सूर्याचा कवडसा पडला कीं पाण्याबरोबर त्याचा तुकडा पडत नाहीं. किंवा छाया कमी जास्त झाली असतांना मनुष्य किंवा आकृती कमी जास्त होत नाहीं. तसें

हें मन जोंवर चंचल गोष्टीनें व्यापलेलें असतें तोंवर तें चंचल असतें. नारायणाचा वेध लागला कीं निश्चळ होतें. जों पर्यंत दोरी—ही दोरी आहे असें स्पष्ट झाले नाहीं तों पर्यंत सापाच्या भासानें पोटीं भय उपजतें — पण हातांत घेऊन एकदा साप नसून ती दोरी च आहे अशी खात्री झाल्यावर कोणास भय वाटेल ! तेव्हां संसारांत

॥ ७७ ॥

**॥ देवाचीया माथा घालुनीया भार। सांडी कलेवर ओवालुनी ॥१॥**
**॥ धृ ॥ नाथीला हा छंद अभीमान आंगी। नीमीत्याचे वेगीं सारी ओझें॥धृ॥**
**॥ करुणा वचनीं लाहो एकसरें। नेदावे दुसरें आड येऊं ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे सांडी लटीकियाचा छंद। आनंद तो मग प्रगटेल ॥३॥**

(७७) देवाच्या माथां आपला सर्व भार घालून त्याचे वरून आपले कलेवर (शरीर) ओवाळून टाकावें. कांहीं तरी निमित्त्यानें अभिमान बळावून सारीं ओझीं आपल्या अंगावर पडलीं तर तो छंद फार पीडा देतो. तेव्हां आपण करुणापर वचनांनीं एकसरें—एकदम लाहो—त्वरा करावी व दुसरें कांहीं हि आड येऊं न देतां त्या लटिकियांचा संग टाकावा—म्हणजे चित्तांत आनंद प्रगट होतो. आनंदात् जायते खल्विदम् ।— अशी श्रुती आहे—तेव्हां तो आनंद कसा उत्पन्न होतो ते येथें सांगितले आहे.

॥ ७८ ॥

**॥ देह नव्हे मी हे सरे। उरला उरे वीठ्ठल ॥ १ ॥**
**॥ धृ ॥ म्हणउनी लाहो करा। काळ सारा चींतनें ॥ धृ ॥**
**॥ पाळणाची नाहीं चींता। ठाव रीता देवाचा ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे जीवासाठीं। देव पोटीं पडेल ॥ ३ ॥**

(७८) सत्तराव्या अभंगांत नाही देखीला तो डोळा देव दाखवूं सकळा। म्हणून जी प्रतिज्ञा केली आहे, तिचें स्पष्टीकरण चाललें आहे; पुढें सांगतात कीं; हा देह म्हणजे मी नव्हे, येवढी एक प्रतीति झाली कीं जें उरतें, तें उरलेलें, तो विठ्ठल. म्हणून त्वरा करा—व त्याच्या चिंतनांत काळ सारा. आपलें पालन कसें होईल ही चिंता नको. तुका म्हणे, तुम्ही आपला जीव विठ्ठलास वाहिलात तर देव पोटीं पडेल. देह नव्हे-मी हें सरे। उरला उरे वीठ्ठल—म्हणजे देव. यानंतर पुढे सर्व जगास सांगतात कीं देवाचा ठाव सदा सर्वांना मोकळा आहे. हा देव एवढ्या सोप्या रीतीनें दुसऱ्या कोणी हि दाखविला नाहीं.

॥ ७९ ॥

॥ पृथक मी सांगो कीती । धर्म नीती सकळां ॥ १ ॥
॥ धृ ॥ आवघीयांचा एक ठाव । शुद्ध भाव वीठलीं ॥ धृ ॥
॥ क्षर अक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आगमींचें । मथीलें साचें नवनीत ॥ ३ ॥

( ७९ ) प्रत्येकास मी धर्माचे व नीतींचे धडे कोठें देत बसू ? विठलीं शुद्ध भाव असणें–विठल सर्व काहीं सांग करील–सर्व कांहीं त्याच्या सत्तेनें सांग होत असतें असा भाव असणें– ही एक च गोष्ट–मूळ ठिकाणीं पाववील. वेदाचे क्षर व अक्षर याचे मंथनांतून जें खरें ( साच ) ( मथीलें ) लोणी निघाव-याचें–तो पुरुषोत्तम–पढरीस विटेवर देव उभा आहे. तेव्हां पढरीस जाण्याची त्वरा करा. ती च गोष्ट पुढील अभगात अधीक स्पष्टपणें सांगताहेत.

॥ ८० ॥

॥ नको आतां पुसो कांहीं । लवलाही उसंती ॥ १ ॥
॥ धृ ॥ जाये वेगी पंढरपुरा । तो सोयरा दीनाचा ॥ धृ ॥
॥ वचनाचा न करी गोवा । रीघे देवा शरण ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कृपावंता । बहु चींता दीनांची ॥ ३ ॥

( ८० ) आतां कमी जास्त विचारीत बसूं नको, त्वरा कर व सवड कर व त्वरेनें पंढरपुरास जा–तेथें दीनाचा सोयरा भक्तांची वाट पहात कटावर कर ठेवून विटेवर उभा आहे. तेथें वचनाचा गोवा करूं नको, म्हणजे क्षर व अक्षर यांची चर्चा करीत बसू नको, म्हणजे शब्दजालांत सांपडू नकोस. शास्त्राच्या पाठीस लागूं नको. देवास शरण जा. तुका म्हणे त्या कृपावतास दीनांची दया फार आहे. म्हणून

॥ ८१ ॥

॥ बुद्धीहीना जडजीवा । नको देवा उपेक्षूं ॥ १ ॥
॥ धृ ॥ परीसावी हे विज्ञापना । आम्हां दीना दासांची ॥ धृ ॥
॥ चींतुनीया आले पाय । त्यासी काय वंचन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पुरुषोत्तमा । करी क्षमा अपराध ॥ ३ ॥

( ८१ ) देवा आमच्यासारख्या बुद्धीनें जड जिवाची उपेक्षा करूं नको. आम्हां दीन दासांची एवढी विज्ञापना आपण ऐकावी. विज्ञापना अशी कीं– जे

तुमचे पाय चिंतून पंढरपुरास येतील त्यांची वंचना करूं नका. तुका म्हणे, पुरुषोत्तमा, तुम्हांस जो शिण आमच्यापासून होत आहे त्याबद्दल अपराध क्षमा करा.

॥ ८२ ॥

॥ जे वीतो तो माझा पीता । उखता तो उखत्यांचा ॥ १ ॥
॥ धृ ॥ जनार्दनीं सरतीं कर्मे । वाते भ्रमे अन्यत्रे ॥ धृ ॥
॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरीतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खांद्यापानें । सींचीतां भीच्च कोरडीं ॥ ३ ॥

(८२) जो हे अवघे वीश्व वीतो—तो अवघा—सर्वांचा, अवघ्यांचा—पिता आहे. तेव्हां तुम्ही कांहीं कर्म केलेंत तरी ते जनार्दनीं च सरतें व्हावयाचे (सव्या) मध्यें अपसव्य सामावलें आहे अशी शुद्धी न धरितां जर तुम्ही सव्य अपसव्य याच्या वाता मारुन अन्यत्र भ्रमांत हिंडत राहाल तर फसाल. कारण मुळास पाणी न घालतां जर खांद्या पानें तुम्हीं सिंचूं म्हणाल तर तीं कोरडीं राहतील. तेव्हां सर्व वर्ण्या वाईट—सव्य—अपसव्य—वृत्तींचा प्रकाशक प्रभू आहे हे ध्यानांत आलें म्हणजे मूळ सिंचन झालें. पहिली ओळ वाचतांना पहिल्यापासून नकल करणारांची चूक झाली असावी. जे बद्दल जो असावें असें मला वाटतें.

॥ ८३ ॥

॥ वंचूनीयां पींड । भाता दान करी लंड ॥ १ ॥
॥ धृ ॥ जैसे याचे चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥ धृ ॥
॥ मेला राखे दीस । जाले पणें जाला वोस ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । लोभें न पवे ची सेवा ॥ ३ ॥

(८३) बाप जीवंत असतांना त्यास जेवावयास न घालतां त्यास फसवून, स्वतः पोटभर जेवून, म्हणजे बापाचा पिंड समोर उभा आहे, तो तूं देशील तो घास तोंडांत घालण्यास तयार आहे, अशा वेळीं त्यास पिंडरक्षणार्थ अन्न न देतां, तो गेल्यावर त्यास पिंड देऊन जो कावळ्यांना खावयास पिंड देतो तो लंड होय. तेव्हां आपण देवा जवळ साच भावानें जात आहोंत किंवा कसें हें ज्याच्या त्याच्या चालीवर आहे. तेव्हां आपण देव, धर्म, कांहीं लोभानें केलें तर तो देवास पावत नाहीं. कारण देवाजवळ, देवदर्शनास, जाण्याचें कारण, सेवा करण्याचें कारण, साच नसल्यामुळें ती देवास पावत नाहीं.

॥ ८४ ॥

॥ पुण्य वीकरा तें मातिचें गमन। भाडी ऐसें धन वीटाळ तो ॥ १॥
॥ धृ ॥ आत्महत्यारा हा वीपर्यांचा लोभी। म्हणावें ते नाभी करवी दंड ॥ धृ॥
॥ नागवला अल्प लोभाचीयेंसाठीं। घेऊनी काचवटी परीस दीलहा ॥ २॥
॥ तुका म्हणे हात झाडीले परत्रीं। श्रम तोची श्रोत्रीं वेठी केली ॥ ३॥

( ८४ ) पुण्याचा वीकरा हें मातेशीं गमन केल्यासारखें आहे. तें मिळविलेलें धन विटाळाचें आहे, व तो विटाळ भाडया ( भडव्याच्या ) च्या कुंटणपणाच्या विटाळासारखा आहे. ज्यानें पुण्यविकरा केला तो स्वतःचा घात करतो. व, त्या, लोभानें उचारूं नयेत त्या गोष्टी करतो, व दंड भोगतो. हा पुण्यविकरा करणारा अल्पशा लोभासाठीं नागवला जातो. कारण तो काच घेऊन परीस देतो. तुका म्हणे – या श्रोत्रीयांनीं परत्रीं हात झाडले व व्यर्थ श्रम केले. वेठीस बिगारी धरावा तसें झालें.

हा अभंग अति झणझणीत आहे. पैसे देऊन व घेऊन जे यज्ञयाग – पूजा – कीर्तन–श्राद्ध पक्ष करिताल–करवितात या सर्व–बदली–मुनीम देऊन पुण्य कर्म करविण्याबद्दल तुकोबास काय वाटत होतें ते या अंभगांत स्पष्ट मांडलें आहे. मुनीम देऊन केलेलें पूजन व्यर्थ आहे. हें सांगितल्यावर खरें पूजन कसें तें पुढें सांगताहेत.

॥ ८५ ॥

॥ अंतरींचें ध्यान। मुख्य या नांवें पूजन ॥ १ ॥
॥ धृ॥ उपाधी तें आवघें पाप। गोड नीरसतां संकल्प ॥ धृ॥
॥ आज्ञा पाळाची हा धर्म। जाणते हो जाणा वर्म ॥ २॥
॥ तुका म्हणे वृत्ती। अविट ते सहज स्थिती ॥ ३ ॥

( ८५ ) अंतरांत वर सांगितल्याप्रमाणें विठुरायाच्या सुंदर ध्यानाचा वेध असणें याचें नांव मुख्य (महा) पूजा. बाकी इतर सर्व उपाधी ( सर्व संकल्प ) यांचा निरास होणें–ही गोष्ट गोड आहे. विठुरायाचा अंतरांत वेध असतांना त्याची जी आज्ञा होईल ( म्हणजे ) आपण आपल्या बुद्धीनें–वृत्तीनें, कांहीं संकल्प न करतां, तो जी वृत्ती जागृत करील, ती पाळणें हा एक च धर्म आहे. ही गोष्ट वर्म म्हणून जाणावयाची आहे. तेव्हां ज्ञानमार्गीयानें ही वर्माची गोष्ट नीट समजून घ्यावी. तुका म्हणे ही जी सहज स्थितींत वृत्ति उठेल ती अवीट

असते. येथें भागवत धर्म सार रूपानें सांगितला आहे. जाणते हो जाणा धर्म म्हणूनं स्वतः महाराजांनीं बजावून सांगितलेली ही गोष्ट आहे. ही नीट समजून घेऊन उमजली च पाहिजे.

॥ ८६ ॥

॥ मूळ करणें सत्ता। नाहीं मीळत उचीता ॥ १ ॥
॥ धृ ॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ धृ ॥
॥ सागर सागरी। सामावेसी कैचीं थोरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भावें। शरण म्हणवीतां बरवें ॥ ३ ॥

( ८६ ) हे ब्रम्हांडाच्या जीवा, तुझी सेवा मी काय केल्यानें होईल तें सांग ना ! कारण, मी कांहीं केलें तरी तें त्या मूळ सत्तेला शोभेल–योग्य–होईल असें नाहीं. मी सागराएवढा मोठा झालों–तरी सागराचा हि सागर तूं–त्या तुला मी माझ्यांत कसा सामावून घेणार ! तुला माझ्यांत सामावीन अशी माझी थोरवी नाहीं. तेव्हां तुला जीवा भावानें शरण येणें हें च बरें. कारण तुला शरण येऊन तुझी नामावळी गाइल्यानें माझ्यांत वसत असलेल्या महादोषांची होळी होऊन आम्हांस–तुझें नाम गाणें –

॥ ८७ ॥

॥ बरवी नामावळी। तुझी महादोषां होळी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जाले आम्हांसी जीवन। धणीवरी हें सेवन ॥ धृ ॥
॥ सोपे आणी गोड। कीती अमृता ही वाड ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अच्युता। आमचा कल्पतरु दाता ॥ ३ ॥

( ८७ ) हेंच जीवन ( जगण्याचें साधन ) होऊन आम्हांस तें पोटभर सेवन करतां येईल–तें नाम सोपें आहे व अमृताहून किती तरी जास्त गोड आहे. तुका म्हणे अच्युता–( जेथें कधीं कांहीं चूक होणार च नाहीं असा) तूं आम्हांस कल्पतरू सारखा दाता आहेस–येवढें सांगून तूं कसा तें पुढें सांगतात –

॥ ८८ ॥

॥ घटीं अलीत असे रवी। अग्नी काष्ठामाजी तेवी।
॥ नारायण जीवीं। जीव साक्षी वर्तनें ॥ १ ॥
॥ धृ ॥ भोग ज्याचे तया अंगीं। भीन्न प्रारब्ध ते जगीं।

॥ वीचीत्र ये रंगीं। रंगे रंगला गोसावी ॥ धृ ॥
॥ देह संकलपा सारीखे। येक येकांसी पारीखे।
॥ सुखें आणी दुःखे। कर्मे अंगी त्रीवीधे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कोडें। नकळे तयासी सांकडे।
॥ त्याचीया नीवाडें। उगव्रे केले वींदान ॥ ३ ॥

(८८) घटांत सूर्यप्रकाश असतो—पण तो कांहीं घटानें बांधला जात नाहीं. लाकडांत अग्नी आहे, पण तो सुपुत असतो, तशी देहांत नारायणाची वसती असते व तो साक्षी म्हणून असतो, असें वेदांत सांगतो, वेदांत असें हि सांगतो, कीं, ज्याचा भोग त्याचें अंगीं असतो म्हणजे त्यास भोगावा लागतो. व ते भोग प्रारब्धा सारखे भिन्न भिन्न होतात. हा जीव संकल्पा सारखा देह धारण करतो, पण येक च इंद्रियांचा स्वामी विचित्र रंगांनीं रंगून सुख दुःख, त्रिविध कर्मे, करीत असतो. तेव्हां नारायण जो साक्षी होऊन देहांत राहातो असें आपण म्हटलें, तर मग हे सर्व भोग, हीं सुख दुःखें कोण भोगतो? नारायणाच्या सत्तेशिवाय कोणास कांहीं करतां येईल कां? संकल्प उठविणारा मालक तो च! सकल्प—प्रारब्ध—त्रिविध कर्मे या कांहीं वेगळ्या शक्ती नव्हत. तेव्हां या सर्व कोड्यांचा कर्ता करविता श्रीहरि आहे. हा निवाडा ज्याचा त्यास पटला नाहीं, त्यास या कोड्यांचें सांकडें आहे. व त्यांचा निवाडा कौशल्यानें करतां यावा म्हणून काकुळतीस येऊन म्हणतात:—

॥ ८९ ॥

॥ म्हणउनी काकुळती। येतों पुढता पुढतीं।
॥ तुम्हां असे हातीं। कमळापती भांडार ॥ १ ॥
॥ धृ ॥ फेडूं आले तो दरीद्र। तरी नलगे उशीर।
॥ पुढें अभयंकर। ठाया ठाव रंकासी ॥ धृ ॥
॥ कोठें न घाली धांव। याजसाठीं त्यजीली हांव ॥
॥ घेऊं नेदी वाव। मना केला नीरोध ॥ २ ॥
॥ कारणाच्या गुणें। वेळ काळ तो ही नेणे।
॥ तुमचीया कीर्तनें। तुका तुम्हां जागवी ॥ ३ ॥

(८९) हे कमलापती, हे निवाडा करण्याचें भांडार तुमचे हातीं आहे. तेव्हां तुम्हांस पुनः पुनः काकुळतीस येतो. तुम्ही आमचें दारिद्र्य फेडण्यास आलां आहांत, तर मग उशीर कां? या रंकास ठायीच्या ठायीं अभयकर द्या. कोठें

धावाधाव करावयास नको म्हणून तुमच्या अभयंकराच्या प्रसादानें हाव त्याजिली. मनास हाव वाटण्यास वाव च होत नाहीं, मनास विरोध च होतो. माझें लक्ष्य या कारणावर असल्यानें मला वेळ काळ कांहीं कळत नाहीं, तुका तुमचें कीर्तन करून तुम्हांस जागवीत आहे. हें कीर्तन कसें केलें हें पुढील अभंगांत सांगतात:

॥ ९० ॥

॥ बहु नांवें ठेवीली स्तुतीचे आवडी। बहुत या गोडी आली रस॥ १॥
॥धृ॥ बहु सोसें सेवन केलें वहुवस। बहु आला दीवस गोमट्याचा ॥ धृ ॥
॥ बहुतां पुरला बहुतां उरला। बहुतांचा केला बहु नट ॥ २॥
॥ बहु तुका जाला नीकटवरती। बहु काकुळती येऊंनीयां ॥ ३॥

(९०) मी स्वतःच्या आवडीनें तुम्हांस स्तुतीचीं पुष्कळ नांवें ठेविलीं त्या रसास गोडी पण फार आली–तो जो रस–ब्रह्मरस (ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस) निर्माण झाला तो बहुवस (फार) होता व त्याचें सोसा–सोसानें पुष्कळ सेवन केलें, त्यामुळें फार गोमट्याचा (सुखाचा) दिवस उजाडला. हा जो रस उत्पन्न झाला, तो बहुतांना पुरून उरलेला आहे. पुष्कळांचा पुष्कळ खेळ केला. अत्यंत काकुळतीस येऊन तुका झाला निकटवरती, देवाचें सानिध्य झालें.

७४ व्या अभंगात देव दाखवूं सकळां। म्हणून जें म्हटलें–तो कसा पहावयाचा तें या अभंगापर्यंत सांगितलें. आतां पुढें तुकोबा स्वतःचा व इहलोकाचा संबंध काय तें सांगतात.

॥ ९१ ॥

॥ इहलोकीं आम्हां वसतीचें पेणें। उदासीन तेणें देह भावा ॥ १ ॥
॥ धृ ॥ कार्या पुरतें कारण मारगीं। उल्लंघूनी वेगी जावें स्थळा ॥ धृ ॥
॥ सोंग संपादणी चाली तो वेव्हार। आत्यंतीक आदर नाहीं गोवा ॥२॥
॥ तुका म्हणे वेच लावीला संचीता। होईल घेतां देतां लाभ कोणां॥३॥

(९१) इह लोकीं आम्ही वस्तीस (पेणें) आलो आहोंत–(म्हणजे मुळचे आम्ही वैकुंठवासी। आलो याच कारणासाठीं॥ बोलीले जे ऋषी। साच भावें वर्ताया॥–) तेणें आम्हीं देहभावाबद्दल उदासीन आहोंत–कारण असें कीं ज्या कार्यापुरतें येथें मालकांनीं पाठविलें आहे तें कार्य पार पाडून वेगी–त्वरेनें आम्ही आपल्या स्थळास जावें हा आमचा निश्चय आहे. आतां व्यवहार आहे, तेव्हां जें सोंग करावें लागेल–त्याप्रमाणें त्याची संपादणी करीन, पण आत्यंतिक

आदराच्या गोवा—गुंनागुंत—कोठें च नाहीं. तुका म्हणे आम्हीं आपल्या संचीताचा विनियोग ( वेच ) करीत आहोंत—त्यांत जें देऊं—जें घेऊं त्यांत कोणास लाभ व्हावयाचा तो होईल. हा सचीताचा वेच कसा करीत आहेत तें पुढें सांगताहेत:—

॥ ९२ ॥

**॥ रोज कीर्दी जमा धरुनी सकळ । खतावीला काळ वरावरी ॥ १ ॥**
**॥धृ॥ नाहीं होत झाडयापाडयाचे लीगाड । हुजराती ते गोड सेवा रुजूं ॥धृ॥**
**॥ चोरी साठीं रदबदल आटाहास । जळो जीणें दास बहुतांचे ॥ २ ॥**
**॥ सावधान तुका नीर्भर मानसीं । सालझाडयापाशी गुंफो नेणे ॥ ३ ॥**

( ९२ ) सर्व रोजकीर्दी जमा करून काळ वरचेवर खताविला—म्हणजे *मागील जमा—नांवें—सर्व गोळा केली. नावें, बाकी, होती ती, जमा होती ती, त्याची* परस्पर गांठ घालून—काळाचा लाग वरचेवर काढून टाकिला. आतां साल अखेरीस हिशोबाचें लिगाड उरलें नाहीं. आतां करीन ती सर्व सेवा—हुजुरच्या दरबारात गोडपणें रुजू होईल. त्यांत, आंत एक, बाहेर एक, अशी चोरी नसल्यामुळें—कोणाशीं अट्टाहास करावयास नको, रदबदल नको—बहुतांचें दास्य नको. व तें लाजीरवाणें जीणें हि नको. आतां मला साल अखेरच्या हिशोबाचें भय नाहीं. तेव्हां तुका—आतां मानसीं सावधान असून निर्भर ( निर्भय ) आहे काळ वरचेवर कसा खतावला तें सांगताहेत.

॥ ९३ ॥

**॥ त्रीवीध कर्माचे वेगळाले भाव । नीवडूनी ठाव दाखवीले ॥ १ ॥**
**॥धृ॥ आलीयाचा झाडा राहील्याचा ठाव । सुखे गवरव संतां अंगीं ॥ धृ ॥**
**॥ हीशोबे आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं अन्य चालो येत ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे नाहीं पाप पुण्य संतीं । झाडयाची हुजती हातां आली ॥ ३ ॥**

( ९३ ) कर्म हें *त्रिविध कसें आहे—त्याचे वेगवेगळाले भाव कोणते हे निवडून* दाखविले. जें कर्म अंगावर येईल त्याचा झाडा ( निकाल ) कसा करावा—जें कर्म राहिलें ( क्रीयमाणाचें ) त्याचा ठाव कोणता हें दाखवून दिलें. तसें च *त्याच्या अंगीं सुख व गौरव कसा असतो हें हि दाखविलें. अशा रीतीनें हिशोबानें जें* सुख, जो गौरव, आपल्या वांट्यास येतो, तेथें दुसऱ्या कोणाचा जोर चालत नाहीं, व तें सुख, तो गौरव, सर्वांस प्रमाण होतो. तुका म्हणे आतां मला

पापपुण्याची खंती उरली नाहीं. कारण सर्व झाडा झाला आहे, सर्व हिशेब पटले आहेत अशाबद्दलची पोंच माझ्या हातीं आहे. पोंच कशी आहे त्यासाठीं स्वतःचें उदाहरण देत आहेत.

॥ ९४ ॥

॥ गोणी आली घरा । द्वाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥
॥ धृ ॥ भरी लोकांची पाटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ धृ ॥
॥ खवळली पीशी । हातां झोंबे जैसी लांसी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खोटा । रांडे संचीताचा सांठा ॥ ३ ॥

( ९४ ) घरीं गोणी भरभरून धान्य आलें–तेव्हां तें धान्य मी मुलांना खाऊं देईना–माउलीच्या कृपेनें आईतें भोजन करें असतें–तें पहाण्याची ही संधि होती. तेव्हां आमची पिशी खवळली व राक्षशिणी ( लासा ) सारखी माझ्या हाताला झोंबली व मला चोरटा, खाणोरी–मेला, दुसऱ्यांची पाटोरी भरतो म्हणून म्हणाली. पण या रांडेस ( रांड–जिचा नवरा मेला आहे अशी विधवा अथवा हा शब्द तुच्छता दाखविण्यास वापरतात. ) असें कळत नाहीं की संचीताचा सांठा खोटा आहे.

या अभंगांत तुकोबांनीं शेतावर बसून पांखरें हांकलून शेत राखण्याचें कबूल केलें व त्याबद्दल त्यांस अर्धा मण धान्य मिळावयाचें होतें. पुढें तें शेत तसें राखलें नाहीं असें पाहून त्या शेतकऱ्यानें पंचाईत करविली, तुकोबांनीं सर्व बाकीचें खत लिहून दिलें व पुढें त्यास पुष्कळ धान्य आलें. तेव्हां त्या शेतकऱ्यास द्यावयाचें तें धान्य दिल्यावर गोणी भरून धान्य घरीं आले तें पाहून आवलीस हर्ष झाला. पण तुकोबा म्हणाले यांतील अर्धा मण धान्य माझ्या कमाईचें व बाकीचें धान्य संचीताचा सांठा–तेव्हां त्या धान्यावर आपली सत्ता नाहीं. ही गोष्ट बायकोस कशी पटणार ! तेव्हां तिनें शिव्यांची लाखोली वाहिली. त्यास उत्तर म्हणून–तुकोबा म्हणतात मी गेल्यावर म्हणजे तूं रांड झाल्यावर या गोष्टींचा त्वां विचार करावा. आज माझ्या कमाईचें असेल तें तूं व मुलांनीं खावें. मला हा संचिताचा सांठा खोटा वाटतो व माझें तत्त्व असें कीं,

॥ ९५ ॥

॥ देवावरील भार । काढूं नये काहीं पर ॥ १ ॥
॥ धृ ॥ ताहान भुके आठवण । घडे तें बरें चींतन ॥ धृ ॥
॥ देखावी नीश्चींती । तें ची अंतर श्रीपती ॥ २ ॥
॥ वैभव सकळ । तुका मानीतो वीटाळ ॥ ३ ॥

( ९५ ) आपला देवावरील भार कोणत्या हि परीनें, प्रकारानें, कारणानें, काढूं नये. तहान भुकेच्या वेळीं देवाचें चिंतन घडतें तें बरें असतें. येथें ज्ञानेश्वरींतील.- कीं आपुली तान्हभूक नेणें। तेया नंकें तें तियेसी च करणें। तैसें अनुसरले मज प्राणें। तेयांचे मी काइसनी नलजे ९।३३६ या ओवीचा अनुभव पाहावयाचा निर्धार आहे. संचिताच्या सांठ्याच्या जोरावर निश्चिंती पहावयास जावें तो श्रीपतीशीं अंतराय पडतो–तुका–सकळ वैभव, विटाळ, आहे असें मानतों. याच्या उलट सचिताचा सांठा ज्यांना मानवतो ते म्हणतात कीं, देहीं उदासीन होऊन–सोवळा होऊन–नित्य कीर्तन करून काय होय ?

॥ ९६ ॥

॥ थुंकोनीयां मान। दंभ करीतो कीर्तन ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ जालों उदासीन देहीं। येका वीण चाड नाहीं ॥ ध्रु ॥
॥ अर्थ अनर्थ सारीखा। करुनी ठेवीला पारीखा ॥ २ ॥
॥ उपाधी वेगळा। तुका राहीला सोंवळा ॥ ३ ॥

( ९६ ) मान व दंभ यावर थुंकून कीर्तन करीत असतो. एका श्रीविठ्ठला वाचून मला कशाची हि चाड वाटत नाहीं; मी इतर सर्व गोष्टींबद्दल उदासीन आहे. अर्थ व अनर्थ हीं दोन्हीं सारखी च समजून मी बाजूस सारली आहेत व सर्व उपाधीपासून वेगळा, स्वतंत्र, अलग, होऊन मी सोवळा होऊन बसलों आहे. उपाधी वेगळा राहिला–तो सोवळा–ही सोवळा शब्दाची व्याख्या तुकाराम-महाराजांची आहे.

॥ ९७ ॥

॥ काय याचे घ्यावे। नीत्य नीत्य कोणे गावे ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ केले हरीकथेनें वांज। अंतरोनी जाते नीज ॥ ध्रु ॥
॥ काम संवसार। अंतरी हे करकर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हेड। ऐसे मानीती ते लंड ॥ ३ ॥

( ९७ ) रोज याचे काय घ्यावें ? नित्य नांव काय घ्यावें ? हरीकथेनें सर्व वांझ झालें आहे. आपला संसार आहे. आपलें काम आहे. त्यात ही हरीकथेची करकर कशास ? तुका म्हणे–मी अशा माणसास हेंड ( पशू ) व लंड ( लबाड चोर ) समजतो. अशा बोलण्यानें, नीजत्व अंतरतें. याउलट आम्हां वैष्णवाची राहणी कशी तें तुकोबा सांगतात.

॥ ९८ ॥

॥ साखरेचे नाम घेतां कळे गोडी। तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥
॥ धृ ॥ मोक्ष गांठीं असे ठेविला बांधोनी। सोस तो भजनीं आवडीचा ॥धृ॥
॥ भोजनाची चीता माय वाहे बाळा। आम्हांसी तो खेळा वरी चीत्त॥२॥
॥ तुका म्हणे आम्ही देह उपकारे। गाऊं नीरंतर नाचो लागी ॥ ३ ॥

(९८) साखर म्हटल्यानें जशी गोडी काय हें कळतें, निराळी सांगावी लागत नाहीं. तसें वैष्णव म्हटल्यानें, आम्हांस वैष्णवांची जोडी आहे, हें म्हटल्यानें मोक्ष हा आमच्या सहज च गांठीस बांधून ठेविला आहे व सहज च आम्हांस आवडीनें भजनाचा सोस असतो असें लक्ष्यांत यावें. आम्हां बाळांच्या भोजनाची चिंता आमची विठाई माय वाहते. आमचे चित्त सदा खेळावर असावयाचें. तुका म्हणे–आम्हांस नरदेह प्राप्त झाला आहे. हा आमच्यावर मोठा उपकार झाला आहे. तेव्हां आम्ही निरतर गाऊं व नाचूं. व प्रारब्ध, संचीत, क्रीयमाण या तत्त्वाप्रमाणें.

॥ ९९ ॥

॥ सुखें घेऊं जन्मांतरे। एक बरें इहलोकीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ पंढरीचे वारकरी। होतां थोरी जोडी हे ॥ धृ ॥
॥ हरी–दासांचा समागम। आंगीं प्रेम वीसावे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हे ची मन। इच्छा दान मागतसे ॥ ३ ॥

(९९) सुखानें या इहलोकीं जन्म घेऊं. या इहलोकीं एक गोष्ट फार चांगली असते कीं जे पंढरीचे वारकरी होतात त्यांस थोर जोडी होते. त्यांना हरीदासांचा समागम असतो. व त्यांच्या अंगीं प्रेम विसावते. तुका म्हणे माझें मन इच्छा धरून–(१) हरीदासांचा समागम–(२) अंगीं श्रीहरीचें प्रेम व (३) मला पंढरीचा वारकरी कर असें इच्छा–दान–मागत आहे. हें असें दान मागण्याचें कारण सांगताहेत कीं.

॥ १०० ॥

॥ करूं जातां सन्नीधान। क्षणें जन पालटे ॥ १ ॥
॥ धृ॥ आतां गोमटे ते पाय। तुझे माये वीठ्ठले ॥ धृ ॥
॥ हे तो आले अनुभवा। भाव जीवा धरेना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केला त्याग। सर्व संग म्हणउनी ॥ ३ ॥

(१००) लोकांची जवळीक (सन्निधान) करावयास जावें, तर लोक एका क्षणांत पालटतात. त्यांच्या वागणुकींत फरक पडतो. तेव्हां माये, विठ्ठले, तुझे पाय च गोमटे आहेत. जीवीताचा विचार करतां हा अनुभव आला—तुका म्हणे—म्हणून—जगाचा नीट अनुभव घेऊन सर्वसग त्याग केला आहे. जगाचा हा अनुभव कसा घेतला हें पुढील अभंगांत सागताहेत.

॥ १०१ ॥

॥ अनुभवें अनुभव अवघाची साधीला । तरी स्थीरावलें मन ठायीं ॥ १ ॥
॥ घृ ॥ पीटोनीयां मुसे आला अलंकार । दग्ध ते असार होउनीयां ॥ घृ ॥
॥ एक ची उरलें काया वाचा मन । आनंद भुवना माजी त्रया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आम्हीं जींकीला संवसार । होऊनी कींकर वीठोबाचे ॥ ३ ॥

(१०१) मन हें विठोबाच्या पायीं स्थीर असल्यामुळें अनुभवानें अनुभव घेत गेलों व सोन्याचा रस करून त्यात असार जळून जाऊन मुशींत ओतून सोनें तयार होतांच हातोड्यानें ठोकून जसा अलकार होतो—तशा अवघ्या अनुभवातून असार गोष्टी दग्ध होऊन—या भुवन त्रया माजी काया, वाचा, मन, यास एक च काम उरलें व तें म्हणजे हरीप्रीतीचा आनद. तुका म्हणे आम्ही विठोबाचे किंकर होऊन ससार जिंकीला.

विठोबाचे दास होऊन ससार कसा जिंकीला व भुवनत्रयामध्यें आनद कसा भोगीत आहेत ते सांगताहेत.

॥ १०२ ॥

[1] माउलीची चाली लेकराचे वोढी । तयालागीं काढी प्राण प्रीती ॥ १ ॥
॥ घृ ॥ ऐसीं बळीवंत आवडी जी देवा । संत महानुभावा वीनवीतों ॥ घृ ॥
॥ मोहें मोहीयेले सर्वकाळ चीत्त । वीसरु तो घेत नाहीं क्षण ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दीला प्रेमाचा वोरस । सांभाळीले दास आपुले ते ॥ ३ ॥

(१०२) सत महानुभावांस विनवून सागतो कीं या माउलीची चाली लेकराच्या ओढीनें असते आणि त्या लेकराच्यासाठीं प्रीतीनें आपला प्राण हि काढून देते. या माउलीचें चित्त लेकराच्या मोहानें सर्वकाळ मोहिलेलें असतें. व त्या लेकराचा क्षण भर हि तीस विसर पडत नाहीं. तुका म्हणे—प्रेमाचा वोरस देऊन ती आपले दास सांभाळते. 'माउली' हा शब्द तुकोबाचा अति आवडीचा आहे.

या तीन अभंगांत जगाची सगत करू गेलें तर जग पालटतें कसें व विठोबाची सगत केली तर तो सांभाळतो कसा हें सांगितलें आहे.

येथें तुकोबांस कोणी कांहीं शंका विचारून रसभंग केल्यासारखा दिसत आहे. हा ९४।९५।९६ मधील ओघ येथेंच खुंटतो. दुर्दैव म्हणावयाचें दुसरें काय!

॥ १०३ ॥

॥ क्षीर मागे तया रायते वाढी। पाधानी गधडी ऐशा नांवें ॥ १ ॥
॥ धृ ॥ समयो जाणा समयो जाणा। भलतें नाणा भलतेयें ॥ धृ ॥
॥ अमंगळ वाणी वदवी मंगळीं। अशोभे वोंगळी शोभन तें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नेणें समयो ठाया ठाव। राहाटी ते वाव नरकाडी ॥३॥

(१०३) जेवणाऱ्यानें मागावी खीर व वाढणारणीनें वाढावें रायतें अशा पाधाणी (खाणावळीण) स गधडी असें म्हणतात. अरे, वेळ काय आहे हें ओळखा. समय जाणा. भलती च गोष्ट भलत्या च ठिकाणीं काढूं नये. मंगल कार्य चालूं आहे त्यांत अमंगळ बोलूं नये. अशुभ ठिकाणीं वोंगळ गोष्ट खपते तुका म्हणे—समय ठाव ठीकाणा जे जाणत नाहींत त्यांची रहाणी ही नरकांडी—नरकास नेणारी आहे.—या वोंगळ रहाणीचें च पुढें स्पष्टीकरण करीत आहे.

॥ १०४ ॥

॥ वींचा पीडी नांगी। ज्याचा दोष त्याच्या आंगीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ केला पाहीजे वीचार। मन मीत्र दावेदार ॥ धृ ॥
॥ मधुरा उत्तरीं। रावा खेळे उरावरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वेठी रेडा। दुखें जाती ऐशी पीडा ॥ ३ ॥

(१०४) ज्याच्या अंगाचा जो दोष असतो तो त्यास पीडा करितो. विंचवास त्याच्या नांगीनें पीडा होते. तेव्हां आपलें मन हें मित्र व्हावयाचें कां दावेदार, शत्रू, व्हावयाचें याचा ज्याचा त्यानें च विचार केला पाहिजे. मधुर शब्दानें लोक, पोपट हातीं—खांदीं—छातीवर खेळवितात, विंचवास जोड्यानें मारतात व रेड्यास वेठीस धरतात.

॥ १०५ ॥

॥ तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म। जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥ १ ॥
॥ धृ ॥ बहु बरी ऐसी भावीकांची जोडी। काळ नाहीं घडी वाया जात॥धृ॥
॥ करुनी चींतन करवावे आणीकां। तो या जाला लोका नाव जगीं ॥२॥
॥ तुका म्हणे ऐसे पर उपकारी। त्यांच्या पायावरी माझी डोई ॥ ३ ॥

(१०५) तीर्थाच्या अपेक्षेनें जागच्या जागीं धर्म वाढतो. याचें वर्म जाणावें कारण त्यांत बहु पुण्य आहे. जे भाविक घडीभर हि काळ वाया जाऊं

देत नाहींत, ऐशा भाविकांची जोडी पुष्कळ बरी. जे लोक स्वतः चिंतन करून दुसऱ्यांकडून करवितात ते या जगांत लोकांना नावे सारखे होतात. तुका म्हणे- ऐसे जे पर उपकारी आहेत त्यांच्या पायावरी मी डोई ठेविलेली च आहे.

॥ १०६ ॥

॥ कां जी माझे जीवीं। आळस ठेवीला गोसावी ॥ १ ॥
॥ धृ ॥ चींतनासी अंतराय। येवढा घात आणीक काय ॥ धृ ॥
॥ देह आत्मवादी। केला घात कुबुद्धी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मन। कळवळे वाटे सीण ॥ ३ ॥

( १०६ ) अहो गो ( इंद्रियें ) यांचे स्वामी, माझ्या ठिकाणीं हा एवढा आळस कां ठेविलात ? त्यामुळें चिंतनांत अंतर पडतें. तेव्हां या सारखा दुसरा घात तो काय आहे ? देह व आत्मा या वादानें, या कुबुद्धीनें, घात होतो. या मुळें देवा, मन कळवळतें व शीण वाटतो.

॥ १०७ ॥

॥ भयाची तों आम्हां चीत्तीं। राहो खंती सकेना ॥ १ ॥
॥ धृ ॥ समर्पीलो जीवें भावे। काशा भावें कारणें ॥ धृ ॥
॥ करीन तीं कवतुकें। अवघे नीके शोभेल ॥ २ ॥
तुका म्हणे माप भरूं। दीस सारूं कवतुकें ॥ ३ ॥

( १०७ ) आमच्या चित्तांत भयाची खंती च नसते—आम्हीं जिवाभावानें देवाला देह समर्पिला आहे तें काय उगी च कांहीं तरी भावाशिवाय होतें काय ? तेव्हां आतां मी जें कांहीं कवतुकानें करीन तें नीकें ( चांगलें ) शोभेल. तुका म्हणे दिवस कवतुकानें सारू व आयुष्याचें माप भरू.

हे माप भरून दिवस कसे कौतुकानें काढीत आहेत तो उपदेश पुढें सांगताहेत.

* ॥ १०८ ॥ *

॥ अरे गीळीले हो संवसारें। कांहीं तऱ्हीं राखा खरे।
॥ दील्हा करुणाकरें। मनुष्य देह संत संग ॥ १ ॥
॥ धृ ॥ येथे न घला न घला आड। संचीतसा शब्द नाड।
॥ उठा उठी गोंड। बीजे बीज वाढवा ॥ धृ ॥

॥ केलें तें क्री ( य ) माण । जालें तें संचीत जाण ।
॥ प्रारब्ध तया म्हणं । उरउरीत होईल तें ॥ २ ॥
॥ चीत खोटे चाली वरी । रोग भोगाचे अंतरीं ।
॥ रसने अनावरी । तुका म्हणे ढुंग वाहे ॥ ३ ॥

येथपासून देहूकरांच्या घरांत पूजेंत असलेल्या वहींतील जीं पृष्ठें आज विद्यमान आहेत त्यांस सुरवात होते. अभंग १०८-११८ हे अभंग वहींतून प्रसाद म्हणून बाहेर गेलेले होते, तें पृष्ठ आतां माझे जवळ आहे.

( १०८ ) अरे संसारानें गिळिलों आहोंत म्हणून तक्रार करणाऱ्यांनों, जरा विचार करा. कांहीं तरी खऱ्याची चाड धरा. तुम्हांस त्या दयाघनांनीं मनुष्य देह दिला आहे नां-तोच संत-सग आहे. तेव्हां येथें सांचित असा शब्द आड घालून नाड उत्पन्न करूं नका-नाड उत्पन्न करूं नका. उठाउठीं ( सहज ) गोड बीज वाढवा. केलें तें क्रियमाण, जालें तें सचीत जाण, व जें शिल्लक राहिलें आहे त्यास प्रारब्ध म्हण. चित्त हें केव्हां हि खोट्या चालीवर असतें- भोगाचे अंगीं च रोग असतो व रसना अनावर झाली कीं तुका म्हणे ढुंग वाहे. तेव्हां उठाउठीं गोड बीजें बीज वाढवा. तें कसें करावयाचें, तर निश्चयानें सागत आहेत कीं:—

* ॥ १०९ ॥ *

॥ वदे साक्षेत्वेंसी वाणी । नारायेणीं मीश्रीत ॥ १ ॥
॥ धृ ॥ न लागे कांहीं चाचपावे । जातो भावें पेरीत ॥ धृ ॥
॥ भांडार त्या दातीयाचे । मी कईचें ये ठाईं ॥ २ ॥
॥ सादावीत गेला तुका । येथें येका येकी तो ॥ ३ ॥

( १०९ ) माझी वाणी नारायणानें निश्रित आहे या साक्षित्वानें मी बोलत आहे. मला कांहीं चाचपावें लागत नाहीं. मला त्या गोष्टींची प्रत्यक्षता असल्यामुळें ( भावें ) सरळ सत्य वचन पेरीत जातो. हें भांडार-धन-त्या दात्याचें आहे-व हें काम माझ्या अंगावर एकाएकीं-अवचित आलें आहे.

तेव्हां स्वतःच्या अभंगवाणीबद्दल केवढा आत्मविश्वास ( प्रत्यक्षता असल्यामुळें ) होता हें पाहण्या जोगें आहे.

* ॥ ११० ॥ *

॥ मजुराचे पोट भरे । दाता उरे संचला ॥ १ ॥
॥धृ॥ यारे या रे हातोंहातीं । काम माती साराची ॥ धृ ॥

॥ रोजकीर्द होतो झाडा। रोकडाची पर्वत ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खोल पाया। वेचो काया क्लेशांसी ॥ ३ ॥

( ११० ) सादावीत गेला तुका। – तो काय सांगत आहे ? मजुराचें पोट भरल्यानें दात्याच्या सचितपणांत म्हणजे श्रीमतींत कांहीं कमी होत नाहीं, तसें मी येथें किती हि उपदेश केला–लोकांनीं तो उपदेश ऐकून आपलें हित करून घेतलें तरी पंढरीरायास कांहीं कमी पडणार नाहीं–तसा च मी हि सचला आहे, मला हि तुम्हांस भरभरून दिलें तरी कमी पडणार नाहीं–तेव्हां हातोहात झटकन आपल्या कामावर माती सारून–या मार्गावर या रे, या रे, येथें रोज झाडा निकाल होतो व येथें व्यवहार रोकडा आहे, उधारीचा नाहीं. तुम्हीं जर पायास खोळ घालून याल म्हणजे पूर्वमहांनीं दूषित असे याल–तर कायेचे क्लेश होऊन जेचाल एवढें च–माणसाच्या पायांत कसली खोळ असते तें सांगताहेत:—

* ॥ १११ ॥ *

॥ केवढा तो अहंकार। माझा तुम्हां नव्हे दुर ॥ १ ॥
॥धृ॥ आतां कोण पडे पाया। तुमच्या अहो पंढरी राया ॥ धृ॥
॥ कां जी कृपेनें कृपण। वेचत असे येसे धन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवे। दुजीयाचे पोते न्यावे ॥ ३ ॥

( १११ ) अहो पंढरीराया, माझा अहंकार हा येवढा का बाऊ करून का आहे ! तुम्हांस तो दूर करतां येत नाहीं कां ? माझ्या ठिकाणीं अहंकार वास करीत असतांना तुमच्या पायां कोण पडणार ? कारण अहंकारी मनुष्य कोणाच्या पाया पडतो कां ? किंवा तुम्ही पदरींचें धन वेंचेल म्हणून कृपेनें कृपण झालांत ? व माझा अहंकार दूर करीत नाही ? तुका म्हणे हें अहंकाराचें पोतें दुसऱ्याचें आहे, त्याचा, अहंकाराचा, भार देवानें कां वाहवा ? भावार्थ असा कीं, केव्हां हि वाहूं नये.

या व वर इंद्रियाची तक्रार केली त्या, सर्व अभंगांत एक गोष्ट स्पष्ट आहे कीं स्वतःस जी जड वाटेल ती दूर करण्याबद्दल कींव भाकावयाची, प्रार्थना करावयाची, ती सुद्धां पंढरीरायाची च करावयाची

* ॥ ११२ ॥ *

॥ येसी जीहुवा नीकी। वीठल वीठल कां न घोकी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जेणें पावीजे उधार। तेथे राखावे अंतर ॥ धृ ॥

॥ गुंपोनी चावटी । तेथे कोणां लाभें भेटी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कळा । देवा वीण अमंगळा ॥ ३ ॥

( ११२ ) हें जें वर अहंकाराचें गाऱ्हाणें सांगितलें–तें बहुधां अशासाठीं असावें कीं या जिव्हेस विठ्ठल विठ्ठल असा सोपा मंत्र घोकावयाचे सुदून इतर गोष्टी बोलाव्यात असें वाटूं लागलें असावें–म्हणून म्हणतात–ही जिव्हा विठ्ठल विठ्ठल हा तीन अक्षरी मंत्र कां घोकीत नाहीं ? त्यामुळें ही जिव्हा उद्धार पावेल पण ती तेथें अंतर राखीत आहे. चावटपणांत गुंफून तेथें कोणास लाभाची भेटी झाली आहे कां ? तुका म्हणे–देवा वीण ज्या ज्या कळा तुम्ही कराल त्या सर्व अमंगळ होत.

तीं च गोष्ट पुढें ज्यास्त स्पष्ट करीत आहेत

* ॥ ११३ ॥ *

॥ साजे अलंकार । तरी भोगीता भ्रतार ॥ १ ॥

॥ घृ ॥ वीभचारीचा टाकमटीका । उपहास हातीं लोका ॥ घृ ॥

॥ शुरत्वाची वाणी । रूप मीरवे मंडणीं ॥ २ ॥

॥ तुका म्हणे जीणें । शेतीं वीण लाजीरवाणें ॥ ३ ॥

( ११३ ) कोणत्या हि बाईनें अलंकार घातले, शृंगार केला व भ्रतार त्या सर्व गोष्टींचें सुख भोगण्यास असला तर ठीक. नाहींतर व्यभीचारणीचा टाकमटीका घडून लोका हातीं उपहास होतो. तशीं या जिव्हेनें अलंकार, साज, करावयाचे, ज्या कला करावयाच्या, त्या विठ्ठलाकरतां कराव्यात, परव्हीं व्यभिचारीचा टाकमटीका. तुका म्हणे – कांहीं तरी ध्येयाशिवाय जगणें हें लाजीरवाणें असतें. तशी या जिव्हेस जी करामत करावीशी वाटेल ती तिनें देवाशीं करावी, तेव्हां वाणी जर शुरत्वाची हवी, तर ती तसल्या च रूपानें मंडीत असावी

* ॥ ११४ ॥ *

॥ अपराधी म्हणउनं येतों काकुल्तीं । नाहीं तरी हीतीं काय चाड ॥१॥

॥घृ॥ येईल तारूं तरी तारा जी देवा । नाहीं तरी सेवा घ्या हो भार ॥ घृ ॥

॥ फासया मी आतां वंचुं हें शेरीर । आहे बारगीर जाईजनें ॥ २ ॥

॥ तुका म्हणे मनें करुनी मोकळें । आहें साळें टाळें उदार मी ॥ ३ ॥

( ११४ ) मी सर्वतोपरी अपराधी आहें म्हणून काकुल्तीस येतों, नाहीं तर काकुल्तीस येण्याचें कारण काय होतें ? तेव्हां तुम्हांस जर मला तारतां

येईल तर तारा–नाहीं तर या सेवेचा भार तुमचे माथ्यावर द्या. आता मी हें शरीर उगा च कशासाठीं वेंचू–त्याची व्यर्थ काळजी का वाहू ? कारण मला जे हे सर्व साज चढविले आहेत ते उसने आणलेले आहेत तेव्हा ज्याचा जो तो अलकार काढन घेईल च मी मोकळया मनाचा उदार, साधा भाळा, असा आहे.

असा साळा ढाळा=साधा भोळा उदार मी असल्याचें लक्षण काय ?

* ॥ ११५ ॥ *

॥ माझे तों फुकाचे कायेचे ची कस्ट । नव्हे क्रीया नस्ट तुम्हा ऐसा ॥१॥
॥धृ॥ कांहीं च न वेंचीं आजीचां प्रसंगीं । सकळा ही आंगीं करीनं पुजा॥धृ॥
॥ द्यावे कांहीं तुम्ही हे तो नाहीं आस । असो या उदास देहे भावे ॥२॥
तुका म्हणे माझी मावळली रती । समाधानं चीत्तीं सर्वकाळ ॥ ३॥

( ११५ ) माझे हे शरीराचे कष्ट फुकट होत आहेत मी तुमच्या सारखा क्रियानष्ट नव्हे तेव्हा आजच्या प्रसगीं मी इतर काहीं न वेंचता सर्व अगानीं तुमची देवा पूजा करीन तुम्ही मला काहीं द्यावेत अशी मला आस नाहीं व मी या देहभावानें उदास आहें तुका म्हणे–माझी रती मावळली आहे व माझ्या चित्तात सदा समाधान नादत आहे मावळली हा शब्द विशेष सूचक आहे

मावळली म्हणजे ती क्रिया आपोआप झाली. त्यासाठीं मी प्रयत्न केला नाहीं पुढील चरणात ईश सत्ता स्वामी सेवा जे काम ( १०९ ) आपल्या सत्तेनें करते म्हणून म्हटलें आहे त्याचा हा परिणाम अगोदर सागून ठेविला. रतीं मावळून चित्तीं समाधान कसें नादत आहे तें सागताहेत:—

* ॥ ११६ ॥ *

॥ स्वामींचीया सता । अधीक वर्म येत हाता ।
॥ पुढती वीशेसता । लाभे लाभ आगळा ॥ १ ॥
॥ धृ ॥ करी कवतुकाचे बोल । परी जीहुवाळयाची वोल ।
॥ आवडे रसाळ । मायबापा लाडाचे ॥ धृ ॥
॥ मंनं मेळवीले मंनां । नाहीं अभावी स्याहाणा ।
॥ अंतरीन्या खुणा । वरी दीरह्या उमंदुनीं ॥ २ ॥
॥ हीं पराक्रम काळा । अवघ्या जागवीलया वेळा ।
॥ दयासी नीराळा । तुका क्षीण न सोडी ॥ ३ ॥

( ११६ ) स्वामीन्च्या सत्तेनें अधिक वर्म हातीं लागलें म्हणजे कोणत्या हि गोष्टींतिल तत्त्व स्पष्ट स्पष्ट होत जातें–व मग पुढें लाभानें लाभ वाढावा तसा विशेष लाभ होतो. माझे बोल या लाभाच्या कौतुकाचे असे आहेत–मायबापास माझे लाडाचे रसाळ बोल–त्यांत जिव्हाळ्याची ओल असते म्हणून आवडतात. मायबाप–मनांत मन मिळवून अंतरी च आपल्या खुणा प्रकट करतात. अभावीक मनुष्य हा कांहीं शहाणा नाहीं. तुका देवास क्षणभर हि वेगळा सोडून नाहीं. त्या मुळें मला सायास करावे लागत नाहींत, कोणती हि गोष्ट काळगतीवर टाकावी लागत नाहीं. तर तुका देवास कीर्तन करून सदोदित जागवीत असतो. ही पराश्रम काळा–या चरणाचा अर्थ मला स्पष्ट झाला नाहीं: पहिल्या चरणांत मूळ पोथींत " अवीक " असा शब्द आहे. पण तो प्रचलित छापील गाथ्यांच्या प्रकाशकांस चुकल्यासारखा वाटून त्यांनीं आधीं हा शब्द घातला परंतु लाभे लाभ आगळा कसा हे अविक हा शब्द स्पष्ट करीत आहे. माझ्या चित्तांत समाधान नांदत असून कोणत्या हि गोष्टीची खती नाहीं हें वर सांगितलें, तसें च एके ठिकाणीं मायबाप व मी अन्नग्रहण करितों, तसें च मी शहाणा होऊन नारायणाच्या आड लपतों म्हणून नारायणानें आपल्या सत्तेनें अधिक वर्मे हातीं दिलीं तीं कोणती तें सांगतात कीं मनांत मन मिळवून अंतरीं खुणा प्रकट केल्या.

* ॥ ११७ ॥ *

॥ येके ठाई अंनं पाणीं । ग्रासोग्रासीं चींतनीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ वेळोवेळां जागवीतो । दुजें येईल म्हंणुं भीतो ॥ धृ ॥
॥ नाहीं हींण्डत उपचारी । मांनं दंभाचे वेव्हारीं ॥ २ ॥
॥ तुका जालासे स्याहाणा । आड लपे नारायणा ॥ ३ ॥

( ११७ ) मी व माझा मायबाप अन्न घेतांना–पाणी पितांना–प्रत्येक घासांत व माझ्या चिंतनांत येके ठायीं असतो. वरील अभंगांत म्हटल्याप्रमाणें–देवासी निराळा तुका क्षण न सोडी । व आमच्यांत दुसरा कोणी शिरेल म्हणून भिऊन असतो. मी मानदंभाच्या कोणत्या हि व्यवहारांत किंवा उपचारांत हिंडत नाहीं, सांपडत नाहीं, म्हणजे देवाच्या पूजाअर्चा–यांचे खेळ मांडून–उपचार करून–मान मिळवीत नाहीं. दंभ करीत नाहीं. तुका शाहाणा आहे. म्हणून तो या मानदंभांत, उपचारांत, सापडत नाहीं. तर आड लपे नारायणा, येथें तुकोबांनीं आपल्या शहाणपणाचें कारण सांगितलें आहे. देवाशीं ऐक्य किती हे हि या अभंगांत सांगितलें व भेद केल्यावर–झाल्यावर–तुका स्वतंत्र होऊन उद्योग काय

करतो तर तुका जालासे शहाणा। आड लपे नारायणा। हा चरण हरीपाठीं स्थिरावला तो चि धन्य या सिद्धरहणीस धरून आहे. केवढी श्रेष्ठ अवस्था आहे ही!!!

या अभंगांत मातें जाणोनि कांहीच नेण। तु तुसीया होसी। या ज्ञानेश्वरीच्या ओवीचा ( ९। ३३० ) तुकोबा अनुभव घेत आहेतसे दिसते.

* ॥११८॥ *

॥ अभयाचें स्थळ। तरी हे येक अचळ ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ तरी धरला वीश्वास। ठेलों होउनीयां दास ॥ ध्रु ॥
॥ पुरली आवडी। पाई लागलीसे गोडी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाम। कंठी आंगीं भरलें प्रेम ॥ ३ ॥

( ११८ ) हें जें स्थळ आहे तें अभयाचें व अचळ असें आहे. म्हणून विश्वास धरला व दास होऊन उभा राहिलों त्यामुळें माझी आवडी पुरली चरणसेवेची मला गोडी लागली आणि नाम, हें मी देवाचें वर्म म्हणून कंठीं धारण केलें आहे. हें भक्तहृदयाचे केवढें सुंदर दर्शन आहे. १०२ या अभंगापासून हा जो भक्तीप्रेमाचा ओघ वाहतो आहे. यांत आपणास चरणा चरणास तुकोबांचें स्वरूप पहावयाचें आहे. दास होऊन ठेलों अंगीं प्रेम भरलें आहे. याची प्रतीति कशी भोगणार तें सांगताहेत.

* ॥ ११९ ॥ *

॥ समसाणी आम्हां न्याहीळीचें सुख। या नांवें कयतुक तुमंची कृपा॥
॥ध्रु॥ नाहीं तरी वाया अवघें ची नीर्फळ। शब्द ते पोकळ बडबडेचे ॥ध्रु॥
॥ झाडें झुडें जीव सोईरें पाश्याण। होती तई दान तुम्हीं केलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां पाहेन अनुभव। घेईन हातीं जीव पांडुरंगा ॥ ३ ॥

( ११९ ) देवा तुमच्या कृपेचें कवतुक असें असावें कीं आम्हांस स्मशानांत नेऊन बसविले तरी ती तेथें तुझें सान्निध्य असल्यामुळें आम्ही गाद्यागिरद्यांवर लोळत आहोत असें च आम्हांस वाटावें. असें जर नसेल तर तुमची माझ्यावर कृपा झाली आहे हे शब्द, पोकळ, बडबड, आहे असें होईल. तुम्हीं आपल्या कृपेचें दान मला दिलें आहे–हें मी–झाडें–झुडें जीव इतर प्राणी व पाषाण हे मला माझे सोईरे आहेत, असें वाटेल, तेव्हां खरें समजेन. तुका म्हणे, देवा, मी आतां हातीं जीव घेऊन तुमच्या कृपेचा अनुभव पाहीन.

* ॥ १२० ॥ *

॥ संदेहे नीरसे तरी रुचीकर। फीक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां नको मज खोट्यानें फटउं। कोठें येउ जाउ वेळो वेळां ॥धृ॥
॥ गेला तरी काय जीवाचें सांकडें। वाचउनी पुढें काय काज ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कसीं नीवडा जी बरें। केली तैसी पोरें आळी पाई ॥

( १२० ) तुझ्या सान्निध्याबद्दल संदेह निरास पावेल ती स्थिति रुचीकर आहे, फिक्याबद्दल आदर हि नाहीं, व चवी हि नाहीं. तेव्हां देवा, मला खोट्याचा चाळा लावून फसऊं नका, व कोठें जाण्यायेण्यास लावूं नका. जीव गेला तर त्याचें काय मोठें सांकडें, संकट, आहे व तुमच्या सान्निध्याशिवाय जगून तरी काय करावयाचें आहे! म्हणून तुका म्हणेः—खरें खोटें—कसास नीट लावून निवडा अशी या मुलानें पायीं आळी केली आहे. हा कस कोठें लावावयाचा तर, ज्ञानी—वेदांती यांचे शब्द पोकळ वडबडीचे असतात. तसे माझे नसावेत.

* ॥ १२१ ॥ *

॥ वदे वाणी परी दुर्लभ अनुभव। चालीचाचो वाहो बहुतेक ॥ १ ॥
॥धृ॥ आम्ही यैसें कैसें राहावें सीतळ। पाठीलगा काळ जीततसे ॥ धृ ॥
॥ वाढवीतां पोट दंभाचे पसारे। येतील माघारे मुदला तोटे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वरें जागवीतां मंनां। तुमच्या नारायणा अभयेंकरें ॥ ३ ॥

( १२१ ) माझी वाणी नारायणीं मिश्रीत आहे. तेव्हां वेदांच्या सारखी माझी वाणी वदली व तो अनुभव दुर्लभ असा जो सध्यां प्रवाद वेदवाणीबद्दल चालू आहे—तसें माझें नसावें. काळ पाठीशीं हात धुवून लागलेला आहे. तेव्हां आम्हीं थंडाई करून कसें चालेल. दंभाच्या पोटीं पसाऱ्यानें पोट वाढविलें तर मुद्दलांत तूट येईल—तेव्हां देवा, तुम्ही आपल्या अभयकरानें मनास नेहमीं जाग देत रहा. जागवीत—असा शब्दप्रयोग करण्याचें कारण असें कीं हीं गोष्ट एकदां झाली कीं तशी च सदा राहील असें नाहीं. मनाचा स्वभाव च असा कीं तें चंचळ असावयाचें—तेव्हां तुम्हीं जाग सारखी देत रहा.

* ॥ १२२ ॥ *

॥ उगें चीं हें मंन राहातें नीस्चळ। तरी कां तळतळ साद होती ॥ १ ॥
॥धृ॥ काये तुमचीं नेणों कवतुक वीदानें। सर्वोत्तमपणें खेळतसा ॥ धृ ॥

॥ नाणां छंदे आम्हां नाचवावें जीवां। वाढवाव्या हावां भलत्या पुढें ॥२॥
॥ तुका म्हणे तुम्ही आपली प्रतेस्टा। वाढवया चेस्टा करा देवा ॥ ३॥

(१२२) हें मन निश्चळ होऊन उगे च रहातें तर मग तळनळीचा ध्वनी कां ऐकूं येतां ? पण मुळांत च तें तसें नाहीं देवा, तुमच्या कौशल्याचें कवतुक किती करावें—तुम्ही सर्वोत्तम पणानें खेळ मांडतां—आम्हां जीवांना नाना छंदांनीं भलत्या हावा वाढवून नाचवितां, व देवा, स्वतःची प्रतेस्टा वाढावी म्हणून चेस्टा तरी किती करतां ? ११९ व्या अभंगांत समसाणी आम्हां न्याहाळीचें सुख। अशी स्वर्गसुखाच्या उलट बाजू मांडली त्या सुखाचें वर्णन या चार अभंगांत आहे. तेथें उर्वशीसारख्या नृत्यांगना चेस्टा करितात येथें प्रेमसुखांत देव आपली प्रतेस्टा वाढावयासाठीं चेस्टा करीत असतो. करा तुम्ही चेस्टा *पण त्या चेस्टा आहेत असें ओळखून—आम्ही काय करू :—*

* ॥ १२३ ॥ *

॥ आम्हीं वळकट जालों फीराउनीं। तुमंच्या वचनीं तुम्हां गोउं ॥१॥
॥धृ॥ जाले तेव्हां जालें मागील तें मागें। आतां वर्म लागे ठांवीं जालीं॥धृ॥
॥ तोडावा अवघ्या चेस्टांचा संबंध। सुध्या पासीं शुध बुध व्हावें ॥२॥
॥ तुका म्हणे आम्हां अत्मत्वाची सोये। आपण हीं होये तैसा च तुं ॥

(१२३) आम्हीं तुमच्या सान्निध्यांत बळकट झालों आहोंत. तेव्हां आम्ही तुमचें च वचन फिरवून त्यांत तुम्हांस गोवूं. तुम्ही जो अभयकर दिला आहे त्याची तुम्हांस आठवण देत राहूं. मागें आम्ही काय फसलों असूं तें असूं—ती मागील गोष्ट झाली गेली. आतां—तुमच्या लागानें, सान्निध्यानें, तुमची वर्में माहीत झालीं, तेव्हां आतां या अवघ्या चेस्टांचा संबंध तोडा व माझ्या सारख्या शुद्धमनाच्या माणसाशीं शुद्ध व बुद्ध पणानें वागा. तुका म्हणे आम्हांस आत्मत्वाची स्वतः वरून जग ओळखण्याची संवय आहे. तेव्हां मी तसे च तुम्ही तेव्हां तुम्ही आमच्यापाशीं चेष्टा करून त्यांत आम्हांस गोऊं नका. आतां मी स्वतःचें मन तुम्हांस सांगूं कां—

* ॥ १२४ ॥ *

॥ तुम्हीं साच नुपक्षाल हा भरवसा। मज जाणतसा अधीरसा ॥ १ ॥
॥धृ॥ कासया घातला लांबणीं उधार। ठेवा करकर वादनीयां ॥ धृ ॥

॥ सुटों नये ऐसें कळलें नीरुतें। कां घ्यावें मागुतें आळउनी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्ही समागे जी देवा। माझा तुम्हां केवा काये आला ॥३॥

(१२४) तुम्ही माझी कधीं हि उपेक्षा करणार नाहीं असा मला साच भरंवसा आहे. मी स्वभावानें अधीर आहे हें हि तुम्हांस माहीत आहे. तेव्हां माझ्या उद्धाराचें काम लांबणीवर कां टाकतां? एकवार ही करकर वारून कां ठेवीत नाहीं? तुम्हांस हें निरुतें–स्पष्ट–कळलें ना कीं ही करकर तुमच्या पाठीची कधीं चुकणार नाहीं. मग माझ्याकडून इतकी आळवणी करून कां घेतां? देवा तुम्ही सभाग्य आहांत तेव्हां माझा तुम्हांस एवढा कसला केवा (थोरपणा) वाटतो? कीं माझ्याकडून सारखी आळवण करून घेतां. ही आळवण च पुढें चालू आहे.

* ॥ १२५ ॥ *

॥ आलीया याचका म्हणतां पुन्हाडें। आपलें रोकडें सत्त्व जातें ॥ १ ॥
॥धृ॥ काय काम भार घेउनीं मस्तकीं। हीण कर्मीं लोकीं म्हणावया ॥धृ॥
॥ दारीं हाका कैसे करवीते भोजन। रुची तन्ही अन्न कैसें देतें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ध्वज उभारीला कर। ते शक्ती उदार काये जाली ॥ ३ ॥

(१२५) दारांत याचक उभा आहे–त्याला पुढें व्हा–असें म्हणण्यांत आपलें सत्व रोकडें (स्वच्छ) जातें! डोक्यावर कोणत्या कामाचा भार घेऊन लोकांत आपली प्रतिष्ठा वाढवयासाठीं तूं हीण कर्मीं गुंतला आहेस? वा याचक दारांत हाका मारीत उभा आहे, त्यास आंत न बोलावितां आपलें जेवण चालूंच आहे. तेव्हां जेवण करविते तरी कसें! तें अन्न रुचीनें गिळविते तरी कसे! देवा तुम्ही भक्त सांभाळाच्या ध्वजा लाविल्यात–ती तुमची उदार शक्ती गेली कोठें?

* ॥ १२६ ॥ *

॥ तुम्हां होईल देवा पडीला वीसर। आम्ही तें उत्तर येत्न केले ॥ १ ॥
॥धृ॥ पतीत पावन ब्रीदें मीरवीशी। याचा काय देसी झाडा सांग ॥ धृ ॥
॥ आहा च मी नव्हें अर्थाचे भुकेलें। भलत्या येका बोलें यारईन तें ॥२॥
॥ तुका म्हणे देह देईन सांडणें। सहीत अभीमानें वोवाळुनीं ॥ ३ ॥

(१२६) देवा कालांतरानें तुम्हांस विसर पडला असेल. पण आम्ही तें उत्तर, तें अभयाचें उत्तर जीवाशीं घट्ट धरून बसलों आहोंत, एवढा च

आमचा यत्न आहे. तेव्हां पतित पावन म्हणून जीं ब्रीदें जगांत मिरवीत आहेस त्याचा झाडा, हिशोब, काय देशील तें सांग बरें. कोणा कोणा पतितांना पावन करून पदरांत घेतलेस तें सांग बरें. मी अहाच=कांहीं तरी, अर्थानें द्रव्यानें, भुकेलेला नाहीं, कीं कांहीं तरी बोलानें तूं मला वारूं शकशील बाजूस सारशील. मी माझ्यापुरतें एवढें सांगतों कीं मी हा देह तुझ्यावरून ओवाळून टाकला आहे व असा देह ओवाळून टाकला आहे हा अभिमान सुद्धां तुझ्यावरून ओवाळून टाकला आहे. भलत्या एका बोला वारईन ते। ही चेस्टा देवांनीं सुरू केली तेव्हां म्हणताहेत.

* ॥ १२७ ॥ *

॥ मानामान कीती। तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ १ ॥
॥ धृ ॥ जा रे चाळवी बापुडी। कोणी धरीती ती गोडी ॥ धृ ॥
॥ रीधी सीधी देसी। आम्हीं चुंभळे नव्हो तैसी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ठका। आसे नागवीले लोकां ॥ ३ ॥

( १२७ ) मान, अपमान आणि इतर क्षुल्लक संपत्ति मला दाखवितोस? जारे—जीं बापुडी त्या गोष्टींची गोडी धरतील त्यास त्या गोष्टी देऊन मूळ गोष्टींची चाळवाचाळव कर—जा—रे—हा जोड शब्द काय जोराचा व निश्चयाचा आहे. हो, हो, तूं रिद्धी सिद्धी देऊं म्हणतोस—आम्हीं तशीं चुंभळें आशाळभूत आहोंत असें कां तुला वाटलें—तसें वाटले असेल तर आम्हीं तशी नव्हांत बरें. तुका म्हणे अरे ठका, लोकांस अशा तऱ्हेनें नागविलें आहेस, तेव्हां माझ्या जवळ तुझी लटपट चालणार नाहीं. तेव्हा आतां पहातोस काय. पाय पुढें कर, तुझ्या पायावर मला मस्तक ठेऊं दे—

* ॥ १२८ ॥ *

॥ पाहातोसी काये। आतां पुढें करी पाय ॥ १ ॥
॥ धृ ॥ वरी ठेउं दे मस्तक। ठेलों जोडुनी हस्तक ॥ धृ ॥
॥ बरवें करी सम। नको भंगों देऊं प्रेम ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चला। पुढती सामोरे वीठला ॥ ३ ॥

( १२८ ) तुझ्यासमोर मी हात जोडून उभा आहे. तेव्हां वाट कोणाची व कसली पाहतोस, असें आतां सम वें बरवें कर—माझें प्रेम भंगूं देऊं नको. तुका म्हणे चला—विठ्ठलास—सामोरे चला, येथें रूपाचा सगुण आकार समोर

गोचर झाला असावा—म्हणून मला तुझ्या पायांवर डोकें ठेवूं दे. पुढतीं सामोरे विठ्ठला चला, हे उद्गार आले असावेत.

* ॥ १२९ ॥ *

॥ प्राण समर्पीला आम्हीं । आतां उसीर कां स्वामी ॥ १ ॥
॥ धृ ॥ माझें फेडावे उसींणें । भार न मना या रीणे ॥ धृ ॥
॥ जाला कंठस्फोट । जवळी पातलों नीकट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । कैसी बरी वाटे सेवा ॥ ३ ॥

( १२९ ) स्वामी आम्हीं तुम्हांस प्राण समर्पिला आहे. तेव्हां आतां विलंब कां ? माझें उसनें फेडावें—या ऋणाचा तुम्हांस भार वाटूं नये. माझा कंठ—स्फोट झाला व ( आम्ही ) जवळ निकट येऊन उभे आहोंत. तुका म्हणे देवा, माझी सेवा घेणें तुम्हांस गोड कसें वाटतें ? मी जवळी पावलों निकट म्हणून सांगितलें तेव्हां त्या स्थितींत मी काय करूं शकेन—तें सांगताहेत.

* ॥ १३० ॥ *

॥ जडलों आंग आंगीं । मग ते ठेवी प्रसंगी ।
॥ कांहीं उरी जोगी । लोकीका हे पुरती ॥ १ ॥
॥ धृ ॥ ठेवी नीवारुनी आधीं । आवकाश तों च बुद्धी ॥
॥ सांपडली संधी । मग बळ कोणासी ॥ धृ ॥
॥ गळा बांधईन पायीं । हालों नेदी ठाईच्या ठाई ।
॥ नीवाड तो तई । अवकळा केलीया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ठावें । तुम्ही असा जी वरवे ।
॥ बोभाटाची सवें । मुळीं हुणं वीठोबा ॥ ३ ॥

( १३० ) एकदां का मीं तुमच्या अंगास अंग भिडविलें कीं मग त्या प्रसंगीं लोकीका पुरती हि तुमच्या माझ्यांत उरी, अंतर, भीड, ठेवणार नाहीं. तेव्हां तो प्रसंग आधीं च निवारून ठेवा—कारण तशी मस्ती करण्यास अवकाश सापडून मला ( मस्ती करण्याची ) बुद्धी झाली कीं मग अधिक बळ कोणाच्या अंगीं राहील, असेल, हें कांहीं मला सांगतां येणार नाहीं. मी बळ कसें करीन म्हणून म्हणाल तर ऐका. मी माझा गळा तुमच्या पायाला बांधीन व तो इतका घट्ट बांधीन कीं तुम्हाला त्या ठिकाणावरून जागच्या जागीं सुद्धां हालतां येणार नाही. बरें, तुम्ही माझी जर अवकळा केली तर त्या च क्षणीं तुमचा

माझा निवाड होईल. तेव्हां ही गोष्ट तुम्ही नीट समजून ठेवा. बाकी देवा, तुम्हांला बोभाटाची–भक्ताकडून आरडाओरड करून घेण्याची फार संवय, बोवा. तुका म्हणे ठावें। तुम्ही असाजी बरवें।–या चरणाचा अर्थ मला स्पष्ट झाला नाहीं।–तेव्हां तो बोभाट करण्यापूर्वी मनुष्य जशा चार समजुतीच्या गोष्टी सांगतो–तसें म्हणतात.

* ॥१३१॥ *

. ॥ आम्ही शक्ती हीणें। कैसें कराल तें नेणें।
॥ लीगाडाच्या गुणें। खोळंबला राहीलो ॥ १ ॥
॥ धृ ॥ माझें मज देई देवा। आहे ठेवीला तो ठेवा।
॥ नाहीं करीत हेवा। कांहीं अधीक आगळा ॥ धृ ॥
॥ नाहीं गळां पडीलों झांड। तुमचे तें च माझें तोंड।
॥ चौघा चार खंड। लांवणीं हें अनुचीत ॥ २ ॥
॥ नाहीं येत बळा। आतां तुम्हांसी गोपाळा।
॥ तुका म्हणे गळा। उगवा पाया लागेतों ॥ ३ ॥

( १३१ ) देवा आम्ही शक्तीहीन आहोंत हें कबूल, स्वपराक्रमानें आपला उद्धार करूं हें शक्य नाहीं. तुम्ही आमचा उद्धार कसा कराल हें हि मला कळत नाहीं. आम्हीं कित्ती तरी लिगाडाच्या गुणांनी खोळंबून, अडकून, राहिलों आहों. तेव्हां तुमच्याजवळ जो ठेवा ठेविला आहे तो मला द्या. तुम्ही दुसरें कांहीं मला द्यावेंत असा मी हेवा करीत नाही. मी झोंडपणें तुमच्या गळ्यांत पडलों नाहीं. तुमचें तें च माझें तोंड आहे. (तूं बोलसी माझे मुखें–) असें म्हटलें नाहीं. तेव्हां चार चौघांत जाऊन मग खंड द्यावयाचा हें तुमच्यासारख्या थोरा मोठ्यांना अनुचित–तुका म्हणे गोपाळा, मी तुमच्याशीं दांडगाई करीत नाहीं. हात-घाईवर येत नाहीं. मी तुमच्या पायां पडतों व तुम्ही माझा गळा उगवा–सोडवा.

* ॥१३२॥ *

॥ काये कृपेवीण घालावें सांकडें। नीश्चींती नीवाडें कोण्या येका ॥ १ ॥
॥धृ॥ आहों तैसीं पुढें असों दीनपणें। वेचुनी वचनें करुणेची ॥धृ॥
॥ धरूं मये आतां काये वाहो चींता। काय करुंसां अन्नपणें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आम्ही भाव हीण जीव। म्हणउणी देव दुरे दुरी ॥ ३ ॥

( १३२ ) देवा तुम्ही कृपा करणार अशी निश्चिती असल्याशिवाय निवाड्याची गोष्ट, निकाल करा, तुमच्याजवळ जो ठेवा आहे तो परत करा, असें तुम्हांस

सांकडें, संकट, कसें, घालावें ? तेव्हां आम्ही दीनपणानें आहोंत तशा च स्थितींत करुणेनें आळवण करून दीनपणानें असूं. आतां भय तरी किती धरूं–चिंता तरी किती करूं, तुम्ही आप्तपणानें, आपलेपणानें काय करूं तें सांगा. देवा आम्ही भावहीन जीव आहोंत, म्हणून कां, तुम्हीं आम्हांपासून एवढें दूर–आहांत ?

* ॥१३३॥ *

॥ नाहीं उलंघीलें कोणाचें वचन । मज कां नारायेण दुरी जाला ॥१॥
॥धृ॥ अशंकीत मनें करीं आळवण । नाहीं समाधान नीश्चीतींचें ॥ धृ ॥
॥ दासांचा वीसर हें तो अनुचीत । असे सर्व नीत पाया पासीं ॥२॥
॥ तुका म्हणे तुम्हां लाज येती नाहीं । आम्हां चींता डोहीं बुडवीतां ॥३॥

(१३३) देवा मी कोणाचा हि शब्द ओलांडला–डावलला–नाहीं–माझ्या जवळ कोणी कांहीं मागावयास आला तर त्याचे ठिकाणीं ती कल्पना तुम्हीं च उठविली आहे, अशा भावनेनें–तो शब्द उचलून धरला–पाळला. असें मी करीत असतांना, मला नारायण दूर आहे असें कां बरें वाटतें? यामुळे माझें मन आशंकित होऊन–आळवण करीत आहे, पण निश्चित असें वाटत नाहीं कीं तुम्हीं माझें समाधान कराल च म्हणून. आपल्या पायाजवळ मी नीति–वागण्याची रीत–काय हें सांगावें असें नाहीं, पण श्रीमंतांना दासांचा विसर व्हावा ही कांहीं रीत नव्हे. तुका म्हणे देवा, आम्हांस चिंतेच्या खाईत बुडवितां, मन सदा साशंक असतें याची तुम्हांस कांहीं च लाज वाटत नाहीं? यात तुम्हांस कमीपणा आहे, असें तुम्हांस वाटत नाहीं ?

* ॥१३४॥ *

॥ जीव जाये वरी सांडी करी माता । हे तो अस्चीरता बाळकाची ॥१॥
॥धृ॥ दुबळ कीं नाहीं आईकत कानीं । काय नारायेणीं नीउन जालें ॥ धृ ॥
॥ क्षीण क्षीणां माझा नेघावा सांभाळ । अभाग्याचा काळ येसा आला ॥२॥
॥ तुका म्हणे नाहीं वचनासी रुची । फळकट वेची ते ते होय ॥ ३ ॥

(१३४) जीव जाई पर्यंत एखाद्या आईनें जशी आपल्या बालकाची उपेक्षा करावी–तशी तुम्ही माझी करीत आहांत–ही या जगांत नवलाईची गोष्ट आहे. तुम्हांस कोणत्या तरी गोष्टीची वाण आहे का ? तुमची शक्ती कमी होऊन तुम्हांस माझा धावा कानानें ऐकूं येत नाहींसा झाला का ? माझ्या अभाग्यानें दुर्दैवानें–कम नशिबानें–असा काळ आला, कीं हरएक क्षणीं तुम्हीं माझा सांभाळ

करावा—तसें होत नाहीं. तुका म्हणे जसें एखाद्यानें फटकळपणानें वचन वेचावें तसें माझें होत आहे. माझ्या शब्दास रुची येत नाहीं, रुची येईल असं तुम्हीं वागत नाहीं.

* ॥ १३५ ॥ *

॥ म्हणउनी दास नव्हे येसा जालो। अनुभवे बोला स्वामी पुढें ॥१॥
॥धृ॥ कां नाहीं वचन प्रती उतराचे। मी च माझ्या वेचे अटाहासें ॥ धृ ॥
॥ कासयाने गोडी उपजावा वीस्वास। प्रीती कांहीं रस यांचुनीयां ॥२॥
॥ तुका म्हणे अगा चतुरा सीरोमणी। वीचारावे मनीं केसीराजा ॥३॥

( १३५ ) किंवा स्वामी तुम्ही असें तरी बोला कीं ( अनुभव पहाता ) तू कांहीं आमचा खरा दास नाहींस. कारण मी तसा दास असतों तर तुमचे कांहीं तरी मला प्रत्युतर आलें असतें. तेव्हा मी च अट्टाहासानें माझी वचनें वेचीत आहे तुमच्याकडून कांहीं प्रीतीचा रस आमचे अंगावर येऊन गोडी उपजल्या-शिवाय आम्हीं विश्वास तरी कसा धरावा? तुका म्हणे, अगा चतुरा—शिरोमणी, केशीराजा, आपल्या मनास जरा जाब विचारा.

* ॥ १३६ ॥ *

॥ काये आम्हो आतां पोट ची भरावे। जग चाळवावे भगत म्हुणं ॥१॥
॥धृ॥ येसा तरी येक सांगा जी वीचार। बहु होतो फार कासावीसी ॥धृ॥
॥ काये कवीत्वाची घालुनीया रुढी। करु जोडा जोडी अक्षरांची ॥२॥
॥ तुका म्हणे काये गुंपोनी दुकानां। राहो नारायेणां करुनी घात ॥ ३ ॥

( १३६ ) देवा, ( १ ) आम्हीं मोठे हरिभक्त असें म्हणवून घेऊन जग चाळवावें व पोट भरून रहावें किंवा ( २ ) अक्षराची जोडाजोडी करून कवि-त्वाची रुढी घालून राहू, का ( ३ ) पुन. दुकानात बसून घात करून घेऊ—असा काहीं तरी निश्चितीचा विचार सांगा या दोन्हीं तिन्हीं विचारानीं माझा जीव कासावीस होत आहे.

* ॥ १३७ ॥ *

॥ वर्म तरी तुम्हीं दावा। काये देवा जाणे मी ॥ १ ॥
॥धृ॥ बहुतां रंगीं ही ( ण ) जालो। तरी आलो शरण ॥ धृ ॥
॥ घाल तरी तुम्हो धीर। होईल स्थीर मन ठाई ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सता बळें। लडीवाळे राखावीं ॥ ३ ॥

( १३७ ) जिवीताचें वर्म काय–हें कांहीं मला समजत नाहीं. तेव्हां तें तरी तुम्ही दाखवा. मी पुष्कळ रंग ढंग करून हीन झालों म्हणून तुम्हांस शरण आलों आहे. तुम्ही धीर घाल तर मन एका ठिकाणीं स्थीर होईल. देवा, आम्हीं, तुमचीं, लडिवाळ मुलें, तुम्ही आम्हांस आपल्या सत्ताबळानें राखावें.

* ॥ १३८ ॥ *

• ॥ सांगों काय नेणा देवा। बोलवा तें आवडी ॥ १ ॥
॥धृ॥ वाया मज चुकूर करा। वीश्वंभरा वीनोदें ॥ धृ ॥
॥ आवडीच्या करा येसें। अंतर्वासें जाणतसा ॥ १ ॥
॥ तुका म्हणे समाधानें। होईन मनें मोकळा ॥ ३ ॥

( १३८ ) देवा अशी काय गोष्ट आहे की ती आवडीच्या बोलानें, तुम्हांस माहीत नाहीं अशी, तुम्हांस सांगावी. विश्वंभरा, तुम्हीं आन्तरवासानें सर्व जाणत आहांत–तेव्हां तुमच्या आवडीस येईल तसें करा व विनोदानें माझी चुकुर हि माफ करा. चुकुर=गोंधळून जे शब्द बाहेर पडतात ते. तुम्हीं माझें समाधान केलेत तर मी मनानें मोकळा होईन म्हणजे माझी वाया चुकूर मिटेल.

॥ १३९ ॥

॥ नीर्धाराचें आवघे गोड। वाटे कोड कवतुक ॥ १ ॥
॥धृ॥ बैसलीया भाव पाई। बरा तई नाचेन ॥ धृ ॥
॥ स्वामी कळे सावधान। तरी मनें उल्हासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आश्वासावे। प्रेम द्यावे वीठले ॥ ३ ॥

( १३९ ) देवा तुम्ही माझें एकवार समाधान केलेत म्हणजे मग माझ्या मनाचा निर्धार होऊन अवघें गोड होईल. कोड कवतुक वाटेल, व तुमच्या पायीं भाव ठेऊन चांगला नाचेन. हि. स्वामीचे आपलेकडे सावधान चित्त आहे असें कळल्यानें मनास केवढा उल्हास येतो. म्हणून तुका म्हणे–तुम्ही आम्हांस आश्वासन द्यावेंत व विठ्ठले प्रेम द्यावें.

॥ १४० ॥

॥ जाली तडा तोडी। अवघीं पडीलो उघडी ॥ १ ॥
॥ धृं ॥ नव्हो कोणाची च कांहीं। तुझे भरलीये वाहीं ॥ धृ ॥
॥ पारुपला संवसार। मोडली बैसण्याची थार ॥ २ ॥
॥ आतां म्हणे तुका। देवा अंतरें राखों नका ॥ ३ ॥

( १४० ) हा सारखा प्रेमाचा एका ओघानें पूर वाहतो आहे ! सध्यांची आमुची स्थिती विचाराल तर तुमची आमची तडातोडी झालेली आहे आणि आम्ही उघडीं पडलों आहोंत. तुमच्या या भरलेल्या पुरांत आम्ही कांहीं जशीं कोणाचीं कांहीं च नव्हत. आमचा संसार पारुषला=तुच्छ झाला, त्यामुळें जगांत बसण्याची जी जागा होती ती मोडली. तेव्हां तुका म्हणे–देवा, आतां तुम्ही मला अंतरावर ठेवू नका. संनसार तुच्छ झालेला आहे. तेव्हां

॥ १४१ ॥

॥ आधार तो व्हावा । येसी आस करी देवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुम्हां पाशीं काय उणे । काय वेचे समाधाने ॥ धृ ॥
॥ सेवेच्या अभीलासें । मन बहु जालें पीसे ॥ २ ॥
॥ अरे भक्त पराधीना । तुका वीनवी नारायणा ॥ ३ ॥

( १४१ ) देवा, तुमचा मला आधार व्हावा ऐशी आस करून आहे. माझें समाधान केल्यानें तुमचें काय वेंचणार आहे ? वरें तुम्हापाशीं कशाची कमतरता आहे, असें हि नाहीं. तुमच्या सेवेच्या अभिलाषानें माझें मन पिसें झालें आहे. नारायणा, तूं भक्त पराधीन आहेस भक्तांचा सर्वस्वीं अंकीत आहेस म्हणून मी ही विनंति करीत आहे.

॥ १४२ ॥

॥ तुमचा तुम्ही केला गोवा । आतां चुकवीतां देवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ कैसें सरे चाळवण । केलं काशाला स्याहाणे ॥ धृ ॥
॥ कासया आला रुपा । नांवा आलेती गा बापा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां । न सरे हावाले घालीतां ॥ ३ ॥

( १४२ ) देवा, तुमचा तुम्ही गोवा केलात, म्हणजे माझ्या प्रेमांत गुंतलांत, आणि आतां मला चुकवितां ! तेव्हां हें चाळवणें चालणार कसें ? आम्हास तुम्ही ज्ञान देऊन शहाणे कशाला केलेत ? बा, बाप्पा, तुम्ही नांवारूपास कां आलेत–तेव्हां आतां हवाले घालणें कांहीं चालणार नाहीं.

तुका म्हणे आतां । न सरे हवाले घालितां–कारण

॥ १४३ ॥

॥ माझी भक्ती भोळी । येक वीध भाव वळी ॥ १ ॥
॥ धृ ॥ मी कां पडेन नीराळा । यैसा सांडुनी सोहळा ॥ धृ ॥

॥ आतां अनारीसा। येथे न व्हावे सहसा ॥ १ ॥
॥ तुका म्हणे जोडुनी पाये। पुढे उगा उभा ठाये ॥ ३ ॥

(१४३) देवा, माझी भक्ति एकवीध व भोळी आहे. तेव्हां तुमच्या प्रेमाच्या सोहाळा सांडून मी वेगळा कसा पडेन! येथें—तुमच्या प्रेमसोहळ्यात मी सहसा अनारिसा—वेगळा—होऊ नये. तुका म्हणे मी (हात) पाय जोडून तुमच्यासमोर उभा आहे.

॥ १४४ ॥

॥ आहे तरी सत्ता। येशा करीतो वारता ॥ १ ॥
॥ धृ ॥ अंग संगाची उतरे। सलगी सेवन लेकुरे ॥ धृ ॥
॥ तरी नीकट वासे। असो आशंकेच्या नासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे रुची। येथें भीन्नता कैची ॥ ३ ॥

(१४४) देवा माझी सत्ता तुम्हांवर आहे म्हणून ऐशा वार्ता, गोष्टी, मी करितों. लेकराचीं हीं अगसंगाचीं उत्तरें हीं सलगीनें सेवन करावयाची असतात—आमच्या शकेच्या नाशानें आम्ही निकटवासी झालों आहोंत. तुका म्हणे येथें भीन्न रुची कैची?
गतीचा ओघ येथें पूर्णतेस आला.

॥ १४५ ॥

॥ भक्त ऐसे जाणा जे देही उदास। गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥
॥धृ॥ विषय तो त्यांचा जाला नारायण। नावडे धन जन माता पिता ॥धृ॥
॥ निर्वाणीं गोविंद असे मागे पुढे। कांहीं च सांकडे पडों नेदी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सत्य कर्मा व्हावे साहें। घातलिया भये नर्का जाणे ॥३॥

(१४५) भक्त जे असतात—ते देहाबद्दल उदास असतात, त्यांचे आशा पाश पार त्यास गेलेले असतात. नारायण हा एक च त्यांचा विषय होऊन बसतो व त्यांस धन, जन, माता, पिता, यापैकीं कशाचा हि लोभ नसतो. गोविंद हा त्यांस मागें पुढें सभाळीत उभा असतो, व त्यांस (भक्तांस) गोविंद कसलें हि सांकडें, सकट, पडूं देत नाहीं, तुका म्हणे, देवा, मी जें सत्य कर्म करीत आहे त्यांस साहाय्य करावेत. भय घातलेत, तर आम्ही नर्कास हि जाऊ, वर, नावडे धन जन माता पिता। म्हणून सांगितलें—त्यांचा लोभ वाटला तर नर्कास जाऊं म्हटलें—पण तुम्ही माझ्या सत्य कर्मास साहाय्य व्हाल अशी

खात्री वाटते—वरील १४५ अभंगांत म्हटल्याप्रमाणें आशंकेच्या नाशानें—आम्ही निकटवासी आहोंत असें आम्हांस वाटत आहे म्हणून

॥ १४६ ॥

**॥ तो ची हीं क्षुल्लक सखीं सहोदरें। नाहीं वीश्वंभरे वोळखी तों ॥ १ ॥**
**॥धृ॥ नारायण वीश्वंभर वीश्वपीता। प्रमाण तो होता सकळ मीथ्या ॥धृ॥**
**॥ रवी नुगवे तों दीपीकांचें काज। प्रकाशें तें तेज सहज लोपें ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे देहसंबंध संचीतें। कारण नीरुतें नारायणीं ॥ ३ ॥**

( १४६ ) जों वर विश्वंभराची ओळखी झाली नाहीं, तोंवर, हीं क्षुल्लक सहोदरें, सखी, आहेतशीं वाटतात. नारायण जो विश्वंभर आहे, विश्वपिता आहे, तो प्रमाण, असें झाल्यावर सकळ मिथ्या आहेत असें वाटतें. सूर्य उगवला नाहीं तोंवर चांदण्याचें तेज खुलून दिसतें. सूर्यप्रकाश होतां च तें तेज सहज च लोपतें. तुका म्हणे देहसंबंध हा संचीतानें होतो—पण नीरुतें, खरें, निश्चित, कारण नारायणाशीं असतें. नारायणाची जोडी झाली कीं सहोदरें, देहसंबंधाचीं माणसें, सखीं या उच्चस्थानावर रहात नाहींत. कारण तें स्थान नारायणानें पटकाविलेलें असतें. जगांतील सर्व नातीं जें एक नातें पर्यायानें सुचवित असतात परंतु त्या एकाची, नारायणाची—ओळख झाल्यावर बाकीच्या नात्यांचे वैभव काय रहाणार ! घरांत एखादी मुलगी असते. ती आई—बापांची लेक, भावांची बहीण, सासुसासऱ्यांची सून अशा अनेक नात्यांनीं सुशोभित असतें. परंतु तीं सर्व नातीं पतीच्या जीवावर त्याच्या जिव्हाळ्यानें असतात. सर्व दिवसभर जगांत सर्व नात्यानें ती मुलगी नांदत असते. पण ती नवऱ्याचे महालांत एकांतांत आल्यावर सर्व नातीं विसरते. तसा जीव हा सर्व नात्यांनीं नांदत असतो. पण तो तसा कोठवर वागणार ? नारायणाची जोडी होईपर्यंत. ती जोडी झाल्यावर सर्व नातीं आपोआप बाजूस सरतात च, सारावीं लागत नाहींत. त्यासाठीं वेदांती—जपी—तपी, सांगतात तसें वनांतरास जावयास नको. संवसार सोडावयास नको.

वर एक शिकवण झाली. आतां शिकवणींतील दुसरा सिद्धांत सांगतात.

* ॥ १४७ ॥ *

**॥ नका वांदुं मन वीधी नीषेधासी। धरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥**
**॥धृ॥ खादलीया अन्न मासी बोलो नये। अवघें ची जाये येका घासें ॥ धृ ॥**

पांडुरंग ही जी जोडी होईल ती संभाळून रहा असे सांगून या जोडीचें स्वरूप वर्णन करितात. हा महा सिध्दांत आहे.

* ॥ १४८ ॥ *

॥ वेरागारापासीं रत्नांचीया खाणी । हे ची ध्यावी धणी फावलें तो ॥ १॥
॥धृ॥ येथें नाहीं तर्क वीतर्कासी चाड । होतुसे नीवाड खऱ्या खोट्या ॥ धृ ॥
॥ उगा च सारावा वाढीला तो ठाव । वाढीतीया भाव कळतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नव्हे टांचणीचें पाणी । येथे झरवणी जैस्या तेसें ॥ ३ ॥

( १४८ ) एक चिंतामणी जवळ असला कीं त्याच्या पोटीं रत्नांच्या खाणी असतात, अशी वेळ फावली, संधी साधली कीं आपली धणी, आवडी फेडून घ्यावी. पांडुरंग मनीं धरावा, पांडुरंग — हा असा चिंतामणी आहे. येथें तर्क वितर्कास वाव नाहीं. खऱ्याखोट्याचा निवाड ज्याच्या त्याच्या अनुभवानें व्हावयाचा आहे. तुमच्या पुढें जें पान वाढून आलें आहे तें खाऊन मोकळे व्हावें — काळ सारावा, वेळ पदरांत पाडून घ्यावी — कारण तें पान वाढणारा जो आहे त्यास तुम्हांस कोणती गोष्ट हवी व ती किती हवी हें कळतें. तुका म्हणे हें पाणी साठवणीचें नाहीं तर जीवंत झऱ्याचें आहे. येथें

॥ नकळे तें कळो येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
॥ धृ ॥ न दिसे तें दिसो येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
॥ न बोलो तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठले एकाचिया ॥
॥ न भेटे तें भेटो येईल आपण । करीतां चिंतन विठोबाचें ॥
॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणता वाचे ॥
॥ तुका म्हणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥

विठ्ठल नामाचा उच्चार — पांडुरंगस्मरण — हा वैरागारमणी — चिंतामणी — आहे. वरील अभंगांत सांगितल्याप्रमाणें तुम्ही जरी आसक्त जीव असला, तरी तुम्हांस जें जें ऐहिक — पारमार्थिक — सुख हवें असेल — तें तें सुख देण्यास — ती धणी फेडण्यास — पांडुरंग समर्थ आहे. परंतु येथें एका गोष्टीस संभाळलें पाहिजे.

* ॥ १४९ ॥ *

॥ नका होऊं देऊं भावी अभावना । याची नांवे जाणां बहु दोश ॥ १ ॥
॥धृ॥ मेघ वृस्टी येथें होते अनीवार । जीव्हीया उखर लाभ नाड ॥ धृ ॥
॥ उतमा वीभागे कनीस्टाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥ २॥
॥ तुका म्हणे जीणें बहु थोडें आहे । आपुलीया पाहे पुढें बरें ॥ ३॥

( १४९ ) पांडुरंग सर्व कांहीं सांग करील या भावनेमध्यें अभावना शिरूं देऊं नका. कारण अशी भावीं अभावना होणें हा मोठा दोष आहे. येथें—माझ्या अन्तःकरणांत जो पांडुरंगकृपेचा झरा लागला आहे. हें कांहीं सांठविलेलें पाणी नाहीं – हें पढीक पुस्तकी ज्ञान नव्हे. येथें मेघवृष्टी अनिवार होत आहे. पण तुमच्या अन्तःकरणा ( जिव्हाळ्याची ) ची जमीन जर उखर ( खडकाळ ) असेल तर लाभ होण्यास नाढ येईल. कल्पतरू तळवटीं बसून उत्तम फळाची भावना ठेविलीत तर "उत्तम सेवन शीतळ कंठासीं।" असें होईल. बरें कनिष्ठाची इच्छा कराल तर तसें होईल. तुका म्हणे जीणें, जीवीत, हें आपण पाहू तसें बरें वाईट आपुले पुढें आहे. १४६–१४९ या अभंगांत एक च ओघ वाहतो आहे. अभंगांत व पुढें—मेघवृष्टी येथें होते अनीवार असें तुकोबा आपल्या बोधाबद्दल–प्रभुप्रेमाबद्दल–स्वतः सांगत आहेत. त्या गोष्टीचें जास्त स्पष्टीकरण पुढील अभंगांत आहे.

* ॥ १५० ॥ *

॥ कृपेची उतरे देवाचा प्रसाद। आनंदी अनंद वाढवावा ॥ १ ॥
॥ धृ ॥ बहुतांच्या भागें लागलें जाहाज। येथें आतां काज लवलाहो ॥ धृ ॥
॥ अलभे तें आले दारावरी पुका। येथें आतां चुका न पाहिजे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जीहुवा श्रवणांच्या द्वारें। माप भरा वरें सींगेवरी ॥ ३ ॥

( १५० ) माझी हीं वचनें – हीं देवाच्या कृपेचीं, त्याच्या प्रसादाचीं आहेत. तेव्हां तीं सेवन करून आनंदानें आनंद वाढवावा येवढें च आपणास काम करावयाचें आहे. हें जहाज या बंदरास बहुतांच्या भाग्यानें लागलें आहे. तेव्हां आपापल्या कार्यास्तव–काजा–त्वरा करा. शास्त्रानें–वेदांतानें देवाचा लाभ अलभ्य म्हणून म्हटलें—पण तो तुमच्या दारावर फुकट घ्या म्हणून पाठीस लागून आला आहे. मीं प्रत्येकास देव घ्या कोणी–देव घ्या कोणी, असें म्हणून देव पदरांत बांधून देण्यास तयार आहे. तेव्हां आतां तेथें चूक होऊं देऊं नका. तुका म्हणे जिहुवा श्रवणाच्या द्वारें। माप भरा बरें शींगेवरी.

ही च गोष्ट अधीक स्पष्ट करीत आहेत.

* ॥ १५१ ॥ *

॥ सकळांसी माझी असा वीनवणी। मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
॥ धृ ॥ अहो श्रोते वक्ते सकळ ही जन। वरें पारखुन बांधा गांठी ॥ धृ ॥

॥ फोडीले भांडार धण्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥२॥
॥ तुका म्हणे चाली जाली चहुं देसी । नीवडला कसीं खरा माल ॥३॥

( १५१ ) माझी सर्वत्रांस त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून – अशी विनवणी आहे कीं अहो, श्रोते, वक्ते – तुम्ही कोणी हि असा – पदरांत जो माल घ्यावयाचा तो बरा, खरा, अशी पारख करून घ्या. मी धन्याचें भांडार फोडीलें व त्यांतून काढून हा माल आणला आहे – तेव्हां माल धन्याचा आहे. मी फक्त ओझेकरी हमाल आहे. आणि हा माल कसीं खरा म्हणून निवडला गेल्यामुळें याची चाली चहु दशी झाली आहे.

बहीणाबाईनीं कोल्हापुरास – जयरामस्वामी यांच्या कीर्तनांत तुकोबांचीं वचनें ऐकिलीं त्या गोष्टीस येथें आधार सांपडतो ! आपण जो माल घ्या म्हणून श्रोत्यांना वक्त्यांना विनवणी करून सांगत आहोंत तो धन्याचा कसा – आपण केवळ भारवाही हमाल कसें – तें सागताहेत

* ॥ १५२ ॥ *

॥ उभारीला हात । जगीं जाणवीली मात ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव बैसले सेहासनीं । आलीयाची होईल धणी ॥ धृ ॥
॥ येकाच्या कैवाडे । उगवे बहुतांचे कोडे ॥ २ ॥
॥ दोहीं ठांई तुका । नाहीं पडो देत चुका ॥ ३ ॥

( १५२ ) मी हात उभारून जगांत अशी मात ( गोष्ट – वृत्त ) सांगितली कीं – माझ्या हृदयींच्या सिंहासनावर देव बैसले आहेत – तेव्हां आतां जो कोणी वर्णी आवड – हौस – फेडून घेण्यास्तव येईल त्याची धणी फिटेल एकाच्या कैवाडें – कैवारें – म्हणजे माझ्यावर दया करावी अशी विठुरायास दया आली म्हणून पुष्कळांची कोडीं उलगडतील. दोन्हीं ठायीं – म्हणजे आल्या माणसाची नड काय हें देवास सांगण्यांत व देव जो उपाय सांगेल तो आलेल्यास सांगण्यांत मीं कांहीं चूक होऊ देत नाही. एकाच्या कैवाडे । उगवे बहुताचे कोडे । ही एक म्हण साधली आहे. एखाद्या व्यक्तीला उपदेश करण्याच्या निमित्तानें सर्व जगास उपदेश करण्याचा हा परिपाठ आहे. अर्जुनाच्या कैवाडानें जगास गीता मिळाली आहे.

* ॥ १५३ ॥ *

॥ येह्न भुतांच्या पाळणा । भेद कारीये कारणा ।
॥ पावावया उपासना । ब्रह्मस्थाना प्रस्थानें ॥ १ ॥

॥ धृ ॥ येक परी पडीले मार्गीं । फळ बीजाचींयें आंगीं ।
॥ धने तो ची जगीं । आदी अंत सांभाळी ॥ धृ ॥
॥ अवसेक तो सेवट । मागें अवघी खटपट ।
॥ चालो जाणे वाट । येैसा वीरुळा येखादा ॥ २ ॥
॥ तुका होउनीं नीराळा । क्षर अक्षेरा वेगळा ।
॥ पाहे नीगमं कळा । सांगे वीठल प्रसादें ॥ ३ ॥

( १५३ ) यज्ञ–ही भूतांच्या पालना साठीं–व्यक्तिमात्राला ब्रह्मपद प्राप्त करून जावयाच्या मार्गाचें प्रस्थान आहे. पण ही संस्था कार्यकारणाच्या भेद-भावावर उभारलेली आहे. जातीच्या–वर्णाच्या–भेदभावावर अवलंबून आहे. कांहींच्या भागास तें येतें परतु फळ हें बीजाच्या अंगीं असतें. म्हणजे जसें बीज तसें फळ येतें व तुमची यज्ञसंस्था भेदभावावर उभारलेली आहे व जो कोणी आदी व अंत बीज व फळ, संभाळील, तो जगांत धन्य होय. बीज पेरून–फळासाठीं मशागत करून फळ मिळवील, फळ हातीं लागणें–हें सर्व यज्ञाचे–यत्नांचें ध्येय आहे. तें फळ हातीं लागेपर्यंत, मागें सगळी खटपट च आहे. तेव्हां या वाटेनें चालावें कसें हें जाणणारा एखादा च विरुळा असणार! तेव्हां क्षर व अक्षर याहून वेगळा–म्हणजे पुरुषोत्तम–स्वरूप होऊन– तुका विठलाच्या प्रसादानें वेदांच्या कला उकलून दाखवीत आहे. यज्ञस्वरूप नारायणाची जी तुम्ही सेवा करतां व फळ मिळवितां त नारायणाच्या जोडीनें सहज मिळतें म्हणून ती नारायणाची जोडी कशी करावयाची ती तुकोबा विठ्ठलप्रसादानें सांगताहेत.

* ॥ १५४ ॥ *

॥ त्रीपुटीच्या युगें । कांहीं नव्हे कोण्हां जोगें ।
॥ येका जाता लागे । येक पाठी लागते ॥ १ ॥
॥ धृ ॥ मागे पुढें अवघा काळ । पळो नये न चले बळ ।
॥ करीतां कोल्हाळ । कृपे खांदा हरी वाहे ॥ धृ ॥
॥ पाप पुण्यां त्याच्या शेक्ती । असली योजीली त्रीपती ।
॥ यावं काकुळती । तेयं सत्ता नायेका ॥ २ ॥
॥ तुका उभा पईल्थडी । तरी हें प्रकासे नीवडी ।
॥ घातल्या सांगडी । तापे पेटी हाकारी ॥ ३ ॥

(१५४) हें जग त्रीपुटींच्या योगें व्यापलें आहे. ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान ध्येय ध्याता ध्यान-त्या मुळें कोणास सहज-आपल्या जोगें सोपें असें कांहीं भेटत नाहीं. ज्ञानाची कला अशी आहे कीं एक त्रिपुटी संपवावी तों दुसरी पाठीस लागते. काळ तर सारखा पाठीस लागला आहे. आपणास पळतां हि येत नाहीं, काळावर आपलें बळ हि चालत नाहीं. तरी आपण बाल होऊन कोल्हाळ केला-रडारड-केली-म्हणजे दमलों असें म्हणून हात टेकले व त्यास विठ्ठले आई, पुरली धांव कढीये घेई असें म्हटलें कीं तो हरि आपणास खांद्यावर घेऊन *उचलून नेतो. पाप पुण्य या त्या श्रीपतीच्या योजनेंतील शक्ती आहेत. आपण त्याकडे पाहू नये-येथें-बाटूं नये. मन विधी निषेधासी। हा उपदेश आठवावा. आपण त्या सत्तानायकास काकुळतीस यावें. तुका हा पैलवार झाला आहे. त्यानें त्या प्रकाशानें या त्रिपुटी काय-त्याचे वर्म काय-पाप पुण्य काय याचा निवाडा केला आहे. तुम्हांस ताफे-पेटी-सांगडी घालावयास या, असें हाकारीत आहे.

ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान-ध्येय ध्याता ध्यान-असल्या त्रिपुटी कांहीं केलें तरी संपणार नाहींत. एखादी त्रिपुटी संपवून तिच्यांतून तुम्ही पार पडलां तर दुसरी समोर उभी राहील च. तेव्हां जगाकडून जगदीशाची ओळख करून घेऊं म्हणाल तर तें कधीं हि न संपणारें असें काम आहे. तेव्हां बाल होऊन त्यास शरण जाणें-उचलून घे म्हणून रडण्याच्या सत्तेनें म्हणणें, शरण जाणें, हा एक च मार्ग या त्रिपुटी पार होण्यास युक्त आहे. तुकोबा पैलतीरावर उभे राहून-आपणांस हाकारून सांगताहेत कीं:-

॥ १५५ ॥

॥ देखण्याच्या तीन जाती। वेठे वारता अंते तीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ जैसा भाव तैसें फळ। संवाती तो येक जळ ॥ धृ ॥
॥ पाहे सांगे आणी जेवी। अंतर महदा अंतर तैं सेवी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हीरा। पारखीया मुद्दा गारा ॥ ३ ॥

(१५५) जगांत जाणते जे आहेत त्याचे प्रकार तीन. एक त्या गोष्टीची वेठ करणारे-दुसरे त्या गोष्टीची ज्यांनीं वार्ता ऐकली आहे असे. व तिसरे असें की ज्यांनीं त्या गोष्टीचा अंत पाहिला आहे. कांहीं लोक नुसते अन्न समोर पहातात..कांहींनीं, मांडे, पुऱ्या, अशी नांवे ऐकिलेली असतात-तीं तें सांगतात, कांहीं जेवून अन्नाची रुची सांगतात-अर्थात् या सर्वांत अतर-महद्अंतर-आहे. स्वातीचे पाणी एक च असतें पण एका ठिकाणीं त्याचें मोती होतात. एका

ठिकाणीं तें व्यर्थ जातें. तसें पारखी जो असेल त्यास हिरा ओळखेल. इतर मुढांना तो गारेसारखा वाटेल. तसा हा माझा संत प्रेम–बोध कांहींना धन्याचा माल आहे असें पटेल इतरांना गारा आहेत असें वाटेल. कारण.

* ॥ १५६ ॥ *

॥ आपल्या च फुंदे। जेथें तेथे घेती छंदें ॥ १ ॥
॥ धृ ॥ पडीला सत्याचा दुकाळ। बहु फार जाली घोळ ॥ धृ ॥
॥ वीस्वासाचें माठ। त्याचें कपाळीं ते नाट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे घाणा। मुढा तीर्थीं प्रदेक्षणा ॥ ३ ॥

( १५६ ) हे जे देखणारे म्हणून वर म्हटलें ते जेथें तेथें आपल्या अभिमाना ( फुद ) नें छंद घेतात. म्हणून सत्याचा दुष्काळ पडला व फार घोळ झाला. विश्वासाच्या ठिकाणीं हे लोक माठ ( मंद ) असतात. म्हणून त्यांचे कपाळीं नाट लागतो. तुका म्हणे मूर्ख जे असतात त्याना तीर्थीं प्रदक्षणा या घाण्यासारखा कराव्या लागतात. विश्वास नाहींसा झाला–सत्याचा दुष्काळ पडला याचें थोडें स्वरूप वर्णन करताहेत.

* ॥ १५७ ॥ *

॥ तर्थि जळ देखे पाश्याण प्रतीमा। संत ते अधमां माणसां यैसे ॥ १ ॥
॥धृ॥ वांजेच्या मैथुनांपरी गेले वांयां। वांडेळ्याचे जांयां जाले पीक ॥धृ॥
॥ अभावीक सदा सुतर्की चांडाळ। समो तळमळ सके ची ना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वरदळी ज्याची द्रस्टी। देंहे बुधीं कस्टी सदा दुखी ॥ ३ ॥

( १५७ ) तीर्थ हें केवळ पाणी आहे–प्रतीमा ही एक शीला आहे. संत हा इतर माणसासारखा च एक माणूस आहे, असें ज्यांस वाटतें, असल्या माणसांचे देखणे, हें वांझिसी मैथुन करावे किंवा वांडेळांचें पीक यावें, असें आहे. असले हे अभावीक, सुतर्की, चांडाळ लोक, यांची तळमळ कधीं शमायची च नाहीं. तुका म्हणे ज्याची दृष्टी अशी वरदळी, बाह्यात्कारी, असते–ते सदा देह बुद्धीवर असून–सैदा कस्टी व दु:खी असतात. हा अभंग वरील अभंगांत जे मूढ लोक सांगितले त्यांच्या च वर्णनाचा आहे. या उलट आपल्या मनाची स्थिति सांगताहेत.

* ॥ १५८ ॥ *

॥ वृक्षवली आम्हां सोईरीं वनंचरे। पक्षीये सुस्वरें आळवीती ॥ १ ॥
॥ धृ ॥ येणें सुखें रुचे येकांताचा वास। नाहीं गुण दोश आंगा येत ॥धृ॥

॥ आकाश मंडप प्रुथुवी आसनं। रमे तेथें मंनं क्रीडा करुं ॥ २ ॥
॥ कंथा कुमंडल देहे उपचारा। जाणीवीतो वारा अवस्वरुं ॥ ३ ॥
॥ हरी नामे भोजन प्रवडी वीस्तार। करुनी प्रकार सेउं रुची ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे होये मंनांसी संवाद। आपलाची वाद आपल्यासी ॥५॥

( १५८ ) वृक्ष, वेली, वनचरें हीं आम्हांस सोयऱ्याप्रमाणे वाटतात. पक्षी आपल्या सुस्वरानें देवास आळवीत आहेत. या सुखानें आम्हांस एकांतांतील वास रुचतो, आवडतो. कारण वर सांगितलेल्या माणसांशीं सहवास झाली तर त्यांचे गुणदोष अंगास चिकटतात. आकाश हा आम्हांस मंडपासारखा आहे. पृथ्वी ही आम्हांस आसनासारखी आहे. तेव्हां आम्ही मन रमेल तेथें क्रीडा करू. देहाच्या उपचारास, म्हणजे थंडीच्या निवारण्यास गोधडी आहे व पाणी पिण्यास कमंडलू आहे. वारा अवस्वरु जाणवितो वाऱ्याच्या दिशेवरून वेळ किती झाला तें आम्हांस कळतें. [ या शब्दाचा अर्थ नीट सांपडत नाहीं ] प्रकारा प्रकारानें विस्तार करून हरि नाम घेणें हें आमचें भोजन आहे व तें आम्हीं रुची रुचीनें घेतो. तुका म्हणे—आमचा वाद आमच्याशीं च व्हावा, तसा आम्ही मनासी संवाद करितो. हीं च गोष्ट पुढे सांगताहेत.

* ॥ १५९ ॥ *

॥ येसी या संपती आम्हां संवंसारी। भोगाचीया परी काय सांगो ॥१॥
॥धृ॥ काम तो कामना भोगीतसे देवा। आलींगणे हेवा चरण चुंबी ॥ धृ ॥
॥ स्यांतीच्या संयोगें नीरसला ताप। दुसरे ते पाप भेद बुधी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पाहें तीकडे सारीखें। आपले पारीखें नीरसले ॥ ३ ॥

( १५९ ) आम्हांस, जगांत, संसारांत, संपत्ती कोणत्या आहेत व भोगाच्या परी काय आहेत तें सांगतो. मला काम आहे, व त्यामुळें देवाच्या चरणाचें चुंबन घ्यावें, हा मला हेवा आहे, व देव आलींगन देऊन भोगावा अशी मला कामना आहे. माझा नित्य शांतीशीं संयोग होत असल्यामुळें मला ताप असा कांहीं उरला नाहीं व आपण व दुसरा ही जी पापाची भेदबुद्धि होती ती पार गेली. तुका म्हणे मी कोठें हि पाहों मला सर्व एक च आहोंत असें वाटतें. व आप—पर यांचा पार निरास झाला व आतां काय झालें आहे म्हणून विचाराल तर ऐका.

* ॥ १६० ॥ *

॥ रामराजे राम प्रजालोकपाळ। येकची सकळ दुसरे नाहीं ॥ १ ॥
॥धृ॥ मंगळा वांचुनं उमटेना वाणी। अखंडची खाणी येकी रासी ॥ धृ ॥

॥ मोडले हे स्वामी ठायाठाव सेवा। वाढावा तो हेवा कोणा अंगे ॥२॥
॥ तुका म्हणे अवघे दुमदुमीले देवे। उरले तें गांवें हें ची आतां ॥ ३ ॥

( १६० ) सर्वत्र राम ( आत्माराम ) राज्य झालें आहे. राम लोकपाळ झाल्यावर सर्व एक च आहेत. त्यांत दुसरें नाहीं. त्या राज्यात मंगळ वाणी शिवाय दुसरी वाणी च उमटत नाहीं. आणि ही आनंदाची एकराशी अखंड खाणी आहे. स्वामी सेवक हे निरनिराळे ठाव आतां मोडले, तेव्हां आतां दुसऱ्याच्याबद्दल हेवा कोणास वाटणार, तुका म्हणे, श्री विठ्ठलाच्या नामाच्या उच्चारानें विश्व दुमदुमलें आहे व आपण त्याचें नाम गावे एवढें च काम आपणास उरलें आहे. तुका म्हणे अवघे दुमदुमीले देवें ।—हरीनामाच्या गजरानें जी पंढरी दुमदुमली त्या गजरानें च जो आशीर्वाद झाला त्याचें वर्णन करीतात.

* ॥ १६१ ॥ *

॥ कल्याण या आसीर्वादें। जाती द्वंदें नासोनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ अस्वासीलें नारायेणें। प्रेमदानें अंतरीच्या ॥ धृ ॥
॥ गेली नीवारली आतां। सकळ चींता या वरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गातां गित। आलें हीत सामोरे ॥ ३ ॥

( १६१ ) नारायणानें अंतरीच्या प्रेम दानानें आश्वासन दिलें त्या आशीर्वादानें द्वंद्वें, पाप पुण्य, सुख दुःख, हीं नाहीशीं झालीं. आतां यापुढें कसली हि शंका उरली नाहीं, चिंता राहिली नाहीं. तुका म्हणे मी गातां गीत—हीत सामोरें आलें. गीत कसें गाईलें म्हणाल तर

* ॥ १६२ ॥ *

॥ सदगदीत कंठ दाटो। येणे फुटो न्हृदय ॥ १ ॥
॥ धृ ॥ चींतनाचा येक लाहो। तुमंच्या अहो वीठला ॥ धृ ॥
॥ नेत्रीं जळ वाहो सदा। अनंदाचे रोमांच ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कृपादान। ईछी मनं हे जोडी ॥ ३ ॥

( १६२ ) प्रेमानें सद्गदीत अवस्था होऊन कंठ सदा दाटलेला असे, हृदय फुटूं पाहे, विठ्ठला, तुमच्या चिंतनाची एक च त्वरा ( लाहो ) असो. नेत्रांतून आनंदाचे अश्रु वाहून अंगावर रोमांच येवोत. देवा, माझें मन सदा या कृपादानाची इच्छा करून, ही जोडी व्हावी, असें मन चिंतीत आहे.

* ॥ १६३ ॥ *

॥ म्हंणउनं धरीले पाये । अवो माये वीठले ॥ १ ॥
॥ धृ॥ आपुलेंचीं करुनी घ्यावें । अस्वासावे ना भी से ॥ धृ ॥
॥ वाढली ते तळमळ चींता । संमं आतां करावि ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जीवीं वसे । मज नसे वेगळा ॥ ३ ॥

( १६३ ) म्हणून अहो विठ्ठले मायें, तुमचे मी पाय धरीले आहेत. भिऊ नको असें म्हणून एकवार आपुले करून घ्यावें. माझ्या मनांत तळमळ व चिंता आतां फार वाढली आहे ती आतां शांत करावी. तुका म्हणे तो माझ्या जीवांत वास करून आहे व माझ्यापासून वेगळा राहत नाहीं.

* ॥ १६४ ॥ *

॥ समर्थ या नांवे दीनांचा कृपाळ । हें तंवं सकळ स्वामी आंगीं॥१॥
॥ धृ॥ मज काय लागे करणें वीनवणी । वीदीत चरणीं सकळ आहे ॥धृ॥
॥ दया सींधु तुम्हां भांडवल दया । सींचावें आतां या कृपा पीयुशें॥२॥
॥ तुका म्हणे अवो पंढरी नीवासे । बहु जीव आसे लागलासे ॥ ३ ॥

( १६४ ) देवा तुम्हीं दीनांचे कृपाळु म्हणून तुम्हांस समर्थ असें म्हणतात. व हे सर्व गुण स्वामीच्या अंगीं आहेत. मला याबद्दल आपली वेगळी विनवणी करावी कां लागावी ? स्वामींच्या चरणाजवळ सर्व विदित आहे च. तुमच्याजवळ दया हे भांडवल आहे. म्हणून तुम्हांस दयासिंधु असें म्हणतात. तरी माझ्यावर आतां कृपा पियुष, पाणी, अमृत, शिंपडा. तुका म्हणे अहो पंढरी निवासे, जीव बहु आशेस लागला आहे.

* ॥ १६५ ॥ *

॥ अनंता मुखीं होसील गाईला । अमुप वीठला दास तुम्हां ॥ १ ॥
॥धृ॥ माझे कोठे आलें होईल वीचारा । तरी च अव्हेरा येगे जालो ॥धृ॥
॥ सर्व कळा तुम्हीं असा जी संपनं । चतुरां नारायेण सीरोमणीं ॥२॥
॥ तुका म्हणे असे कळयोगींचें जीव । तरीं नये कीव बहुपापी ॥३॥

( १६५ ) वीठला, तुम्हांस अमूप — असंख्य दास आहेत यामुळें तुझे गुण गान अनंत मुखांनीं गाईलें जातें, होतें. तेव्हां मी जे गुणगान करीतो, तें तुमच्या लक्ष्यांत च येत नाहीं. म्हणून या अव्हेरास पात्र झालों आहेसा दिसतो. नारायणा, तुम्हीं सर्व कळांनीं संपन्न असून चतुरांचे शिरोमणी आहांत, तेव्हां तुमच्या

मनांत आलें असतें तर केव्हां च माझा उद्धार झाला असता. पण आम्ही कली-युगाचे बहु पापी जीव म्हणून तुम्हांस कींव येत नाहींसें दिसतें.

* ॥ १६६ ॥ *

॥ लेखीलें कवीत्व माझे सहज बोल । न लगे ची वोल जीहुवाळ्याची ॥१॥
॥धृ॥ नये ची उतर कांहीं परतोनीं । जालों नारायणीं न सरतें ॥ धृ ॥
॥ लाजीरवाणी कां वदली हे वाचा । नव्हे च ठाईंचा मनन सीळ ॥२॥
॥ तुका म्हणे फळ नव्हेची सायासा । पंढरी नीवासा काये जालें ॥ ३ ॥

(१६६) देवा, हे माझे कवित्व सहज म्हणजे वरवरचे बोल आहेत असें कां तुम्हांस वाटतें ? त्यांत तुम्हांस जिव्हाळ्याची ओल आढळत नाही का ? ज्याअर्थी तुम्हां कडून कांहीं उत्तर परतुन येत नाहीं त्याअर्थी माझे बोल नारायणाचे चरणाजवळ सरते झाले नाहींतस वाटतात. माझा कोणता हि बोल विचार करण्या-जोगा—ठायींचा; झाला नाहींसें वाटतें. मग ही वाचा असले लाजीरवाणी शब्द बोलली तरी कशास ? पंढरीनिवासा, हें काय हो झालें, कीं, माझ्या सायासास, फळ येईनासें झालें. येथें एक गोष्ट स्पष्ट दिसतें कीं तुकोबांच्या मुखांतून प्रश्नान्या रूपानें जी वचनें बाहेर पडत त्यास उत्तर म्हणून शब्द ऐकूं येत नव्हते, येत ना, म्हणून हे काकुळतीचे शब्द आहेत. या ओघानें पुढें आळवणी चालू आहे कीः—

* ॥ १६७ ॥ *

॥ पापी म्हणां तरी आठवीतों पाये । दोश बळी काये तयाहुणी ॥१॥
॥ धृ ॥ यैस्या वीचाराचे घालुनीं कोंडणीं । काये चक्रपाणी नीजेलेती ॥धृ॥
॥ येक वेळ ज्याणें पुत्राच्या उदेसें । घेतल्याचें कैसे दुख नेले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अहो वैकुंठ नायेका । चींता कां सेवका तुमंचीया ॥३॥

(१६७) मी पापी म्हणावा तर देवा मला तुमचे पाय आठवतात, तेव्हां तुमच्या पायांच्या प्रसादापेक्षां माझे दोष ज्यास्त बळींवंत झाले का ? असल्या विचाराच्या पेंचांत तुम्हांस अडकवून, देवा, चक्रपाणी, तुम्ही निजला तर नाहीं ना ? असे मी तुम्हांस विचारीत आहे. एक वेळ अजामेळानें मुलाला हाक मारण्याच्या मिषानें नारायण म्हटलें त्याचें जन्माचें दुःख हरण केलें आणि या तुमच्या सेवकास—वैकुंठनायका—ही अशी चिंता कां ?

* ॥ १६८ ॥ *

॥ असुरी स्वभाव नीर्दय अंतर । मानस नीस्टुर अतीवादी ॥ १ ॥
॥ धृ ॥ याती कुळ येथें असे अप्रमांण । गुणांचे कारण असे आंगीं ॥ धृ ॥

॥ काळकुटे पीतळ सोने शुध रंग । आंगाची च आंगसाक्ष देतें ॥२॥
॥ तुका म्हणे बरी जाती सवे भेटी । सांठवलें पोटीं नवनीत ॥ ३ ॥

( १६८ ) येथें अजामेळाचें उदाहरण डोळ्यापुढून हलडें नव्हतेंसें दिसतें. त्याचें जर असें तर मग माझें असें का म्हणून म्हणतात—देवा माझा स्वभाव असुरी, अंतर निर्दय, मन निष्ठुर व अतिवादी असें कां झालें आहे ? मी त्या अजामेळापेक्षा हि कां वाईट आहे ? बरें माझी याती—कुळ—हीं आड येत आहेत कां ? बरें तसें म्हणावें तर त्याची तुम्हास क्षिती नाहीं तें अप्रमाण आहे. कारण सर्व गुणाचे जें मूळ कारण तें स्वतःचे अगीं च आहे. पीतळ हें वरून पिवळा रग दारवीत असलें, तरी अन्तर्यामी काळकूट असतें, तसें तर माझें नाहीं ना ? सोनें हें कसें हि असलें तरी शुद्ध रंगाची साक्ष पटविते तसें तुका म्हणे *शुद्ध रगाच्या जातीबरोबर भेटी झालेली बरी कारण तेथें अंगीं नवनीत*—लोणी—सांठविलेलें असतें

* ॥ १६९ ॥ *

॥ नीवडुनीं वानं कादीले नीराळे । प्रमाणं डोहाळे यावरी तें ॥ १ ॥
॥ धृ ॥ जयाचा वीभाग तयासी च फळे । देखने नीराळे कौतुकासी ॥ धृ ॥
॥ शुर तो वोळखे घाये डाये हात । येरां होईल मात सांगायासी ॥२॥
॥ तुका म्हणे माझी केळवते वाणी । केला नीजस्थानीं जानवसा ॥३॥

( १६९ ) येथें अजामेळाचा दृष्टांत अतितापदायक होऊन तुकोबास कांहीं उत्तर आलें, कां, काहीं दृश्य दिसलें हें आतां सागता येणार नाहीं. कारण आपलें कवित्व फुकट नाहीं—असें लक्ष्यात घेऊन म्हणतात कीं मी निरनिराळे वान निवडून काढले आहेत. ज्याला जसे डोहाळे होतील, त्याप्रमाणें ज्याचा भाग त्यास फळून—त्यास प्रमाण होईल. आम्ही देखणे द्रष्टे ते निरनिराळे खेळ कौतुकानें पाहू. शूर जो असतो तो घावे डाये हात ओळखतो ( पऱ्याचे हात त्याला माहीत असतात ) येरांना ( दुसऱ्यांना ) त्या सांगितलेल्या गोष्टी—काहाणीसारख्या वाटणार. तुका म्हणे माझ्या वाणीनें नीजतत्वाच्या ठिकाणीं जानवसा केला असल्यामुळें तिला सध्या केळवणे—लग्नापूर्वीच्या मेजवान्या, चालू आहेत.

तुका म्हणे माझी केळवते वाणी । केला निजस्थानीं जानवसा ।— हे *आपल्या वाणींतून* जो अमृत स्राव होत आहे. त्याबद्दलच्या कौतुकाचे शब्द आहेत. तुकोबाना आपल्या वाणीचे केवढे कोडकौतुक वाटलें असेल याची

कल्पना च करविणार नाहीं, आपले गण गोत कोणते शब्द वापरीत आहेत व आपल्या वाचेवर काय शब्द उगवताहेत, या दोन्ही गोष्टींतील फरक पाहून याचें कारण जेव्हां ते शोधू लागले, तेव्हां त्यास असें आढळून आलें कीं, आपल्या वाणीनें निजस्थानीं जानवसा-(लग्नाचे वऱ्हाड जें घर लग्नासाठीं घेतात तें) केला आहे. लग्न व्हावयाचें आहे विठुरायाशीं-व वाणीला केळवणें-मेजवान्या चालू आहेत. म्हणजे रोज नित्य नवी गोष्ट नव्या रंगानें बाहेर पडत आहे. या एका अभंगांत आपल्या वाणीच्या कौतुकास्तव २।२ दृष्टांत साधले आहेत. व्यवसायानें तुकोबा वाणी होते. म्हणून पहिला दृष्टांत आला तो दुकानाचा. निरनिराळे वान निवडून काढले, सर्व वस्तु जशा निरनिराळ्या डब्यांत भरून वर चिठ्या माराव्यात तशी आपल्या डोक्यांत स्थिती आहे असें सांगितलें, पुढील दृष्टांत डोहाळ्याचा आला. डोहाळा हा गर्भाच्या गुणधर्मावर अवलंबून असतो; तेव्हां आपल्याकडे जे गिऱ्हाईक येईल त्यास त्याच्या गुणकर्माप्रमाणें डोहाळा होईल. पुढील दृष्टांत पट्याचे हात खेळणाराचा. आपण कोणावर शब्दानें वार केला तर तो काय वार आहे हें सुद्धां ओळखू आलें पाहिजे. तसें च आपण अशा खुबीनें शब्दयोजना केलेली आहे कीं, पुढें येणारा घाव आधीं च चुकवून ठेविलेला असावा, हें ओळखण्यास सुद्धां जाणता पाहिजे. शिवाय एक द्रष्ट्याचा हि दृष्टांत घेतला आहे. असे येथें आपल्या वाणीचें तुकोबांनीं ३।४ दृष्टांत साधून कौतुक केलें आहे. तेव्हां आपल्या वाणीचें कौतुक करुन म्हणतात.

* ॥ १७० ॥ *

॥ याचसाठीं होता केला अट्टाहास। सेवटाचा दीस गोड व्हावा॥ १॥

॥घृ॥ आतां नीस्चीतीनें पावलों वीसांवा। खुंटलीया धावा त्रुष्णेचीया॥घृ॥

॥ कवतुक वाटे जालीया वेचाचें। नांव मंगळाचें येणे गुणें॥ २॥

॥ तुका म्हणे मुगती परणीली नोवरी। आतां दीवस च्यारी खेळे मेळे॥३॥

(१७०) कीं नारायणाची जोडी व्हावी व सर्व इंद्रियें नारायणाच्या सेवेंत रंगून दंग असावीत यासाठीं मी आजवर अट्टाहास करीत आलों. आतां ती गोष्ट फळास आली व माझ्या वाणीनें नीजत्वाच्या ठिकाणीं जानवसा केला, असा हा गोड दिवस दिसला. आतां निश्चितीनें मी विसावलों आहे. माझ्या तृष्णेची धाव आतां उरली नाहीं. त्या हावा खुंटल्या आहेत आजवर जे जीवित नारायणाच्या गुणगानांत वेचलें गेलें त्याचें कवतुक वाटतें. जगांत जर कांहीं मंगल व्हावयाचें असेल तर तें हें च. हा जो इतक्या अट्टाहासानंतर मंगल गोड दिवस

उगवला त्या दिवशीं काय गोड गोष्ट झाली ती तुम्हांस सांगू का ? मी मुक्तीशीं लग्न लावलें व आतां तिच्याबरोबर सुखसोहाळ्यांत खेळीमेळीनें चार दिवस घालवीत आहे. तेव्हां यापुढील वचनें मुक्ताबाई बरोबर जी खेळीमेळी झाली त्या सुख सोहाळ्यांतील आहेत.

* ॥ १७१ ॥ *

॥ भगतीचीये पोटीं रत्नांचीया खाणीं । ब्रम्हींचीं ठेवणी सकळ वस्तु ॥१॥
॥धृ॥ माउलीचे मागें बाळकांची हारी । येका शुत्रें दोरी वोढतसे ॥ धृ॥
॥ जेथील जे मागे तें रायासमोर । नाहींसें उतर येत नाहीं ॥ २ ॥
॥ सेवेचीये सते धणी च सेवक । आपलें तें येक नेवेची कांहीं ॥ ३ ॥
॥ आदी अंता ठाव असे मदे भाग । भोवंते भासे मग उचासनीं ॥ ४ ॥
॥ भावारूढ तुका जाला येकायेकीं । देव ची लोकीकी अवघा केला ॥ ५॥

( १७१ ) या मुक्ताबाईचें पोट भक्तीचें आहे. तिच्या पोटांत रत्नांच्या खाणी आहेत. व त्या सर्व वस्तु ब्रह्मीच्या ठेवणींतल्या आहेत. माउलीच्या मागें जशी बाळकांची ओळ असावी व ती बाळकांची ओळ जशी एका रंगाची–रूपाची दिसावी तशी ब्रह्मीच्या ठेवणींतली प्रत्येक वस्तू एका सुत्रानें, भक्तीनें, बांधलेली आहे. मी कोणत्या हि वस्तुची म्हणजे ज्ञान, बोध, प्रेम याची इच्छा करो. कीं या मुक्ताबाईचा जो मी राया, त्यासमोर ती वस्तु हजर होते. नाहीं हा शब्द या मुक्ताबाईस माहीत नाहीं. या संबंधांत अशी जोडी आहे कीं सेवेच्या सत्तेनें धनी सेवक होतो व आपलें तेथें कांहीं खर्चावें लागत नाहीं. आपण मध्यभागीं विराजमान झालों कीं आदि अंत या गोष्टी उरत नाहीं. आपण उच्चासनावर बसून जग आपल्याभोंवतीं फिरत आहेसें वाटतें. एकाएकीं तुका भावावर आरूढ झाला आहे; व आतां सर्वत्र देव च देव केला आहे; वाटतो आहे. भेटतो आहे ! हें वचन जेव्हां प्रकट झालें असेल तेव्हांचें भावारूढ स्थितीतलें तुकोबांचें दर्शन किती गोड असेल ! कधीं काळीं कोणी भाग्यवान सिद्धपुरुष आपल्या सुखाचे कौतुकानें, भावारूढ अवस्थेंत संतांच्या एखाद्या वचनाच्या आधारें, मिषानें, वर्णन करीत असेल तेव्हां तें वर्णन करीत असतांना अमृतधारांचा वर्षाव होत असलेला आपण पाहिला ऐकिला असेल तर च ही अवस्था काय आहे याचें आपणास आकलन होईल. ही गोष्ट अनुभवाची आहे. बोलून लिहून दाखविण्या सारखी नाहीं.

तुम्ही मुक्ताबाई बरोबर काय सुख भोगतां तें सांगा असे कोणा संताचें विनवणीचे शब्द ऐकून म्हणतात.

* ॥ १७२ ॥ *

॥ सांगतां दुर्लभ ज्ञानाचीया गोस्टी । अनुभव तो पोटी कैंचा घडे ॥१॥
॥ध्रु॥ भजनाचे सोई जगा परीचार । नेणत्यां सादर चीत कथे ॥ धृ ॥
॥ नाइकचे कानीं साधनं उपाये । आईके तो गाये हरुशें गीत ॥ २ ॥
॥ नव्हे आरानुक जावयासी वनां । वेध कामीं मेना हरीकथेचा ॥ ३ ॥
॥ काळाच्या साधनां कोणा अंगीं बळ । चींतनां मंगळ आठ प्रन्ह ॥४॥
॥ तुका म्हणे आम्हीं खेळो भातकुळें । वीभागासी मुळे भोळी येथें ॥५॥

( १७२ ) ज्ञानाचे चार शब्द सांगून हें सुख तुमच्या हातीं कसें लागणार (दुर्लभ),! तुम्हांला ती गोष्ट अनुभवांत कशी भेटणार ? साखर हा शब्द उच्चारल्यानें साखर खाल्ली असेल त्यास ती रुची आठवेल. पण इतरांना, त्याच्या–त्या शब्द उच्चाराचा अनुभव पोटीं कसा पडेल ? जगानें भजनाचा जर परिचार केला तर, नेणत्या माणसांनीं कथेंत चित्त सादर ठेवणें हा परिचार केला तर, त्यांची सोय लागेल. म्हणजे भजनांत व हरिकीर्तनांत तुम्हीं सादर असाल तर, तुम्हांस हें सुख भेटेल. मला याव्यतिरिक्त कांहीं साधनांचें उपाय ऐकवत नाहींत. मला हर्षभरानें गीत गावें व ऐकावें एवढा च एक (साधन) उपाय माहीत आहे. रानांत, वनांत, जाऊन हें सौख्य, शांती भोगण्याची जरूरी नाहीं. कारण माझ्या मनाला हरिकथेचा वेध आहे. रानांत जाऊन कालांतरानें होणाऱ्या गोष्टी करण्याइतपत बळ कोणाच्या अंगीं आहे. देवाच्या नांवाचें स्मरण व चिंतन–आठ हि प्रहर येथें होऊं शकते. तुका म्हणेः–आम्ही भातुकली–मुलींचा खेळ खेळत आहोंत–आणि भोळी जीं असतील तीं येथें विभाग मिळविण्यास अधिकारी आहेत. भोळीव हें मूळ आहे.

* ॥ १७३ ॥ *

॥ जाणंपणं वरं देवाचीयें सीरीं । आम्ही येसी वरी नेणती च ॥ १ ॥
॥धृ॥ देखणीया पुढें रूचे कवतुक । उभयेता सुख वाढतसे ॥ धृ ॥
॥ अशंकेचा बाध नाहीं लडीवाळां । चीत वरी खेळां सम बुधी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दीसा मोकळ्या सकळा । अवकासीं खेळा ठाव जाला ॥३॥

( १७३ ) वरील अभंगांत मी कोणत्या स्थितींत आहे याचें, ज्ञान तुम्हांला शब्दानें होणार नाहीं. पण ती गोष्ट तुम्हांस भजन व कीर्तन हीं जर तुमचा परीचार म्हणजे–नित्यक्रम झाला तर भेटतील. परव्हीं ज्ञानाच्या गोष्टी सांगून कांहीं ती गोष्ट तुम्हांस भेटणार नाहीं म्हणून सांगितलें, तेव्हां सांगतात कीः–

जाणपण हें भलें देवाच्या डोक्यावर भार म्हणून ठेवावें. आम्ही भोळी—नेणती आहोंत—तीं ठीक आहोंत. श्री विठ्ठलास, जाणत्याला, नेणत्याचें मोठें कवतुक वाटतें, व त्यामुळें उभयतांमध्यें कौतुक वाढीवर असतें. आमचें लक्ष्य सदा खेळावर असतें, आम्हां लडिवाळांना केव्हां हि अशंकेची बाधा होत नाहीं. तुका म्हणे आम्हांस सर्व दिशा मोकळ्या झाल्या आहेत—यामुळें खुल्या जागेंत खेळण्यास ठिकाण झालें.

वरील अभंगांत तुका म्हणे आम्ही खेळो भातकुले म्हणून म्हणाले होते — तो दृष्टांत आधारास घेऊन म्हणतात कीं आम्ही हा जो भातुकलीचा खेळ खेळत आहोंत यांत.

॥ १७४ ॥

॥ वचनांचा मांड दावावे प्रकार। काये त्या साचार कवतुकाचें ॥ १ ॥
॥ध्रु॥ जातां घरामागे उरो नेणे खंती। मीळाल्या बहुती फांकलीया ॥ ध्रु ॥
॥ उदई च अस्त उदये संपादला। कल्पनेचा केला जागेपणें ॥ २ ॥
॥ जाणउनी गेला हांडोरीया पोरा। सावध ईतरा करूनी तुका ॥ ३ ॥

( १७४ ) वचनाचे मांडे—पुऱ्या—करून—प्रकार करून दाखवितो. त्या ( वेडे ) ( पोरकट ) चाराचे ( खेळाचे ) कौतुक तें काय करावयाचें. भातुकली खेळून घरीं गेलें कीं त्याची खंती कांहीं उरत नाहीं. अशी पुष्कळ माणसें मिळून फाकली तरी त्याची खंती उरत नाहीं. या कल्पनेच्या जागेपणांत च उदय व अस्त सामावलेले आहेत. या सर्व गोष्टी या हांडोरिया ( अडाणी ) पोरांस सांगून व इतरांस सावध करून तुका—गेला, जात, आहे. मार्ग आक्रमीत आहे. हांडोरीया पोरांना काय सांगितलें तें पुढलि अभंगांत आहे. येथें १५८ पासून जी ओळ चालूं होती ती संपते.

॥ १७५ ॥

॥ सामावे कारणें। नाहीं सोसत धरणे ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ लादी थींकी लाजीरवाणी। हीण कमाईची घाणी ॥ ध्रु ॥
॥ पुश्या जवळी नाका। दुर्गंधीच्या नांवें थुंका ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कीती। उपदेसावी हीण जाती ॥ ३ ॥

( १७५ ) देवा, तू आम्हांला तुझ्यांत सामावून घे. हें धरणें सोसत नाहीं. असली ही हीन कमाईची लादी ( चीप ) लाजीरवाणी आहे ती थुंकून टाकावी. दगड नीट घडविला गेला तर तो आपोआप देवाच्या पायरीस बसवितात नाहींतर शौचकुपांत भरतात. जवळ, पुष्प, असें नावाला फूल असावें, याची घाण

आली तर जवळ कोण करील तसें हें धरणें घेणें आहे. तुका म्हणे या हीन जातीला मी उपदेश तरी किती करूं ?

कोणी तरी आम्हांस कांहीं सांगा म्हणून धरणें धरलें असावें त्यामुळें त्रासून हे उद्गार आले असावेत. तेव्हां लोकांचा हा त्रास असह्य होऊन म्हणताहेत.

* ॥ १७६ ॥ *

॥ नका मजपासी । वदो प्रपंचाचे वींशी ॥ १ ॥
॥ धृ॥ आतां नाइकवे वाणी । मज देवावीण कानीं ॥ धृ ॥
॥ येऊनीयां रुपा । कोण पाहे पुनें पापा ॥ २ ॥
॥ मागें आजीवरी । जालें पाप नेले चारी ॥ ३ ॥
॥ सांडीयेलीं पानें । पुढें पीका अवलोकनें ॥ ४ ॥
॥ पडो नेदी तुका । आड गुंपी कांहीं चुका ॥ ५ ॥

( १७६ ) आतां मला देवाशिवाय दुसरी कोणती हि गोष्ट कानानें ऐकवत नाहीं. तेव्हां तुमच्या किंवा माझ्या प्रपंचाबद्दल माझ्याशीं बोलूं नका. रूपास येऊन देव समोर उभा असतांना पाप पुण्याकडे कोण पाहूं शकेल ? ज्ञानाची, शास्त्राची गोष्ट कोणास आठवेल ? आजवर मी या गोष्टी बोलण्यांत जो वेळ घालविला असेल तें माझें हातून पाप झालें, चोरानें ( काळानें ) ते दिवस नेले असें समजा. दाणा दिसूं लागला कीं पाला जसा बाजूस सरतो तसा देव रूपाला आल्यावर प्रपंचाबद्दल किंवा पुण्यपापाबद्दल कसला विचार करावयाचा ! तुका म्हणे मी येथें कसली हि चूक होऊं देणार नाहीं व आड हि कांहीं येऊं देणार नाहीं.

लोकांनीं प्रपंचाची आठवण करून देऊन जो आघात केला होता. तो च दृष्टांतास घेऊन रूपास जो देव आला होता त्यास सांगताहेत.

* ॥ १७७ ॥ *

॥ बरें जाले देवा नीघाले दीवाळें । बरी या दुहकाळें पीडा केली ॥ १ ॥
॥धृ॥ अनुतापें तुझें राहीलें चींतन । जाला हा वमनें संवसार ॥ धृ ॥
॥ बरें जालें जगीं पावलो अपमानें । बरे गेलें धनें ढोरें गुरें ॥ २ ॥
॥ बरें जालें नाहीं धरीली लोक लाज । बरा आलो तुज शरण देवा ॥ ३ ॥
॥ बरें जालें तुझें केले देवाईल । लेकरें बाईल उपक्षीली ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे बरें व्रत येकादसी । केलें उपवासी जागरण ॥ ५ ॥

(१७७) देवा, दुष्काळानें पीडा झाली, दीवाळें निघालें, हें एका अर्थी बरें झालें. त्यामुळें—संवसाराचें वमन होऊन (ओकारी येऊन) अंतरांत तुझें चिंतन अखंड राहिलें. माझें धन गेलें, ढोरें गुरें मेलीं, जगांत अपमान पावलों याची लोकलाज धरली नाहीं, धरण्याची सोय च नव्हती, हें ठीक झालें. कारण मनास इतर कांहीं हि वेध न राहतां तुला शरण आलों. बायको व मुलें यांची उपेक्षा करून तुझें देऊळ बांधलें हें बरें झालें. गरीबीमुळें उपवास पडत तेव्हां जागरण हि होई यामुळें एकादशी चांगली साधली हें बरें झालें येथें देऊळ स्वहस्तानें बांधलें ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. St Francis of Assissi नें देऊळ बांधलें होतें.

मूळ पोथींत किंवा सख्याहरींच्या नक्लेंत बरें जालें देवा बाईल कर्कशा हा चरण नाहीं. तो कोणी मागाहून घातलेला असावा. या अभंगांतील वृत्त च पुढें सांगताहेत.

* ॥ १७८ ॥ *

॥ त्याग तंवं मज नव जाता केला। कांहीं च वीठला मनांतुनी ॥ १ ॥
॥धृ॥ भागलीया आला ऱ्वोग सहज। न धरीतां काज जालें मनीं ॥ धृ ॥
॥ देहे जड जालें रीणाचीया भारें। केले संवसारें कासावीस ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गेला अळसे कीळोसे। अकर्तेवें दोश नीवारले ॥ ३ ॥

(१७८) विठ्ठला, मी मनांतून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें त्याग असा कांही च केला नव्हता. संसाराच्या चिंतेनें नित्य उठून खावयाची चिंता करीत मी दमलों होतों, भागलों होतों, म्हणून मला सहज च कंटाळा (उबोग) आला होता. त्यामुळें मनांत कोणता च संकल्प उठत नव्हता, हें कार्य मात्र आपोआप झालें. संवसारानें मला कासावीस केले होते. ऋणाच्या भारानें देहाला जडत्व आलें होतें. कोणाकडे जावेंसें वाटेना, कोणास भेटवेना, सर्व गोष्टींच्याबद्दल आळस आला होता. किळस (वीट) हि आला होता, यामुळें मी कांहीं करीत नाहीं हा दोष निवारला होता.

दुर्गादेवीच्या दुष्काळांत तुकोबांनीं वर दोन अभंगांत वर्णिली अशी स्थिति पुष्कळांची झाली असेल. पण पुष्कळांनीं हातास चाळा असावा म्हणून पडलेलें देऊळ बांधलें नाहीं. किंवा वाचेस चाळा असावा म्हणून विठ्ठल नाम घेतलें नाहीं. तेव्हां नारायणाची जोडी झाल्यावर त्या गोडीनें झाल्या गेलेल्या सर्व गोष्टी चांगल्या च झाल्या असें म्हणण्यासारखें हें वरील म्हणणें आहे. वरील दोन्ही

अभंगांत वर्णिलेल्या गोष्टींनीं एक गोष्ट घडली कीं, सर्व गोष्टींतून मन निघालें व लागलें कोठें तर

* ॥ १७९ ॥ *

॥ बोलावा वीठल पाहावा वीठल। करावा वीठल जीव भाव ॥ १ ॥
॥घृ॥ येणें सोसें मनं जालें हांवं भरी। परती माघारी घेत नाहीं ॥ घृ ॥
॥ बंधनां पासुनी उकलली गांठी। देतां आली मीठीं सावकासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देहे भरीला वीठलें। काम क्रोधीं केलें घर रीतें ॥ ३ ॥

(१७९) बोलावा वीठ्ठल, पहावा वीठ्ठल, करावा विठ्ठल जीवभाव या सोसानें मनाची हाव वाढली. मग मन तेथून कांहीं माघार घेईना. सर्व बंधनापासून गांठ उकलली व पंढरीरायाच्या पाऊलांना निवांतपणें मिठी देतां आली. अशा तऱ्हेनें तुका म्हणे—अंगभर विठ्ठल भरला व कामक्रोधानीं घर रालीं केलें. व राहिलों कसा म्हणाल तर—

* ॥ १८० ॥ *

॥ वीठल टाळ वीठल दंडी। वीठल तोंडीं उचार ॥ १ ॥
॥घृ॥ वीठल अवघ्या भांडवला। वीठल बोला वीठल ॥ घृ ॥
॥ वीठल नाद वीठल भेद। वीठल्ल छंद वीठल ॥ २ ॥
॥ वीठल सुखा वीठल दुखा। तुक्या मुखा वीठल ॥ ३ ॥

(१८०) टाळ हा च विठ्ठल, दिंडी (अबदागिरी) विठ्ठल, तोंडीं उच्चार विठ्ठलाचा. सर्व भांडवलास मुखीं विठ्ठल विठ्ठल बोला. नाद विठ्ठल, भेद विठ्ठल व छंद हि विठ्ठल. सुखाचेवेळीं विठ्ठल, दुःखाचे वेळीं विठ्ठल, असा तुक्याच्या तोंडीं सारखा एक विठ्ठल उच्चार.

दुःखानें, त्रासानें — सर्व गोष्टींतून मन निघून एका विठ्ठल उच्चारावर मन तल्लीन होतें याचा परिणाम पुढील अभंगांत सांगताहेत:—

* ॥ १८१ ॥ *

॥ मी च मज व्यालों। पोटा आपुलीया आलों ॥ १ ॥
॥ घृ ॥ आतां पुरला नवस। नीरसोनी गेली आस ॥ घृ ॥
॥ जालों बारां वर्टी। गेलों मरोनं ते काळीं ॥ २ ॥
॥ दोहींकडे पाहे। तुका आहे तैसा आहे ॥ ३ ॥

(१८१) मी च मज व्यालों—म्हणजे माझ्या मनांत जें उच्च, रम्य, पवित्र, श्रेष्ठ होतें, तें माझ्या पुढें साकार साजीरें गोजीरें श्रीविठ्ठल असें रूप घेऊन

उभें राहिलें. मला कसली हि आस उरली नाहीं, व माझे सर्व नवस पुरले. अमुक एक मला व्हावें. अशी आस आतां उरली नाहीं. विठ्ठलानें सर्व कांहीं सांग केलें—गोड केलें. व जेव्हां मी आपलें मरण पाहिलें तेव्हां बारांबळी ( बलाढ्य ) झालों, तुका दोन्हीं प्रपंच व परमार्थ या दोन्ही, ठिकाणच्या गोष्टी पाहून सम दृष्टीनें गम्मत पाहून आहे. गेलो मरोन ते काळीं, हीं एक समजून घेतां येईल अशी गोष्ट आहे. ज्या वेळीं साक्षात्कार होतो त्या वेळीं—भक्त हा आपलेपणानें सर्वतोपरी विरून—विठ्ठलांत सामावला जातो; त्यास आपलें कलेवर —प्रेत रूपानें—वेगळें दिसतें. हे शब्द आले. पण—तुका म्हणे मी तो सगळा चि विरालो । विठ्ठल चि झालों दर्शनानें ॥ हा अनुभव जेव्हां येईल तो सुदिन—तीं सुवेळ. असा च कोणी विरळा महाभाग, आपुलें मरण पाहिलें म्या डोळां । तो जाला *सोहळा अनुपम्य ।—असे धन्योद्गार काढूं शकतो.*

※ ॥ १८२ ॥ ※

॥ स्वपनीच्या गोस्टी । मज धरीलें होते वेठी ।
॥ जालीया सेवटीं । जागे लटीकें सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ वाया भाकीली कारुणा । मुळ पावावया सीणा ।
॥ राव रंक राणा । कैंचा स्थानावरी आहे ॥ ध्रु ॥
॥ सोसीले तें आंगें । खरें होतें नव्हतां जागें ।
॥ अनुभव हीं सांगें । दुखे डोळे उघडीले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे संतीं । सावचीत केलें अंतीं ।
॥ नाहीं तरी होती । टाळी बैसोनी राहीली ॥ ३ ॥

( १८२ ) मला असें स्वप्न पडलें कीं मला देवांनीं व संतांनीं वेठीस धरिलें आहे, व त्या आनंदांत मी होतों, असा बरा च वेळ गेल्यासारखे मला वाटत होतें. पण जाग येतां च हें सर्व लटकें ठरलें. व मग वाटूं लागलें कीं, विठ्ठल टाळ, विठ्ठल दंडी, अशी मूळ पावावें म्हणून मी करुणा भाकली ती वाया तर गेली नाहीं ना ? मला व्यर्थ शीण तर झाला नाहीं ना ? ते—स्वप्नांत दिसणारे राव —रंक—राणा—हे स्थानावर आहेत कोठें? जें कांहीं वेठ करून सोसलें—तें जागें होतां च नव्हतेसें झालें व दुःखानें डोळे उघडले व अनुभव हा नुसता सांगावयास राहिला. तुका म्हणे—शेवटीं संतांनीं ( नामदेवरायांनीं ) सावध केलें म्हणून बरें—नाहीं तर माझें तोंडास टाळी बसली असती—गप्प बसावें लागलें असतें—

नामदेवरायांनीं कवित्वशक्ति दिली म्हणून विठ्ठलाचें गुणगान करतां येतें नाहींतर मौन धरावें लागलें असतें.

* ॥ १८३ ॥ *

॥ येणें जाला तुमंचे पोतडीचा झाडा। केलासी उघडा पांडुरंगा ॥ १ ॥
॥धृ॥ भरुनीयां घरीं राहीलो वाखती। आपली नीश्चींतीं आपल्यापे ॥धृ॥
॥ आतां काये उरी उरली तें सांगा। आणीलेती जगाचीये साक्षी ॥ २॥
॥तुका म्हणे कोठें पाहो जासी आतां। माझी जाली सत्ता तुम्हांवरी॥ ३ ॥

( १८३ ) मागील अभंगांत सांगितल्याप्रमाणें संतांनीं सावचित्त, सावध, केलें, याचा परिणाम काय झाला हें पांडुरंगा पाहिलेस कां ? या संतांच्या वचनाच्या आधारें तुमच्या पोतडीचा झाडा झाला – तुला संतवचनांनीं उघडा ( गुप्त असें कांहीं न ठेवीतां ) केला. मी तुला घरीं खोळींत – या शरीराच्या – या घोंगड्याच्या खोळींत, भरून ठेविला. देवाबद्दलची आपली निश्चींती – खात्री प्रत्यक्षता – आपली आपणास च असणार. आतां मी जगांत – जगास – तुमची साक्ष पटवीत आहे. त्यांत व तुमच्या सत्तामात्र अस्तित्वांत काय फरक आहे सांगा ? देवा, आतां तूं कोठें कसा काय जातोस तें पाहून घेऊं. यापुढें देवा, तुमचेवर माझी सत्ता झाली आहे.

या अभंगाचे द्वारें संतांच्या वचनांनीं देव आपणास स्पष्ट झाला असें तुकोबांचें स्पष्ट विधान आहे. असा हा संतांच्या वचनांशीं जो परिचय झाला, तें ऋण येथें कबूल केलें आहे.

* ॥ १८४ ॥ *

॥ तुमच्या पाळनां वोढतसे मंनं। गेलो वोसरोन आपणासी ॥ १ ॥
॥धृ॥ लागेल पालटें फेडावें उसीणें। येणें ची प्रमाणें पांडुरंगा ॥ धृ ॥
॥ तुमचें आवडीं समंध्याचा त्याग। घेतला यें लाग जग नींदेचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जैसा माझा जीव वोढे। तैसें च तीकडे पाहीजेल ॥३॥

( १८४ ) माझी तुम्हांवर सत्ता झाली ही गोष्ट स्पष्ट आहे व मला हि कबूल आहे. पण मी स्वतःस विसरलों आहे. व मी बाळ राहून तुम्हीं माऊली पदानें मला सांभाळावेत इकडे माझें मन ओढत आहे. तेव्हां तुम्हांस याप्रमाणें माझें उसनें फेडावें लागेल. तमच्या एकाच्या आवडीनें – सर्वांचा संबंध तुटला,

व जग निंदेचा लाग घाव मीं घेतला, तेव्हां आतां माझा जीव जसा तुमचेकडे ओढतो आहे, तसा च तुम्हास माझा वेध लागला पाहिजे.

देव भक्त यांचे नातें कसें असतें तें येथें स्पष्ट केलें आहे. भक्तांना केव्हां हि देवाचे अंकित आहोंत या भावनेनें आनंद होत असतो. हें देव भक्ताचें नातें पुढील अभंगांत ज्यास्त च स्पष्ट, स्पष्टतर, होत आहे.

* ॥ १८५ ॥ *

**॥ नाहीं मज कोण्ही उरला दुर्जन । मायेबापावीण ब्रम्हांडांत ॥ १ ॥**
**॥धृ॥ कासया जी माझी करणें ये वीशीं । भयाची मानसी चींता संतीं ॥धृ॥**
**॥ वीस्वंभराचीये लागलों सांभाळीं । सतेने तो चाळी आपुलीय ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे माझें पाळणं पोसनं । करीतां आपण पांडुरंगा ॥ ३ ॥**

( १८५ ) देवा मला, तुमच्या शिवाय, कोणी दुर्जन उरला नाहीं, कारण जेव्हां कांहीं आघात होतो त्यावेळीं ती तुमची च योजना आहे. निमित्त मात्र दुसरा कोणी उभा करतां हें लक्ष्यांत आलें कीं — तुमच्याशिवाय मला दुसरा दुर्जन (कोठें) उरला? तेव्हा यापुढें मी कोणत्या व कसल्या भयाची चिंता करावी — किंवा माझ्याबद्दल संतांना तरी काळजी कशास हावी? मी विश्वंभराचींये, सांभाळीं लागलों आहे. तो आपल्या चालीनें व सत्तेनें मला सांभाळील. पांडुरंगा, माझें पालनपोषण आपण करीत आहांत तेव्हां मी काळजी कसली व काय म्हणून करावी? व दुसऱ्या कोणास दुर्जन म्हणून म्हणावें? पांडुरंग पालनपोषण कसें करीत आहे तें पुढील अभंगांत पहा.

* ॥ १८६ ॥ *

**॥ मज कांहीं सीण न व्हावा या साठीं । कृपा तुम्हां पोटीं उपजली ॥१॥**
**॥धृ॥ होतें तैसें केलं आपले उचीत । सीकवीलें हीत बहु बरें ॥ धृ ॥**
**॥ आम्ही न मणावी कोण्हाची असंका । तुम्हां भय लोकां आहे मनीं ॥२॥**
**॥ तुका म्हणे आतां संचीताचा ठेवा । वोढवला घ्यावा जैसा तैसा ॥३॥**

( १८६ ) मला कांहीं शीण होऊं नये, म्हणून तुमचे पोटीं दया उपजली व तुम्हीं मला योग्य होतें तसें उचित केलेंत, जेणें होय हीत, तें तूं जाणसी उचीत, व मला पुष्कळ हीत कशांत आहे, बरें होत कशात आहे, तें शिकविलेंत. व आतां स्थिति अशी आहे कीं आम्हांस कोणाची शंका वाटत नाहीं. व या लोकांच्याबद्दल तुम्हांस भय वाटतें. तुका म्हणे, हा जो माझ्या

संचिताचा ठेवा ओढवला आहे. व तुम्हांस माझें पालन करावें लागावें हा तुमच्या संचीताचा ठेवा ओढवला आहे तेव्हां तो, प्रत्येकानें जसा आला आहे तसा घ्यावा.

हा संचिताचा ठेवा — देवाचा व आपला — आपण कसा भोगीत आहोंत तें स्पष्ट करीत आहेत.

* ॥ १८७ ॥ *

**॥ राजा चाले तेथें वैभव सांगातें। हें काये लागातें सांगावें त्या ॥ १ ॥**
**॥धृ॥ कोण्ही कोण्हा येथें न मणी जी फुका। कृपेवीण येका देवाचीये ॥धृ॥**
**॥ श्रींगारीलें नाही तगो येत वरी। उमटे लोकरी जैसे तैसें ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे जीवीं वसे नारायण। कृपेची ती खुण साम्या येती ॥ ३ ॥**

( १८७ ) राजा रस्त्यानें चालूं लागला कीं त्या बरोबर त्याचा सरंजाम हि मागें पुढें चालूं लागतो. त्या सरंजामास कांहीं वेगळें बोलवावें लागत नाहीं, येथें कोणी हि कोणास एका देवाच्या कृपेशिवाय मान देत नाहीं. तेव्हां माझी, जी मानमान्यता होत असेल ती तुमची कृपा माझ्यावर होत आहे याची साक्ष आहे. सजवलेली गोष्ट ही कांहीं फार दिवस टिकत नाहीं — तर ती खरी कशी आहे हें लवकर च बाहेर उमटतें. तुका म्हणे अंतरांत जर नारायणाची वस्ती झाली तर त्याच्या कृपेची खूण जी साम्यावस्था ती आपोआप बाहेर पडते. कोणी कोणा येथें न मनी जी फुका। कृपेवीण एका देवाचीया। — ही गोष्ट एका स्वतंत्र अभंगांत अधिक स्पष्ट मांडिली आहे.

॥ जन पूजी याचा मज कां आभार। हा तुम्हीं विचार जाणा देवा ॥
॥ धृ ॥ पत्र कोण मानी वंदतील शिक्का। गौरव सेवका त्याचीमुळें ॥
॥ मी मी पणें होतो जनामध्यें आधीं। कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥
॥ आतां तूं भोगीता सर्व नारायणा। नको आम्हां दीना पीडा करूं ॥
॥ आपुलीया हातें देशील मुशारा। तुका म्हणे खरा तो चि आम्हां ॥
॥ कृपेची ती खूण साम्या येती। — ही कृपेची खूण ओळखावयाची कशी ?

* ॥ १८८ ॥ *

**॥ वछ पळे धेनु धांवे पाठीलगी। प्रीतीचा तो आंगीं अनुभाव ॥१॥**
**॥ धृ ॥ सीकवीलें काय येईल कारणा। शुत्र बोटी मना आणीकाच्या ॥धृ॥**
**॥ सांडीलें तें नाहीं घेत मेळवीतां। हाणोनीया लाता मागे सारी ॥२॥**
**॥ तुका म्हणे अग्र करावा न लगे। सांगतुसे हा गे अनुभव ॥ ३ ॥**

( १८८ ) वत्स पळूं लागलें की धेनु पाठीमागें धांवत जाते. कारण तिच्या अंगीं प्रेमाचा संचार झालेला असतो. ही गोष्ट कधीं शिकवून येईल का ? मनानें मन ओढलें जातें:—वरें हें सूत्र एकदां सुटलें कीं मिळवून घेऊं म्हटलें तर तसें मिळवून घेतां येत नाही. ती च गाय वत्स मोठा झाल्यावर लाथा मारून मागें सारतें. तेव्हां तुका म्हणे येथें आग्रह करावा नलगे ।—हा मी आपला अनुभव सांगत आहे—विश्वंभराचिये लागलो सांभाळी ।— ही गोष्ट सहज झाली पाहिजे. रानांत जाऊन होणारी नव्हे. मुद्दाम करूं म्हणून करण्याजोगी नाहीं.

१८७ अभंगांत कृपेची ती सूण साम्या येती । म्हणून सांगितलें. साम्या येणें म्हणजे काय याचें स्पष्टीकरण—धेनु व वत्स—यांच्या दृष्टांतांत आहे. तेव्हां मी वत्स आहे. प्यावयास येत नाही—पळत आहे. त्यावेळीं गाय जशी पाठीशी पळत सुटेल तसें देवा तुझें आमच्यावर लक्ष्य हवें. ही गोष्ट कांहीं शिकवून येणारी—पुरी पडणारी, नाही. व येथें आग्रहाचे हि कांहीं कारण नाही. सर्व गोष्टी साहजीकपणें—निजत्वानें व्हावयाच्या तसा देवा तुझा माझा संबंध आहे. असल्या पालनास माझें मन ओढत आहे. सांगतुसे हा गे अनुभव ।—तेव्हां वीश्वंभराचीये सांभाळी लागल्याचा अनुभव सांगताहेत:—

* ॥ १८९ ॥ *

**॥ देवाच्या समंधें वीस्वची सोईर । शुभ्र वोढे दोरे येका येक ॥१॥**

**॥ धृ ॥ आहाच नव्हे हें वीटाया सारीखें । जीव जीवीं देखे सामावले ॥धृ॥**

**॥ आणींकांचे सुख दुख उमटाते अंतरी । येथील ईतरीं तेणें न्यायें ॥ २॥**

**॥ तुका म्हणे ठसावले शुध्द जाती । शोभा च पुढती वीशेसता ॥ ३ ॥**

( १८९ ) देवाशीं आपला असलेला संबंध स्पष्ट झाला कीं सर्व विश्व आपणास सोईरें आहे असें वाटतें—कारण जे सूत्र आपणास ओढून जवळ करतें—तें च सूत्र तसें च दुसऱ्यास हि सांभाळीत असल्याचें स्पष्ट होतें, वरें हें नातें असें कांहीं तरी—वीट येण्याजोगें नव्हे — कारण प्रत्येक जीव—जीवनीं—नारायणांत कसा सामावला आहे हें लक्ष्यांत येणें, आपण सर्व नारायणाची, त्या मायबापाचीं, लेकरें आहोंत असें पटूं लागतें. जसें आपलें तसें च दुसऱ्याचें या न्यायानें—आणीकांचें सुख दुःख अंतरी उमटूं लागतें. तुका म्हणे सर्व च श्रीहरीचीं लेकरें असें वाटूं लागलें म्हणजे उच्च नीच भाव लयास जाऊन, सर्व शुद्ध, भद्र, जातीचीं आहोंत. असा शुद्ध भाव मनांत ठसून, मग जों जों इतरांशीं संबंध येईल, सग होईल तो तो ज्यास्त ज्यास्त शोभा वाढत च जावयाची, येथें माणसाची दृष्टि

आत्मौपम्येन सर्वत्र सम कशी पाहूं लागते याचें विवेचन आहे. हा येवढा मोठा लाभ आपणास कसा झाला तें परिहार देऊन सांगताहेत:—

* ॥ १९० ॥ *

॥ अवघा वेचलों ईंद्रीयांचे वोढी । जालें तें तें घडी नीरोपीलें ॥ १ ॥
॥ धृ ॥ असावा जी ठावा सेवेसी वीचार । आपला म्या भार उतरीला ॥ धृ ॥
॥ काया वाचा मनें तो च नीजध्यास । येथें जालों वोस भग्तीभावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करु येईल धावणें । तरी नारायेणें सांभाळावें ॥ ३ ॥

( १९० ) मी मूळचा इंद्रियांच्या ओढीनें वेचलों होतों. तेव्हां जी जी गोष्ट जशी झाली, होत गेली, तशी ( श्री विठ्ठलाच्या ) पायापाशीं सांगत आलों. मला सेवेसी ठाव असावा असा हि विचार निवेदन करून मी आपल्यावरचा भार उतरिला व देवावर घातला. मला कायेनें मनानें वाचेनें तो च निजध्यास आहे. व भक्तीभावामुळें मी मीपणानें आतां उरलों नाही. तेव्हां देवा, तुम्हांस जर आम्हांस आपल्या सेवेत सांभाळण्याचें सामर्थ्य असेल तर तसें नारायणानें सत्तामात्र ज्ञानानें सांभाळावें.

* ॥ १९१ ॥ *

॥ कोणांचें चींतन करुं येस्या काळें । पांयांचीया बळें कंठीतसे ॥ १ ॥
॥ धृ ॥ पहातुसे वाट येईं गा वीठला । मज कां हा केला परदेस ॥ धृ ॥
॥ बहुतांचे सते जालों कासावीस । जाये राती दीस वैरीयांचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वैसे मनाचीये मुळीं । तरी च हीं जाळीं उगवती ॥ ३ ॥

( १९१ ) अशा वेळीं म्हणजे इंद्रियांचे ओढीनें वेचलों असतांना दुसऱ्या कोणाचें चिंतन करूं. अशावेळीं काळ—पायांच्या—चरणांच्या कृपाप्रसादानें देवा साभाळा असें म्हणून कंठावयाचा असतो. अशा वेळीं, येईं गा तूं विठ्ठला, असें म्हणून मला हा परदेश कां केला? मला आपल्यापासून दूर कां केलेत? आपल्या कृपाछत्राच्या बाहेर कां लोटलें? असें म्हणून देवा, तुमची वाट पहात असतो. बहुतांच्या सत्तेनें कासावीसी होते. दिवस रात्र ही वैऱ्यांच्या सत्तेंत जाते. तुका म्हणे तुम्ही जर मनाच्या मुळीं बसाल तर हीं जाळीं उगवतील. म्हणजे बाजूस सरतील. मागील व या अभंगांत जी तक्रार आहे ती शब्दशः घ्यावयाची नसून देवा तुझें सान्निध्य सदा च वाढत्या प्रमाणावर पटावें एवढी च तक्रार आहे. ही केव्हां हि न मिटण्याजोगी तक्रार आहे.

—येथें ओघ बदललेल्या सारखा वाटतो. मग कांहीं १४ें अगर अभंग गहाळ झालेले असोत किंवा कांहीं नवीन विषय सुचलेला असो. पुढील अभंग वेगळा आहे.

* ॥ १९२ ॥ *

॥ साधक जाले कळी । तंबाखुची लांब नळी ॥ १ ॥
॥ धृ ॥ पचीं पडीलें मद्यपान । भांगीं भुरका हे साधन ॥ धृ ॥
॥ अभेदाचा पाठांतर । अती वीशईं पडीभर ॥ २ ॥
॥ चेल्यांचा सुकाळ । पींड देंड भगपाळ ॥ ३ ॥
॥ सेवा मान धन । वरे ईछेने संपनं ॥ ४ ॥
॥ सोंगांच्या नरकांडीं । तुका बोडुनीयां सोडी ॥ ५ ॥

( १९२ ) या कलीयुगांत साधक कसें झाले आहेत पहा. त्यांच्या तोंडांत गुडगुडीची लांब नळी सदा असते. मद्यपान हें त्यांस पचनीं पडलेलें असतें. भांग भुरका हें त्यांचे साधन असतें, तोंडी शब्द अभेदाचे आणि विषयांबद्दल अति पडीभर—उत्कटत्व. आजूबाजूस चेल्यांचा सुकाळ आहे. व तें शरीर वगैरे धष्टपुष्ट असलेले. भगपाळ ( अर्थ सांपडत नाहीं ) मान—धन मिळविण्याच्या इच्छेनें संपन्न असतात. तुका म्हणे; अशांची—असल्या सोंगांची नरकांडी घाण जेथें सांठविलेली असते ती जागा म्हणजे या साधकांची डोचकीं—तुका—भादरून टाकतो.

हा तत्कालीन बोवाबाजीवरचा अभंग आहे. त्यावेळीं शाक्तांचें बंड होतें, त्यास धरून कोणी तरी एखादी व्यक्ति डोळ्यापुढें आणून हें चित्र रेखाटलेलें आहे. या अभंगाला अभेदा चा पाठांतर असा चरण आहे. परंतु ही अभेद स्थिति पहावयाची कोठें व कशी तें सांगून पर्यायानें जे साधक आहेत त्यांचें वर्तन कसें असावयास हवें हें सांगताहेतः—

* ॥ १९३ ॥ *

॥ जग अवघे देव । मुखे उपदेसाची ठेव ॥ १ ॥
॥ धृ ॥ आधीं आपणया नासीं । तरी उतरे ये कसीं ॥ धृ ॥
॥ ब्रह्मज्ञानाचे कोठार । तें हें नीश्चयें उतर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ते उन्मनीं । नास कारीये कारणीं ॥ ३ ॥

( १९३ ) सर्व उपदेशाचें—गुरुमार्गाचें—कांहीं सार असेल तर हें विश्व च देव आहे. पण ही गोष्ट ज्याचा देह निरास झाला आहे त्यास च फक्त पटेल—

किंवा या कसास तो उतरेल. जग अवघे देव—हें ब्रह्मज्ञानाचें कोठार आहे ही गोष्ट निश्चित आहे. परंतु कार्याकारणांचा नाश होईल— म्हणजे मला कांहीं साधावयाचें—मिळवावयाचें आहे—अशी हेव्याची निश्चिंती होईल तर च उन्मनी अवस्था अंगावर येईल. येथें विषय बदलतो. येथें जो देहनिरास सांगितला तो वरील १८१ व्या अभंगांत गेलों मरोन त्या काळीं ।—या चरणांत सांगतल्याप्रमाणें समजावयाचा आहे.

* ॥ १९४ ॥ *

॥ साधनांच्या कळा आकार अकृती । कारणें नवनीती मथनांचें ॥ १ ॥
॥धृ॥ पक्षीयासी नाहीं मारगीं अडतळा । अंतराक्षीं फळासी च पावे ॥ धृ ॥
॥ भग्तीची जोडी ते उखत्याची साठीं । उणें पुरे तुटी तेथे नाहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आले सांचत सांचणी । आजी जाली धणी येकसरें ॥ ३ ॥

(१९४) अनेक साधनांचा कळा कुसरी शिकून त्यांचें मंथन करून नवनीत लोणी काढावयाचें हा एक मार्ग व दुसरा म्हणजे विहंगम मार्ग. यांत पक्षांना वाटेंत कोठें हि अडथळा नसतो, अंतरीक्षांत भ्रमण करून फळास तीं एकदम झोंबतात. असे पिपीलीका व विहंगम असे हे दोन मार्ग सांगितले आहेत. पण भक्तीची जी जोडी आहे ती अवघें प्राप्त करून देणारी ( उखत्याचीसाठीं ). साठवण आहे. या मार्गात कांहीं उणें—तुटी—पुरे हे शब्द नाहींत. तुका म्हणे आजवर आपल्या भक्तीभावानें साचत आलें त्यास आज एकदम फळ लागून आपली हौस फिटली. पिपीलीका व विहंगम मार्गापेक्षां भक्तिमार्ग श्रेष्ठ आहे असें येथें सांगितलें आहे. ही शिकवण ज्ञानेश्वरींतील तिसऱ्या अध्यायांतील खालील ओव्यास धरून आहे.

तैसी दोन्हीं इये मतें । सूचीति एका चि कारणातें । परी उपासी ते योग्यते । आधीन असे ॥४०॥ देखें उत्पवनासरिसा । पक्षीया फळासी झोंबे जैसा । सांघे नरु केवि तैसा । पावें वेगें ॥४१॥ तो हळहळु ढाळे । केतुकनि एके वेळे । मार्गाचेनि बळे । निश्चींत ठाकी ॥४२॥ तैसें विहंगम मतें । अधिष्ठूनी ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकलिती ॥४३॥ एर योगीये कर्माधारें । वीहीतें चि निजाचारें । पूर्णता अवसरें । पावते होती ॥४४॥

* ॥ १९५ ॥ *

॥ नाहीं येथें वाणीं । सकळां व्रणीं व्यावी धणी ॥ १ ॥
॥धृ॥ जालें दर्पणांचें आंग । ज्याचे त्यासी दावी रंग ॥ धृ ॥

॥ येका भावाचा येकांत। पीक पीकला अनंत ॥ २॥
॥ तुका खळे दानीं। करी बैसोन वांटणी ॥ ३ ॥

( १९५ ) येथें कशाची हि कमतरता नाहीं. सकळा वर्णांनीं आपली घणी आवड येथें पुरवून घ्यावी. माझें अंग च आतां दर्पणाचें—आरशाचें झालें आहे. तेव्हां ते ज्यास जसा रंग हवा असेल तसा रंग दाखवीत आहे. एका भावाचा एकांत झाला त्यामुळें अनताचें पीक पीकून आलें व मी आतां खळ्यावर बसून दान करण्यास्तव, वांटणी करीत आहे. म्हणून म्हणाले कीः—या रे या रे लहान थोर। याती भलते नारी नर। करावा विजार। न लगे चीता कोणासी ॥ व ब्राह्मण क्षत्रीय वैश्य शूद्र। चांडाळा ही अधीकार। बाळे नारी नर। आदी करोनी वेश्या ही ॥

भक्तीची जोडी ते उसत्याची साठीं असें जें वचन आहे त्यांचें स्पष्टीकरण या अभंगांत आहे.

तुकोबा वांटणी कसली करीत आहेत म्हणून विचाराल तर

* ॥ १९६ ॥ *

॥ ठेवीलें जतन। करुनीयां नीज धन ॥ १ ॥
॥ धृ॥ जया पासाव उत्पती। तें हें बीज धरीलें हातीं ॥ धृ ॥
॥ नीवडीलें वरला भुस। सार आईनं जीणस ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नारायेण। भाग संचीताचा गुण ॥ ३ ॥

( १९६ ) मी निजधन जतन करून ठेविलें आहे. यापासून सर्व उत्पत्ति आहे — तें बीज —नाम— हातीं धरिलें आहे. त्या बीजावरील इतर भूस बाजूस सारिलें व ऐन जिन्नस जतन करून ठेविला आहे. तुका म्हणे आमच्या संचिताचा गुण म्हणून आमच्या वांट्यास नारायण आला.

* ॥ १९७ ॥ *

॥ भ्रमंतां पाउलें वेचलीं तीं वाव। प्रवेसता ठाव येक द्वार ॥ १ ॥
॥धृ॥ सार तीं पाउलें वीठोबाचीं जीवीं। कोणी न वीसंभावी क्षीण भरी ॥धृ॥
॥ सुलभ हे केले सकळा जीवन। फुंकावाची कान नलगे से ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येथें सकळ ही कोड। पुरे मुळ खोड वीस्ताराचे ॥ ३ ॥

( १९७ ) आजवर तुम्हीं निरनिराळे मार्ग आक्रमण्यांत जे कष्ट केलेत, ते सर्व व्यर्थ आहेत, कारण नारायणाची जोडी होण्याचा मार्ग एक च आहे,

व तो असा कीं, नारायणाचीं पाउलें ही सर्व जीवीताचें सार आहे, व तीं कोणी हि क्षणभर हि विसवूं नयेत, सार तीं पाऊलें विठोबाची जीवीं। कोणी न विसंवावी क्षणभरी – या उपायानें सर्वजनांना हा जीवनाचा उपाय सुलभ केला – व आतां कान'फूंकून गुरुमंत्र देण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. तुका म्हणे येथें तुम्हीं विठोबाचीं पाउलें जीवीं धरल्यावर तुमचे सर्व कोड पुरविले जातील. कारण हीं पाउलें हें जगत विस्ताराचें मूळ खोड आहे.

भक्तीची जोडी ती उखत्याचे साठीं म्हणून जें १९२ व्या अभंगांत सांगितलें आहे त्याचें हें स्पष्टीकरण आहे.

* ॥ १९८ ॥ *

**॥ आदी मधे अंत दाखविला दीपें। हा ची आपणांपें येरन वरा ॥ १ ॥**
**॥धृ॥ दास्यत्वें दावीलें धण्याचे भांडार। तें तो नव्हे सार येथुनीया ॥ धृ ॥**
**॥ उपायाचा सोस नासला सकळ। सते सत्तावळ आंगा आले ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे ब्रुस्टी सकळांची सीरीं। वचनंची करी बैसोनीयां ॥ ३ ॥**

(१९८) विठोबाचीं पाऊलें हीं सार आहेत–हा दीप हातीं आल्यावर – जगाचें आदि तत्त्व काय–मध्य कशांत व अंत कसा–हें या चिन्मणी दिपानें–दिव्यानें दाखविलें – तेव्हां विठोबाचीं पाउलें जीवीं धरावी हा आपण यत्न केलेला बरा. कांहीं साधनांची आटाआटी करून सोस करावा हें आतां संपलें – व माझ्या अंगीं खरें सत्तावळ आलें. तेव्हां आतां मी सर्व साधनांच्या –उपायांच्या– शिरावर बसून – वचन बोलतो आहे.

* ॥ १९९ ॥ *

**॥ धनवंता घरिं। करी धनंची चाकरी ॥ १ ॥**
**॥ धृ ॥ होये बैसल्या व्यापार। न लगे सांडावे ची घर ॥ धृ ॥**
**॥ रानीं वनीं दीपीं। असती ती होती सोपी ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे मोल। देता कांहीं नव्हे खोळ ॥ ३ ॥**

(१९९) धनवंता घरीं धन चाकरी करीत असतें. श्रीमत माणसास घर सोडून व्यापार करावयास बाहेर जावें लागत नाहीं. त्याच्या नुसत्या शब्दानें व सत्तेनें बसल्या ठिकाणीं व्यापार होतो.'मग ती गोष्ट रानांत असो, वनात असो, एखाद्या द्वीपांत असो, त्यास तो मोल देत असल्यामुळें – कांहीं खोळ पडत नाहीं व सर्व गोष्टी सोप्या होतात. विठोबाचीं पाउलें–जीवीं धरून मी हि हा धनवंत झालों आहे. तेव्हां

॥ २०० ॥

॥ साठवीले वाण। पैस घातला दुकान ॥ १ ॥
॥ धृ ॥ जे ज्या पाहीजे ज्या काळीं। आहे सीध ची जवळी ॥ धृ ॥
॥ नीवडीले साचे। उतम मधेम कनीस्टाचे ॥ २ ॥
॥ तुका बैसला दुकानीं। दावी मोला येसी वाणी ॥ ३ ॥

( २०० ) मी दुकानांत निरनिराळे वाण सांठविले आहेत, व दुकान पैस ( मोठें ) घातलें आहे. कोणास कोणत्या हि काळीं लागतील असे जिन्नस माझे जवळ सिद्ध आहेत. सर्व माल उत्तम मध्यम कनिष्ट असे साचे – खरे निवडिले आहेत. म्हणजे वेगवेगळाले काढले आहेत. तुका आतां दुकानीं बैसला आहे – व आतां मोलाप्रमाणें जिन्नस दाखवीत आहे.

तुकोबा व्यवसायानें वाणी होते. तेव्हां त्यांना वरचेवर दुकानाचा दृष्टांत सुचत असे. पूर्वी सोनें-चांदी कापड-चोपड-हिंग-मिरे-मीठ मिरची हे वाण दुकानांत साठवीत होते, आतां कोणते वाण दुकानांत साठविले आहेत ते सांगताहेत. आतां या नव्या दुकानांत बोध प्रेम सांठविलें आहे. तेव्हां त्यांतील एकेक जिन्नस मोला ऐसा – म्हणजे गिऱ्हाईक – ज्या तयारीनें (मोल घेऊन) आला असेल तसे दाखवीत आहेत.

॥ २०१ ॥

॥ पुसावे तें ठाई आपल्या आपण। अहंकारासी सुने घालुनीयां ॥ १ ॥
॥ धृ ॥ येर वागजाळ मयेचा आकार। वचनासी था (र) अज्ञान तें ॥ धृ ॥
॥ फळ तें ची वीज बीज तें ची फळ। उपनांवें मुळ न पालटे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अवघे गव्हाचे प्रकार। सोनें अलंकार मीथ्या नांवें ॥ ३ ॥

( २०१ ) आपण बसल्या ठिकाणीं ठायींच्या ठायीं अहंकारास शून्य घालून ( कोणींच मीं नव्हे – कोणींये गावींचा – एकच तूं ठायींचा ठायीं एक या न्यायानें ) आपण कोण आहोंत – कोठून आलों, कशासाठीं आलों, हें स्वतःस च विचारावें. इतर वागजाळ – हा मायेचा आकार जसा स्वप्नवत्, तसा अज्ञानास टेकावयास ठिकाणा आहे असें समजावें. फळ तें चि बीज – व बीज तें चि फळ – आपण देवाचे व देव आपला – भक्त देवाचा जनीता – देव भक्ताची कृपाळु माता हें मूळ आहे व आडनांव बदलल्यानें – दत्तक गेल्यानें, जसा ऐन जिनसीं मनुष्य बदलत नाहीं – तसा या संबंधांत फरक पडत नाहीं. तुका म्हणे गव्हाचें काय किंवा सोन्याचें काय – निरनिराळे प्रकार केल्यानें, ऐन जिन्नस जसा नाहींसा

होत नाहीं, तसा हा देवभक्तांचा संबंध आहे. सर्व ज्ञान—वेदांत—देव—धर्म—हे सर्व मनुष्य प्राणी म्हणजे जीव जीवंत आहे, म्हणून, त्यानें हो म्हटलें तर आहेत व देवाचा जन्म, हा भक्तहृदयांत जें रम्य—पवित्र—धर्म्य—क्षेत्र आहे त्यांत आहे. व असा हा भक्तहृदयांत जन्मून देव कृपाळू माउलीप्रमाणें भक्ताचें रक्षण—पालन-पोषण करीत असतो.

* ॥ २०२ ॥ *

॥ कांहीं जाणो नये पांडुरंगावीण। पावीजैल सीण संदेहानें ॥ १ ॥
॥धृ॥ भलतीया नांवें आळवीला पीता। तऱ्ही तो जाणंता कळवळा ॥ धृ॥
॥ अलंकार होतो गौरवीतां वाणी। सर्व गात्रां धणी हरी कथा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे उपजे वील्हाळे आवडी। करावा तो घडी घडी लाहो ॥३॥

( २०२ ) फळ तें ची बीज—बीज तें चि फळ—हा एक बाण दाखवून त्याचें गुणवर्णन चालूं आहे.

आपण एका पांडुरंगाशिवाय इतर कोठें हि पाहूं नये. कारण त्यामुळें, इतरत्र पाहिल्यानें, आपणास शीण च होईल. आपण बापास काका म्हटलें—तरी तो आपला कळवळा ओळखतो. तेव्हां आपण पांडुरंग—पांडुरंग, म्हणून मायबापास आळविलें तर वाणीस अलंकार होतो व हरी कथेनें सर्व गात्रांस धणी होते. म्हणजे त्यांची हौस फिटते. तुका म्हणे—जिव्हाळयानें आवडी उत्पन्न होते व घडी घडी लाहो करावा—नामाचा छंद घ्यावा, असें वाटतें.

* ॥ २०३ ॥ *

॥ लागलीया मुख स्थना। घाली पान्हा माउली ॥ १ ॥
॥ धृ ॥ उभयेता आवडी लाडे। कोड कोडे पुरातें ॥ धृ ॥
॥ मेळवीतां आंगा आंग। प्रेमें रंग वाढता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जडभारी। अवघे सीरी जननीचे ॥ ३ ॥

( २०३ ) नामस्मरणानें घडी घडी लाहो केला तर काय होतें ? तर नाम हे देवाचे स्तन असल्यामुळें, बालकाचे स्तनास मुख लागतां च माउली पान्हा सोडते, तसें, म्हणजे आपण नामस्मरण करूं लागतां च—माउली पान्हा घालते व उभयतांस आवडी आवडीनें लाडाचीं—कोडाचीं पुरवणी, कोडाकोडानें—कौतुकानें—होते. अंगास अंग मिळवितां च प्रेमाचा रंग वाढता असतो. अशा स्थितींत जें जडभारी—अवघड त्रासदायक—होईल—असेल त्याचा भार जननीचे

शिरावर साहजीक च असणार. बीज तें चि फळ हा एक जिन्नस दाखविला. आतां गोविंद घ्या—कोणी दामोदर घ्या, हा जिन्नस दाखवितात.

* ॥ २०४ ॥ *

॥ मैं भुली घरज्यानी वाट। गोरस बेचनं आई हाट ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ कान्हा रे मन मोहन लाल। सबही बीसरी देखी गोपाल ॥ ध्रु ॥
॥ का हा डास पग देख अनेरा। देखुं तो सब योहीं न घेरा ॥२॥
॥ हुं तो थकीत भैरे तुका। भागा मनं का सबही धोका ॥ ३ ॥

(२०४) मी घराची वाट चुकून गोरस (दूध, दही, लोणी) विकण्यासाठीं बाजारांत आलें. तेव्हां आतां कान्हा, लाला, मनमोहना, तुला पाहून सर्व शुद्ध नाहींशी झाली रे, आतां सर्वत्र, लाला, तूं च दिसतो आहेस. तेव्हां आतां पाऊल तरी कोठें टाकूं—तुका म्हणे—मी तर चकीत झालें आहे व माझ्या मनांतलें सर्व भय नाहींसें झालें.

हा—तुकोबांच्या दुकानांतील उत्कृष्ट जिन्नस मोल देवून पदरांत घेणारा कोण भाग्याचा हरीचा लाल आहे! ही स्थिती ज्यांनीं त्यांनीं क्षणभर तरी भोगलेली असावी. शितावरून भाताची परीक्षा करा असें सांगून तुकोबांनीं दोन जिन्नस दाखविले पण पुरेसे मोल घेऊन गिऱ्हाईक आलेलें दिसेना तेव्हां विषय बदलतात. वाण हि निराळे काढताहेत.

* ॥ २०५ ॥ *

॥ कां जी तुम्ही येसे न व्हा कृपावंत। नींवे माझें चीत ठाईंचा ठाईं ॥१॥
॥ध्रु॥ कांहीं सम नये वीशम अंतरा। श्यांतीचा तो बरा येसा योग ॥ ध्रु ॥
॥ दुखी होतो पंचभुताच्या वीकारें। जडत्वें दातारें राखावीं तीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मोडा अहंकाराची मानं। धरीतो चरण म्हणउनी ॥ ३ ॥

(२०५) देवा, ठायींच्या ठायीं—म्हणजे माझें मन तुमच्या ठिकाणीं पूर्णपणें नीवून जावें असें कृपावंत तुम्ही कां होत नाहीं? माझ्या मनांत कांहीं सम विषमाचा भाग न येईल—असा मला शांतीचा योग यावा हें उत्तम, पंचभूतांच्या जडत्वानें, विकारानें, मी दु:खी होतों, तेव्हां हीं पंचभूतें ठायींच्या ठायीं तुम्ही राखावींत—व देवा, मी तुमचे चरण धरीत आहे, धरिले आहेत म्हणून, जी गोष्ट स्पष्ट झाली आहे कीं आम्हांस आतां अहंकार नाहीं ती गोष्ट, अहंकर्तृत्वाची मान मोडून सिद्ध करा. तेव्हां सांगण्याची गोष्ट अशी कीं,

आपणांस जी नड वाटत असेल ती देवास आळवून सांगावी. हा तुकोबांच्या दुकानांतील तिसरा जिन्नस.

* ॥ २०६ ॥ *

॥ बीजा पोटीं पाहे फळ। बीध न करीतां सकळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ तया मुर्ख म्हणा वेडें। केंसे तुटेल साकडे ॥ धृ॥
॥ दावीतीया वाट। वेठी धरु पाहे चाट ॥ २ ॥
॥ पुढीला उपाया। तुका म्हणे राखे काया ॥ ३ ॥

(२०६) जमीन नांगरली पाहिजे, बीज पेरलें पाहिजे, स्वतः पाणी घातलें पाहिजे, हे सर्व विधी न करिता जो कोणी बीजात च फळ पाहूं म्हणेल, त्यास मूर्ख वेडा असा म्हणावें. असल्या वेडेचारानें, बाबा, संकट निवारण कसें होईल? भूक कशी शमेल? वरें या गोष्टी कशा कराव्यात ती वाट दाखवावयास जो येईल, त्यास वेठीस धरून, दुसऱ्या पुढील इतर उपायास्तव जो आपली काया, शरीर राखील त्यास चाट असें म्हणावें.

आम्ही कोणती हि ज्ञानाची, बोधाची गोष्ट, कर्मावर, प्रियतेच्या कृतीवर येऊं न देतां, केवळ शब्दाच्या ओळखीनें, बीजांत च फळ पाहू, असें म्हणणाऱ्यास व सर्व भार गुरुवर आहे, त्यांनीं आमचेबद्दल सर्व करावें असें म्हणणाऱ्यास – तुकोबा – वेडे-मूर्ख-चाट – असें म्हणताहेत. हा दुकानांतील चवथा जिन्नस. अलीकडे चाट हा शब्द फार रूढ झाला आहे, पण त्याचा खरा अर्थ येथें तुकोबांनीं सागितला आहे. दुकानांतील आणखी एक वाण दाखवीत आहेत.

*॥ २०७ ॥ *

॥ मातेचीं जो थानं फाडी। तया जोडी कोणतं ॥ १ ॥
॥ धृ ॥ वेदां नींदी तो चांडाळ। भ्रस्ट सुतकीया खळ ॥ धृ ॥
॥ आगी लावी घरा। मग वसती कोठें थारा ॥ २ ॥
॥ तुका जाणे वर्म। येरा नाचवीतो भ्रम ॥ ३ ॥

(२०७) जो आपल्या आईची स्तन स्तनपान करितांना फाडतो, त्यास लाभ काय होणार? तसें जो चांडाळ वेदांना – सत्ता मात्र ज्ञानास निंदील – त्यास लाभ काय होणार? तो भ्रस्ट – सुतकी – खळ – म्हणून समजावा. जो कोणी आपल्या घरास आग लावील – त्यास वसतीस थारा कोठें राहणार? तुका म्हणे – मला जगाचें वर्म माहीत आहे व इतरांना भ्रम नाचवितो आहे. तुका जाणे वर्म ।

येरा नाचवितो भ्रम ।– ही गोष्ट कशी नांदत आहे ते सांगताहेत. हा तुकोबांच्या दुकानांतील पांचवा जिन्नस. येथें वेदाची आठवण झाली तेव्हां ओघानें च वेदोनारायणांची म्हणजे वर्णानें ब्राह्मण म्हणविणाऱ्यांची आठवण होऊन म्हणतात.

* ॥ २०८ ॥ *

॥ वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण नीरुते ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ ऐसे सांगा मजपासीं । संतां वीनवीतो ये वीशीं ॥ ध्रु ॥
॥ असा जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुध हीण ॥ २ ॥
॥ तुका जाणे वर्म लोपे । सत्याचीया घडती पापे ॥ ३ ॥

( २०८ ) हे जे समोर ब्राह्मण दिसताहेत, तो त्यांचा वेष वंदनापुरता, नमस्कार घेण्यापुरता आहे. पण यांतील निरु ब्रह्म जाणणारे कोण आहेत, ते दाखवा बरे, असें तुम्हां संतांस विनवून विचारीत आहे. तुम्ही ग्रंथ म्हणण्यांत, जाणण्यांत, प्रवीण असाल, त्यांतील तुम्हास शुद्ध हीन हि कळत असेल, परंतु सत्याचें वर्म लोपल्यामुळें, तुमच्या हातून पापें घडत आहेत, हें, याचें वर्म, मी जाणत आहे.

तुम्ही ब्राम्हण यज्ञ करता त्यांत तुम्हांस स्वर्गसुख मिळावें अशी इच्छा असते, उर्वशीसारख्या बायका भोगावयास मिळाव्यात, ही इच्छा असते. त्यांत देव प्राप्त व्हावा, नारायणाची जोडी व्हावी, अशी इच्छा, असते कां? तुम्ही दक्षणा घेऊन दुसऱ्यासाठीं जप करितां, व त्या पुण्याचें उदक यजमानाचे हातावर दक्षिणेस्तव सोडता. हें तुम्ही पुण्य करितां का पाप? हें पुण्यविक्रीचें काम म्हणजे, *पुण्य विकरातें मातेशीं गमन ( अभंग ८० वा )* आहे. तुम्ही सोवळ्या ओवळ्याचें मोठें स्तोम माजवितां म्हणून विचारतों कीं ऐसें केसें बा सोवळे, *शिवतां होतसे ओवळें ।– समोर विष्ठा पाहिलीस, हडुक पाहिलेंस, तर, तुला* विटाळ होतो, पण तुझ्या पोटांत काय सांठविलें आहे? त्यांत विष्ठा, मूत्र आहे, शरीरांत हाडें किती आहेत? *तेव्हां बा कशाचा विटाळ मानतोस–सोवळा* कोणास समजतोस? सोवळा तो कीं ज्याचा देवानें अंगीकार केला. तसा सोवळा रेशमी वस्त्र दुंगणास लावल्यानें तूं होतोस का? तेव्हां या सर्व गोष्टींतील तुमच्या आचारांतील, वर्म लोपून, तुमच्या हातून पाप होत आहे. तेव्हां ब्राह्मणांच्या हातून ज्ञानाचें वर्म लोपल्यामुळें पापें कशीं घडतात याचें वर्णन करून सांगताहेत कीं:–

* ॥ २०९ ॥ *

॥ अवगुण तो कोण्हें नाही प्रतेस्टीले। मागे होत आले सीस्टाचार॥१॥
॥घ्रु॥ दुबळ्याच्या नांव पीटावा डांगोरा। हा तो नव्हे बरा मते वाद॥ ध्रु॥
॥ मद्दे आणी मधु येकीरासी नावे। तरी कां ते खावें आधारें त्या ॥२॥
॥ तुका म्हणे माझा उचीस्ट प्रसाद। नीवडी भेदाभेद व्रुस्टी न्यायें ॥३॥

(२०९) आजवर अस कधीं हि झालें नाहीं कीं कोणी हि झालें तरी अवगुणांची पूजा बांधिली आहे. वेदोनारायण, भू देव, म्हणून लोक तुम्हांस शिष्टाचार म्हणून मानीत आले. पण नारायणाची जोडी करून देण्याचें वर्म तुमचे हातीं नाहीं, तें वर्म तुमच्या आचारधर्मात लोपून गेलें. आतां मी नारायणाची जोडी लोकांस करून देतो म्हणून ते मला मानतात, असें आहे. मग असे चार लोक अम्हांस मानीत असले तर तुमच्या पोटांत कां दुखावें? तुम्हीं या हीन, दीन, दुर्बळ माणसांच्या नांवानें डांगोरा कां पिटावा? हें तुमचें करणें कांहीं बरें नव्हे. हा केवळ मतवाद आहे. मद्य व मधु यांतील मधु हा शब्द द्वयर्थी आहे. म्हणून त्या आधारें दारु प्यायली तर चालेल का? हा प्रश्न शास्त्रांस असावा. तुका म्हणे माझी वचनें हीं संतांच्या उच्छिष्टाचा प्रसाद आहे आणि मी त्यांतील भेदाभेद वृत्ती न्यायानें निवडीत आहे. [ शेवटच्या दोन चरणांचा अर्थ नीट लागला नाहीं. ]

लोक तुकोबांस मानू लागल्यावर जी कित्येक पंडितांस पोटदुखी उठली व शास्त्रज्ञांच्या कपाळास तिढीक गेली — त्यास हें उत्तर आहे.

* ॥ २१० ॥ *

॥ नव्हे खळवादी मता च पुरता। सत्याची हे सता उपदेस ॥ १ ॥
॥घ्रु॥ साक्षेत्वेसी मनां आणावीं उतरे। परीपाकीं खरें खोटें कळे ॥ ध्रु॥
॥ नव्हे येकदेसी शोब्द हा उखता। ब्रह्मांडा पुरता घेईल त्यासी ॥ २ ॥
॥ तुका वीनंवणी करी जाणतीया। वहुमतें वाया श्रमो नये ॥ ३ ॥

(२१०) मी असा कांहीं खळ नाहीं, कीं, एका मतापुरता मी सर्व गुडाळून ठेवीन व एक च वाद मांडीन. माझा उपदेश हा सत्याची सत्ता प्रस्थपित करण्यासाठीं आहे. माझ्या वचनाची साक्ष पहावी, व त्या वचनांचा मनांत काय परिणाम होतो, त्यावरून खरें खोटें, कळून येईल. माझा शब्द हा एकदेशी, कांहीं मत प्रस्थापित करण्यापुरता, उच्चारलेला नाहीं. जो कोणी त्याचा अनुभव घेईल त्यास तो शब्द ब्रह्मांडा एवढा आहे असें आढळेल. तेव्हां जाणत्या माणसांस

तुका विनवणी करून सांगतो आहे कीं, बाबांनो, बहुमतें वाया श्रमो नये।— पुष्कळ शास्त्रांचीं परस्पर विरुद्ध वचनें गोळा करून—त्यांची गुंतागुंत सोडविण्याच्या श्रमांत आपण पडूं नये.

येथें आपलें कवित्व हें कांहीं कोणत्या मताचा प्रसार करण्यासाठीं आग्रहानें मांडलेला वाद नसून तीं सत्यप्रकाशाची सत्ता आहे. त्या वचनांची साक्ष पहावी व जो माझें वचन विश्वासाच्या व आदराच्या भावनेनें घेईल त्यास माझें वचन ब्रह्मांडास नेऊन पोहोचवील असें वाटेल; तेव्हां मतांतरें गोळा करून श्रमूं नका म्हणून सांगताहेत बहु मतें वाया श्रमो नये। ही शिकवण अलीकडील किती सुशिक्षित लोक मानतील! उठला सुटला प्रत्येक मनुष्य तुकोबांचे सारखे वचन बायबलमध्यें, बुद्ध गाथांमध्यें—शोधीत असतो. या तुलना व्यर्थ आहेत.

स्वतःच्या उपदेशाचें स्वरूप जास्त स्पष्ट करीत आहेतः—

* ॥ २११ ॥ *

॥ भूतीं भगवंत। हा तो जाणोतो संकेत ॥ १ ॥
॥ घ्रू ॥ भारी मोकळीतो बाण। ज्याच्या त्यासी कळे गुणं ॥ घ्रू ॥
॥ करावा उपदेस। नीवडुनीं तरी दोश ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाटे। चुकतां आडराणें काटे ॥ ३ ॥

( २११ ) प्रत्येक भूतमात्राच्या ठिकाणीं भगवान वास करीत आहे. या संकेतानें प्रत्येक गोष्ट मनावर घेऊन मी प्रत्येक शब्द, भारी वजनानें, सोडीत उच्चारीत, असतो. हें तो शब्द ज्यास लागूं असेल—त्यास त्याचा गुण येऊन, कळेल. कोणास उपदेश करावयाचा तर त्याचे गुणदोष मनांत आणून केला पाहिजे. जर असें न करूं तर माणसें रस्ता चुकून आड रानांत जातील. स्वतःच्या कवित्वाचें वर्णन, भारी मोकलीतो बाण। असें तुकोबांनीं केलें आहे.

हे दोन अभंग श्रीज्ञानेश्वरींत म्हटल्याप्रमाणें:—

तो शांतू चि अभिनवेल। ते परीयेसा मऱ्हाटे बोल।
जे समुद्रा ही हुनी खोल। अर्थ भरीत ॥२११॥
जैसें बींब तरी बचके येवढें। परी प्रकाशा त्रैलोक्य थोकडे।
शब्दाची व्याप्ती तेणें पाडें। अनुभवावी ॥२१२॥—

असे हे तुकोबांचे शब्द अर्थभरितः—समुद्राहुनी खोल—असे मऱ्हाटे बोल आहेत. येथें विषय व ओघ बदलतो. सगुण व निर्गुण अशीं देवाचीं च अंगें आहेत.

पण आपणास निर्गुण रूप पटत नाहीं, आवडत नाहीं, अशी तक्रार आहे. हें देवाशीं प्रेमाचें भांडण आहे.

* ॥२१२॥ *

॥ माझे लेखीं देव मेला। असो त्याला असेल ॥ १ ॥
॥धृ॥ गोठी न करी नांव नेघे। गेलों दोघे खंडोनी ॥ धृ ॥
॥ स्तुती समवेत धंदा। केला धंदा उदंड ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीवांत ठेलों। वेचत आलों जीवीत्वें ॥ ३ ॥

(२१२) कोणास देव लाभला असेल तो असो, मला देव मेलेला आहे. आतां मी त्याची गोष्ट बोलणार नाही. त्याचें नांव घेणार नाहीं. दोघांनीं आजपासून फारकत करून घेतली आहे. आजपर्यंत त्याची स्तुती पुष्कळ केली त्याबरोबर निंदा हि केली, हा धंदा आजवर उदंड केला, त्यांत जीवीत वेचींत आलों, तेव्हां आतां, त्याची गोष्टी करीत नाहीं, निवांत स्वस्थ बसतो.

* ॥२१३॥ *

॥ चींतनें अर्चीत राहीलो नीश्चळ। तें च कीती काळ वाढवावें ॥ १ ॥
॥धृ॥ अबोल्याचा काळ आतां येस्यावरी। वचनांची उरी उरली नांहीं ॥धृ॥
॥ करु आला तो तो केला लवलाहो। उरोंची संदेहो दीलहा नाहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मोहो परते ची ना मागें। म्हणउनी त्यागें त्याग जाला ॥३॥

(२१३) परंतु या अचिंत्य अशा निश्चळ स्थितींत चिंतनांत च राहिलों— आतां अबोल्याचा काळ हा असा आला कीं, आतां बोलण्यास वाव (उरी) उरली नाहीं. आजवर करविला तो तो त्याच्या नांवानें त्वरेनें गजर केला, कोठें हि संदेह उरुं दिला नाहीं. तुका म्हणे या सर्व गोष्टी, करीत असतांना केव्हां हि मोहानें मागें परतून पाहिलें नाहीं. गजर करीत असतांना मोह अमुक एका गोष्टीच्या आड येत आहे असें म्हणतां च कोणत्या हि गोष्टीचा त्याग सहज झाला.

* ॥२१४॥ *

॥ नीर्गुणांचे द्यावें गुणांसीं दरशण। येका येक भीन भेदे घडे ॥ १ ॥
॥धृ॥ तुम्हां आम्हां आतां न पडे यावरी। अहों तें च वरी जेथें तेथें ॥ धृ ॥
॥ आपण्या पासुनी नसांवें अंतर। वेचीलें उतर म्हंणउनीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आंगा आली कठीणता। आमंच्या अनंता तुझ्या येसी ॥३॥

(२१४) आम्हांस सगुण दर्शन हवें व तुम्ही निर्गुण स्वरूपांत दर्शन घ्या म्हणतां परंतु या दोन्ही गोष्टी भिन्न आहेत. त्यामुळें तुमचे, आमचें या भेदामुळें,

पटत नाहीं. तेव्हां तुम्ही व आम्ही जेथें जशी आहोंत तेथें ठीक आहोंत. तुम्हां आम्हांत अंतर नसावें म्हणून इतकीं उत्तरें वेचिलीं, आतां मात्र आमच्या अंगीं तुमच्या सारखी च हे अनंता, कठीणता आली आहे. येथें पहाण्या सारखी गम्मत ही कीं, ही गोष्ट अनंतास च सांगत आहेत.

* ॥ २१५ ॥ *

॥ तुजची पासाव जालोंसों नीर्माण। असावें तें भीनं कासयानें ॥ १ ॥
॥ध्रु॥ पाहावा जी ठाईं करुनी वीचार। नीउन कोठें फार असेचीना ॥ ध्रु ॥
॥ ठेवीलीये ठाईं अइयेचें पाळण। करुनी जतनं राहीलोसें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां बोलतुसे पस्ट। जालों कीयानस्ट तुम्हां येसी ॥३॥

(२१५) देवा मी तुम्हांपासून निर्माण झालों आहे. आतां काय म्हणून कोणत्या आधारानें मी तुम्हांपासून भिन्न असावें! आतां याचा विचार जरा तुम्ही च करा, कीं तुमच्या आमच्यांत कोठें न्यून, कमीपणा, आहे का? तेव्हां तुमच्या आमच्या संबंधांत तुम्ही आम्हांस आज्ञा करून जेथें ज्या कामावर स्थापून ठेविलें आहेत, तेथें तुमचें नांव जतन करून राहिलों आहे म्हणून आतां स्पष्ट च बोलतों कीं आम्हीं आतां तुमच्यासारखे क्रियानष्ट झालों आहोंत, म्हणजे जसा तुम्हांस कांहीं करावें असा लकडा नाहीं तसा आम्ही हि आपल्या पाठीशीं कांहीं काम लावून घेत नाहीं.

* ॥ २१६ ॥ *

॥ प्रीत भंग माझा केला पांडुरंग। भक्तीरस सांगा कां जी तुम्ही ॥१॥
॥ ध्रु॥ म्हणउनी कांहीं नेठवी च उरी। आलो वर्मावरी येकायेकी ॥ ध्रु ॥
॥ नेदखें ची कांहीं परती माघारी। उरली ते उरी नाहीं मुळें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आला अंतरासी खंड। तरी माझें तोंड खवळले ॥ ३ ॥

(२१६) पांडुरंगा, तुम्ही माझ्या प्रीतीचा व भक्तिरसाचा भंग कां बरें केलांत? करीत आहांत, तें सांगा, आतां मी कसली हि उरी ठेवीत नाहीं, मी आतां एकाएकी वर्मावर आलों आहे. मज पाठीमागें कांहीं मोह नाहीं, मी मागें वळून हि पाहात नाहीं. तुका म्हणे तुमच्या आमच्यांत, अंतर, सार्क्षीस खंड आला, अंतर पडलें, म्हणून माझें तोंड खवळलें आहे.

* ॥ २१७ ॥ *

॥ दृटीका येसा म्हणंतां देव। संधयस। पाटतसे ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ तों हें आलें अनुभवा। मज ही सेवा करीतां ॥ ध्रु ॥

॥ सुन्याकारी बहु मोल्टा । भेंडोळा हे पवाडे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ताळीं नाहीं । येके ठाई चपळत्वें ॥ ३ ॥

(२१७) मला सेवा करून अनुभवानें आतां — ( लोक म्हणतात देव नाहीं म्हणून ) तसा सशय येऊं लागला आहे. शून्य वादाचा, शून्याकाराचा, फार बोलवाला आहे आणि त्याच्या पवाड्यांची भेंडोळीं होतात. परंतु तुमच्या अंगीं, चपलत्व असल्यामुळें तुमचा एका हि ठिकाणीं ताळा सांपडत नाहीं. यांत सगुण आवडीनें, निर्गुण ध्यानांत, न्यून कोठें आहे तें सांगितलें आहे. सगुणपणांत जशी हातीं साक्ष असते, राहते, तशी निर्गुण स्वरूपांत नसते हा सांगण्याचा आशय.

* ॥ २१८ ॥ *

॥ जैसा साठीं तैसे व्हावें । हें बरवें कळलें ॥ १ ॥
॥ धृ ॥ उदास तूं नारायणा । मीं ही म्हणां तुम्हीं च ॥ धृ ॥
॥ ठका महाठक जोडा । जो धडपुडा लागासी ॥ २ ॥
॥ येकांगीचें भांडे तुका । नाहीं धोका जीवीत्वें ॥ ३ ॥

(२१८) देवा, जशास तसें वागावें हें मला चांगलें कळलें. तुम्ही जर उदास, तर नारायणा, मीं तुमच्यासारखा उदास कां नसावा? तुमच्या खरोखर जवळ जवळ असावें म्हणून जो तडफडत आहे. पण उलट मीं उदास असलेला बरा कारण त्यामुळें ठकाशीं महाठकाचीं गांठ पडेल. माझें भांडण हें एकांगी च चालूं आहे कारण उत्तर द्यावयास तुम्हीं समोर च येत नाहीं, तंटा, तक्रार, पुढें चालूं.

* ॥ २१९ ॥ *

॥ बहुता रीती काकुळती । आलों चीतीं न धरा च ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां कास्यासाठीं देवा । मीथ्या हेवा वाढऊं ॥ धृ ॥
॥ तुम्हां आम्हां जाली तुटी । आतां भेटी चींतन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लाजीरवाणें । अधर जीणें ईछेचें ॥ ३ ॥

(२१९) निरनिराळ्या तऱ्हांनीं तुम्हांस काकुळतीस आलों पण तुम्हीं कांहीं मनावर च घेत नाहीं तेव्हां काय करावयाचें ? आतां कशासाठीं खोटा हेवा वाढवूं ? तुम्हां आम्हांस आतांपासून तुटी झाली, आतां चिंतन ही च तुमची भेट, माझें हें सारखें मागतकऱ्याचें जीणें लाजीरवाणें आहे. तक्रार पुढें चालू आहे.

* ॥ २२० ॥ *

॥ अस्चीर तें येक जाले। मंनां आले माझीया ॥ १ ॥

॥ घृ ॥ मठ्यापासी करुणा केली। तैसीं गेली वृथ्या हे ॥ घृ ॥

॥ न यावा तो कैसा राग। खोटे मग देखोनी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कैचा बोला। शोध चीठला माझीया ॥ ३ ॥

( २२० ) देवा मला एका गोष्टीचें सारखें आश्चर्य वाटून राहिलें आहे व तें हें की, मी मझ्यापाशीं तर करुणा भाकली नाही ना ! कारण माझी विनवणी तशी फुंकट गेल्यासारखी वाटत आहे. मग देवा, तूं खोटा आहेस, असें पाहून मला राग कां येऊं नये ! तेव्हां मझ्यापाशीं करुणा केली हा बोल कोठून आला, कसा आला, व तो कां आला तें देवा, शोधून काढा.

* ॥ २२१ ॥ *

॥ मागायाची नाहीं ईछा। जो मी यैसा संकोचो ॥ १ ॥

॥ घृ ॥ लटीकीयाची न करूं स्तुती। ईछा चीती धरूनी ॥ घृ ॥

॥ हीसोबे ते आले ध्यावे। हे तो ठावे सकळांसी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे स्वामी सेवा। येथें देवा कास्याची ॥ ३ ॥

( २२१ ) देवा तुम्हास नावे ठेवण्याचें कारण काय ? मला कांहीं तुमच्यापाशीं काहीं मागावयाचें नाहीं. तेव्हा कसलया तरी प्रीतीनें मला खोट्या गोष्टीची उगा च स्तुती करण्याचें, कारण काय आहे ! हिशोबाने जें देणें घेणें निघेल तें सर्वांस प्रमाण असतें, जेथें स्वामी समोर उभा राहात नाहीं तेथें त्याची सेवा कोठची आली ! सगुणनिर्गुणाचें भाडण अद्याप मिटल नाहीं. व्यवसायानें वाणी असलेले तुकोबा हिशोबानें देवावर बाकी काढतात.

* ॥ २२२ ॥ *

॥ पाठवणे पडणे पांयां। उधार वांयां कास्याचा ॥ १ ॥

॥ घृ ॥ घडैल तें भेटीसवे। दीसे बरवे सकळ ॥ घृ ॥

॥ न घडतां दुस्टादुस्टी। अरुच गोस्टी कोरडीया ॥ २ ॥

॥ अबोल्याने असे तुका। अंतर आइका साक्षीतें ॥ ३ ॥

( २२२ ) पाठवणी — पादुकांवर डोके ठेवावयाचें — मग उद्धाराची गोष्ट च बोलावयास नको. भेट झाली म्हणजे पाया पडणे हें चांगलें दिसतें. दृष्टादृष्ट झाली नाहीं आणि उगा च कोरड्या गोष्टी काय सांगाव्यात, त्यांत रुची नसते.

अंतरांत मला जी साक्ष पटली आहे, त्यामुळे मी अचोला, धरून आहे. निर्गुण म्हणून पादुकांवर डोकें टेकणें हि नको त्यांत रुची नाहीं. ते शब्द कोरडे आहेत. या दहा अकरा अभंगावरून सगुण कां निर्गुण भक्तीचे, ध्यानाचे, तुकोबा उपासक होते याबद्दल वाद करावयास त्यांनीं जागा ठेविली नाहीं. अवघ्या दशा येणें साधती या अभंगांत मुख्य उपासना सगुणभक्ती असें स्पष्ट सांगितलें आहे. ती च गोष्ट येथें सांगितली आहे. या अभंगानंतर सगुणदर्शनाचा काय सुख सोहळा झाला असेल तो सांगतां येत नाहीं—परंतु सुख सोहळा झाला हें निश्चित! कारण हा ओघ — मनाचा रंग — एकदम पालटलेला आहे. राग, रुसवा, भांडण — कलह — पार लयास जावून म्हणताहेत कीं—

* ॥ २२३ ॥ *

**॥ ज्या ज्या आम्हापासीं होतील शक्ती। तेणें हा श्रीपती अलंकारू ॥ १ ॥**
**॥ध्रु॥ अवघा पायांपासीं दील्हा जीवभाव। जन्म मरण ठाव पुसीयेला ॥ध्रु॥**
**॥ ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प। बंधनाचे पाप चुकवीले ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे येथें उरला वीठल। खाये बोले बोल गाये नाचे ॥ ३ ॥**

( २२३ ) आम्हांपाशीं ज्या ज्या शक्ती असतील त्या सर्व एकवटून त्यांचा या श्रीपतीस अलंकार करूं आम्हीं आपला अवघा जीव भाव त्याचे पायीं वाहिला आहे. व त्या योगानें जन्ममरणाचा ठाव पुसला आहे. म्हणजे नाहीसा केला आहे, नाहींसा झाला आहे. आमच्या संकल्पाप्रमाणें ज्यांनीं आम्हांस देणें द्यावयाचें त्यास च संकल्प करून, जी वृत्ती उठवावयाची ती बा तुझ्या प्रेरणेनें उठूं दे; असें म्हणून, संकल्पाप्रमाणें पापपुण्य होऊन बंधन उत्पन्न व्हावयाचें — तें सर्व पाप, अवघा जीव भाव देवापायीं वाहून — चुकविलें आहे. तुका म्हणे आतां फक्त उरला आहे विठ्ठल — व तो खातो — गातो — नाचतो — बोल बोलतो.

२१२ व्या अभंगांत जी तक्रार सुरु झाली ती तक्रार या अभंगांत मिटली. यांत "हा श्रीपती" असा स्पष्ट शब्द — प्रत्यक्षतेचा आहे. प्रत्येक माणसाच्या अंगी काम क्रोधादि गोष्टी असतात. पण एखाद्यानें शिवी दिली कीं रागानें—म्हणजे प्रियत्वास धक्का बसल्यानें आपलें आपल्यावर जें प्रेम आहे तें स्वसंरक्षणार्थ उसळून येऊन, स्वाभिमानानें जागृत होऊन, तें, शिवी देणारास मारण्यासाठीं धावतें. तेव्हां तो च राग—सुषुप्त असलेला जागृत होऊन अंगावर येतो. म्हणजे निर्गुणांतून सगुण दर्शन देतो. प्रत्येकाच्या ठिकाणीं काम सुषुप्त अवस्थेंत आहे च. तो योग्य वेळीं—योग्यप्रसंगीं जेव्हां ती क्रिया करण्या-

स्नच–भोग भोगण्यास्तव– भोगीत असताना–अगावर येतो. तसा पाडुरग–ज्ञानो-बानीं वर्णिल्याप्रमाणें सुखाचा चावळ करीना–किंवा परमात्मया रामा तू एक लाधवी सावेव पावले ज्ञान–असा सावेव ज्ञानानें भेटेना–तेव्हाचे हे अभग आहेत तसा तो भेटावयास येता च–ज्या ज्या म्हणून आम्हाजवळ शक्ती असतील त्या सर्व एकवटून हा अगावर आलेला–समोर दिसत असलेला, मनात साक्ष पटवीत असलेला श्रीपती पुजू असा परमेश्वर सावेव भेटावा म्हणून विरहानें झुरत असलेला परमभक्त दृष्टीस पडणें हें केवढें भाग्य ! त्याचें दर्शन हि कसें असेल !

* ॥ २२४ ॥ *

॥ आम्हां हे कवतुक जगा द्यावी नीत। करावे फजीत चुकती ते ॥ १ ॥
॥धृ॥ कासयाचा बाध येकाच्या नीरोप। काये होवे कोपे जगाचीया ॥धृ॥
॥ अवींद्रेचा येथे कोठे पराश्रम। रामकृष्ण नाम यैसे बान ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येथें खऱ्याचा वीकरा। न सरती येरा खोट्यापरी ॥ ३ ॥

( २२४ ) आम्हास जगास नीतीचा मार्ग दाखविण्याचें व चुकत असतील त्यास फाजित करण्याचें काम आलें आहे ही केवढी कौतुकाची गोष्ट आहे एका श्रीहरीचा निरोप सागण्यास आपणास कोठें व कोणाचा बाध येणार आहे ! बरें एखादा मनुष्य त्यामुळें रागावला, किंवा सारें जग रागावलें, तरी काय होय ? आपण विठुरायाचे सेवक, येथें अविद्येस वार नाहीं, फार कष्ट नाहींत, एक राम-कृष्ण नाम हे आपलें वाण–जिन्नस आहे तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा आहे इतर खोटे प्रकार येथें चालणार नाहींत–चालत नाहींत

रामकृष्ण नाम देऊन जगास नीतीचा रस्ता दाखवावयाचा व चुकत असतील त्यास फजीत करावयाचे या गोष्टीस कोणत्या गोष्टी आड येताहेत ते सागताहेत —

* ॥ २२५ ॥ *

॥ दर्पणासी नकटे लाजे। शुध खीजे देखोनीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ यैसे अवगुणाच्या बाधे। दीसे सुध वीपरीत ॥ धृ ॥
॥ आधळ्यास काये हीरा। गारा च तो सारीखा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भुके सुने। ठाया नेण ठावते ॥ ३ ॥

( २२५ ) आरसा दाखविला कीं नकटा लाजतो व आपलें शुद्ध स्वरुप पाहून सजील होतो अवगुणाची बाधा झाली का शुद्ध गोष्ट विपरीत दिसू

लागते. ही झाली एक तऱ्हा, दुसरी जात आंधळ्यांची, त्यांस गारा व हिरा हीं दोन्ही सारखी च असतात. तिसरी तऱ्हा कुतऱ्याची—कीं कोठें केव्हां भुंकावें हें त्याला कळत नाहीं. तें केव्हां हि झालें तरी भुकते च असें कांहीं लोक असतात या शिवाय—

* ॥ २२६ ॥ *

॥ नावडे तरी कां येतील हे भांड। घेऊनींया तोंड काळें येथें ॥ १ ॥
॥ धृ ॥ नासोनीयां जाये रस या पंगती। खळाचे संगती नारायणा ॥ धृ ॥
॥ तोंडा वाटा नर्क काढी अमंगळ। मीस्टानां वीटाळ करी सुणें ॥२॥
॥ तुका म्हणे नाहीं संतांची मरीयादा। नीद तोची नींदा मायेझवा ॥३॥

(२२६) – कांहीं लोक भांड (बहुभाष – पुष्कळशा भाषेंतल्या पुष्कळशा गोष्टी वाचलेला—पुष्कळ ठिकाणीं भिक्षा मागून पोट भरणारा—याची चार वचनें गोळा कर—त्याची चार वाक्यें पहा असें) असतात. आतां वर सांगितलेली ४।५ जातीची व असल्या च गुणाचीं इतर माणसें—कीं ज्यांना विठुराजा—त्याचे भक्त जे आम्हीं हे आवडत नाहींत असले लोक आपले काळे तोंड घेऊन येथें येतात तरी कशाला ! नारायणा, या खळांच्या संगतींत, पंगतींतला भक्तीरस नासून जातो. हे लोक अमगळ बोलून तोंडावाटा नर्क काढतात. व कुतरें जसें मिष्टान्नास शिवून विंटाळ करतें तसें हे लोक आमच्या संतबोधास विटाळ-करतात. तुका म्हणें ज्यांना संताची मर्यादा नाहीं, सताबद्दल आदर नाहीं, ती माणसें, निंद्य, मायझवी माणसें, जशीं निंद्य, तेवढी निंद्य असतात.

* ॥ २२७ ॥ *

॥ आणीकांच्या कापीती माना। नीस्ठुरपणा पार नाहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ करीती बेटे उसणवारी। येमपुरी भोगाया ॥ धृ ॥
॥ सेंदुराचे देव केले। नवस बोले तयासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाचती पोरे। खोडींतां येरे आंग दुखे ॥ ३ ॥

(२२७) जे हे लोक दुसऱ्याच्या माना कापितात—त्यांच्या निष्ठुरपणास कांहीं पार च नसतो—बेटे उसणवारी करीतात, व यमपुरींची तयारी करितात. यांनीं देव सेंदराचे केलें आहेत व त्यास नवस बोलतात, तुका म्हणें हीं पोरें या तऱ्हानीं नाचताहेत—व यांना जर खोडून काढू म्हणाल तर आपले अग दुखेल—(हे सुधारणार नाहींत) या दुष्ट लोकांचें च वर्णन पुढें चालू आहे.

* ॥ २२८ ॥ *

॥ माउंस खाता हउस करी। जोडुनी वैरी ठेवीला ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोण याची करील कींव। जीव जीव नेणती ॥ धृ ॥
॥ पुढीला साठीं पाजवी सुरी। आपली चोरी आंगोळी ॥
॥ तुका म्हणे कुटी हाडे। आपला नाडे रडवेल ॥ ३ ॥

( २२८ ) दुसरे कांहीं लोक हौस करून मांस खातात. पण त्यांच्या हें लक्ष्यांत येत नाहीं कीं–ज्याचें मांस आपण खातों त्यास जन्माचा वैरी आपण जोडून ठेवतों. हीं माणसें जीव असून जीवाची ओळख ठेवीत नाहींत तेव्हां यांची कींव कोण करील. हे लोक दुसऱ्यासाठीं जेव्हां सुरी पाजळतात–तेव्हां आपली अगुळी त्या सुरीखालीं सांपडूं नये म्हणून जपतात–पण तें व्हावें कसे ? तुका म्हणे हे लोक हाडें कुटतात–तेव्हां एखादा दिवस आपणास हि अशीं नाड, कोणी आणील व आपली हाडें चेंचील व आपणास रडवील हें याच्या लक्ष्यात येत नाहीं.

येथवर जे भांड कीर्तनास येऊं नयेत त्यांचें वर्णन झालें. आतां–आम्हां हें कवतुक जगा द्यावी नीत–ही जगास नीति दाखविल्याचें काम आलें आहे, त्यात आपण कोणत्या तयारीनें, काय अवसानानें, कोणत्या सहाय्यानें, तें काम करीत आहोंत. ते सागताहेत.

* ॥ २२९ ॥ *

॥ मनें वळी मनां। बुधी बुधी क्षीण क्षीणां ॥ १ ॥
॥ धृ ॥ मी च मज राखण जालों। त्याणे तेथेंची धरीलो ॥ धृ ॥
॥ जे जे जेथे उठी। तेच तया हातीं कुटी ॥ २ ॥
॥ भांजीली खांजणी। तुका साक्षी उरला दोन्ही ॥ ३ ॥

( २२९ ) क्षणक्षणाला मी माझ्या मनास आजारून गोंजारून धाक दाखवून, बुद्धीनें बुद्धीस वळविलें. अशा रीतीनें माझा मी च स्वतःला राखण झालों, व जागच्याजागीं जेथल्या तेथें च स्थिर धरून ठेविला गेलों. मनात जो जो सकल्प उठला–तो कसा काय कोठून आला याचा निकाल होऊन तो त्यास दंड करी ( कुटी ) अशा तऱ्हेनें कोणती हि चट कशी लागते–उतार कसा लागतो–या दोन्ही गोष्टींस तुका साक्षी उरला आहे. या अभगांत आपण विद्या मिळविण्यास कोठें बाहेर गेलों नव्हतों, तर बसल्या ठिकाणीं, स्वतःशीं सवाद, ( खेळो मनासवे जीवाच्या संवादें – या अभंगात म्हटल्याप्रमाणें ) होऊन बोध कसा

झाला तें सांगितलें आहे—या पुढील गोष्ट म्हणजे—माझा मायबाप उभा वटेवरी कवतुकें करी कृपादान। प्रसादाची वाणी वदे तीं उत्तरें—

आपणांस पांडुरंगानें नीज धन कसें दाखविलें ते सांगताहेत.

* ॥ २३० ॥ *

॥ लेकरा अइते पीत्याची जतन। दावी नीज धन सर्व जोडी ॥१॥
॥धृ॥ त्या परी आमंचा जालासे सांभाळ। देखीला च काळ नाहीं आड ॥ध॥
॥ भुकेची सनीध वसे स्थन पान। उपायाची भीनं चींता नाही ॥२॥
॥ आळउनी तुका उभा पैलथडी। घातलीया उडी पांडुरंगे ॥३॥

( २३० ) लेकरास जशी पित्याची जतन ऐती मिळते, बाप आपण होऊन प्रयासानें केलेली जोडी मुलास दाखवितो, अशा तऱ्हेनें आमुचा साभाळ झाला आहे. त्यांत बाप लेकांच्या वयांतील अंतर किंवा तें मिळविलेले धन, मिळविण्यास बापास लागलेले श्रम व काळ हीं जशीं त्या मुलास सर्व जोडी दाखविण्याच्या आड येत नाहींत तसें माझें झालें आहे. भुक लागतां च भुके जवळ च स्तनपान असते त्या साठीं निराळा उपाय करावा लागत नाहीं तशीं कोणत्या हि गोष्टीची भूक लागली कीं देवास व संतास आळवून तुका पैलथडीस उभा राहिला कीं पाडुरंग उडी घालतो च.

हा अभंग पाडुरंग व पांडुरंगस्वरूप संत या उभयतांस लागूं आहे. मायबाप पंढरीनाथानें हजारों वर्षें साठत आलेला प्रेमसुखाचा बोध एका क्षणांत दार उघडून जसा ठेवा दाखवावा तसा दाखविला—तसेंच श्री नामदेव—ज्ञानेश्वरानी आपलें नीज धन—सर्व जोडी, दाखविली. त्यांनीं काळाची अडचण मानली नाहीं. श्री ज्ञानेश्वरीच्या अभ्यासानें प्रीयबोधाची भूक लागावी तों तेथें च स्तनपानाची सोय असावी—स्तनपान हा शब्द स्थानापन्न आहे. मुलाला भूक लागलेली आईस लागते. मूल रडण्यापलीकडे कांहीं करीत नाहीं. आई मांडीवर घेते स्तनपान करवीते. तसें या संतांनीं केलें असें सागण्याचा आशय. तेव्हा संताच्या या उपकाराचे आपण उतराई कसें व्हावयाचे ते सांगताहेत.

* ॥ २३१ ॥ *

॥ शुध चर्या हे च संतांचें पुजन। लागत ची धन नाहीं वीत ॥ १ ॥
॥धृ॥ संगुणांचे सोई सगुण वीश्रांती। आपणं ची येती चोजवीत ॥ धृ ॥
॥ कीर्तीनि ची वोळे कृपेचा वोरस। दुरीपणें वास सनीधता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वर्म सांगोती सवंगे। मंनं लावा लागे स्वहीताचा ॥३॥

( २३१ ) आपली शुद्ध वागणूक ही च संतांची पूजा होय म्हणजे त्यांच्या बोधामृताचा आपण उपयोग केला कीं त्यांस सर्व पावले असें होईल. त्यासाठीं वेगळें धन – वित्त द्यावें लागत नाहीं. हे संत आपण होऊन आपणास हुडकीत येतात व सगुणास सगुणाची सोय होऊन विश्रांती लाभते. ते लांब जरी असले ( काळानें किंवा अंतरानें ) तरी आपण त्यांचे गुणगान करून कीर्तन करूं तर त्यांच्या कृपेचा वोरस – ओघ आपणाकडे वळतो. व दूर असले तरी ते संत जवळ आहेतसे वाटतें. तुका म्हणे मी या सर्व गोष्टींतील वर्म तुम्हांस सर्वंगपणे सांगत आहे. तुमच्यापासून कांहीं हि घेत नाहीं. पण स्वहिताच्या लागानें – मन लावा – स्वतांच्या हिताकडे लक्ष्य पुरवा. खरें हित कोणतें तें ओळखा.

शुद्धचर्या हेंच संतांचें पूजन। – हा अति श्रेष्ठ, वर्माचा अभंग आहे. यांत संतांची नजर आपणाकडे केव्हां वळते ते सांगितलें आहे, कीर्तीनें च वोळे कृपेचा वोरस – तेव्हां ज्ञानोबांचा ओघ आपणाकडे कसा वळला तें येथें सांगून संतगुरुरायाच्या कृपेचा ओघ आपल्यावर वळावा असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं ज्ञानोबांची किर्ती गावी – आपल्या अभंगांचें गान – मनन चिंतन – करावें. म्हणजे ज्याचें जया ध्यान। तेच होय त्याचे मन। – या नियमानुसार साहाजिक च अन्तर्यामांत फरक पडेल – मन पालटलें कीं न सांगतां – चर्या शुद्ध होत जाते. आपण या स्थितींत असतांना लेकरा अईती पित्याची जतन। – हा अभंग सगुण साकार आपणास भेटतो. असे ज्ञानराज आपणास भेटले – त्यांनीं आपले निजधन आपले स्वाधीन केले, तें च वर्म मी तुम्हास सांगत आहे, असा अभंगाचा भावार्थ. या अभंगाचा अनुभव निळोबा पिंपळनेरकरांनीं घेतला, बहिणाबाईनीं घेतला व अगदीं अलीकडे श्रीसद्गुरु दादामहाराज सातारकर यांनीं घेतला. ( १ ) मनवळी मना ( २ ) लेकरा अइती पित्याची जतन ( ३ ) शुद्धचर्या हेंच संतांचें पूजन। हे तिन्हीं अभंग एक च गोष्ट स्पष्टपणें सांगताहेत–की तुका म्हणे तुम्ही चला या ची वाटे भरंवशानें भेटे पांडुरंग.

* ॥ २३२ ॥ *

॥ चीताच्या संकोचें कांही च न घडे। अतीशये वेडे चार तो ची ॥ १ ॥
॥ध्रु॥ जीवीचें जाणावें या नांवें आवडी। हेकड ते वोढी अमंगळ ॥ ध्रु ॥
॥ काव्यावीण कांही नाहीं रुचो येत। करूण संकेत ठेवीयेले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कळे वचनें चाचणीं। काये बोलउनी वेळोवेळां ॥ ३ ॥

( २३२ ) चित्ताच्या संकोचानें ( संकोच हा शब्द भोळा—उदार – उघड याच्या विरुद्ध अर्थाचा आहे ) माणसाच्या हातून कांहीं कार्य होत नाहीं. त्या संकोचानें ( क्षुद्रपणानें ) वेडेचार तेवढे अतिशय होतात. आपणांस जगांत जें हवें असतें त्याची आवडी असते व ती गोष्ट अमंगळ असली तर त्या ओढीस हेकट म्हणतात, योग्य वेळ येईपर्यंत – कोणती हि गोष्ट रुचत नाहीं – हे परमेश्वरी संकेत च आहेत. तुका म्हणे माणसाची चांचणी त्याच्या शब्दावरून होते. ती गोष्ट वेगळी बोलून सांगावी लागत नाहीं.

हा संतबोध पदरांत पडण्यास हि वेळ यावी लागते – तर तो बोध – पटतो. एरव्हीं श्रीज्ञानेश्वरींत अर्जुननें वर्णिलेली स्थिती पहावयास सांपडते.

॥ यऱ्हवीं नारदु अखंड जवळा आहे । तो ऐसे चि वचनें गायें ॥
॥ परी अर्थु न बुझो ठायें । गीत चि आइको ॥ अ. १०।१३९ ॥
॥ जी आंधलेयाच्या गावीं । जऱ्ही आपण पें प्रकटले रवी ॥
॥ तऱ्ही वोतपली चितेर्या हाआवी । वांचुन प्रकाशु नाहीं ॥ २४० ॥
॥ यऱ्हवीं देवऋषी अध्यात्म गातां । आहाच रागेंसीं उमटतां ॥
॥ तेचि परिसवे येर चित्ता । नैये कांहीं ॥ १४१ ॥
॥ पै असितां देवलाचेनि मुखें । मी एवंविधु तूतें आइकें ॥
॥ परी तै बुद्धी विषय विखें । घारली होतीं ॥ १४२ ॥
॥ आतां आणीकाचें नांव काइ घेयावें । आपण येऊनी व्यास देवें ॥
॥ तुझें स्वरूप आघवें । सर्वत्र सांगीजे ॥ १४३ ॥
॥ देवा आंधारीं चिंतामणी देखीला । जेव्हीं न्हवे म्हणौनि उपेक्षीला ॥
॥ पाठीं दीन उदो मोटका जाला । मन होय म्हणे ॥ १४४ ॥

हा बोध केव्हां पटेल? कोणास पटणार नाहीं. ही गोष्ट निराळ्या शब्दांत तुकोबा सांगताहेत. माणसाची चांचणी मी एका शब्दावरून करतों असें येथें सांगितलें आहे. ती च गोष्ट भक्ती तें नमन वैराग्य तो त्याग । या अभंगांत सांगितली आहे. तुका म्हणे मज कळते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य । – अशी माणसांची ज्यांस पारख त्यांस कोणी कांहीं हि येऊन सांगावें व – फसवावें – म्हणून जे शब्दचित्र महिपतीबोवा ताराहबादकरांनीं काढलें आहे – तें सत्य कसें म्हणावें? जीवींचें जाणावें या नांवें आवडी । – ही आवडी शब्दाची सुंदर व्याख्या येथें साधली आहे.

॥ २३३ ॥

॥ कामातुर चवी सांडी । बरळे तोंडी बरळ ॥ १ ॥

॥ धृ ॥ रजले ते आंगीं दावी । वीप देवी आसडे ॥ धृ ॥

॥ धन शोषे लागे वेड । ते वडबड समेना ॥ २ ॥

॥ तुका म्हणे वेसने दोनी । नरक खाणी भोगाया ॥ ३ ॥

( २३३ ) कामातुर मनुष्य नीत – रुची – गोडी – टाकतो –,झुगारून देतो. व तोंडानें बरळ बरळतो, अगात जें कामाचें विष भिनलेलें असतें तें अंगावर स्पष्ट दिसतें, विष हें आचके देववितें – धनसोस ज्यास असतो, त्यास वेड लागतें व त्या वेडांतली त्याची बडबड कधीं शांत होत नाहीं – थांबत नाहीं. तुका म्हणे – काम व धन यांची व्यसनें ही नर्कांची खाणी भोगावयास लावणारी आहेत.

खालील अभंग मूळ वहींत नाहीं. पण नकलेंत आहे. हा अभंग अगांतुक आहे. मी तो गाळणार च होतों. पण नकल जशीच्या तशी व्हावी म्हणून अभंग दिला.

* ॥ २३३ अ ॥ *

॥ पतीव्रते आनंद मनीं । सिंदळ खोचे व्यभिचार वचनीं ॥ १ ॥

॥ धृ ॥ जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भले जगीं ॥ धृ ॥

॥ सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ २ ॥

॥ शुरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥ ३ ॥

॥ तुका म्हणे हिरा । धन घावे निवडे पुरा ॥ ४ ॥

* ॥ २३४ ॥ *

॥ कृस्टांजनें जाले सोहोज्वळ लोचन । तेणें दील्हें वानं नीवडुनी ॥१॥

॥ धृ ॥ नीरोपाच्या मापं करी लडबड । त्याचे त्याणे गोड नारायणे ॥धृ॥

॥ भागेवंता घरीं करीतां वीस्वासे । कार्ये त्या सरीसें होईजतें ॥२॥]

॥ तुका म्हणे पोट भरे बुरें वोजा । नीजें ठाव नीजा नीज स्थानीं ॥३॥

( २३४ ) डोळ्यांत कृष्णांजन घातल्यानें माझे डोळे सोज्वल ( निर्मळ ) झाले आहेत. त्यानें हे वाण, जिन्नस निवडले आहेत. श्रीकृष्ण परमात्मा आपला निरोप जगास कळावा म्हणून फार लडबड करून त्यानें नारायणाचें गोड रूप ( ज्ञान स्वरूप ) धारण केलें आहे भाग्यवंताच्या घरीं कोणतें हि काम विश्वासानें करावें– म्हणजे त्याप्रमाणें कार्य होत असतें – तेव्हां तुका म्हणे – आतां पोट चांगलें भरपूर भरेपर्यंत निजत्वानें निजत्वाच्या ठिकाणीं ठाव दिला आहे.

२२४ या अभंगांत आम्हां हे कवतुक जगा याची नीत म्हणून सांगितलें. त्या कार्यांत कोणते लोक आड येतात तें सांगितलें—नंतर पंढरी रायानें—संतांनीं, आपलें ज्ञान कसें दिलें तें हि सांगितलें—तें ज्ञान कोणास पटणार नाही—हें कामातुर चवीसाठी या अभंगांत सांगितलें. कृष्णांजनें जाले सोज्वळ नयन—या अभंगांत श्रीकृष्ण नीरोपान्या मापे करी लडबड—असें सांगितलें आहे. तुकोबा कृष्णांजन लेइले आहेत त्यामुळें त्यांची दृष्टी सोज्वळ—स्वच्छ झाली आहे. नारायणरूपानें श्रीकृष्णाचा च निरोप माप भरून तुकोबा सांगताहेत. असा हा तुकोबांच्या चरित्रावर दिव्य प्रकाश पाडणारा अर्थभरित अभंग आहे. तुकोबांनीं कृष्णांजन लेइलें होते. अंजनाचा गुण ज्ञानेश्वरींत खालीलप्रमाणें सांगितला आहे.

जैसें डोळेयां अंजन भेटे। तेव्हली दृष्टीस पाटा फुटे।

मग वास पाहींजे तेथ प्रकटे। महानिधी।

अशा रीतीनें बोधाचा जो महानिधी त्यांस हस्तगत झाला त्यांतील वाण—जिन्नस—आपण निवडून काढले—हें श्रीकृष्णानें नारायणरूपानें मला ज्ञानदान करून आपला निरोप सांगण्यास मला पाठवून गोड कार्य करविलें आहे. लोचन सोज्वळ झाले आहेत अशा स्थितींत धरणेकरी आळंदीहून आला व त्यास उपदेश करण्यास सुरवात झाली आहे. खालील अभंगांत ७ नमनांचे व ११ उपदेशाचे अभंग आहेत.

॥ २३५ ॥

॥ श्रीपंढरीशा पतीत पावना। येकी वीज्ञापना पायापाशीं ॥ १ ॥

॥ धृ ॥ अनाथा जीवांचा तु काज कैवारी। येसीं चराचरीं ब्रीदावळी ॥धृ॥

॥ न सांगतां कळे अंतरीचं गुज। आतां तुझी लाज तुज देवा ॥ २ ॥

॥ आळीकर त्याचें करी समाधानं। अभयाचें दान देउनीयां ॥ ३ ॥

॥ तुका म्हणे तुं च खेळें दोंही ठाई। नसेल तो देई धीर मना ॥ ४ ॥

(२३५) श्रीपंढरीशा, पतीतपावना, आपल्या पायाजवळ एक विनंती आहे. तुम्हीं अनाथ जीवांचे कैवारी अशी चराचर सृष्टींत तुमची विरुदावळी—=ख्याती, आहे. तुम्हांस कोणती हि गोष्ट स्पष्ट करून न सांगतां च—समोरच्या माणसाच्या अंतरंगांतील गुप्त कळतें. तेव्हां हा जो धरणेकरी आळी घेऊन आला आहे त्यास अभयाचें दान देऊन त्याचें समाधान करावें. तुका म्हणे देवा इच्छा करविणारा व पुरविणारा—तूं च आहेस. तूच दोन्हीं ठिकाणीं खेळतो आहेस, तेव्हां—या धरणेकऱ्याचें काम करण्यास—मला धीर होत नाहीं—तो धीर मला दे.

* ॥ २३६ ॥ *

॥ अगा ये उदारा अगा वीस्वंमरा। रखुमाईच्या वरा पांडुरंगा ॥ १॥
॥धृ॥ अगा सर्वोत्तमा अगा कृष्णारामा। अगा मेघस्यामा वीस्वजनीत्या ॥धृ॥
॥ अगा कृपावंता जीव दान तुं दाता। अगा सर्व सता धरीतीया ॥ २ ॥
॥ अगा सर्व जाणा अगा नारायेणा। करुणा वचना चीत धावे ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे नाहीं अधीकार तैसी। सरती पायापासीं केली मागे ॥४॥

(२३६) अगा ये, उदारा, अगा विश्वंभरा, अगा, रखुमादेवीवरा, पांडुरंगा, अगा सर्वोत्तमा, अगा रामकृष्णा, अगा विश्वजनित्या, अगा कृपावता, जीवदान देणाऱ्या, सर्व जगावर सत्ता चालविणाऱ्या, अगा सर्व जाणा, अगा नारायणा, माझ्या करुणापर वचनांकडे लक्ष द्यावें. तुका म्हणे—माझा अधिकार नसतांना—मी आपल्या पायाजवळ विनंती करीत आहे.

* ॥ २३७ ॥ *

॥ नव्हे दास खरा। परी जाला हा डांगोरा ॥ १ ॥
॥ धृ ॥ यास काय करुं आतां। तुं हे सकळ जाणंता ॥ धृ ॥
॥ नाहीं पुंन गाठी। जे हे वेचुं कोण्हां साटी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कां उपाधी। वाढवीली कृपानीधी ३ ॥

(२३७) मी काहीं तसा, नांवाजण्याजोगा, आपला दास नाहीं, पण माझ्या नांवाचा डांगोरा फार झाला आहे. तूं सर्व सत्ताधीश आहेस, तुला हें सर्व माहीत हि आहे. तेव्हां या धरणेकऱ्याचें समाधान करण्याचें माझेकडे लिगाड आलें आहे त्यास मी काय करूं ? माझ्या गांठीस असा पुण्याचा सचय नाहीं कीं मी तें कोणासाठीं वेचूं शकेन. तुका म्हणे—देवा, तुम्ही ही उपाधी कां हो वाढविलीत ? माझ्या पाठी लाविलीत ?

* ॥ २३८ ॥ *

॥ तुज वीण सता। नाहीं वाचा वदवीता ॥ १ ॥
॥ धृ ॥ ऐसे आम्ही जाणों दास। जालों म्हणउनी उदास ॥ धृ ॥
॥ तुम्हीं दील्हा धीर। तरी हें मन जाले स्थीर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आड। केलो मी हे तुझें कोड ॥ ३ ॥

(२३८) देवा, तुमच्या सत्तेशिवाय ही वाणी कांहीं बोलूं शकणार नाहीं-ही गोष्ट ओळखून आम्ही दास या उपाधीबद्दल उदास आहोंत—तुम्ही धीर

दिलात —तर हें मन स्थिर होऊन सांगितलेलें काम करील—तुका म्हणे—देवा तुम्ही मला आड घालून—आपले कोड पुरवून घेत आहांत. येथें उपदेश काय करावयाचा ते शब्द तयार होत होतेसे दिसतें. म्हणून म्हणतात.

* ॥ २३९ ॥ *

॥ कायें मी जाणतां। तुम्हां हुणी या अनंता ॥ १ ॥

॥ धृ ॥ जो हा करु अतीशये। कां तुम्हां दया नये ॥ धृ ॥

॥ काय तुज नांहीं कृपा। वीस्वाचीया मायेबापा ॥ २ ॥

॥ तुका म्हणे वाणी। माझी वदे तुम्हां हुणी ॥ ३ ॥

( २३९ ) अहो अनंता, मी तुमच्याहून कां ज्यास्त जाणता आहे कीं या धरणेकऱ्यास मीं उपदेश करावा. तुम्हांस माझी दया कां येत नाहीं ? वा तुम्ही सर्व विश्वाचे मायबाप, मग तुम्हांस माझी दया कां येत नाहीं ? देवा, माझी वाणी बोलते हें खरें, पण तिच्यांत सामर्थ्यसंचार तुमचा असतो म्हणून मी बोलूं शकतो. पांडुरंगे आई हें झालें तुम्हांबद्दल पण आमचे मायबाप संत श्रीज्ञानेश्वर भगवान्,—त्यांनीं येथें धरणेकरी पाठवावा !

* ॥ २४० ॥ *

॥ कायें ज्ञानेस्वरी उणें। तीं हीं पाठवीलें धरणें ॥ १ ॥

॥ धृ ॥ आईकोनी या लीरीत। म्हणउन जाणवीली मात ॥ धृ ॥

॥ जरी जाणे धणी। वदवी सेवकाची वाणी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे सेवा। हीता सांभाळी हा ठेवा ॥ ३ ॥

( २४० ) श्रीज्ञानेश्वरांजवळ कांहीं कमतरता कां होती, कीं त्यांनीं लेख, पत्र, देऊन मला याचा मनोदय कळवावा. पण धनी हा काय करावयाचें तें ठरवून ती गोष्ट सेवकाच्या तोंडून बोलवितो. तुका म्हणे, हातून सेवा झाली कीं धनी हा ठेवा हातीं देतो.

* ॥ २४१ ॥ *

॥ ठेउनीया डोई। पाई जालों येकेसोई ॥ १ ॥

॥ धृ ॥ कारण तें तुम्ही जाणा। मी तराळ नारायेणा ॥ धृ ॥

॥ प्रसंगीं वचन। दीलहे तें ची खावें अन्न ॥ २ ॥

॥ तुका म्हणे भार। तुम्ही जाणां थोडें फार ॥ ३ ॥

( २४१ ) तेव्हां मी एकदां च पायावर डोकें ठेवून आतां पुढील कार्यास लागतो. त्याचे प्रयोजन काय हें नारायणा, विठोबा, तुम्ही जाणत आहां. मी एक

ओझे पालट करणारा ( तराळ ) आहे. आपण या प्रसंगानुसार जें वचन घाल तें च अन्न म्हणून खाईन—ग्रहण करीन. तुका म्हणे त्या वचनाचा थोडा फार भार तुम्ही लक्ष्यांत घ्या अशा त-हेनें विठोबा व ज्ञानोबा याच्या पायावर डोकें ठेऊन पुढील उपदेश आहे.

* ॥ २४२ ॥ *

॥ नको कांहीं पडो ग्रंथांचीये भरी । सीघ्र व्रत करी हे ची आतां ॥ १ ॥
॥धृ॥ देवाचीये चाडे आळवा रे देवा । वोस देहे भावा पाहुनीयां ॥ धृ ॥
॥ साधने घालीती काळाचीये मुखी । गर्भवास सेखी न चुकती ॥ २ ॥
॥ उधीराचा मोक्ष होयि नव्हे येसा । पतनासी इछा अवसेक ॥ ३ ॥
॥ रोकडी पातली अंगसंगीं जरा । आतां उजगरा कोठवरी ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे घाली नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पावलील ॥ ५ ॥

* ॥ २४३ ॥ *

॥ नाहीं देवापासीं मोक्षाचे गांठोडे । आणुनं नीराळे द्यावे हातीं ॥१॥
॥ धृ ॥ इंद्रीयांचा जय साधुनीयां मन । नीरवीश कारण अस तेथे ॥ धृ ॥
॥ उपास पारणी अक्षेरांची आटी । सते कर्मा सेवटीं येसे फळ ॥२॥
॥ आदर संकल्प वारी अतीशये । सहज ते काय दुख जाणे ॥ ३ ॥
॥ स्वपणींच्या घाये वीळवसी वायां । रडे रडतीया सवे मीथ्या ॥४॥
॥ तुका म्हणे फळ आहे मुळापासी । शेरण देवासी जाये वेगीं ॥ ५॥

* ॥ २४४ ॥ *

॥ तजीले भेटवी आणुनी वासना । दावील्याचे जना काये काज ॥१॥
॥ धृ ॥ आळवावे देवा भाकुनी कारुणा । आपुलीया मना साक्ष करी ॥धृ॥
॥ नाहीं जाव यावे दुरुनीं लागत । आहे साक्ष भुत अंतरीचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हा आहे क्रुपासींधु । तोडी भव बद्ध तातकाळ ॥ ३ ॥

* ॥ २४५ ॥ *

॥ गोवींद गोवींद । मना वेसलीया छंद ॥ १ ॥
॥ धृ ॥ मग गोवींद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ धृ ॥
॥ अनंदले मनं । प्रेमे पाझरती लोचेन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अळी । जेवी तुरे ची येगळी ॥ ३ ॥

* ॥ २४६ ॥ *

॥ ज्याचे जया ध्यान । ते च होये त्याचे मन ॥ १ ॥
॥ धृ ॥ म्हणउनी अवघे सारा । पांडुरंग द्रुढ धरा ॥ धृ ॥
॥ सम खुण त्याचे पाये । उभा व्यापक ईटे ठायें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सरता । अनुचा ही गाभा ॥ ३ ॥

* ॥ २४७ ॥ *

॥ पाहोनीयां ग्रंथ करावे कीर्तन । तेव्हां आले जाणं फळ त्यासी ॥ १ ॥
॥धृ॥ नाहीं तरी वाया केली तोंडपीटी । उरी ते सेवटीं उरली च ॥ धृ ॥
॥ पढोनीयां वेद हरी गुणं गाने । ठावे ते जाणावे तेव्हा जाले ॥ २ ॥
॥ तप तीर्थाटणे तेव्हां कार्येसीधी । स्थीर राहे बुधी हरीचा नामीं ॥ ३ ॥
॥ याग येज्ञादीकें काये दान धर्म । तरी फळ नामं कंठी राहे ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे नको काबाडाचे भरी । पडो सार धरी हे ची येका ॥ ५ ॥

* ॥ २४८ ॥ *

॥ सुखे खावे अनं । त्याचे करावे चींतन ॥ १ ॥
॥ धृ ॥ त्याचे दील्हे त्यासी पावे । फळ आपणासीं फावे ॥ धृ ॥
॥ असे हा आधार । नामं त्याचे वीस्वंभर ॥ २ ॥
॥ नाहीं रीता ठाव । तुका म्हणे पसरी भाव ॥ ३ ॥

* ॥ २४९ ॥ *

॥ संकोचोनी काय जालासी लहान । घेई आपोसनं ब्रह्मांडाचे ॥ १ ॥
॥धृ॥ करूनी पारणे आंचवे संवसारा । उसीर उसीरा लाउ नको ॥ धृ ॥
॥ घरकुलाने होता पाडीला आंधार । तेणे केले फार कासीवीस ॥ २ ॥
॥ झुगारुनी दुरी लपवीले काखे । तुका म्हणे वाखे कौतुकाचे ॥ ३ ॥

* ॥ २५० ॥ *

॥ माझ्या बापे मज दील्हेसे भातुकें । म्हणउनीं कौतुकें क्रीडा करी ॥१॥
॥धृ॥ केली आळी पुढे बोलीलो वचनं । उतमं हें दान आले त्याच ॥ धृ ॥
॥ घेउनीं वीभाग जावे लवलाह्या । आलेती त्या ठाया आपुलीया ॥२॥
॥ तुका म्हणे ज्ञानदेवीं सामुदाये । करावा मी पाय येईन वंदुं ॥३॥

* ॥ २५१ ॥ *

॥ ज्ञानीयांचा तुं राजा माहाराव । म्हणती ज्ञानदेव येसे तुम्हां ॥ १ ॥
॥धृ॥ मज पामरा हे काय थोरपण । पाईची वाहाण पांई बरी ॥ धृ ॥

॥ ब्रह्मादीक जेथें तुम्हां वोळगणें। आणीक तुळणे काये पुरे ॥ १ ॥
॥ तुका म्हणे नेणे युगतीची ते खोली। म्हणउनीं ठेवीली पाई डोई ॥

* ॥ २५२ ॥ *

॥ बोलीलीं उतरें। वेडीं चाकडी लेकरें ॥ १ ॥
॥ धृ ॥ करा क्षेमा अपराध। माहाराज तुम्हीं सीध ॥ धृ ॥
॥ नाहीं वीचारीला। अधीकार म्यां आपुला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ज्ञानेस्वरा। राखा पांयां पें कींकरा ॥ ३ ॥

अभंग २४२–२५२ या अभंगांचा अर्थ प्रस्तावनेत शब्दशः दिला आहे. तेव्हां द्विरुक्ती होऊ नये म्हणून तो भाग येथें गाळला आहे.

* ॥ २५३ ॥ *

॥ काये तुम्हीं जाणां। करु अव्हेर नारायणा ॥ १ ॥
॥ धृ ॥ तरी या लटीक्याची गोही। नीवडीली दुसरे ठाईं ॥ धृ ॥
॥ कळो अंतरीचा गुणं। नये फुटल्या वांचुन ॥ २ ॥
॥ आणीलें अनुभवा। जनांच्या हे ज्ञानदेवा ॥ ३ ॥
॥ आणीक कोणी भीती। त्याच्या चीतासीं वीस्रांती ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे बीजा पोटीं। फळ तैसें च सेवटीं ॥ ५ ॥

(२५२) हे वरील ७ नमनाचे व ११ उपदेशाचे अभंग दिल्यावर तो धरणेकरी अभंग टाकून गेला. तेव्हां आपल्या नांवानें भक्त म्हणून डांगोरा हा तर खोटा नसेल ना, व हा भ्रमाचा भोपळा एकवार फुटून भ्रमनिरास व्हावा या विचारानें देवाने ही गोष्ट घडवून आणली नसेल ना अशा स्थितींत म्हणतात कीं:—

अहो नारायणा, हा अभग व श्रीफळ, यांचा अव्हेर करून गेला तेव्हां तूं बोलिसी माझे मुखें। ही गोष्ट खोटी ठरवून त्यास ही साक्ष करून ठेविलीत कीं काय? हा भ्रमाचा भोपळा फुटल्यावाचून अंतरीचा गुण कळत नाहीं. देवा हा असा प्रकार करून, तुम्ही ही सत्य गोष्ट, जगाच्या निदर्शनास आणलीत कीं काय? कीं यापुढें कोणी या भ्रमांत सांपडूं नये, माझ्याकडे येण्याचे श्रम घेऊ नये व अशा मणसांचा भ्रमनिरास होऊनं त्यांस विश्रांति मिळावी. तुका म्हणे हा धरणेकरी कपटाने—अतीताईपणाने येथें आला त्यास तसें फळ मिळालें.

* ॥ २५४ ॥ *

॥ न हो आतां जीवीं कपट वसती। मग काकुळती कोणां यावें ॥ १ ॥
॥धृ॥ सत्याचीया मापें गांठी नये नाड। आदी अंत गोड नारायेणें ॥ धृ ॥
॥ चोखडीचा नाहीं वींटाचा आघात। सांचें तें सांचत सांचा पडे ॥२॥
॥ वीचारीली वाट उसंतें सीतळ। बुधींपुढें बळ त्रुण तुळे ॥ ३ ॥
॥ आहाराच्या घांसें पचोनीयां जीरे। वासनां हीं नुरे उरउरीत ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे ताळा घालावा वजनी। तुं माझी जननी पांडुरंगे ॥ ५ ॥

(२५४)पांडुरंगे तू माझी जननी आहेस, तेंव्हा माझ्या वचनास ताळा सापडावा म्हणून मी काकुळतीस — तुझ्याशिवाय इतर कोणास येऊ ? माझ्या चित्तांत आतां कपटाची वस्ती होणार नाहीं असें कर — नारायणाच्या सान्निध्यानें सत्याचें माप घालण्यास गांठीं कांहीं नाड येणार नाही — आदि व अंत नारायण गोड करून घेईल. चोखट ( शुद्ध ) मालास कधीं वींट नसतो व तो माल सारखा साठीं पडत आहे. ( अभंग होत आहेत ) बुद्धीपुढें बळ हें तृणवत आहे. यामुळें केंव्हां हि कोणी वाट विचारली तर शीतळ — उसंत — आहे — शेवट गोड होत असतो. जसा आहार असेल तसें घास घेतल्यानें खाल्लेलें अन्न पचतें व जिरतें व शिवाय थोडी भूक हि शिल्लक राहते असा पांडुरंगे आई, माझ्या वचनाचा ताळा घाल तुका म्हणे ताळा घालावा वजनी। हा दृष्टांत हि दुकानातील आहे. हाच विषय म्हणजे जगास नीत दाखविण्याचा अधिकार काय तें पुढें सांगताहेत.

* ॥ २५५ ॥ *

॥ मुसावीले आंग। रंगीं मेळवीला रंग ॥ १ ॥
॥ धृ ॥ येकीं येक दृढ जालें,। मुळां आपुलीया गेलें ॥ धृ ॥
॥ सागरी थेंमटा। पडीला नीवडे कोण्या वाटा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नवें। नव्हे जाणांवें हें देवें ॥ ३ ॥

( २५५ ) देवानें माझ्या अंगात आपलें अंग मिळविलें — पूर्णपणें भरलें. आपल्या रंगानें माझ्या रंगात मिळून गेला — व दोघें एकमेकांत मिसळून — उभयतांचें जें मूळ तेथपर्यंत आम्हीं पोंहोचलों समुद्रांत थेंबुटा पडला तर तो कोण्या तऱ्हेनें — वाटेनें — निवडता येईल — तसा मी देवांत समाविष्ट झालों आहे. एक होऊन गेलों आहे तेंव्हां आतां — तुका म्हणे — हे देवानें कांहीं नवे निर्माण केलें नाहीं. तू बोलसी माझें मुखें — हें कसें होतें याचें हे निरूपण आहे व श्रीकृष्णाचा निरोप आजवर असंख्य साधुसंत सांगते आले, तें च काम मी करीत आहे. कांहीं नवी घडी बसवीत नाहीं — असें सांगण्याचा मथितार्थ.

॥ २५६ ॥

॥ नव्हती हीं माझी जायाची भूषणें। असे नारायणें उचीत केलें ॥ १॥
॥धृ॥ शब्दांच्या वोवणी रत्नांचीया माळा। मुळींचा जीहुवाळा झरवणी ॥धृ॥
॥ अर्थांतरी असे अनुभवें सेवन। परीपाकीं मनं साक्षी तेथे ॥ २॥
॥ तुका म्हणे मज आरते परतें। हें नाहीं अनंतें उरो दीलिहे ॥ ३॥

( २५६ ) ही माझी भूषणें ( अभंग ) जावयाची नव्हतीं — फुकट जाऊ नयेत असें नारायणानें, उचित योग्य तें केलें. हे अभंग म्हणजे शब्द ( रत्नें ) ओवणींत ओवलेल्या रत्नमाला आहेत. यांत मूळींचा जिव्हाळा झरवणी सारखा वाहात आहे. यांच्या अर्थांतराचें सेवन अनुभवानें करावयाचें असतें व त्या अनुभवाचा मनांत परिपाक होईल तेव्हां या वचनांची साक्ष पटेल. अनंतानें मला आतां आरते — परते — ऐलथडी — पैलथडी असें कांहीं ठेविलें नाहीं.

धरणेकरी अभंग टाकून गेल्यानंतरचा हा अभग आहे. धरणेकऱ्यानें अभंग टाकून दिले — तें कोंडभट लोहोकरे यानें घेतले. त्यास त्याची प्रतीति आली. या गोष्टीस धरून हा अभंग आहे.

॥ २५७ ॥

॥ सहज लीळे मी साक्षी या जनांचा। नये वेचु वांचा यैसे जाले ॥ १॥
॥धृ॥ उपकर्मे वदे नीशब्दाची वाणी। जे कोठें बंधनी गुंपो नेणे ॥ धृ ॥
॥ तम नासी परी वेव्हारा वेगळा। रवी प्रभा कळा व्रते जन ॥ २॥
॥ तुका म्हणे येथें गेला अतीशये। आतां पुन्हां नये तोंड दाउं ॥ ३॥

( २५७ ) मी सहज या लोकांच्या कृतीचा साक्षी झालों आहे. व त्याची अनास्था पाहून ही वाणी त्यांचेसाठीं व्यर्थ वेचूं नये असें हि मला वाटतें म्हणून मी सहज निःशब्दाची वाणी बोलत आहे ही वाणी कोणत्या हि बंधनांत सांपडावयाची नाहीं.

सूर्य हा तमाचा नाश करतो, पण तो त्या वेव्हारापासून अलिप्त असतो, जन मात्र रवीची प्रभा जशी पडली असेल तसे वागतात तसा मी ही नि.शब्दाची वाणी बोलतो आहे. आतां कोणती हि गोष्ट मी अतिशय उत्कटत्वानें सांगेन असें नाहीं. या — धरणेकऱ्या सारख्यांनीं मला तोंड दाखवूं नये हें चांगलें.

प्राप्त कर्म म्हणून जगाला नीत देण्याचें काम चालू आहे. तें सूर्याप्रमाणें अलिप्तपणें होईल हें सांगणें. या अभंगांतील पहिले दोन चरण स्वतःच्या कवित्वा-बद्दल तुकोबांचें मत काय होतें तें सांगताहेत.

२५३–६० या अभंगांत अभंग टाकून गेल्याबद्दलचें मतप्रदर्शन, आत्म-निरीक्षण व स्वत:च्या कवित्वाबद्दलची स्पष्ट कल्पना येथें मांडली आहे. पण ज्ञानेश्वर माउलीस पाठविलेले १३ अभंगांचें पत्र वेगळें आहे.

* ॥ २५८ ॥ *

॥ बोलाल त्या आतां आपल्या पुरतें । मज या अनंतें गोवीयेलें ॥ १ ॥
॥धृ॥ झाडीला न सोडी हातीचा पालव । वेधीं वेधे जीव वेधीयेला ॥ धृ ॥
॥ तुमचे ते शब्द कोरडीया गोस्टी । मजसवें मीठी अंगसंगें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्हां होईल हे परी । अनुभवांतरी येईल मग ॥ ३ ॥

(२५८) तुम्हांस जें बोलावयाचें तें आपल्यापुरतें बोला. मला या अनंतानें आपल्यांत गुरफटुन घेतलें आहे. त्यानें आपल्या वेधानें माझा जीव वेधला आहे. व माझा पदर जो त्यानें धरला आहे तो त्यास झाडून टाकला तरी सोडीत नाहीं. तुमचे शब्द हे कोरड्या गोष्टी आहेत – मजसवें मिठी अगसंगें आहे. तुका म्हणें मी काय म्हणतों आहे हें तुम्हांस अशी स्थिति आल्यावर अनुभवानें कळेल, एरव्हीं कळणार नाहीं. घरणेकरी अभंग टाकून गेल्यावर – तो अभंग टाकून गेला या गोष्टीची एवढी खंत कां करतां असें म्हणून कोणी समाधान करण्याचा प्रयत्न केला असावा त्यांस हें उत्तर आहे.

* ॥ २५९ ॥ *

॥ जेस्या तुम्हीं दुरी आहां । तैशा राहा अंतरें ॥ १ ॥
॥ धृ ॥ नका येउ देउ आळ । आंगी गोपाळ जडलासा ॥ धृ ॥
॥ अवघा हा ची राखा काळ । चींटाळ ची भोवंता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मज येस्या । होता पींस्या जगनींद ॥ ३ ॥

(२५९) म्हणून तुम्हीं असें करा कीं जशा तुम्हीं श्रीहरीपासून दूर आहांत तशा दूर रहा. उगा च अंगी गोपाळ जडला आहे असा आळ स्वत:चे अंगावर येऊं देऊं नका. सतत तुम्हीं अशी खबरदारी घ्या. तुका म्हणे तुम्हीं जर माझ्यासारख्या झाल्यात तर जग तुम्हांस पिशी म्हणून म्हणतील व जगांत तुमची निंदा होईल. स्वत:स वेडा – पिसा – म्हणून लोकांनीं म्हटल्याचें ऐकूं आलें असेल त्यास धरून हे शब्द आहेत.

* ॥ २६० ॥ *

॥ सतीचे सें घेतां वान । बहु कठीण परीणामीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ जीवासाठीं गीरव वाटे । आहाचे जोडे नव्हेते ॥ धृ ॥

॥ जरी होय उघडी दुस्टी। तरी गोस्टी योध्यांच्या ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आंगा येतां। तेव्हां सता धीर्याची ॥ ३ ॥

सतींचें वाण हातीं घेणें ह परिणामीं फार कठीण असतें. 'सती' हा गौरव जीव दिल्यानें होतो. तो गौरव आहाच—काहीं तरी—कसा तरी जोटला जाईल असा नव्हे. जर दृष्टी उघडली असेल तर युद्धाच्या गोष्टी बोलाव्यात एरव्हीं बोलू नये. कारण ती बाजू आगा येता—म्हणजे युद्धाची बाजू अगावर येईल तेव्हा धैर्याची सत्ता कळते.

तशी जगास नीत देण्याची गोष्ट आहे तेथें जीवावर उदार असावें तेव्हा दम निघणार. आता ज्याच्यासाठीं सतींचें वाण हातीं घेतलें आहे. तो कसा आहे तें सागताहेत.

* ॥ २६१ ॥ *

॥ आडवा तो उभा। असे दाटुनीयां प्रभा ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव नाहीं येकवीध। येका भावें असे सीध ॥ धृ ॥
॥ भेदा भेद आटी। नाहीं फार कोठे तुटी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गोवा। उगा वेव्हाराचा हेवा ॥ ६ ॥

( २६१ ) तो देव आडवा व उभा असा आपुली प्रभा पसरून आहे तो देव एकवीध आहे असें नाहीं. पण तो एका भावानें सिद्ध होणारा आहे त्यासाठी भेद अभेद याची फार आटी अट्टाहास करावयास नको त्यानें केव्हा हि तुटी पडणार नाही. भेद-अभेद हे वाद कधी तुटणार नाहीत. तुका म्हणे वेव्हाराचा हेवा हा गोवा उगा च आहे देव नाहीं एकविध—एका भावे असे सिद्ध। हीं खूण अनुभवी माणसाशिवाय कोण सागू शकेल? तेव्हा मूळ वहींतील हा शुद्ध पाठ सोडून नकलकारानें आपल्या मताप्रमाणे पाठभेद केले, ते सर्व चूक आहत

* ॥ २६२ ॥ *

॥ येका बोटाची नीस्यानीं। परीपाक नाही मनीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ तरी ते संपादीले सोंग। कारणां वाचुनीयां वेग॥ धृ ॥
॥ वेस्णवांचा धर्म। जग वीस्णु नेण वर्म ॥ २ ॥
॥ अतीशये पाप। तुका रीत करी माप ॥ ३ ॥

( २६२ ) वैष्णव—निशाणी म्हणून एका बोटाने गध लावतात—पण 'एकविध' भावानें तसा परिपाक—मनाची पक स्थिति तेथें नांदते का—तेव्हा

कारणाशिवाय हें नुसतें संपादिलेलें सोंग आहे. सर्व जग विष्णुमय आहे याचें वर्म ज्यास कळणार नाहीं त्याला वैष्णवाचा धर्म काय कळला? किंवा कोणती हि गोष्ट अति केली तरी तें पाप आहे, तुका अशा तऱ्हेनें माप रीतें करीत आहे.

जगास नीट लावितांना पहिल्यानें च वैष्णवांकडे पाहून त्यांस उपदेश झाला. त्यानंतर देवास विनति करितात कीं देवा,

* ॥ २६३ ॥ *

॥ सतेत्वेसीं घेणे भगतीचा अनुभव। स्वामीचा गौरव इछीतसे ॥ १ ॥
॥ध्रु॥ मग ते अवीट न भंगे साचार। पावलें वीस्तार फीरो नेणे ॥ ध्रु ॥
॥ वाणी वदे तीचा कोणांसी वीस्वास। अभयें करे दास सते तंई॥२॥
॥ तुका म्हणे आधीं न करी तांतडी। पाईं जाली जोडी तेणें शुध॥३॥

( २६३ ) मला भक्तीचा सत्यत्वानें अनुभव घ्यावयाचा आहे. त्यांत स्वामीचा गौरव व्हावा एवढी च मला इच्छा आहे. मग ती भक्ति अवीट अशी असणार–त्यांत कोठें हि भंग होणार नाहीं व भक्तीचें सौख्य विस्तार पावेल पण कधीं माघार घ्यावी लागणार नाहीं देवा, मी जी वाणी वदेन त्याचा विश्वास तरी कोण मानील? तेव्हां तुम्ही अभयंकर देऊन दान ( प्रेमदान ) देऊन ठेवा. त्यासाठीं देवा, मी कांहीं तांतडी करीत नाहीं. कारण तुमचे पाईं माझी जोडी झाली आहे तेव्हां मी आतां शुद्ध आहे.

* ॥ २६४ ॥ *

॥ आम्हीं आळीकरे। प्रेमसुखाचीं लेकरें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ पांईं गोवीली वासना। तुसे केलें ब्रह्मज्ञाना ॥ ध्रु ॥
॥ येतां पाहे मुळा। वाट पंढरीचे डोळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे स्थळें। मग पाहिन सकळें ॥ ३ ॥

( २६४ ) देवा, आम्ही तुझीं आळीकरें, प्रेमसुखाची लेकरें, हट्ट करणारा लाडकीं मुलें आहोंत. आम्ही आपली वासना तुमचें पायीं गोविली आहे व ब्रह्मज्ञान तुच्छ केलें आहे. पंढरीचें मूळ बोलावणें, केव्हां येतें याची डोळ्यांनीं वाट पाहात आहोंत. तसें मूळ आलें कीं मग मी सर्व स्थळें निवांतपणें पाहीन म्हणजे मला पाहिल्यासारखीं वाटतील. ब्रह्मज्ञान तुच्छ केलें हें सांगण्याचें कारण असें कीं आम्हांस पंढरीची ओढ आहे. पंढरींत देव आहे व येथें नाहीं कां? असा प्रश्न विचारणारे वेदांती–पाखांडी आम्ही नव्हे! हें सांगणें.

* ॥ २६५ ॥ *

॥ सर्वात्मक पण। माझें घेउणं जातो कोण ॥ १ ॥
॥ धृ ॥ मनीं भगतीची आवडी। हेिया व्हावी येसी जोडी ॥ धृ ॥
॥ घेईन जन्मांतरे। हें ची करावया खरें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा। रुणी करूण ठेउ सेवा ॥ ३ ॥

(२६५) देवा माझें सर्वात्मकपण कोण हिरोन नेणार आहे ? कारण हें सर्वात्मकपण म्हणजे मनांत भक्तीची आवडी व्हावी व नारायणाची जोडी व्हावी येवढा च मला हेवा आहे. व ही गोष्ट खरी करण्यासाठीं मला जन्मांतरें घ्यावी लागलीं तरी घेईन. देवा, तुला आम्ही सेवेनें ऋणी करून ठेवू.

* ॥ २६६ ॥ *

*॥ केली मझ्या मनांसी। तें मी दास सत्येत्वेसी।*
॥ नेईल पाया पासीं। स्वामी मुळें पंढरीये ॥ १ ॥
॥ धृ ॥ तों वरी हे भरी पोट। केला तो मीथ्या बोभाट।
॥ नाहीं सांपडली वाट। सईराट पीतुसे ॥ धृ ॥
॥ ज्यावें आदराचे जीणें। स्वामी कृपा करी त्याणें।
॥ पाळील्या वचने। सखेत्वाचा अनुभव ॥ २ ॥
॥ घडे तें घडा आतां। मायेबापाचीया सता।
॥ तुका म्हणे चीता। काये पाहे मारगा ॥ ३ ॥

(२६६) हे सर्वात्मकपण कसें भोगणार तें सांगताहेत:—देवा, आम्ही आपल्या मनाशीं अशी प्रतिज्ञा केली आहे, कीं, मी जर स्वामीचा खरा च दास असेन तर स्वामी मूळ (बोलावणें) पाठवून आपल्या पायापाशी नेईल. तोंवर हें पोट भरून राहेन—जो करीत आहे तो बोभाट मिथ्या चालला आहे. मला तुमच्या पायाची वाट सांपडली नाहीं. आणि मी उगा च सैराट फिरत आहे. जीवानें जीणें जगायचें असेल तर तें आदराचें असावें, कीं जेणेंकरून स्वामी कृपा करील, व आमचें वचन पाळून सख्यत्वाचा अनुभव देईल. तुका म्हणे *मायबापाच्या सत्तेनें आतां काय व्हावयाचें तें होवो, मी आतां* चिंता करून वाट पहात बसत नाहीं.

* ॥ २६७ ॥ *

॥ मागत्याची कोठें घडे तें नीरास। लेकरा उदास नाहीं होते ॥ १ ॥
॥धृ॥ कासया मी होउ उतावीळ जीवीं। जाणता गोसांवीं सर्व आहे ॥ धृ ॥

॥ जाला तरी वेळ कवतुका साठीं। निर्दया तो पोटीं उपजेना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे त्यासी ठाउकें उचीत। होईल संकेत नेमीयेला ॥ ३ ॥

(२६७) सर्वात्मकपण कसे भोगणार तें सांगितलें पण त्यासाठीं जीवीं उतावीळ कां म्हणून होऊं, कारण (माझा गो-इंद्रियें यांचा) स्वामी मालक जाणता आहे. त्याच्या दरबारांत मागत्याची कोठें निरास होणार आहे! लेकरास कधीं उदासपणें वागविलें जातें का? बरें मागावी ती गोष्ट द्यावयास उशीर लागला तर त्या गोष्टीचें तसें च मागणारानें, मागितल्याचें,—देणाऱ्यानें, दिल्याचें, कवतुक वाढावें म्हणून, पोटीं अन्तर्यामीं निर्दयता उपजली म्हणून नव्हे. तुका म्हणे माझ्या हिताचें व उचित असें काय हें त्याला माहीत आहे. त्याचा जो संकेत असेल, त्यानें जी गोष्ट जशी नेमून ठेविली असेल, ती तशी होईल.

* ॥ २६८ ॥ *

॥ अरुशा वचनीं मातेची आवडी। म्हंणउनी तातडी घेत नाहीं ॥ १ ॥
॥धृ॥ काये होईल माझें मांडीलें कवतुक। आदराची भूक रडारोवी ॥ धृ ॥
॥ लपोनीयां करी चुकूर माउली। नाहीं होती केली नीरद्धा सांडी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करी पारखी वचनें। भेवउनी तान्हे आळवावें ॥ ३ ॥

(२६८) आतां माझें सर्वात्मकपण सिद्ध व्हावयास वेळ लागला आहे. यावरून माझें त्यानें कवतुक तर मांडलें नसेल ना! रडारोवी ही भुकेच्या बद्दल आदर दाखविते, मातेला बाळाचे आरुष शब्द ऐकण्याची मोठी आवडी असते व शब्द ऐकूं यावेत म्हणून तांतडीनें घेत नाहीं. इतकें च नव्हे तर लपून बाळास चुकूर (गोंधळवीते) करते व त्यास आई आपणास टाकून गेली नाहीं असें वाटावें म्हणून ओळखीचे शब्द उच्चारते—हेतु एवढा च की तान्ह्या बाळानें गोंधळून भिऊन आळवावें. तसा पांडुरंगाचा व आपला खेळ चालूं आहे. पांडुरंग मध्यें च एखादा शब्द बोलतो, मध्यें च लपतो हा भावार्थ.

* ॥ २६९ ॥ *

॥ दोष पळती दरशेणें। तुमच्या नांमं संकीर्तनें ॥ १ ॥
॥ धृ ॥ हें कां करूं आदरीलें। खोटें वचन आपुलें ॥ धृ ॥
॥ तुम्ही पापा भीतां। आम्हां उपजवाया चींता ॥ २ ॥
• ॥ तुका म्हणे सेवा। कळ्ळी काळा जींके देवा ॥ ३ ॥

(२६९) वरच्या अभंगांत म्हटलें कीं माउली-लपून-चकूर करते. आणि पारखी वचनें बोलते म्हणून म्हणतात देवा, तुमचें वचन तुम्हीं खोटें करूं कां

पाहतां ? तुमच्या दर्शनानें नामसंकीर्तनानें दोष पळतात-कारण आमच्या अंगीं पा राहील काय म्हणून तुम्हांस भय वाटतें; व त्यामुळें आम्हांस चिंता उपजविता, कीं, तुका म्हणे देवा तुमची सेवा कळीकाळाला जिंकते. अशी ही सेवा करितांना

* ॥ १७० ॥ *

॥ करूनी वीनंवणीं । माथा ठेवीतो चरणीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ होतें ते चीं असो द्यावें । रूप सोमेंची बरवें ॥ धृ ॥
॥ भया भेणें तुमंचा ठाव । तुमंच्या कोपें कोठें जाउं ॥ २ ॥
॥ तुका पाया लागे । दान समुदायें मागे ॥ ३ ॥

( २७० ) देवा, तुमचें रूप सौम्य होतें तें तसें च असो द्यावें अशी विनवणी करून तुमचे चरणावर माथा ठेवितो, आम्हांस कोठें भय आलें तर तुमचे पाय हे आमचें लपावयाचें, आश्रयाचें, स्थान आहे. आणि तुम्ही कोपून उग्र रूप धारण केलेत तर आम्ही कोठें जावयाचें ! म्हणून तुका पाया लागे व सर्व समुदायासाठीं ( कीं तुमचें रूप सौम्य असावें ) हें दान मागत आहे.

* ॥ २७१ ॥ *

॥ प्रीतीच्या भांडणां नाहीं सीरपाव । वचनांचे चीं भाव नीस्टुरता ॥१॥
॥धृ॥ जीणें तरी येका जीवें उभयेता । पुत्राचीया पीता दुखवे दुखें ॥ धृ ॥
॥ काये जाणे तुटो मायेचे लीगाड । वीशम तें आड उरों नेणे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मज करूणा उतरें । करीतां वीस्वंभरें पावीजैल ॥ ३ ॥

( २७१ ) पुत्राला जें दुःख होतें त्या दुःखानें बापाला दुःख व्हावें, अशा एका जीवानें उभयता ( पिता–पुत्रानें, जगावें–अशी स्थिति असतांना ) पिता-पुत्रांच्या भांडणास शीर नाहीं, पाय नाहीं, म्हणजे त्यास आरंभ नाहीं, शेवट नाहीं, बाप नेहमीं रागावणार व मुलगा नेहमीं रुसणार, चुकणार, हें ठरलेलें च आहे. निष्ठुर भाव हा केवळ वचनाचा आहे. मायेचें लिगाड कधीं तुटणार आहे का ? — तेव्हा विषम असें कांहीं हि आड राहूं च शकत नाहीं. तुका म्हणे विश्वंभराच्या करुणा उत्तरांत मला सर्व कांहीं पावेल.

* ॥ २७२ ॥ *

॥ नको घालुं झांसा । मंनां उपाधी वळसा ॥ १ ॥
॥ धृ ॥ जे जे वाहावे सं ( क ) ल्प । पुनें तरी ते ची पाप ॥धृ॥
॥ उपजो तो भेव । होतो कासावीस जीव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पांहो । होईल ते नीवांत राहों ॥ ३ ॥

( २७२ ) असें उभयतांमध्यें पिता–पुत्राचें नातें असल्यामुळें मी पुण्यात्मक असे संकल्प वेगळे वाहिले तर तें पाप होईल–कारण करुणा वचनांत मला सर्व मिळावयाचें आहे. तेव्हां मला कसला हि धाक ( झांसा ) घालूं नको. किंवा माझ्या मनाला उपाधीचा वळसा ( फेरा ) नको; कारण तुम्ही धाक दाखविलेत तर भय वाटते, आणि फेरी करावयास लाविलेत तर जीव कासावीस होतो. म्हणून तुका म्हणे–आम्ही निवांत राहूं व जें होईल तें पाहूं.

* ॥ २७३ ॥ *

॥ कोण वेची वाणी । आणीक क्षुलका कारणीं ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आतां हें ची माप करूं । वीठल हृदयांत धरूं ॥ ध्रु ॥
॥ नेदावीया वृती । आतां उठों ची बहु ती ॥ २ ॥
॥ उपदेस लोका । करून वेडा होतो तुका ॥ ३ ॥

( २७३ ) असें निवांत बसलों असतांना–विठ्ठल विठ्ठल या उच्चारानें माप करूं व विठ्ठल हृदयांत भरूं. आतां क्षुलक कारणासाठीं वाणी कोण वेंचणार ? आतां क्षुलक कारणासाठी वाणी वेंचण्याची वृत्ती च उठूं द्यावयाची नाहीं. उगा च लोकांना उपदेश करून तुका वेडा होतो.

* ॥ २७४ ॥ *

॥ अईत्याची रासी । आली पाक सीधीपासीं ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आतां सांडुनी भोजन । भीके जावें वेडेपण ॥ ध्रु ॥
॥ उसंतीली वाट । मागे परतावें फुकट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाणी । वेचुं वैसोन ठाकणी ॥ ३ ॥

( २७४ ) आतां ( हे चि माप करूं विठ्ठल हृदयांत धरूं ) हें भोजन सोडून – लोकांना उपदेश करून–तुका जो वेडा होतो–तें वेडेपण भिकेस जावो. व आइत्या भोजनाची राशी, पाकसिद्धी, जवळ येवो. चालून आलेली वाट पुनः चालणें हें व्यर्थ आहे. म्हणजे पुनः पुनः उपदेश करावयास धावणें व्यर्थ आहे. तुका म्हणे–ठायीं च बसोन आपण आपली वाणी वेचूं.

* ॥ २७५ ॥ *

॥ धने गृध जाती । घरीं लांकरी परती ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आईकीलें तें ची कानीं । होय परीपाक मनीं ॥ ध्रु ॥
॥ कवटवटा पोटीं । सावधान होतासाठीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भाव । त्याचा तो ची जाणा देव ॥ ३ ॥

( २७५ ) ही वाणी ऐकून – जो ही परती गोष्ट लौकर मनांत ठसावून त्याचा परिपाक होऊं देतो त्याची जात धन्य व शुद्ध होय. ज्याच्या पोटीं स्वत.च्या हिताचा कळवळा असतो व जो स्वत.च्याबद्दल सावध असतो अशा माणसाची प्रत्यक्षतेच्या प्रीयतेबद्दल जी नीष्ठा असते तो च त्याचा देव होय (ज्ञानदेवी रम्य रमलें समाधान हरींचें चींतन सर्वकाळ ) तेव्हां माणसाचें समाधान रम्यपणानें कोठें रमत आहे – हें पहावें – तो त्याचा देव होय.

* ॥ २७६ ॥ *

॥ वीशम वाट दुरवरी । चालोनीया परती धरी ।
॥ मागीला ते उरी । नाहीं उरली भयाची ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ मुखे न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड ।
॥ सरलीया चाड । मग कैचे उद्वेग ॥ ध्रु ॥
॥ होतो पराजीला अभ्यास । समई घालावया कास ॥
॥ तेव्हां लटीके दोश । योगे अनुतापाच्या ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आहे । बुधी केलीयाने साहे ।
॥ जवळी च आहे । देव वाट स्मरणाची ॥ ३ ॥

( २७६ ) तुका म्हणे भाव – त्याचा तो ची जाणा देव, ही जी गोष्ट सांगितली – त्या गोष्टीस कसली हि नाड होऊ नये – ही नाड आपण ( विषयांच्या नादानें ) चुकल्या वाटेनें दूरवर चालून गेलों आहोंत, तरी ती चूक लक्ष्यांत येतां च जो परतीची ( उलट ) वाट धरतो. त्यास परत फिरण्याचें भय किंवा लाज वाटू नये ही गोष्ट एवढी चांगली आहे कीं मागाहून जे येतील त्यास त्या भयाची उरी उरत नाही व आपल्या हातीं शेवटीं गोड लागते. बरें जी वाट चुकली म्हणून तेथून परतलों कीं त्याची चाड मातब्बरी सरते व मग त्याबद्दल उद्वेग हि राहत नाहीं. अनुतापाच्या योगानें लटीके दोष नाहींसे होऊन तशी च वेळ आली तर कास घालावयाचा परजीलया ( शब्द लागला नाहीं ) अभ्यास होतो. अशा तऱ्हेनें बुद्धी साहाय्य करूं लागली कीं देव जवळ च आहे. तो फक्त स्मरणाची वाट पाहात आहे असें तुका म्हणे.

* ॥ २७७ ॥ *

॥ बीजीं फळाचा भवसा । जतनें सींचना सरीसा ।
॥ चावीलीया आसा । काकुळती ते नाड ॥ १ ॥

॥ धृ ॥ हा तो गडसंदीचा ठाव । पीके पीकवीला भाव ।
॥ संकोचोनी जीव । दसा केली जतनं ॥ धृ ॥
॥ माती घाली धनांवरी । रांडा रोटा वरी वरी ।
॥ सुखाचे शेजारीं । दुख भ्रमें भोगीतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दीसा भुली । जाल्या उफराटी चाली ।
॥ नीवाडाची बोली । अनुभवें साक्षीसी ॥ ३ ॥

( २७७ ) बुद्धी साहाय्य करील तर देव जवळीं च आहे. ( पिके पीकवला भाव ) असा जो वर सिद्धांत मांडला—त्यांत बुद्धी अनुकूल होणें हा मोठा गडसंदीचा ( अडचणीचा ) भाग आहे. हा मोठा पेंच आहे. कारण जीव हा संकोचून आपली दशा जतन करून असतो. बीज आणि फळ हरींचे नाम—असा भरवंसा धरून जो कोणी पाणी वगैरे घालण्याची काळजी घेईल तेथें बीजासारखें फळ लागेल; परंतु या भावांत कोणी दुसरी कसली आशा ठावली तर ती नाड उत्पन्न करीत—व मनुष्य काकुळतीस येईल. दुसऱ्या कोणी चावळल्यास मनुष्य धनावर माती लोटतो—रांडा रोटा ( दळणकांडण असले अनाथ विधवांचे व्यवसाय ) वर वर करतो—व सुखाचे शेजारीं भ्रमानें दुःख भोगीत असतो. तुका म्हणे दिशाभुली झाली कीं माणसाची चाली उफराटी होते—आणि निवाडा—हा अनुभवाच्या साक्षीच्या बोलीनें होतो.

[ येथें ओळ संपते ]

॥ २७८ ॥

॥ काये उरली ते करु वीनवणी । वेचलों वचनीं पांडुरंगा ॥ १ ॥
॥ धृ ॥ अव्हेरलो आतां कैचं नांमं रूप । आदर नीरोप तरी तो नाहीं ॥धृ॥
॥ माझा माये वाप ये गेलो सलगी । तो हे तुम्हां जगीं सोईरीका ॥२॥
॥ तुका म्हणे आतां जोडुनीयां हात । करी दंडवत ठाईंचा ठाईं ॥३॥

( २७८ ) नामरूपाबद्दल आदर वाटावा तो तसा वाटत नाहीं. तुमचा कांहीं निरोप यावा—तो हि नाहीं—तेव्हां माझा अव्हेर झाला आहेसें वाटतें. आतां विनवणी तरी उरली सुरली काय करूं—माझी सर्व वचनें वेचिलीं आहेत. माझा मायबाप—असें म्हणून तुम्हांजवळ सलगी करावयास गेलों—पण तुम्हांस जगांत सोईरीं फार तेव्हां आमच्याकडे लक्ष्य पुरवावयास सवड कोठें आहे ! तेव्हां तुका म्हणे—आतां हात जोडून ठाईंच्या ठायीं दंडवत करितो.

* ॥ २७९ ॥ *

॥ आवडी धरूनी करू गेलो लाड । भगती प्रेम कोड न पुरेची ॥१॥
॥घृ॥ म्हंणउनी जीव ठेला आसावोनीं । खेद होतो मंनीं बहुसाल ॥ घृ ॥
॥ वेठी चैसे वाटे नीर्फळ कारण । सीतळ होउनं खोडावलों ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सरतें नव्हे ची पांयांपे । वळ केले पापे नव्हे ची भेटी ॥३॥

( २७९ ) हात जोडून ठायींच्या ठायीं दडवत घालून जीव आशा धरून होता व आवडीनें — माझा मायबाप म्हणून लाड करवून घेण्याच्या मी आशेवर होतों. परंतु माझे भक्तीप्रेम कोड पुरविले जात नसल्यामुळें, मनांत खेद फार होतो. जीवींत वेठीं ऐसें निर्फळ वाटते. व त्यामुळें ( उल्हास नाहींसा होऊन ) शीतळ — थंड — होऊन मी खोडावलों आहे. तुका म्हणे — माझ्या पापानें वळ केल्यासारखे दिसतें — यामुळें माझे बे,ल पायापाशीं मरते झाले नाहींत; पटले नाहींत. हें होणें अगदीं सहज आहे कारण

* ॥ २८० ॥ *

॥ काये लवण कळीके वीण । येके क्षीण सागर ॥ १ ॥
॥ घृ ॥ कां हे येवढी अडचणी । नारायेणीं मज वीण ॥ घृ ॥
॥ कुबीरा अटाहासे जोडी । काये कवडी कारणे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे काच मणी । कोण गणी भांगारी ॥ ३ ॥

( २८० ) नारायणास माझ्याशिवाय असली कसली अडचण पडणार आहे कीं ती माझ्याशिवाय दूर होणार नाहीं, समुद्र मिठाच्या कधीं एका खड्या शिवाय — क्षीण झाला आहे का ? कुबेरास कवडीसाठीं कधीं अट्टाहास करावा लागला आहे का ? सोन्यात कोणी कांचमणी बसवतो का ? तसें देवाचें माझ्याशिवाय काय अडणार आहे ?

* ॥ २८१ ॥ *

॥ सोव्हा सहस्र होउं येते । भरलें रीते आम्हां पें ॥ १ ॥
॥ घृ ॥ येसे तुम्हां ठाया ठाव । देव म्हुंणे संपादे ॥ घृ ॥
॥ कैचीं चीरामधीं चीरें । मना वेरं आले ते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पांडुरंगा । अंग लगा भीनं परा ॥ ३ ॥

( २८१ ) असे — कांच मणी व भांगार । ठाया ठाव हे तुम्हांस देव म्हणून शोभतात, मी कांच व तुम्ही सोनें हीं एकत्र शोभवून घेणें तुम्हांस

शक्य आहे. तुम्हांस कधीं कोणी नांवें ठेविली आहेत कां? वेळ आली तेव्हां तुम्ही सोळा सहस्र रूपें घेऊन हजर झाला—आणि आमच्या वेळीं मात्र तुम्ही रीते आहांत. तुम्हांस द्रौपदीस साहाय्य करावेसें वाटतां च चिरा मध्यें चिरे किती झालांत—तुका—म्हणे अंगलगा पांडुरंगा—तुम्ही भिन्नपणानें परक्यासारखे वागतां. म्हुंणे हा एक तुकोबांचा स्वतंत्र शब्द आहे त्याचा अर्थ म्हणउनी—म्हणून असा आहे.

* ॥ २८२ ॥ *

॥ प्रीतीचा तो कळवळा । जीव्हाळाची वेगळा ॥ १ ॥
॥ धृ ॥ बहु नेदी रडो माता । दुस्वीत होतां धीर नव्हे ॥ धृ ॥
॥ वरी वरी तोंडा पुरतें । मोहेरीते कळ्तसे ॥ २ ॥
॥ जाणोनीयां नेणता तुका । नव्हे लोका सारीखा ॥ ३ ॥

( २८२ ) कारण मी अंगलगा असतों तर माता ही मुलाला फार रडूं देत नाहीं, बाळ दुश्चीत होतां च तीस धीर निघत नाहीं, धरवत नाहीं. असा प्रीतीचा जिव्हाळा व कळवळा वेगळा असतो. आतां वेळपर्यंतचें तुमचें वागणें वरवरचें तोंडापुरतें रीतें होतें; तो केवळ मोह होता हें मला कळतें—हें जाणून सुद्धां तुका नेणता, ( इतरांसारखा जाणता नाहीं ) असा राहिला आहे.

* ॥ २८३ ॥ *

॥ असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा नीवडोना ॥ १ ॥
॥ धृ ॥ अनुसरलों येका चीतें । हातों हाते गीवसीत ॥ धृ ॥
॥ गुण दोष कास्यासाठीं । तुं मीं पोटीं वागउं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दुजे आतां । कोठें चीता आतळे ॥ ३ ॥

( २८३ ) तुम्हांस एका चित्तानें—हातोहातें गिवसीत अनुसरतो आहे. तुम्ही कसे हि असा आम्ही सहसा ती गोष्ट नीवडणार नाहीं, तूं व मीं असा पोटीं भेद वागवून गुण कोणाकडे दोष कोणाकडे—हे कशासाठीं करीत बसूं. देवा, तुझ्या शिवाय माझ्या चित्ताला आतां काय शिवणार आहे ( आतळे ) ?

* ॥ २८४ ॥ *

॥ हा गे हाची आतां लाहो । माझा अहो वीठला ॥ १ ॥
॥ धृ ॥ दंडवत दंडवत । वेगळी मात नो वंदे ॥ धृ ॥

॥ वेगळ्याल्या कोठें भागें । लाग लागें लावावा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केल्या जमा । वृती तमा भाजुनी ॥ ३ ॥

( २८४ ) तेव्हां आतां माझ्या विठ्ठला, मी आतां हा एक च लाहो ( त्वरा ) करून तुम्हांस दंडवत घालतो व वेगळी मात बोलत नाहीं, वेगवेगळाल्या भागानें कोठें लाग लावीत बसूं. असें सर्व तम भाजून वृत्ती जमा केल्या.

* ॥ २८५ ॥ *

॥ तुम्हांसी न कळे सांगा काये येक । कासया संकल्प वागउं मी ॥ १ ॥
॥ध्रु॥ आहे तेथें सता ठेवीलें स्थापुनी । प्रमाणें ची वाणी वदे अझ्या ॥ ध्रु ॥
॥ कृपा जाली मग न लगे अंगसंग । नीजध्यासे रंग चढता राहे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मागें बोलीलो ते वाव । आतां हा ची भाव द्रुढ जाला ॥ ३ ॥

( २८५ ) तुम्ही जेथें मला आपुल्या सत्तेनें स्थापून ठेविलें आहे, तेथें तुमच्या आज्ञेप्रमाणें वाणी वदतो; ही गोष्ट अशी आहे कां ? कीं, ती तुम्हांस कळत नाहीं ! तेव्हां मी कशाबद्दल संकल्प वागवूं ? तुमची एकवार कृपा झाली कीं मग अंगसंगाची जरूरी उरणार नाहीं. नीजस्वाच्या ध्यासानें रंग वाढता राहिल. वाढत–जाईल. तुका म्हणे मी मागें कांहीं हि बोललों असलों तरी तें वाव आहे. आतां हा भाव ( अंगसंग ) असावा हा दृढ झाला.

* ॥ २८६ ॥ *

॥ आवडी न पुरे मायेबापा पासीं । घडो कां येवीशीं सकईल ॥ १ ॥
॥ध्रु॥ होईल नेमलें आपलीया काळें । आलीयाचा बळें अन्न उरे ॥ ध्रु ॥
॥ जाणवले तेथें थोडें येक वेळा । सकळ ही कळा सर्वोतमीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीवेदीले गुहीये गुज । आतां तुझी तुज सकळ चींता ॥ ३ ॥

( २८६ ) मायबापाजवळ आपली आवडी पुरणार नाहीं असें कधीं होतें कां ? तेव्हां याविषयीं–सर्व कांहीं–जे व्हावयाचें असेल तें घडो. त्यांनीं याबद्दल जें कांहीं नेमून ठेविलें असेल–तें त्याप्रमाणें होईल. आळी करणारें मूल असतें त्याचा आग्रह हा उरतो च–असतो च. मी एकवेळ माउलीस थोडें, मला काय हवें तें, जाणवलें. बाकी सर्वोत्तमीं सर्व कला आहेत च. तुका म्हणे मी ही गुह्यांतली गुह्य गोष्ट तुम्हांस सांगितली, आतां तुझी तुला सकळ चिंता आहे.

* ॥ २८७ ॥ *

॥ जालें आतां साटे । कासयाचें लाहान मोठें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ येक येका पडीले हातीं । जाली तेव्हां च नीस्चींती ॥ ध्रु ॥

॥ नाही फीरो येत मागे । जाले साक्षीचीया आंगे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । आतां येथें कोठे हेवा ॥ ३ ॥

( २८७ ) तुम्हीं आम्हीं एकमेकाच्या हाती सापडलों तेव्हा च आम्हास काय मिळावयाचें व न मिळावयाचें याची निश्चिती झाली आता आपणात ल्हान मोठें असं काहीं उरलें नाहीं. तुमचे आमचें साटे झालें आहे. आता आपणास माघार घेता येणार नाहीं त्यास अगींचीं साक्ष आहे तुका म्हणे आता तुमच्या आमच्यामध्यें हेवा कोठें उरला साटे हा शब्द वश्य व्यवसायातला आहे.

* ॥ २८८ ॥ *

॥ वोसटा तरी मी वीटला देहासी । पुरे आतां येसी जोडी पुन्हां ॥ १ ॥
॥ धृ ॥ कीती मरमर सोसावी पुढती । राहीलो संगती वीठोबाचे ॥ धृ ॥
॥ आतां कोण याचा करील आदर । जाव कलेवर वीटवोनी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां सांडी ते ची सांडी । कोण फीरे लडी यासी मागें ॥ ३ ॥

( २८८ ) ही मरमर सारखीं—या विठोबाच्या सगतींत सोसावी तरीं किती ? मी वोसट—ओंगळ—म्हणून या देहाम विटलों आहे व पुन्हा ही अशी जोडी नको. आता या देहाचा कोणास आदर उरला आहे ! हें कलेवर विटवोन जाऊ दे तुका म्हणे—तू हें शरीर साडी म्हणता च साडीन हि—यास मी माघार घेऊन लडी होणार नाहीं.

* ॥ २८९ ॥ *

॥ हें ही येसे ते हीं तैसे । उभये पीसें अवीचार ॥ १ ॥
॥ धृ ॥ अभीमांनाचे ठेलाठेली । मधीं जालीं हींपुस्ट ॥ धृ ॥
॥ धीरा श्यांती ठाव नुरे । हा ची उरे आबाळ्या ॥ २ ॥
॥ कवतुक हे पाहे तुका । कढता लोकां आधनीं ॥ ३ ॥

( २८९ ) अभिमानाचें ठेलाठेलींत ( गर्दींत )—माणसें फक्त कस्टी होतात कारण हे असें म्हणणार—ते तसें म्हणणार आणि दोघाच्या अविचारात धीरपणास, शातीस, ठाव उरत नाहीं—व या गरीब माणसाची उगा च आबाळ होते तुका म्हणे लोकाना या अधणात कढताना पाहतो आहे—हें एक कवतुक आहे मी यात कोठच्या हि अविचारांत सापडलों नाहीं हें हि कवतुक आहे

* ॥ २९० ॥ *

॥ हीत जाणे चीत । कळो येतसे उचीत ॥ १ ॥
॥ धृ ॥ परीहार ते सपादनीं । संते कारण कारणीं ॥ धृ ॥

॥ वेगळाल्या कोठें भागे । लाग लागे लावावा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केल्या जमा । वृत्ती तमा भाजुनी ॥ ३ ॥

( २८४ ) तेव्हा आता माझ्या विठ्ठला, मी आता हा एक च लाहो (त्वरा) करून तुम्हास दडवत घालतो व वेगळी मात बोलत नाहीं, वेगवेगळाल्या भागानें कोठें लाग लावीत बसू असें सर्व तम भाजून वृत्ती जमा केल्या

* ॥ २८५ ॥ *

॥ तुम्हांसी न कळे सांगा काये येक । कासया संकल्प वागउ मी ॥ १ ॥
॥ध्रु॥ आहे तेथ सता ठेवीले स्थापुनी । प्रमाणे ची वाणी वदे अझ्या ॥ ध्रु ॥
॥ कृपा जाली मग न लगे अंगसग । नीजध्यासे रंग चढता राहे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मागे बोलीलो ते वाव । आतां हा ची भाव द्रुढ जाला ॥ ३ ॥

( २८५ ) तुम्ही जेथें मला आपुल्या सत्तेनें स्थापून ठेविलें आहे, तेथें तुमच्या आज्ञेप्रमाणें वाणी वदतो, ही गोष्ट अशी आहे का ? कीं, तीं तुम्हास कळत नाहीं ! तेव्हा मी कशाबद्दल सकल्प वागवू ? तुमची एकवार कृपा झाली की मग अगसगाची जरूरी उरणार नाहीं नीजत्वाच्या ध्यासानें रग वाढता राहील वाढत–जाईल तुका म्हणे मी मागें काहीं हि बोललों असलों तरी तें वाव आहे. आता हा भाव ( अगसग ) असावा हा दृढ झाला.

* ॥ २८६ ॥ *

॥ आवडी न पुरे मायेबापा पासीं । घडो कां येवीशी सकईल ॥ १ ॥
॥ध्रु॥ होईल नेमल आपलीया काळे । आलीयाचा बळे अन्न उरे ॥ ध्रु ॥
॥ जाणवले तेंथ थोड येक वेळा । सकळ ही कळा सर्वोतमीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीवेदीले गुहीये गुज । आतां तुझी तुज सकळ चींता ॥ ३ ॥

( २८६ ) मायबापाजवळ आपली आवडी पुरणार नाहीं असें कधीं होत का ? ते हा याविषयीं–सर्व काहीं–ज व्हावयाचें असेल तें घडो त्यानीं याबद्दल जें काहीं नेमून ठेविलें असेल–तें त्याप्रमाणें होईल आळी करणारें मूल असते त्याचा आग्रह हा उरतो च–असतो च मी एकवेळ माउलीस थोडे, मला काय हवें ते, जाणवलें बाकी सर्वोत्तमीं सर्व कला आहेत च तुका म्हणे मी ही गुह्यातली गुप्त गोष्ट तुम्हास सागितली, आता तुझी तुला सकळ चिता आहे

* ॥ २८७ ॥ *

॥ जाले आतां साटे । कासयाचे लाहाण मोठ ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ येक येका पडीले हातीं । जाली तेव्हा च नीश्चींती ॥ ध्रु ॥

॥ नाहीं फीरो येत मागें । जालें साक्षीचीया आंगें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । आतां येथें कोठें हेवा ॥ ३ ॥

(२८७) तुम्हीं आम्हीं एकमेकांच्या हातीं सापडलों तेव्हां च आम्हांस काय मिळावयाचें व न मिळावयाचें याची निश्चिती झाली. आतां आपणांत ल्हान मोठ असें कांहीं उरलें नाहीं. तुमचें आमचें साटें झालें आहे. आतां आपणास माघार घेतां येणार नाहीं. त्यास अंगीचीं साक्ष आहे. तुका म्हणे आता तुमच्या आमच्यामध्यें हेवा कोठें उरला. साटें हा शब्द वैश्य व्यवसायांतला आहे.

* ॥ २८८ ॥ *

॥ बोखटा तरी मी वीटलों देहासी । पुरे आतां येसी जोडी पुन्हां ॥ १ ॥
॥ धृ ॥ कीती मरमर सोसावी पुढती । राहीलो संगती वीठोबाचे ॥ धृ ॥
॥ आतां कोण याचा करील आदर । जावें कलीवर वीटंबोनी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां सांडी ते ची सांडी । कोण फीरे लंडी यासी मागें ॥ ३ ॥

(२८८) ही मरमर सारखी—या विठोबाच्या संगतींत सोसावी तरी किती ? मी बोखट—ओंगळ—म्हणून या देहास विटलों आहे व पुन्हां ही अशी जोडी नको. आतां या देहाचा कोणास आदर उरला आहे ! हें कलेवर विटबोन जाऊं दे. तुका म्हणे—तूं हें शरीर सांडी म्हणतां च सांडीन हि—यास मी माघार घेऊन लंडी होणार नाहीं.

* ॥ २८९ ॥ *

॥ हें ही येले तें हीं तैसें । उभये पीसें अवीचार ॥ १ ॥
॥ धृ ॥ अमीमांनांचे ठेलाठेली । मधीं जालीं हींपुस्ट ॥ धृ ॥
॥ धीरा श्यांती ठाव नुरे । हा ची उरे आवाळया ॥ २ ॥
॥ कवतुक हें पाहे तुका । कढतां लोकां आधर्नीं ॥ ३ ॥

(२८९) अभिमानाचें ठेलाठेलींत (गर्दीत)—माणसें फक्त कस्टी होतात कारण हे असें म्हणणार—ते तसें म्हणणार आणि दोघांच्या अविचारांत धीरपणास, शांतीस, ठाव उरत नाहीं—व या गरीब माणसाची उगा च आवाळ होते. तुका म्हणे लोकांना या अधणांत कढतांना पाहतो आहे—हें एक कवतुक आहे मी यात कोठच्या हि अविचारांत सांपडलों नाहीं हें हि कवतुक आहे.

* ॥ २९० ॥ *

॥ हीत जाणे चीत । कळों येतसे उचीत ॥ १ ॥
॥ धृ ॥ परीहार ते संपादनीं । सते कारण कारणीं ॥ धृ ॥

॥ वरदळ ते तुतेरें कसीं । आगी मंद येते रसीं ॥ २ ॥
तुका म्हणे करुनी खरें । ठेवीतां तें पुढें बरें ॥ ३ ॥

( २९० ) कोणा हि माणसास त्याच्या हिताची गोष्ट कळते च कार्यकारण भाव लावून त्याची संपादणी करून परिहार थावयास नको. नुसता डौल दाखवून कांहीं माल कसास उतरत नाहीं. रस मंद अग्नीवर ठेविला कीं कसास उतरतो असा खरा माल पुढें ठेविलेला बरा.

* ॥ २९१ ॥ *

॥ भोग भोगाचारी घ्यावा । संचीताचा देतां ठेवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ श्यांती धरणें जीवासाठीं । दशा उत्तम हे गोमटी ॥ धृ ॥
॥ देहे लेखावें असार । सते पर उपकार ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हे मीरासी । बुडी घावी ब्रह्मरसी ॥ ३ ॥

( २९१ ) तुका म्हणे खरें । ठेवितां तें पुढें बरें—ही गोष्ट कशी करावी हे सांगताहेत कीं संचीताचा ठेवा देऊन भोग—जो येईल तो भोगावारी घेऊन जीवीं शांती धरणें ही दशा गोमटी आहे. देह हा असार लेखावा. परउपकार हा सत्य मानावा व तुका म्हणे ब्रह्मरसीं बुडीं देणें ही आपली मिराशी समजावी.

* ॥ २९२ ॥ *

॥ करा नारायेणां । माझ्या दुखाची खंडणा ॥ १ ॥
॥ धृ ॥ वृती राखा पांयांपासीं । वसती धरून मांनसीं ॥ धृ ॥
॥ पाळुनीयां लळा । आतां पाववावें फळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दीन । त्याचा हरीतीया सीणं ॥ ३ ॥

( २९२ ) ही ब्रह्मरसी बुडी थावयाची जी आपुली मिराशी आहे ती भोगावयाची कशी तें सांगताहेत. नारायणा, माझ्या मानसीं वस्ती करून तुमच्या पायापाशीं वृत्ती राखा—माझ्या दुःखाची खंडणा करा माझ्या लळा पाळून, मला अविनाश जोडीचें फळ मिळेल असें करा. तुका म्हणे आम्ही हीन, दीन आहोंत, आमचा शीण हरण करा.

* ॥ २९३ ॥ *

॥ जीवत्व तें कीती । हें ची धरीतां बरें चीतीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ संत सुमनें उतरें । मृद रसाळ मधुरें ॥ धृ ॥

॥ वीसावतां कानीं । परीपाक घडे मंनीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जोडी । हो हे जतन रोकडी ॥ ३ ॥

( २९३ ) हीन-दीन जीं असतात त्यांचा शीण संत वचनें जीं सुमंनांसारखीं —फुलांसारखीं मृदु, रसाळ व मधुर असतात तीं करतात. त्यामुळें जीवीत्व हें काय आहे तें कळतें व तीं वचनें चित्तीं धरावी हें बरें. तीं वचनें कानांत विसावल्यानें— मनांत त्यांच्या परिपाक होतो. तुका म्हणे संत वचनांची आपणास जोडी झाली असतां आपल्या मिराशीची जतन रोकडी होते. येथें संत वचनांचें स्वरूप किती गोड वर्णिलें आहे.

* ॥ २९४ ॥ *

॥ अभीमानाची स्वामी श्यांती । महत्व घेती सकळ ॥ १ ॥
॥धृ॥ कळोनी हें न कळे वर्म । तरी श्रम पावती ॥ धृ ॥
॥ सर्व सत्ता करीता धीर । वीर्या वीर आगळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तीखट तीखे । मृद सखे आवडी ॥ ३ ॥

( २९४ ) संत वचनांनीं आपल्या मिराशीची जतन रोकडी होते हें कळून हि—ज्यांना त्याचें वर्म कळत नाहींसें होतें तीं श्रम पावतात. सर्व अभिमानांची स्वामीनी शांती आहे—तिच्यामुळें सकळांस महत्त्व येतें. धीर केला असतां वीर हा वीर्यानें धीर करून सर्व सत्ता हातीं धरील. तुका म्हणे तिखटाशीं तिखट व मृदुशीं सख्यत्व केलें असतां वीर हा आगळा शोभेल. तुका म्हणे तीखट तीखे ही महाराष्ट्राची वृत्ति आहे.

* ॥ २९५ ॥ *

॥ भोजन तें पश्यांतीचें । नींचें उंच उसाळी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जैसी कारंज्याची कळा । तो जीहुवाळा स्वहीता ॥ धृ ॥
॥ कल्पना ते देवावीण । न करीं भीन इतरीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पावे भुतीं । ते नीरच्यांती मापली ॥ ३ ॥

( २९५ ) कारंज्याची कळा— ही जशी उंच उसळी मारून आकाशांत जातें—तसें शांतीचें भोजन हें उंच उसळी मारते. तो कळवळा माणसाचा स्वहिताबद्दल असावा म्हणजे देवावीण दुसरी कसली हि कल्पना—भिन्न कल्पना त्यानें करूं नये. तुका म्हणे शांती ही भूतमात्राच्या ठिकाणीं निश्चितपणें मापली जाते.

( येथें ओप बदलली. )

* ॥ २९६ ॥ *

॥ देवाचे म्हणउनं देवीं अनादर। हे मोठें आश्चीर वाटतसे ॥ १ ॥
॥धृ॥ आतां येरा जनां म्हणांवे ते काई। जया भार डोई संवसाराचा ॥धृ॥
॥ तजुनी संवसारा अभीमान साठा। जुलुम हा मोटा दीसतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अळस करूनीया साहे। बळें केसे पाहे वाया जाती ॥३॥

( २९६ ) देवाचे ( भक्त ) म्हणवून घेत असताना या लोकाच्या ठिकाणीं देवाच्या बद्दल हा एवढा अनादर पाहून फार आश्चर्य वाटतें !! अशी स्थिति असताना इतर माणसाना, कीं ज्याचे डोक्यावर संसाराचा भार आहे, त्यास काय म्हणावें ! म्हणजे त्याच्या ठिकाणीं अनादर असेल हें सांगावयास च नको हे जे वर देवाचे भक्त म्हणवून घेणारें म्हणून सांगितले, त्यानीं संसार त्यजिला व अभिमानाचा साठा केला हा मोठा जुलूम झाल्यासारखा दिसतो आहे तुका म्हणे यानीं आळसास साहाय्य करून– किंवा आळसाचें साहाय्य घेऊन, हे बळें, च कसे वाया जात आहेत पहा हें तात्पर्यानें कोणातरी देवभक्त म्हणविणाराचें शब्दचित्र आहे.

* ॥ २९७ ॥ *

॥ कथेचा उलंघ तो अधमां अधम। नावडे ज्या नांम वोळखा तो ॥१॥
॥धृ॥ कासया जेउनी जाला भुमीभार। अनं उपकार माते कुसी ॥ धृ ॥
॥ नीद्रेचा आदर जागरणीं वीट। त्याचे पोटीं कीट कुपथ्याचे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दोन्ही बुडवीली कुळ। ज्याचे तोंड काळे कथेमधीं ॥ ३ ॥

( २९७ ) हे असले लोक जिवत राहून भूमीस भार झाला आहे आणि मातेच्या कुशींत जन्मून उपकार न होता अपाय झाला आहे हे अधमाधम लोक याचे हातून कथेचा उल्लंघ होतो, याना नाम आवडत नाहीं याना निद्रेचा आदर व जागरणीं वीट असतो व त्याचे पोटीं कुपथ्याचें कीट असतें ज्याचें कथेमध्यें तोंड काळे असतें ( म्हणजे जे कथेस येत नाहींत ) त्यानीं आपली दोन्ही कुळें ( आईचें व बापाचें ) बुडविलीं म्हणून समजावें

* ॥ २९८ ॥ *

॥ देवे दीलहा देहे भजनां गोमटा। तो या जाला सांटा बाधीकेचा ॥ १ ॥
॥धृ॥ ताटोनीयां मान राहीली वरती। अहंकारा हातीं लवो नव्हे ॥ धृ ॥
॥ दास म्हणवाया न वळे रसना। सईर वचनां बाशगळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कोठें ठेवावा वीटाळ। स्वाणे नीरवळ व्हावयासी ॥ ३ ॥

(२९८) देवानें यांना गोमटा देह दिला तो यांस वाधिकेचा साठा व्हावयास कारण झाला. यांची मान ताठून वर राहिली व अहंकारामुळें ती मुळी-सुद्धां लवत नाहीं. आपण श्रीहरीचे दास आहोंत असें म्हणावयास रसना वळत नाहीं व बाष्कळ गोष्टी—स्वैर गोष्टी—बोलण्यास वळवळत असते. तुका म्हणे या श्वानांनीं निर्मळ होण्यास्तव आपला विटाळ कोठें ठेवावा, म्हणजे हे मानव देहधारी श्वान असे स्वयंभू आहेत कीं त्यांना विटाळ ठेवण्यास ठिकाण च सांपडत नाहीं.• कीं, या पैकीं एखाद्या ठिकाणीं आपल्या आंगीचा विटाळ ठेवून आपण निर्मळ व्हावें, आपला विटाळ जावा—आळस जावा—कुपथ्याचे कीट नाहींसें व्हावें, असें मनांत आलें तर तसें होण्याचा उपाय सांगताहेत.

* ॥ २९९ ॥ *

*॥ पोटापुरतें कामं । परी अगते तो रामं ॥ १ ॥*

॥ धृ ॥ करणें तें हें च करी । चीत्तीं पांडुरंग धरी ॥ धृ ॥

॥ परारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ २ ॥

॥ तुका म्हणे वळ । बुधी वेचुनी सकळ ॥ ३ ॥

(२९९) पोटापुरतें काम करा पण अन्तरांत अगत्यानें आत्माराम आठवा. वे कांहीं करावें असें वाटत असेल तर चित्तांत पांडुरंग धरा. प्रारब्धीं हेवा करून जर तुम्हांस कांहीं जोडावयाचें असेल, तर देवाची सेवा जोडा व ही गोष्ट तुम्हीं सकळ बळ बुद्धी वेंचून करा.

* ॥ ३०० ॥ *

॥ वहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली हे हातीं ॥ १ ॥

॥ धृ ॥ मनुसे देहा यैसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ धृ ॥

॥ वहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ २ ॥

॥ तुका म्हणे जाणे । येसे भले ते स्याहाणे ॥ ३ ॥

(३००) फार जन्मांतरांनीं मनुष्य देहासारखा ठिकाणा व जोडी हातीं लागली आहे. तेव्हां पांडुरंगीं भाव धरा—तुम्ही आजवर फार फेरा केला आहेत, आतां तुम्हांस—मनुष्य देहासारखा ठेवा सांपडला आहे—तुका म्हणे जे भले लोक ऐसे जाणून घेतील ते शहाणे होत.

* ॥ ३०१ ॥ *

॥ भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणं सकळां साक्षेत्वेसी ॥ १ ॥

॥ धृ ॥ माझी माझी म्हुणं येक येका मारी । हे तो नाहीं दुरी उभयेता ॥ धृ ॥

॥ तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद कर कर वाद मीथ्या ॥२॥
॥ तुका म्हणे येके ठांई आहे वर्म । हे ची होये श्रम नीवारीती ॥३॥

( ३०१ ) माउली ही आपण साक्षी राहते व कवतुकानें आपल्या बाळामध्यें भांडण लावते. तुझें थोडे भातुके—माझें पुष्कळ भातुके—असलें छद — करकर—मिथ्या वाद—करून तीं मुलें माझें माझे म्हणून एकमेकांस मारतात—आणि ही उभयता पासून भिन्न, साक्षी, असते. तुका म्हणे या सर्व गोष्टींचें वर्म एके ठिकाणीं आहे व तें हें कीं ही च उभयतांचे श्रम निवारण करते.

जगांतील हालचाल —तटेबखेडे—हें श्रीहरीची मुलांना कमी जास्त भातुके देऊन कलागत लावून देऊन गम्मत पहाण्यासारखें आहे. एक च गोष्ट दोन ठिकाणी वाटलेली असते.

* ॥ ३०२॥ *

॥ रुप नांवें माया बोलावया ठाव । मागा आले भाव तया वरी ॥१॥
॥धृ॥ सीव घाटेपरी न खंडे प्रुथुवी । श्याहाणे ते जीवीं समंजती ॥ धृ ॥
॥ पोटा आले तीच्या लोळे मांड्यावरी । पारखीपे करी खंती तीची ॥२॥
॥ तुका म्हणे भगतीसाठीं हरीहर । अरुपींचे क्षर वीभाग हे ॥ ३ ॥

( ३०२ ) परब्रह्माचे ठिकाणीं रुप व नांव ही बोलावयास कांहीं ठिकाणा हवा म्हणून आलीं, व जसें रुप—जसें नांव—तसें भाव हि उत्पन्न झाले. एरव्हीं ही या गांवाची प्राताची शीव म्हटल्यानें—पृथ्वीचा जसा खड पडत नाहीं—तसें रुप—नांवानें ऐन जिन्नस जो आहे त्यांत फरक होत नाहीं. ही गोष्ट शहाणे जे असतात ते जाणून असतात. आपण ज्या आईच्या पोटीं आलों तिच्या मांडीवर मनुष्य लोळण घेतो—इतर त्या गोष्टींची खंत करतात. तुका म्हणे भक्तीसाठीं हरी व हर असे विभाग केलेले आहेत. एरव्हीं अरूपींचे हे क्षर विभाग आहेत.

* ॥ ३०३॥ *

॥ लेकराचीं आळी न पुरवी कैसी । काय तया पासीं उणें जालें ॥ १ ॥
॥धृ॥ आम्हां लडीवाळां नाहीं ते प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थीती ॥धृ॥
॥ वचनांचा घेईन अनुभव पदरीं । जें हे जनाचारी मीरवीलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझी भोळीवेची आटी । दावीन सेवटीं कवतुक हे ॥ ३ ॥

( ३०३ ) येथें वर जो विचार २१४ अभंगांत सांगितला, ती गोष्ट ब्रह्मज्ञानाची व आत्मस्थिति मिरविणाऱ्या लोकांच्या मतानें बरोबर असेल. तुकोबा सागतात ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ही आम्हां लडिवाळांना प्रमाण नाहींत—

म्हणजे आम्ही त्यांची सत्ता ओळखत नाहीं. आमुची माउली आमुची आळी पुरविणार नाहीं — हें तुम्ही म्हणतां तरी काय ? त्या विठुरायाजवळ कांहीं कमतरता कां आहे ? आजवर जनाचार म्हणून जें वचन मिरविलें आहे त्याचा अनुभव पदरीं घेईन — तुका म्हणे माझी ही भोळीवेची आटी हट्ट, प्रयत्न आहे. तुम्हांस हें काय कवतुक आहे माउली आमुचें केवढें कवतुक करते तें — शेवटीं दाखवीन.

*हा अभंग नको ब्रह्मज्ञान आत्मास्थिती भाव मी भक्त तूं देव ऐसें करी ॥ धृ ॥ दावी रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणावरी माथा. या अभंगास पूरक आहे.

॥ पाहोनी श्रीमुख देईन अलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥

॥ पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुख गोष्टी ॥

॥ तुका म्हणे यासी न लावी उशीर । माझें भ्यंतर जाणोनियां ॥

व यांत सांगितलेलें कौतुक तुम्हांस पहावयास सांपडेल असें सांगताहेत. म्हणून विठुजीस बजावताहेत.

* ॥ ३०४ ॥ *

॥ आर्तभुता प्रती । उत्तम योजाव्या त्या शेक्ती ॥ १ ॥

॥ धृ ॥ फळ आणी समाधान । तेथे उत्तमें कारणें ॥ धृ ॥

॥ अल्पे तो संतोसी । स्थळीं सांपडे उदेसीं ॥ २ ॥

॥ सहज संगमें । तुका म्हणे तो उत्तम ॥ ३ ॥

( ३०४ ) आर्त भूत = जे कोणी कांहीं इच्छा करून तुमचेजवळ येतील त्यांचेसाठीं देवा तुम्ही आपल्या सर्व शक्ती—ऋद्धी—सिद्धी—अणिमा लघिमा या सर्व खर्च करा — त्यांमुळें त्यांचे कामुक भक्तीस फळ लागून त्यांस समाधान होईल. तुम्हांस हि आपण कांहीं दिलें असें वाटेल. माझ्या सारख्या अल्पसंतोषी माणसाला तुम्ही स्थळीं सापडावंत येवढा च उद्देश आहे. तुका म्हणे, देवा, हा, जो तुमचा आमचा सहज संगम होईल — कांहीं घ्यावयाचें नाहीं — नुसतें प्रियत्व भोगावयाचें — हा सहज संगम — हा सर्वांत श्रेष्ठ आहे. सहज संगम तुका म्हणे तो उत्तम ही म्हण किती गोड आहे.

* ॥ ३०५ ॥ *

॥ मुळाचीया मुळें । दुरे वाटती सकळें ॥ १ ॥

॥ धृ ॥ ऐसा योगीयाचा धर्म । नव्हे वाटयाचा श्रम ॥ धृ ॥

॥ मकळे आवडी । कोणं वाहे कैसी घडी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे स्थीत । दुख पाववावें चीत ॥ ३ ॥

( ३०५ ) कांहीं तरी उद्देश धरून जी भक्ति होते. त्या भक्तीनें कोणत्या तरी मुद्यानें मूळ जोडावें तसें कार्यकारण भावानें देण्याघेण्याच्या व्यवहारानें सर्व च दुःखें वाढतात. असा हा योगीयांचा धर्म आहे. तो श्रम वाढवीत नाहीं का? कोणत्या वेळीं कशी घडी येईल हें कांहीं सांगतां येतें का? योग्यांच्या मार्गांत चित्त व वृत्ति यांस विरोध असतो यास उद्देशून हा अभंग आहे. तुका म्हणे चित्त स्थिर करतां हे खरें, पण तें दुःखाचें मूळ आहे. कारण चित्त मारून ते स्थिर केलें आहे. तें स्थिर होणार कसे?

* ॥ ३०६ ॥ *

॥ उधत त्या जाती । रंगीं रंगल्या उधती ॥ १ ॥

॥ धृ ॥ म्हणंउनीं बहु फार । त्यांसीं असावें अंतर ॥ धृ ॥

॥ कैचे पाठी पोट । गोड वीशासी सेवट ॥ २ ॥

॥ तुका म्हणे सापा । न कळे कुवाळीले बाप्पा ॥ ३ ॥

( ३०६ ) तेव्हां वेदांती सिद्धांती-ब्रह्मज्ञानी-आत्मस्थितीवाले-योगी जपी काम्य कर्में करणारे हे सर्व आपापल्यापरीनें रंगून उद्धट, देवाशी हि उद्धट, झालेले आहेत. म्हणून त्यांच्यांत व आपल्यांत फार अंतर असावें. विषास काहीं पाठपोठ, आदी अंत, असें असतें का? आरंभ कडू च शेवट गोड असें कधीं होईल का? हे लोक आपण सुधारूं-जवळ करूं-तर ती कल्पना कशी व्यर्थ आहे तें तुकोबा म्हणतातः— सापाला — बाप्पा कधीं कुर्वाळलेलें समजेल का? जो त्याला कुर्वाळावयास जाईल त्यास डसेल मात्र. येवढ्यासाटीं त्यांच्यांत व आपल्यांत अंतर फार असावें येवढ्या प्रकारचे लोक सांगून झालें. तुका म्हणे सापा न कळे कुर्वाळीलें बाप्पा ही म्हण आहे. आतां एखाद्या लहान मुलास लहानपणींच चांगली संगत लावली व तो हरिनामांत रत असला तर त्याचे आईबाप कशी कागाळी करितात तें सांगताहेत.

* ॥ ३०७ ॥ *

॥ काये करु पोरा लागली चट । धरी वाट देवळाची ॥ १ ॥

॥ धृ ॥ सांगीतलें नेघे कानीं । दुजें मनीं वीठल ॥ धृ ॥

॥ काम घरी न करी धंदा । येथे सदा दुस्चीत ॥ २ ॥

॥ आमचें कुळीं नव्हते येसें । हे च पीसें नीवडले ॥ ३ ॥

॥ लोकीकाची नाहीं लाज । माझें मज पारीखे ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे नरका जाणं । त्या वचनें दुस्टांची ॥ ५ ॥

( ३०७ ) काय करावें बोवा, पोराला चट लागून तो सारखा देउळाची वाट धरतो, आम्ही दुसरें कांहीं सांगितलें तरी तो लक्ष्यांत घेत नाहीं. एक विठ्ठल विठ्ठल हा उच्चार ! ! घरीं कांहीं कामधंदा करीत नाहीं. सदा दुश्चींत असतो. आमच्या कुळांत हे असें कोणी नव्हतें — हें च पिसें वेडं कोठून झालें आहे — तें न कळेः अहो, यास लौकीकाची कांहीं लाज नाहीं — हा मुलगा माझा असून — मला पारखा झाला कीं हो. तुका म्हणे — या दुष्टांच्या या वचनांनीं नरकास जाण्याची तयारी होत असते. कोणातरी मुलानें तुकोबांचा उपदेश ग्रहण केल्यानंतर त्याच्या आईबापांनीं केलेली ही खरी खोटी तक्रार आहे. मनीं एक विठ्ठल विठ्ठल असणें हें केवढें भाग्य ! म्हणून सांगतातः—

* ॥ ३०८ ॥ *

॥ भागेवंता हे ची काम । मापी नांमं वेखरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ अनंदाची पुस्टी अंगीं । श्रोते संगी उधरती ॥ धृ ॥
॥ पीकला तया खाणे कीती । पंगतीस सुकाळ ॥ २ ॥
॥ तुका करी प्रणीपातु । दंडवत आचारीया ॥ ३ ॥

( ३०८ ) भाग्यवंत जे असतील त्यांना वाचेनें हरी गुणगान करण्याचें भाग्य लाभेल. त्यांच्या अंगावर आनंदाची पुष्टी चमकेल व त्यांच्या बरोबर सहज च श्रोते हि उद्धरतील. घरांत आंबा पिकला कीं एकटा मालक किती खाणार! त्याचा पंक्तीस सुकाळ व्हावयाचा अशा आचार्यांना, नामानिष्ठांना, तुका दंडवत करीत आहे.

नामानिष्ठ जे असतात त्यांची जात चोखोबा, सेना महाराज, यांसारखी असली तर किंवा ती एखादी जनाबाई असली तर म्हणून तुकोबा सांगताहेत कीं, नामनिष्ठ, भाग्यवंत, आचार्य, तुम्हांस, शालजोड्या पांघरलेले दिसणार नाहींत — पण आपण पात्रावर लक्ष ठेवू नका कवठ, ऊंस व नारळ हीं बाहेरून काग दिसताहेत !

* ॥ ३०९ ॥ *

॥ उपदेस तो भलत्या हातीं । जाला चीतीं धरावा ॥ १ ॥
॥ धृ ॥ नये जाउ पात्रावरी । कवटे रसीं नारळीं ॥ धृ ॥
॥ स्त्री पुत्र बंदी जन । ज नारायेण स्मरवी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे रत्न सार । परी उपकार चींधीचे ॥ ३ ॥

( ३०९ ) तेव्हां उपदेश हा भलत्या हातीं झाला तरी चित्तीं धरावा-मग तो उपदेश करणारी एखादी स्त्री असो, एखादा बंदीजन-गुलाम असो, तो जर तुम्हांस नारायणाची आठवण करून देत आहे तर तुम्ही त्याचा उपदेश मनीं धरा. तुका म्हणे तुमच्या हातांत जर रत्न धावय.चें झालें तरी तें चिंधींत बांधून दिलें पाहिजे नां ? तेवढ्या पुरता तुम्ही त्या चिंधीचा स्वीकार केला पाहिजे. तसा नारायणाचें स्मरण करून देणारा एखादा गुलाम असो, एखादी स्त्री-असो — तुम्ही त्यांच्याकडे —अनादरानें पाहूं नका व पात्राबद्दल तुम्हांस शंका न येतां तुम्ही तो उपदेश मनांत ठसूं द्या.

* ॥ ३१० ॥ *

॥ कारणां पैं असतां दृस्टी । शंका पोटीं उपजेनां ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ शुर मीरवे रणांगणीं । मरणीं च संतोस ॥ ध्रु ॥
॥ पाहीजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे उदारपणें । काय उणें मानांचें ॥ ३ ॥

( ३१० ) 'तुम्हांस जर आपलें ध्येय काय याची कल्पना स्पष्ट असेल तर मग तुमच्या पोटीं शंका ( पानाबद्दल ) उपजणार नाहीं — ( नामनिष्ठ म्हणतात — तसा देव आपल्या पोटीं पडेल कां — या चोखोबा, सेनामहाराज, जनाबाई, व तुकाराम यांचे हातून आपणास देव भेटेल का ? अशी ) शंका तुम्हांस शिवणार नाहीं. शूर हा मरणांत संतोष मानतो व तो रणांगणावर च चमकतो. आपल्या अंगीं जर कळवळा असेल तर आपल्या बळास उणें काय पडणार आहे ? तुका म्हणें आपण जीवावर उदार असल्यावर मान मिळण्यास कांहीं कमी पडणार आहे कां ? कारणां पैं असतां दृष्टी शंका पोटी उपजेना ही एक सुंदर म्हण आहे.

* ॥ ३११ ॥ *

॥ नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ अनुभव तो वरावरी । नांहीं दुरी वेगळा ॥ ध्रु ॥
॥ पाहीजे तें अले रुची । काचाकुची कास्याची ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥ ३ ॥

( ३११ ) बाबानों, हे माझे बोल तुमची कांहीं रमज, करमणूक, करण्यासाठीं उसने आणलेले नाहींत, अहाच म्हणजे — कांहीं तरी बोलावें म्हणून बोललेले नाहींत. मी हा वरचेवर अनुभव सांगत आहे. अनुभव एक व बोल एक अशी त्यांत ताटातूट नाहीं — जें म्हणूं तें येथें रुचीस येईल येथें आंत एक, बाहेर एक,

अशी काचाकुची नाहीं. येथें लाज आड येत नाहीं कारण तिची आम्हीं चाड धरीत नाहीं.

* ॥ ३१२ ॥ *

॥ जो जो घ्यावा सोस । माझें वारी गर्भवास ।
॥ लटीक्याचा दोश । अधीक जढे आंगेसीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां आहे तैसें असो । अनुताप आंगीं वसो ।
॥ येवढें चीं नसो । माझें आणीं परावें ॥ धृ ॥
॥ जागा जाले पणें । काय नासावे स्वपणें ।
॥ शब्दांचीया सीणें । कस्ट मीथ्या माणावे ॥ २ ॥
॥ घ्यावे मांकड चीटे । धांवे कुपीं काये भेटे ।
॥ तुका म्हणे फुटे । डोई गुडघे कोंपर ॥ ३ ॥

( ३१२ ) आमच्या शब्दाचा जो सोस धरील त्याचे गर्भवास वारले जातील, बरें तुम्हीं लटकें पदरांत घ्याल तर तुमचे दोष वाढतील. आतां तुम्ही कसे हि असा, पण तुमच्या ठिकाणीं अनुताप असूं दे व माझे व दुसऱ्याचें हा भेद नसावा—मग माझ्या शब्दाच्या सोसानें तुमचा गर्भवास टळेल. जाग आल्यावर स्वप्नांतल्या नाशाचें काय होय ! फक्त शब्दांचा मिथ्या शीण तेवढा पदरांत पडणार. माकड हें आपली छाया पाण्यांत पाहून कष्टी होतें आणि विहिरींत उडी घेऊं पाहतें, त्यास तेथें काय भेटणार आहे ? तुका म्हणे त्याचे डोई, गुढगे व कोपर फुटतील एवढा च काय तो लाभ.

* ॥ ३१३ ॥ *

॥ लटकीयाचे झांसां । होतो पडीलों वळसा ।
॥ होउनीयां दोशा । पात्र मीथ्या अभीमानें ॥ १ ॥
॥ धृ ॥ बरवी उघडली द्रुस्टी । नाहीं तरी होतों कस्टी ।
॥ अकेंदेते स्रुष्टी । मायेचीया चेस्टानीं ॥ धृ ॥
॥ मरणाची नाहीं सुधी । लोभी प्रवर्तली बुधी ।
॥ परेतो तो कधीं । घडेची ना माघारी ॥ २ ॥
॥ सांचुनीयां मेरे धन । लावी पोरासीं भांडण ।
॥ नाहीं नारायण । तुका म्हणे स्मरीला ॥ ३ ॥

( ३१३ ) आपल्या या लटिक्या प्रयत्नांत मिथ्या अभिमानानें पडून दोशास पात्र होवूं व फेऱ्यांत सापडूं; तेव्हां आमची दृष्टि उघडली आहे ही गोष्ट बरी

झाली आहे. नाही तर कष्टी व्हावें लागलें असतें. मायेच्या चेष्टांनीं ही सृष्टी ओरडते आरडते आहे. अभिमानानें पछाडलेल्या माणसांची बुद्धी लोभीं प्रवर्तलेली असते, व ती बुद्धी कधीं हि माघारी फिरत नाहीं व त्यांस कधीं मरण येणार आहे. ही हि शुद्ध नसते. माणूस धन सांचवून मरतो—व आपल्या पोरांत भांडणें लावून ठेवतो. पण चुकून हि नारायणास स्मरत नाहीं.

* ॥ ३१४ ॥ *

॥ लटीकें तें रुचे । साच कोण्हां हीं न पचे ॥ १ ॥

॥ धृ ॥ येसा माजल्याचा गुणं । भोगें कळों येईल सीण ॥ धृ ॥

॥ वाढवी ममता । नाहीं वरपडला तो दुतां ॥ २ ॥

॥ न मणी माकड । कांहीं उपदेस हेंकड ॥ ३ ॥

( ३१४ ) *लोकांना लटिकें रुचतें — पण साच गोष्ट कोणास पटत नाहीं.* असा हा अभिमानानें माजलेल्यांचा गुण आहे. तो भोग भोगावा लागेल तेव्हां मी काय म्हणत आहे तें कळून येईल. जोपर्यंत यमदूतांनीं वोरबडला नाहीं तोंपर्यंत ममता वाढवीत असणार च. तुका म्हणे माकड—हेकट असतं तें—कधीं *उपदेश ऐकल का ? लटिके तें रुचे । सा च कोणतं हीं न पचे । ही स्थिति* २०० वर्षे झालीं तरी तशी च आहे !

* ॥ ३१५ ॥ *

॥ जवळी सुखापासीं । असतां नेघे अहींर्णसी ॥ १ ॥

॥ धृ ॥ भव नीर्दाळण नामं । वीटल वीटल नासी कामं ॥ धृ ॥

॥ सुखाचा सेजार । करूं कां नावडे घर ॥ २ ॥

॥ तुका म्हणे ठेवा । कां हा न करी वरवा ॥ ३ ॥

( ३१५ ) विठ्ठल विठ्ठल हें भव निर्दाळण नाम—जवळ असून तोंडानें तें नाम *कोणी रात्रं दिवस कां उच्चारीत नाहींत ? हा सुखाचा च शेजार आहे. —पण विठ्ठल* विठ्ठल नाम हें अंतरांत घर करून राहिलेलें आवडणार नाहीं—तुका म्हणे हा वरवा ठेवा तुम्हीं कां करून ठेवीत नाहीं ? मग स्वतःबद्दल सांगतात कीं भव निर्दाळण करणारे विठ्ठल विठ्ठल हें नाम — मुखीं उच्चारल्यानें—

* ॥ ३१६ ॥ *

॥ वरवे देसाउर जालें । काये बोलें बोलींरे ॥ १ ॥

॥ धृ ॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दरुशणें ॥ धृ ॥

॥ भाग्ये जाली संत भेटी । आवडे पोटीं होती ते ॥ २ ॥

॥ तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ३ ॥

( ३१६ ) आमचे देशांतर झालें आहे—अवस्था बदललेली आहे — कांहीं पालटलें आहे—हें कसें काय बोलून दाखवूं ? एका लाभानें दुसरा लाभ झाला व पहिला लाभ दुणावला. व या संतांच्या व देवाच्या दरशनानें जीव धाला. मागें संतभेटी व्हावी अशी आवडी होती त्याप्रमाणें संतभेटी झाली त्याबरोबर च देवदर्शन झालें व त्यांनीं काम सांगितलें. असा लाभेलाभ दुणावला. तुका म्हणे आजवर मी जो श्रम केला तो अवघा फळासी आला. व मला नारायणाची जोडी व संतभेटी झाली. संतभेटी होऊन मला जी नारायणाची जोडी झाली, हें जें मझ्या सर्व श्रमांचें फळ तें मला मिळालें.

* ॥ ३१७ ॥ *

॥ सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥ १ ॥

॥ धृ ॥ आवडीनें सेवनं करूं । जीवीचें धरूं जीवीं च ॥ धृ ॥

॥ उपमा या देतां लाभा । कास्या शोभा सारिखी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे नुचलीं डोई । ठेवीली पाईं संतांचे ॥ ३ ॥

( ३१७ ) तें आवडीनें सेवन करतां येईल — जीवींचें हितगुज जीवीं धरतां येईल. पण तें सांगतां येणार नाहीं. तें सांगण्यास—ती कीर्ती गाण्यास मुख च पुरत नाहीं. या लाभास कसली हि उपमा दिली तरी ती शोभन च नाहीं. तुका म्हणे—मी संतांच्या पायीं जें एकदां डोकें ठेविलें आहे—तें कांहीं पुन्हां उचलणार नाहीं.

* ॥ ३१८ ॥ *

॥ आपलाला लाहो करूं । केणें भरू वीठल ॥ १ ॥

॥ धृ ॥ मार्गे पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ धृ ॥

॥ पुढती कोठें घडे ऐसें । वहुतां दीसें फावलें ॥ २ ॥

॥ तुका म्हणे जाली जोडी । चरण घडी न वीसंभे ॥ ३ ॥

( ३१८ ) या संतचरणाजवळ आपण मोठ्या भाग्यानें पावलों, आतां या चरणावरून आपली काया कुरवंडी करून टाकावी. व आपापला छंद करकरून हा विठ्ठल —हें केणें ( जिन्नस )—मनांत भरून घेऊं. फार दिवसांनीं आपणास ही गोष्ट लाभली आहे. पुनः अशी जोड कधी केव्हां कोठें होणार आहे ! तुका म्हणे ही जी चरण जोडी झाली आहे ती मी क्षणभर हि विसंबणार नाहीं.

* ॥ ३१९ ॥ *

॥ उजळलें भागें आतां अवघी चींता वारली ॥ १ ॥
॥ धृ ॥ संत दरशणें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ धृ ॥
॥ संपुस्ट हा न्हदय पेटी । करुणी पोटीं सांठउं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ३ ॥

( ३१९ ) या संत चरणाचा प्रसाद म्हणून आम्हांस हा पद्मनाभ जोडला असें आमचें भाग्य उजळलें व अवघीं चिंता निवारण झाली. तेव्हां आतां हृदयाची पेटी करून हा पोटांत साठवूं. तुका म्हणे हा जो माझा ठेवा होता, तो, अंतरीं जो देवाबद्दल भाव होता, त्यास सांपडला.

( येथें ओघ बदलला आहे. )

* ॥ ३२० ॥ *

॥ मजसवें नको चेस्टा । नव्हे साव्टी कांहीं कोस्टा ॥ १ ॥
॥ धृ ॥ बैस सांडुनी दीमाख । नाहीं तरी काळें करी मुख ॥ धृ ॥
॥ येथें न सरे चार । कांहीं आणीक वेव्हार ॥ २ ॥
॥ तुका वीस्णुदास । रस जाणोतो नीरस ॥ ३ ॥

( ३२० ) पद्मनाभ हृदयसंपुटीं साठवून म्हणताहेत कीं बा मजबरोबर चेष्टा करूं नकोस. मी कांहीं साठी – किंवा कोष्टी – अलत्यापलत्या नाहीं. तेव्हां तूं आपला दिमाख टाकून बस – नाहींतर तोंड काळें कर. येथें इतर चार, वेहेचार, किंवा व्यवहार चालणार नाहीं. कारण विष्णुदास तुका सरस नीरस जाणता आहे. हें बोलणें देवास उद्देशून आहे.

* ॥ ३२१ ॥ *

॥ गुणांचा चीं सांटा । करुं न वजो आणीका वाटा ॥ १ ॥
॥ धृ ॥ करीती छंदें नाणापरी । भरोणं सीणती अडभरी ॥ धृ ॥
॥ नेमली पंगती । आम्हां संतांची संगती ॥ २ ॥
। तुका म्हणे लीला । येर कवतुक पाहो डोव्टा ॥ ३ ॥

( ३२१ ) आम्ही दुसऱ्या कोणत्या हि गुणाचा सांठा इतर वाटांनीं जाऊन करणार नाहीं. लोक नानातऱ्हेचें छंद करितात – आडरानांत शिरतात व शीण करून घेतात. आम्हांस एक संतांची पंगती नेमलेली आहे. ( आम्हांस दुसऱ्या वाटा वर्ज्य आहेत ) बाकी इतरांची लीला व कवतुक काय असेल तें डोळ्यांनीं पाहूं.

* ॥ ३२२ ॥ *

॥ लाडाच्या उतरी वाढविती कलह । हा तो अमंगळ जाती गुण ॥१॥
॥धृ॥ तमाचे शेरीरीं वीटाळची वसे । वीचाराचा नसे लेश तो हीं ॥ धृ ॥
॥ कवतुके घ्यावे लेकराचे बोल । साहीलीया मोल येसे नाहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे काये उपदेस खळा । नाहोणी काउळा खर्ते धुंडी ॥ ३ ॥

(३२२) लाडाच्या उत्तरानें कलह वाढवितात हा अमंगळ गुण ज्याच्या त्याच्या जातीचा आहे. या तमाचे शरीरीं विटाळ च असणार त्यांत विचाराचा लेश हि नाहीं. हे माझे बोल कवतुकानें मनावर घ्या—व जर हे शब्द सोसलेत— तर ते अमोल आहेत असें पटेल एरव्हीं—कावळ्यास उपदेश करून काय होय—तो न्हाऊन क्षर्ते धुंडतो. वेद, शास्त्री ठेवून वाचावयाचे, अशा करतां कीं हिंदुधर्माची त्या जोरावर सातसुरत निंदा करतां यावी. तसें च संत वाङ्मय पहावयाचें, तें अशासाठीं कीं शब्दांचा विपरीत अर्थ करून संतांवर यथेच्छ तोंडसुख घेतां यावें—अशा विद्वान् लोकांची पूजा काउळा नाहुन क्षर्ते धुंडी। अशी तुकोबांनीं केली आहे. येथें विषय बदलतो.

* ॥ ३२३ ॥ *

॥ कोण घरा येते आमच्या कास्याला । काये ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥१॥
॥ धृ ॥ देवासाटीं जालें ब्रम्हांड सोईरे । कोवळ्या उत्तरें काये वेचे ॥ धृ ॥
॥ मानें पाचारीता नव्हे आराणुक । येसे येती लोक प्रीतीसाठीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे रांडे नावडे भुशेणे । कांतिलेसें स्वान पाठी लागे ॥ ३ ॥

(३२३) देवामुळें आम्हांस सर्व ब्रह्मांड सोइरें झालें आहे—तेव्हां त्या लोकांशीं बोलतांना कोमल—मृदु—शब्द—वापरण्यास काय जाते? एरव्हीं आपल्या घरीं कोण येणार आहे? कां ज्याचा त्याला धंदा नाहीं? ज्या लोकांना मोठ्या मानानें बोलाविलेत तरी यावयास आराणुक, सवड, उसंत, व्हावयाची नाहीं—अशीं माणसें केवळ प्रीतीसाठीं येतात, तुका, म्हणे, या रांडेस आमचें हें भूषण आवडत नाहीं म्हणून. कांतिलेसें, पिसाळलेलें, श्वान, कुतरें, जसें पाठीस लागतें, तशीं ही वसवस सारखी करीत असते. ही जीजाबाईबद्दलची तक्रार आहे. श्रोते कोणत्या दर्जाचे होते हें येथें सांगितलें आहे. देवामुळें ब्रह्मांड सोयरें झाल्यासारखें वाटतें. ही विश्वबंधुत्वाची स्पष्ट खूण आहे. पण ती आवलीस पटेना. कोवळ्या उत्तरें काय वेचें—हा शब्दप्रयोग किती सुंदर आहे.

* ॥ ३२४ ॥ *

॥ आतां मज देवा । ईचे हातीचे सोडवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाठी लागलीसे लासी । ईछा जीते जैसी तैसी ॥ धृ ॥
॥ फेडा आतां पांग । आंगी लपउनी आंग ॥ २ ॥
॥ दुजे नेणे तुका । कांही तुम्हांसी ठाउका ॥ ३ ॥

( ३२४ ) देवा, मला आतां हिच्या हातांतून सोडवा, इच्छा जशी माणसाची पाठ पुरवते तशी ही लासी, राक्षशीण, माझ्या पाठीस लागली आहे. तुम्ही आपल्या अंगांत माझें आंग लपऊन घेऊन माझें पाग फेडा, याहून दुजे कांहीं तुका मागत नाहीं, जाणत नाहीं, हें तुम्हांस ठाउक आहे.

* ॥ ३२५ ॥ *

॥ बहु वाटे भयें । माझे उडी घाला दये ॥ १ ॥
॥ धृ ॥ फांसा गुंतलो लीगाडी । नचले बळ चरफडी ॥ धृ ॥
॥ कुंठीत चीं युक्ती । माझ्या जाल्या सर्व शेक्ती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । कामें मोहे केला गोवा ॥ ३ ॥

( ३२५ ) देवा, मला फार भय वाटत आहे तेव्हां तुमचे पोटीं दया येऊन तुम्हीं उडी घाला. मीं या लीगाडाच्या फांसांत गुतलों आहे, चरफडत आहे, पण माझे बळ कांहीं चालत नाहीं. देवा, माझ्या सर्व शक्ती कुंठीत झाल्या आहेत. देवा, मला कामानें व मोहानें मोठा च गोवा केला आहे.

* ॥ ३२६ ॥ *

॥ आम्हां कां आपले नावडे स्वहीत । चरफडी चीत कळवळयानें ॥१॥
॥धृ॥ न कळतां जाला खोळंब मारग । जगीं जालों जग बहुरुपी ॥ धृ ॥
॥ कळो आले वेर उघडले डोळे । करणधार मीळे तरी बरें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे व्हाल आइकत कारूणा । तरी नारायणा उडी घाला ॥३॥

( ३२६ ) आपलें हित व्हावें असें कां आम्हास वाटत नाहीं. चित्त कळवळयानें चरफडत आहे. काय करावें हें न कळून मार्गात खोळंबा झाला आहे आणि जगात जगाप्रमाणें बहुरूपी झालों आहे. आतां डोळे उघडले आहेत व असें कळलें कीं आपणांस कर्णधार मिळेल तर बरें होईल. देवा हे माझे बोल जर तुम्ही ऐकत असाल तर तुम्हांस करुणा येऊ द्या व नारायणा, माझ्या रक्षणार्थ उडी घाला. वरील अभंगात आत्मचरित्र स्पष्ट — पग — कोमउ शब्दानें सांगितलें आहे. येथे विषय बदलतो

* ॥ ३२७ ॥ *

॥ सीकरया शेब्दांचे उत्पादीतों ज्ञान । दर्पणीचे धन उसर वायां ॥ १ ॥
॥धृ॥ अनुभव कंई होईन भोगीता । सांकडे आतां हे ची आले ॥ धृ ॥
॥ गाये नाचे करी शेरीराचे धर्म । बीज कळा वर्म तुमचे दान ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केला उसीर न साहे । घाल तरी आहे सर्व सीध ॥ ३ ॥

( ३२७ ) देवा, मी शिकल्या शब्दांचें ज्ञान उत्पादन करीत आहे. म्हणजे ऐकलेले शब्द लोकांस सांगत आहे. पण तें सर्व आरशांत जस धन पहावें किंवा उसनवारीच्या धनासारखें आहे मला आता हें साकडें–सकट–पडलें आहे कीं -- त्या ज्ञानाच्या गोष्टींचा मला अनुभव केव्हां येणार – देवा, मी गातों, नाचतों व शरीराचे इतर धर्म हि करतों, पण त्या सर्व कलाचें बीज व वर्म तुम्ही दान केलेत तर भेटणार आहे. तुका म्हणे देवा, मला आतां उशीर सहन होत नाहीं. तुम्हीं जर मनांत आणाल तर सर्व सामुग्री घरीं सिद्ध आहे. हा काय अधिकार आहे की देवानें काय करावें हें हि तुकोबा सागत आहेत ! व दान करावयाचा जिन्नस कोठें आहे तें हि सांगताहत ! स्वसुरु पुरत नाही – एवढाच अर्थ घ्यावयाचा.

* ॥ ३२८ ॥ *

॥ अळस पाडीं वीशय कार्मी । शेक्ती देई तुझ्या नार्मी ॥ १ ॥
॥ धृ ॥ हे ची वीनंवणी वीनंवणी । धरा देवा माझी मंनीं । ॥ धृ ॥
॥ आणीका वचनां मुकी वाणी । तुमंच्या गर्जो द्या जी गुणीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पाये डोळां । पाहावे येर्‍हवीं आंधळा ॥ ३ ॥

( ३२८ ) देवा, तुम्ही आतां माझी विनवणी मनीं धरा. माझी विनवणी अशी कीं विषय व काम – या ठिकाणीं मला आळस येऊ दे व तुझें नाम गाण्यास शक्ती दे. त्याशिवाय इतर वचनांच्या ठिकाणीं माझी वाणी मुकी असू दे. व तुमच्या गुणगानात गर्जो द्या. डोळ्यानीं तेवढे तुमचे पाय पहावेत एर्‍व्हीं ते आधळे असावेत.

* ॥ ३२९ ॥ *

॥ व्रतता वासर । काये करावे शेरीर ॥ १ ॥
॥ धृ ॥ ठेवा नेमुनं नेमुनं । माझे तुमच्या पायीं गुणं ॥ धृ ॥
॥ नेदावीया वृती । कोठे फाको जी श्रीपती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भले । जन्मां येउनीयां तरी जाले ॥ ३ ॥

( ३२९ ) हें शरीर जर उनाडपणें वागेल तर त्याचें काय करावयाचें आहे ! तेव्हां त्यास सर्व गुणांनीं तुमच्या पायीं नेमून ठेवा. माझ्या वृत्ती कोठें फाकणार नाहींत असें करा. असें जर तुम्हीं केलेत तर श्रीपती, जन्मास येऊन बरें व भलें झालें म्हणावयाचें.

* ॥ ३३० ॥ *

॥ देवा वनवास । ज्याणें वसे सर्व देस ॥ १ ॥
॥ धृ ॥ केली नांवाची जतन । समर्थें तें नव्हे भीनं ॥ धृ ॥
॥ वनांतरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नेम । ऐसा कळोनी कां भ्रम ॥ ३ ॥

( ३३० ) रामरायानें एवढा देश वसविला, त्या देवास वनवास भोगावा लागला, *ज्यानें आपल्या नांवाची एवढी जतन केली — तो सामर्थ्यानें कांहीं* कमी नव्हता. पण त्यास वनांतरीं रड आली — असें पुराणांतरीं पवाडे आहेत. तुका म्हणे — नेमलेल्या गोष्टी या अशा होत असतात असें कळून उगा च अशांत कां राहतां ?

* ॥ ३३१ ॥ *

॥ कौतुकाची सृष्टी । कौतुकेची केलें कष्टी ॥ १ ॥
॥ धृ ॥ मोडे तरी भले खेळ । फांके फांकील्या कोल्हाळ ॥ धृ ॥
॥ जाणंनींया साठीं । भये सामावलें पोटीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चेतां । होणें तें तु च अईता ॥ ३ ॥

( ३३१ ) ही सृष्टी ही देवाचें कौतुक आहे. त्या कौतुकानें च आपणांस कष्टी केलें आहे. व आपण कष्टी होतों हें हि देवाचें कौतुक च आहे. तेव्हां हा येथील खेळ मोडला तर खुशाल मोडो — व तो मोडून चार चार दिकाणीं फाकल्यानें कोल्हाळ — आरडाओरड झाली तरी खुशाल होवो. ज्यास या गोष्टी कळतात त्याचे पोटीं भय सामावलेलें असतें. म्हणजे त्यास भय वाटत नाहीं, तुका म्हणे चेता, चित्ता जें काय व्हावयाचें आहे — तें तुझें तूं च व्हावयाचें आहे.

* ॥ ३३२ ॥ *

॥ मोवंडी सरीसें । अवघें मोवंत ची दीसे ॥ १ ॥
॥ धृ ॥ ठायीं राहील्या नीचळ । आहे अचळीं अचळ ॥ धृ ॥
॥ ये क हाकेचा कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥ २ ॥
॥ अभ्रे धांवे शशी । असते तें दुसरें भासी ॥ ३ ॥

( ३३२ ) आपणांस भोवड आली कीं त्या बरोबर सर्व कांहीं फिरल्या-सारखें वाटतें. आपण ठायींच्या ठायीं निश्चळ राहिलों तर सर्व अचळ आहेसें वाटतें. दरीच्या तोंडाशीं हाक मारली तर तेथें आणिक नाद उठतात. आकाशांत अभ्र–ढग–पळू लागले कीं चंद्र पळतो आहेसें वाटतें,

* ॥ ३३३ ॥ *

॥ सीकवीला तैसा पढों जाणे पुसा । कैंची साच दसा तैसी आंगीं ॥
॥ स्वपणीच्या सुखें नाहीं होत राजा । तैसा दीसे माझा अनुभव ॥ १ ॥
॥धृ॥ कासया हा केला जीहुवे अलंकार । पायासी अंतर दीसतसे ॥ धृ ॥
॥ दर्पणींचें धन हातीं ना पदरीं । डोळा दीसे परी सत्याचीये ॥
॥ आस केली तरी लाळची घोटावी । ठका ठकी तेवी दीसतीसे ॥२॥
॥ कवीत्वें रसाळ वदवीली वाणी । साक्ष हीं पुराणीं घडे येसी ॥
॥ तुका म्हणे गुरें राखोनी गोवारी । माझी म्हणे परी लाभे नाहीं ॥३॥

( ३३३ ) पोपटास जसा पढवावा तसा बोलू लागतो त्याच्या अंगीं तशी साच दशा असते कां ? स्वप्नांच्या सुखानें कोणी हि राजा होत नाहीं. तसा देवा, माझा अनुभव दिसतो आहे. हा माझ्या जिव्हेस हा एवढा अलंकार करून, मी पायापासून दूर च आहे. आरशांतील धन हें जसें हातीं किंवा पदरीं नसते पण डोळ्यास मात्र सत्यासारखें वाटतें व त्या धनाची आस केली तर आपली च लाळ घोटावी लागते तशी ही तुमची ठकाठकी दिसत आहे. माझी ही वाणी कवीत्वानें इतकी रसाळ वदविली आहे, कीं जशी कांहीं पुराणांतरी साक्ष च पटलेली आहे. तुका म्हणे गोवारी हा गुरें राखून माझी माझी म्हणतो पण त्यास जसा कांहीं लाभ नसतो तशी माझी स्थिति झाली आहे.

या एकाच अभगांत किती म्हणी साधल्या आहेत तें पहा : (१) स्वपनींच्या सुखें नाहीं होत राजा ( २ ) दर्पणींचें धन हातीं ना पदरीं ( ३ ) तुका म्हणे गुरें राखोनी गोवारी माझी म्हणे परी लाभ नाहीं.

* ॥ ३३४ ॥ *

॥ अनुभव तो नाहीं तुमचीया दरशणें । आईकीले कानीं वदे वाणी ॥
॥ जेवील्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडे पुरी काय होते ॥१॥
॥धृ॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरी हारा चाळवीले ॥धृ॥
॥ परी कुशलता भेटी अनादर । काये ते उत्तर येईल मानुं ॥

॥ अंतरी सद्राहीं कां नाहीं सारीखे । धरुनीं पारीखें व्रत तसा ॥ २ ॥
॥ आलों आलों चैसी दाउनीया आस । वाहो वुडतयास काय द्यावे॥
॥ तुका म्हणे अहो चतुरा सीरोमणीं। कीती माझी वाणी तुम्ही कोठें ॥३॥

( २३४ ) देवा, मांडे पुऱ्या असें तोंडानें म्हटल्यानें कां ते जिन्नस तयार होतात, तसें कानानें ऐकलेले शब्द मी तोंडानें उच्चारतों – पण तुमच्या दर्शनाचा मला अनुभव नाहीं. देवा, माझी खरं च अंतरीची तळमळ गेली नाहीं. तुम्हीं शंकर व विष्णु यांना हि चाळविलेंत तेथें माझें काय होय ? पत्रीं कुशल प्रश्न विचारावयाचें, व भेटीचे वेळीं अनादर, अशा स्थितींत त्या कुशल प्रश्नाचे काय होय ! तुमच्या मनांत एक, वागण्यांत दुसरें असें समजून अंतर कां पडतें. आलों आलों अशी आस दाखवून, मी बुडून वाहात आहे. त्यास काय द्यावें या विचारांत कां तुम्ही पडलां आहांत ? तुका म्हणेः–अहो चतुरा शिरोमणी-मी वाणी किती कष्टींत आहे व तुम्ही कोठें आहांत ? या अभंगांत हि दोन म्हणी साधल्या आहेत. (१) जेवील्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडे पुरी काय होतें । (२) पत्रीं कुशलता भेटी अनादर । काय तें उत्तर येईल मानू ।

* ॥ ३३५ ॥ *

॥ केलें तरी आतां सांच ची करावें । वीचारीलें द्यावें कृपा दान ॥ १ ॥
॥धृ॥ संकल्पासी नाहीं वीलीला वीकल्प । तुम्हां पुण्य पाप कळे देवा ॥धृ।
॥ उदार शेक्ती तवं तुमंची भुमंडळी । येसी ब्रीदावळी गर्जतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अहो रखुमादेवीवरा । उपरोध कां धरा माझा आतां ॥३॥

( २३५ ) तेव्हां देवा, आतां तुम्हांस जें करावयाचें असेल तें साच करावें. व तें म्हणजे मी मागितलें आहे तें कृपादान द्यावें. तुम्हांस माझें सर्व पापपुण्य कळत आहे. मी संकल्प केला आहे त्याचा विकल्प–होऊं न द्यावा. तुमची ब्रीदावळी अशी गर्जना करून आहे कीं, तुमची भूमंडळीं शक्ती उदार आहे. तेव्हां तुका म्हणे अहो रखुमादेवीवरा, माझा तुम्हांस उपरोध-प्रतिबंध कां होत आहे ?

* ॥ ३३६ ॥ *

॥ धर्माची तूं मूर्ती । पुनें पाप तुझे हातीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ मज सोडवी दातारा । कर्मापासुनीं दुस्तरा ॥ धृ ॥
॥ करीसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ २ ॥
॥ जीवाच्या जीवना । तुका म्हणे नारायेणा ॥ ३ ॥

( ३३६ ) देवा, तूं धर्माची मूर्ति आहेस. पापपुण्य तुझे हातीं आहे. तेव्हां मला या दुस्तर कर्मापासून सोडीव. तूं जर माझा अंगीकार केलास तर माझा कांहीं तुला भार होणार नाहीं. असें तुका जीवाचें जीवन जो नारायण त्यास म्हणत आहे.

* ॥ ३३७ ॥ *

॥ तुम्हां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ १ ॥
॥ धृ ॥ फुकासाटीं जोडे येस । तेथें कां करा आळस ॥ धृ ॥
॥ कृपेचे भुकेले । जीवदानं होयें केलें ॥ २ ॥
॥ माझें सीकवीलें । आइकावें हें वीठले ॥ ३ ॥

( ३३७ ) तुम्ही माझा अंगीकार केलात-तर तुम्हांस कांहीं वेंच=खर्च पडणार नाहीं व माझी केवढी अडचण दूर होईल ! असें तुम्हांस फुकासाठीं यश जोडेल ! मग आळस कां करितां ? मी कृपेशिवाय भुकेलेला आहे व तुम्हीं केलें म्हटल्यानें मला जीवदान मिळणार आहे. तुका म्हणे शिकवीलें-माझें ऐकावें वीठले ! अनन्यत्वाचा येथें कळस झाला. अनन्यत्वाच्या उत्कटत्वाचे च पुढील शब्द आहेत.

* ॥ ३३८ ॥ *

॥ अहो पुरुषोतमा । तुम्हां कास्याची उपमा ॥ १ ॥
॥ धृ ॥ सतंत तों नाही वुधी । आळवीतां नाहीं शुधी ॥ धृ ॥
॥ जागवीलें तरी । तुम्हां वेग्ती येणें हरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । तुम्हां नीत दीस नवा ॥ ३ ॥

( ३३८ ) अहो पुरुषोत्तमा, तुम्हांस कशाची उपमा द्यावी ? तुम्हांस स्वतंत्र अशी बुद्धी नाहीं. बरें तुम्हांस आळवीलें नाहीं-तर शुद्ध हि नसते. बरें आम्ही तुम्हांस जागवीलें तर तुम्हांस प्रकट व्हावें लागतें. तेव्हां तुका म्हणे-देवा, तुमचा रोज नवा दिवस आहे.

* ॥ ३३९ ॥ *

॥ आपुलीया काजा । आम्ही सांडीयेल्या लाजा ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुम्हां असो जागवीत । आपुलें आपुलें हातीं हीत ॥ धृ ॥
॥ तुम्ही देहे सुनें । आम्हां कळे पाप पुनें ॥ २ ॥
॥ सांगायासी तुका । उरउरीत उरला लोकां ॥ ३ ॥

( ३३९ ) देवा, आम्ही आपुल्या कार्यावर लक्ष्य ठेवून लाज सांडली आहे. आम्हीं आपले हित आपले हातीं घेऊन तुम्हांस जागवीत आहोत. तुम्ही देहशून्य तेव्हां तुम्हांस पाय पुण्याचें काय होय? पण तें सर्व आम्हांस कळतें. या सर्व गोष्टी सांगण्यास तुका उरउरीत: उर्वरीत—उरला आहे.

* ॥ ३४० ॥ *

॥ मथनें भोगें सार। ताकें घडे उपकार ॥ १ ॥
॥ धृ ॥ करवी सायासांची जोडी। अनुभवीयां ठावीं गोडी ॥ धृ ॥
॥ पाक आणी रुची। जेथें तेथें ते कईंची ॥ २ ॥
॥ वाढीतो पंगती। तुका आवडी संगती ॥ ३ ॥

( ३४० ) घरचें दहीं घुसळण्याने सार जें लोणी तें आपणास भोगावयास होतें व ताक दुसऱ्यास देऊन उपकार होतो. अशा तऱ्हेनें आपणास जे सायास पडून, उपकाराची—जोडी होते—ह्याचा अनुभव असेल त्यास च फक्त त्याची गोडी कळेल. सर्वांस च रुची व पाक कोठें आहे. तेव्हां तुका ज्यांना त्याची संगत आवडत असेल त्यांना पंगतीनें वाढतो आहे.

हा आत्मचरित्रपर गोड अभंग आहे. स्वतः तुकोबा लोणी खाऊन—त्याचें ताक म्हणजे शब्द आपणास देत आहेत. आतां त्या ताकावरून लोण्याची कल्पना ज्यास करवेल त्यानें करावी.

* ॥ ३४१ ॥ *

॥ आणीलें सेवटा। आतां कामा नये फाटा ॥ १ ॥
॥ धृ ॥ मज आपुलेसें म्हणां। उपरी या नारायेणा ॥ धृ ॥
॥ वेचियेली वाणी। युगती अवघी चरणीं ॥ २ ॥
॥ तुका धरी पाये। क्षेमा करुनी अन्याय ॥ ३ ॥

( ३४१ ) देवा, तुम्हीं मला येथवर आणलेत, आतां माझ्या कामास फाटा फोडूं नका. यापुढें तुम्ही मला आपुले म्हणा म्हणजे झालें. मी माझी सर्व युक्ती व माझ्या वाणींतील सर्व शक्ती तुमचे चरणीं वेचिली आहे तेव्हां आतां सर्व अपराध क्षमा करा—तुका तुमचे चरण धरीत आहे.

( येथें ओघ बदलतो. विषय हि निराळा आहे. )

* ॥ ३४२ ॥ *

॥ अवध्या जेस्टा देवी। कोणं पुजनांचा ठाव।
॥ धरीतां मी भाव। कोठें नयेसें जालें ॥ १ ॥

॥ धृ॥ दीसे सारीखे सारीखे। परी त कारणीं पारीखे।
॥ तळी गेली देखे। वरी टोले न साहती ॥ धृ॥
॥ पट येका सीरीं। येथा वीधीने त्या येरी।
॥ वस कोळ्या घागरी। डेरे रांजणं गाडीगे ॥ २॥
॥ तुका म्हणे मांनां। येथे कोण्ही रुसावेनां।
॥ आपलाल्या स्थाना। जेथे त्या च शोभाल ॥ ३॥

( ३४२ ) सर्व देवता वरिष्ठ आहेत श्रेष्ठ आहेत. असें म्हणून मी कोणाची पूजा करावी असा भाव धरिता च – माझा भाव कोठेंच बसेना सर्व काहीं सारखे सारखें दिसू लागले पण तें आपलें नसून पारखें–दुसऱ्याचें आहे – असें दिसलें त्यांतील काहीं देवता तळी व काहीं वर दिसतात व त्याना तो भार सहन होत नाहीं तेव्हा राज्याचें पट – उत्र एकाच्या च डोक्यावर असतें व बाकीचे लोक यथाविधीनें आपआपली जागा सभाळून असतात वसकोळ्या घागरी डेर राजण हे जसे यथाविधीनें एकावर एक ठेविले पाहिजेत – तसें आम्हांस सर्व देवताबद्दल केलें पाहिजे येथें मानासाठीं कोणी रूसू नये तुम्ही आपाआपल्या स्थानीं यथाविधीन नीट शोभाल

शकर, विष्णु, दत्त वगैरे सर्व देवता आपणास सारख्या च वंदनीय आहेत, असें वावदूकपणें प्रतिपादन करणाऱ्यास हें अनुभवी सताचें उत्तर आहे.

* ॥ ३४३ ॥ *

॥ रोडोनीयां मागं। कोणं मागता भुशेणं ॥ १॥
॥ धृ॥ देवे दील्हे तरी गोड। राहे रुची आणी कोड ॥ धृ॥
॥ लावीता लावणीं। वीके भीके के ज्या दानीं ॥ २॥
॥ तुका म्हणे धीरा। वीण केसा होतो हीरा ॥ ३॥

( ३४३ ) रडून माझी पूजा करा म्हणून मागून घेतलेल्या पूजेंत काय मान आहे ! देवानें दिल्हे तर तें गोड होते त्यात रुची राहते व कोड पुरते आपण लावणी केली तर धान्य विकता हि यतें व दान हि करिता येत – हें धान्य भीक मागून आणल्यानें होईल का ? तुका म्हणे धैर्य असल्याशिवाय – घण मारून चुरा झाला नाहीं तर तो हिरा–एरव्हीं गारा.

* ॥ ३४४ ॥ *

॥ पुज्या येकासनीं आसन आसनं। वेसतां गमनं मतिसीं ते ॥ १॥
॥ धृ॥ सागोतो ते धर्म नीतीचे संकेत। सावधान हीत व्हावे तरी ॥ धृ॥

॥ संतां ठाया ठाव पुजनाची इछा। जीवनीं च चळसा सांपडला॥२॥
॥ तुका म्हणे येका येकी वरासनं। दुजें तेथें भीनं अशोभतें ॥ ३ ॥

(३४४) तुम्हांस आपलें हित व्हावें असें वाटत असेल तर चित्त सावधान ठेवून जे धर्मनीतीचे संकेत सांगतो आहे ते ऐका. जेथें आपणास जे कोणी पूज्य आहेत, ते बसले असतील त्या आसनावर आपण जाऊन बसणें, हे मातेशी गमन करण्यासारखें आहे. संतांची ज्या ठिकाणी पूजा होत आहे तेथें आपली पूजा व्हावी अशी इच्छा होणें म्हणजे आपण एका फेऱ्यांत सांपडलों आहोंत म्हणून समजावें. तुका म्हणे कोणती हि, एक गोष्ट, उच्च आसनावर शोभून दिसते. तेथें जर दुसरें आलें, तर ते अशोभ्य होतें.

* ॥ ३४५ ॥ *

॥ नव्हती ते संत करीतां कवीत्व। संतांचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥
॥धृ॥ येथें नाहीं वेश सरत अडनांव। नीवडो घावडाच व्होवा अंगीं ॥ धृ॥
॥ नव्हती ते संत धरीतां भोपळा। करीता वाकळा परव्रणें ॥ २ ॥
॥ नव्हती ते संत करीतां कीर्तन। सांगतां पुराण नव्हती संत ॥ ३ ॥
॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें। कर्मा चरणें नव्हती संत ॥ ४ ॥
॥ नव्हती संत करीतां तप तीर्थाटण। सेवीलीया घन नव्हती संत॥५॥
॥ नव्हती संत माळामुद्रांच्या भुशेणें। भस्म उधळणें नव्हती संत ॥ ६ ॥
॥ तुका म्हणे नाहीं नीरसीला देहे। तों वरी अवघे सवंसारी च ॥ ७ ॥

(३४५) कोणी मनुष्य कवित्त्व करतो म्हणून तो संत या पदवीस पावत नाहीं. संतांचे आप्त हे संत होऊं शकत नाहींत. येथें वेष किंवा आडनांव उपयोगी पडत नाहीं. अंगीं आला घाव टाळावा कसा व आपण घाव टाकावा कसा याचें ज्ञान ज्याचें त्यास च हवें. तांब्याबद्दल माणूस भोपळ्याचा उपयोग करितो म्हणून तो संत होत नाहीं. किंवा वाकळ हीं पांघरावयास घेतो म्हणून कोणी संत होत नाहीं. मनुष्य कीर्तन करतो, पुराण सांगतो, म्हणून संत होणार नाहीं. वेद पठण करून किंवा कर्माचरणानें मनुष्य संत होणार नाहीं. माणसानें तप केल्यानें, तीर्थाटण केल्यानें किंवा वनवास सेविल्यानें त्यास संत पद प्राप्त होणार नाहीं, माणसानें माळामुद्रांची भूषणें घातलीं आहेत, भस्म उद्धळण केलें आहे, म्हणून तो संत होणार नाहीं. तुका म्हणे जों वर देहबुद्धी लय पावली नाहीं तों वर, वर सांगितलेले सर्व जटाधारी गोटे संसारीक च समजावयाचे. या एका अभंगानें—अनुकरणानें—संतपद प्राप्त होणार नाहीं—देहाच्या निरसनें

पावीजे या ठाया जव माझी काया ऐसें नोहे।– हीं स्थिति अंगीं येईपर्यंत सर्व कांहीं व्यर्थ आहे असें सांगितलें आहे. तेव्हां ३४४ अभंगांत सांगितल्याप्रमाणें संतांच्या पायरीस आपण पाय लावूं नये तर आपण आपणांस संतांचे सेवक म्हणवावें हें भले.

* ॥ ३४६ ॥ *

॥ म्हणवीतां भले संतांचे सेवक। अईत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥
॥धृ॥ ठसावीतां बहु लागती प्रयास। चुकल्या घडे नास अल्पवर्मे ॥ धृ ॥
॥ पाकसीधी लागे संचीत अईतें। घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वरें सांगतां च गोठी। रण भुमी द्रुस्टी न पडे तो ॥ ३ ॥

(३४६) कारण त्यांच्याकडे आपणांस ज्ञान व प्रेम यांची भीक ऐती मिळते व ती सुखरूप असते. ही गोष्ट मनांत ठसून त्या प्रमाणें वागण्यास फार प्रयत्न लागतात व यांत अल्प वर्म जरी चुकलें तरी नाश होतो. आइते संचित पुढें उभें राहून जेव्हां पाकसिद्धी होते. तेव्हां त्या सोइनें जें होतें तें गोड होते. तुका म्हणे–युद्धाच्या गोष्टी रणभूमि दृष्टीस पडली नाहीं तोंवर सांगण्यास ठीक; तसें मडकें कच्चें कीं पक्कें हें संतपद खरें च सिद्ध झालें आहे कीं नाहीं हें ठरण्याची वेळ आली नाहीं तोंवर संतपदाच्या गोष्टी सांगणें सोपें आहे. तेव्हां तुकोबा सांगताहेत.

* ॥ ३४७ ॥ *

॥ नये इछु सेवा स्वइछा जनांची। अवज्ञा देवाची घडे तेणे ॥ १ ॥
॥धृ॥ देहाचा नीग्रही त्याचे तो सांभाळी। मग नये कळी आंगावरी ॥धृ॥
॥ आपलीया इछा माता सेवा करी। न वाधी ते थोरीविनें क्षोभे ॥२॥
॥ तुका म्हणे सांडा देखीचे दीमाख। मोडसीचे दुख गांडी फाडी ॥३॥

(३४७) कोणीं आपली सेवा करावी अशी इच्छा करूं नये कारण त्यामुळें देवाची अवज्ञा घडते. ज्याची या देहावर सत्ता आहे–तो आपली जिन्नस सांभाळून आहे. म्हणजे हा देह कसा सांभाळावयाचा हें ज्याचें त्याला कळतें. आपण दुसऱ्याकडून सेवा घेऊं लागलों तर अंगीं अवकळा येते. आई ही आपल्या बाळाची सेवा स्वेच्छेनें करते त्यामुळें तिला बाध येत नाहीं. किंवा तशी सेवा करावी लागली, करावी असें वाटलें तर मी मोठी, मूल लहान, मूल माझ्यावर अवलंबून या थोरीवेनें तिचा क्षोभ होत नाहीं. तुका म्हणे हे दिखाऊ दिमाख सांडा–मोडशीच्या दुःखानें गांड फाटते.

३४४ या अभंगांत धर्मनीतीचे संकेत सांगण्यास सुरवात केली आहे. हे चार अभंग जसे निरनिराळ्या वळणाचे आहेत तसेच पुढील दोन्ही हि आहेत.

* ॥ ३४८ ॥ *

॥ सोंवळा होउं तों ओवळें जडलें । सांडी मांडी बोले तोंडी बीजीं ॥ १ ॥
॥धृ॥ येक सरें केली कलेवरें साटी । आतां नका तुटी पायासवें ॥ धृ ॥
॥ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जु सर्प मुळ मरणाचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हें तु ब्रह्मांड चाळीता । मी कां करूं चींता पांडुरंगा ॥३॥

( ३४८ ) सोंवळा होईन म्हणून जें तोंडानें म्हणावयास जावें तों तोंडांत सांडणें मांडणें म्हणून जे शब्द राहतात ते ओवळें जडण्याचें बीज होय. तेव्हां देवा, मी हें कलेवर – देह – शरीर एकदां च पायावर वाहिलें आहे – आतां त्याची पायापासून तुटी होऊं नये. शुद्ध संकल्प करावयास जावें तों विकल्पानें पापाचा सुकाळ होतो – दोरी लक्ष्यांत आली कीं सर्प पुढें उभा राहून मरणाचें मूळ सिद्ध होतें. तेव्हां तुका म्हणे – पांडुरंगा – तूं ब्रह्मांडाची चालना करून राहिला आहेस तेव्हां मी व्यर्थ चिंता कां करूं ?

॥ ३४९ ॥

॥ आहे तैसा आतां आहे ठाईं बरा । ठेवीलो दातारा उचीते त्या ॥ १ ॥
॥धृ॥ वचनाचा भार पडीलीया शीरीं । झालें मग भारी उतरेना ॥ धृ ॥
॥ आबोल्याची सवे लाउनीयां मनां । फांको नेदीं गुणां येसें करूं ॥२॥
॥ तुका म्हणे आम्हां गोवळ्याचा संग । राखातें तें अंग जाणतसों ॥३॥

( ३४९ ) निश्चयानें च तूं कांहीं तरी योग्य गोष्ट योजून मला या ठिकाणीं स्थापिला आहेस तेव्हां आहे त्या ठिकाणीं मी बरा आहे. उगा च संकल्पानें एखाद्या वचनाचा भार शिरावर पडला, तर तो उतरावयास जड जाईल. तेव्हां या मनास अबोल्याची संवय लावूं व तें इकडे तिकडे फांकणार नाहीं असें करूं, तुका म्हणे आम्हांस गोवळ्याचा संग आहे व तो सर्व अंगें नीट राखून आहे हें हि आम्ही जाणून आहोंत.

येथें ३४४ मध्यें सुरू झालेलें प्रकरण संपतें. पुढील चार अभंग भूपाळ्यांचे आहेत. हें प्रकरण अति गोड आहे.

॥ ३५० ॥

॥ कामें नेले चींत नेदी अवलोकुं मुख ।
वाटु वाटे दुरा फुटो पाहे हृदय ॥ १ ॥

॥ धृ ॥ कां जी सासुरवासी मज केले भगवंता।
आपलीया सता स्वाधीनता ते नाही ॥ धृ ॥
॥ प्रभातेसी वाटे तुमच्या यावें दरशना।
येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ ३ ॥
॥ येथें अवघें वांयां गेले दीसती सायास।
तुका म्हणे नाश दीसे जाल्या वेचाचा ॥ ४ ॥

( ३५० ) देवा, माझें चित्त कामानें नेलें आहे, तें श्रीमुख पाहूं देत नाहीं. या गोष्टीचें मला दुःख होत आहे, व हृदय फुटूं पाहात आहे., भगवंता, मला हें असें सासुरवासी कां हो केलेत! माझ्या इच्छेप्रमाणें आपल्या श्रीमुखाचें दर्शन घेण्यास येण्याची स्वाधीनता माझ्या ठिकाणीं कां नाहीं! प्रभात काळीं तुमच्या दर्शनास यावें पण तसें घडत नाही. आपल्याजवळ चोरी कशास करू—वासना उरते च. तेव्हां तुका म्हणे माझे आजवरचे सर्व सायास व्यर्थ गेल्यासारखे दिसताहेत व आजवर जें आयुष्य वेचलें त्याचा नाश झाल्यासारखा वाटतो.

॥ ३५१ ॥

॥ जळोत तीं येथें उपजवीती अंतराय।
सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां मज साहे येथें करावें देवा।
तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगउनी ॥ धृ ॥
॥ भोगें रोगा जोडोनीया दीलें आणीका।
अरुची ते हो कां आतां सकळा पासुनी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे असो तुझें तुझे मस्तकीं।
नाहीं हे लोकीकीं आतां मज वर्तणें ॥ ३ ॥

( ३५१ ) देवा, तुमचे पाय हि मोठ्या सायासानें जोडलेली जोडी आहे, तेव्हां येथें ज्या कारणांनीं अंतराय पडेल तीं कारणें जळोत. देवा, तुम्ही मला साहाय्य करून सर्व गोवा उगवून तुमची सेवा करून घ्या. भोगानें रोग जोडला जातो, तेव्हां आतां मला सर्व अरुची उत्पन्न होऊं दे. देवा, हे सर्व भोग तूं पाठविले आहेस, ते तुझ्या मस्तकीं राहोत. मला आतां या लोकांत लौकीका-प्रमाणें वागावयाचें नाहीं.

॥ ३५२ ॥

॥ न सांगतां तुम्हां कळो येते अंतर ।
वीर्स्वी वीस्वंभर परीहार ची नलगे ॥ १ ॥
॥धृ॥ परी हे अनावर आवरीतां आवडी ।
अवसान तें घडी पुरो येकी देत नाहीं ॥ धृ ॥
॥ काय उणे येथें मज ठेवीले ठाई ।
पोटा आलो तई पासुनीया समर्थ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अवघी आवरली वासना ।
आतां नारायणा दुसरीया पासुनी ॥ ३ ॥

( ३५२ ) या विश्वाचा विश्वंभर तूं आहेस. तेव्हां तुम्हांस मी न सांगतां माझ्या अंतरीची गोष्ट कळते तेव्हां परीहार देण्याची गरज नाहीं. परंतु ही आवडी ( तुमच्या दर्शनाची ) अनावर आहे. ही मला एक घडीभर हि उसंत देत नाहीं. मी तुमच्या पोटास आलों तेव्हांपासून समर्थ च आहे. मग माझ्यांत काय उणें पाहून मला येथें ठेविलें, नारायणा आतां इतर सर्व गोष्टीपासून मी वासना आवरली आहे.

॥ ३५३ ॥

। तुजसवें आम्हीं अनुसरलो आवला । नको आंगीं कळा राहो हरी हीन देऊं॥
॥ धृ ॥ सासुरवासा भीतो जीव वोढे तुजपासीं ।
आतां दोही वीशीं लज्जा राख आमची ॥ धृ ॥
॥ न कळतां संग जाला सहज खेळता । प्रवर्तली चींता मागीलाची यावरी ॥
॥ तुका म्हणे आसतां जैसे तैसें बरवें । वचन या भावें वेचुनीयां वीनटलो ॥

( ३५३ ) देवा, आम्ही अबला तुला जीवाभावानें अनुसरलों आहोंत, तेव्हां आतां हरि, आमच्या अंगीं हीन कळा राहूं देऊं नकोस. आम्ही सासुरवासास भीत आहोंत व जीव तर तुझ्याकडे ओढतो आहे, तेव्हां दोन्हीं ठिकाणीं तूं आमची लज्जा रक्षण कर. देवा तुम्हीं आम्हीं सहज खेळतांनां आपला संग झाला—आणि मग मागीलाची ( सासुरवासाची ) पूर्वाश्रमीची आठवण होऊन चिंता उत्पन्न झाली. तुका म्हणे जें आहे तें सर्व ठीक च आहे. म्हणून भक्तिभावानें हें वचन तुम्हांस वाहून तुमच्या पायास चिकटून आहे.

विठु शिवाय दुसरी कोणती हि गोष्ट जिवास गोड वाटं नये याबद्दलची केवढी ही सावधानता !

हा कारुण्य रस आहे. या चार अभंगांत गौळणींची भूमिका पोटीं घेऊन, गौळणींनीं काय म्हटलें असेल तें म्हटलें आहे. ( येथें ही ओढ संपते. )

* ॥ ३५४ ॥ *

॥ आहाकटा त्याचे करीती पीतर । वंउंसीं दुराचारी पुत्र जाला ॥ १ ॥
॥धृ॥ गळेचीना गर्भ नव्हेची कां वांज । माता त्याची लाज लावा पापी ॥धृ॥
॥ परपींडे परद्वारी सावधान । सादरची मंनं अभाग्याचे ॥ २ ॥
॥ नींमळतां नींदा चाहाडी उपवास । संग्रवावें दोश सकळ हीं ॥ ३ ॥
॥ पुर उपकार पुनें त्या वावडे । वीशाचे ते कीडे दुधर्दी मरे ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे वीटाळाची च ते मुर्ती । दया क्षेमा श्यांती नातळे त्या ॥५॥

( ३५४ ) वशांत दुराचारी पुत्र झाला तर त्याचे पितर आक्रोश करितात, हा गर्भ गळून कां पडला नाहीं, त्याची आई वांझ कां झाली नाहीं, त्याच्या पापी आईने लाज लाविली. बरें या दुराचाऱ्याचें वर्तन असे कीं तो परपीडेस परद्वारीं सावधान असतो असें या अभाग्याचें मन असतें. यास चहाडी करावयास, निंदा करावयास, मिळाली नाहीं तर यास उपवास घडतो, असा यानें सर्व दोषांचा संग्रह केला आहे पुण्य, पर उपकार, हें त्यास आवडत नाहीं. असे हे विषाचे किडे दुधांत मरतात. तुका म्हणे असला मनुष्य हीं विटाळाची च मूर्ती आहे. त्यास दया क्षमा शांति कळणे च शक्य नाहीं.

॥ ३५५ ॥

॥ स्वान सीघ्र कोपी । आपणां घात कर पापी ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं भींड आणी धींर । उपदेस न जीरे क्षीर ॥ धृ ॥
॥ माणसांसी भुके । वीजातीनें ध्यावे थुंके ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चीत । मळीनं करा ते फजींत ॥ ३ ॥

( ३५५ ) हीं माणसें कुतऱ्यासारखीं, शीघ्रकोपी, पापी व आपणास घात करणारीं अशीं असतात. त्याना कोणाची, कसली भीड नसते, त्यास धीर निघत नाहीं. व म्हणून उपदेशाची खीर त्यांचे पोटांत जिरत नाहीं. अशीं माणसें इतर माणसांवर सारखी भुंकत असतात – व हा विजाती म्हणून इतर लोक याचेवर थुंकत असतात. याचें चित्त सदा मळीन असतें. तुका म्हणे असले लोक फजीत करावेत.

* ॥ ३५६ ॥ *

॥ देखोन हरवेली आंड । पुत्र जाला म्हुणं रांड ।
॥ तव तो जाला भांड । चाहाड चोरटा सींदळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ जाये तेथें पीडी लोका । जोडी भांडवल थुंका ।
॥ थोर जाला चुका ॥ वर नाही घातली ॥ धृ ॥
॥ भुमी कांपे याच्या भारे । कुंभपाकची शेरीरे ।
॥ नीस्तुर उतरे । पापदृस्टी मळ चींता ॥ २ ॥
॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगाते वीटाळ ।
॥ तुका म्हणे खळ । म्हंणउनीया नीशीध ॥ ३ ॥

( ३५६ ) रांड आपणास पुत्र झाला हें पाहतां च हर्षभरीत झाली पण तो निघाला भांड, चाहाड चोरटा व शींदळ. तो जेथें जातो तेथें लोकांस पीडा करतो, लोक तोंडावर थुंकतील असें भांडवल जोडतो, याच्या आईनें जन्मत: च याची वार यास घालून मारून का टाकला नाहीं. ही तिची मोटी चुक झाली. याचें शरीर कुंभपाकाचें असल्यामुळें याच्या भारानें भूमी कापते. तो निष्ठुर उत्तरें बोलतो. त्याची दृष्टी पापी असते व चित्त मळीण असतें. तो दुराचारी चांडाळ असतो. त्याच्या संगतीनें पाप लागतें व विटाळ होतो. तुका म्हणे हा असा खळ असल्यामुळें निषिद्ध आहे.

* ॥ ३५७ ॥ *

॥ येकीं असे हेवा । येक अनावड जीवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ देवें केल्या भींनं जाती । उतमं कनीस्ट मधेस्ती ॥ धृ ॥
॥ प्रीतीसाठीं भेद । कोण्हीं पुजे कोण्हीं नींद ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कळा । याच्या हा जाणे सकळा ॥ ३ ॥

( ३५७ ) कांहीं ना कांहीं गोष्टींचा हेवा असतो. दुसऱ्यांना त्याची अनावड असते. अशा देवानें उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा जाती केल्या आहेत. प्रीतीसाठीं, भेद करून, कोणी पूज्य केले, कोणी निंद्य केले. तुका म्हणे देव प्रत्येकाच्या कळवळा पाहून त्याचा लळा पाळतो. अभंग ३५४–५५–५६–५७ हें पृष्ठ मूळ वहींतून बाहेर प्रसाद म्हणून गेलें होतें. तें आतां माझ्याजवळ आहे. येथें ओघ बदलतो.

* ॥ ३५८ ॥ *

॥ चींतनाची जोडी । हाची लाभ घडी घडी ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुम्ही बसोनी अंतरीं । मज जागवा नीर्धारीं ॥ धृ ॥

॥ जाये तेथें मन। आड घाला सुदरसेन ॥ २॥

॥ तुका म्हणे मोजें। मग मी नाचेन नीर्लज्ज ॥ ३ ॥

( ३५८ ) देवा, तुमचें चिंतन हीं च माझी जोडी व हा लाभ मला घडो-घडीं होऊं दे. तुम्ही माझ्या अंतरांत वसून मला या निर्धारांत सदा जाग देत रहा. जेथें जेथें माझें मन जाईल तेथें तुमचें सुदर्शन आड घाला. तुका म्हणे मग मी मोजे = आवडीनें = निर्लज्ज पणानें नाचेन.

* ॥ ३५९ ॥ *

॥ दुरबुधी ते मना। आतां नुपजो नारायणा ॥ १ ॥

॥ धृ ॥ आतां ऐसें मज करी। तुझे पाये चीतीं धरीं ॥ धृ ॥

॥ उपजला भाव। तुमचे कृपे सीधीं जाव ॥ २ ॥

॥ तुका म्हणे आतां। लाभ नाहीं या परता ॥ ३ ॥

( ३५९ ) नारायणा, माझ्या ठिकाणीं केव्हां हि दुर्बुद्धि उपजूं देऊं नका. आतां असें करा कीं तुमचे पाय चित्तांत मी धरून राहीन. हा जो माझे ठिकाणीं भाव उपजला आहे तो तुमचे कृपेनें सिद्धीस जावो. तुका म्हणे—मला या पलीकडे कांहीं लाभ उरला नाहीं. येथें विषय बदलतो.

* ॥ ३६० ॥ *

॥ भाव देवाचें उचीत। भाव तो ची भगवंत ॥ १ ॥

॥ धृ ॥ धनें धनें शुध जाती। संधे कैंचा तेथें चीतीं ॥ धृ ॥

॥ बहुत बराडी। देव जवळी आवडी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे हे रोकडे। लाभा आधीकारी चोखडे ॥ ३ ॥

( ३६० ) भाव . म्हणजे प्रत्यक्षतेबद्दलची आवडी हें देवाचें उचीत (अंदण-भेट) आहे. आपला जो भाव तो च भगवंत आहे. असा ज्यांचा भाव असतो त्यांची जात धन्य असते व शुद्ध असते. त्यांच्या चित्तांत कधीं संदेह नसतो. देव हा बहुत बराडी आहे म्हणून सारखा त्यांच्याजवळ आवडीनें असतो. तुका म्हणे या लाभास जे मनानें चोखटे (स्वच्छ) असतात ते अधिकारी असतात.

* ॥ ३६१ ॥ *

॥ संतांचें दरुशेण। जालें धन्य आजी दीन ॥ १ ॥

॥ धृ ॥ जाली पापा तापा तुटी। देनें गेलें उठाउठी ॥ धृ ॥

॥ जालें समाधानं पाई। वीसावलें मनं ॥ २ ॥

॥ तुका म्हणे आले घरा। तो च दीवाळी दसरा ॥ ३ ॥

( ३६१ ) आजचा दिवस धन्य होय कारण आज संतांचें दर्शन झालें. त्यामुळें पाप व ताप यांस तुटी पडली व दैन्य हे वरचेवर गेलें. या संतांच्या पायीं माझें मन विसावलें व मन समाधान पावलें. तुका म्हणे हे संत आज आपल्या घरीं आले तेव्हां हा च आपला दसरा व ही च आपली दिवाळी.

* ॥ ३६२ ॥ *

॥ हे ची माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ येणें भाग असे जीत । येवढें समर्पुनीं चीत ॥ ध्रु ॥
॥ सांभाळीलें देवा । मज अनाथा जी देवा ॥ २ ॥
॥ जोडोनीयां कर । तुका वीनवीतो कींकर ॥ ३ ॥

( ३६२ ) तुम्हां संतांच्या चरणांस वंदन करावें हे च माझें धन. एवढें चित्त तुम्हांस अर्पण करून त्या भाग्यानें आम्ही सर्व कांहीं जिंकल्यासारखें आहे. मज अनाथ जीवाला, देवा, तुम्ही आजवर चांगलें सांभाळलेंत–तेव्हां तुमचा सेवक, तुका, हात जोडून तुम्हांस विनंती करीत आहे.

* ॥ ३६३ ॥ *

॥ आवडीचीं न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ नीत नवा कळवळा । माये बाळामधें तो ॥ ध्रु ॥
॥ सुख सुखा भेटी आलें । होयें वाल्हें पोटींचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ब्रह्मानंद । संत वृंद चरणां पें ॥ ३ ॥

( ३६३ ) महाराज, आपल्या चरणांची मला इतकी गोडी लागली आहे व आपले चरणावर माझी एवढी प्रीत जडली आहे कीं, त्यांची माझी हौस कधीं फिटत च नाहीं. माय व बाळ यांच्यामध्यें जसा नित्य नवा कळवळा उत्पन्न होतो तसें हें आहे. तुमच्या चरणाजवळ मी येणें म्हणजे सुखर सुखास भेटावयास आल्यासारखें आहे. त्यामुळें पोटींचें वाल्हे ( आवड ) होतें म्हणजे मनाची हौस फिटते. संतवृंदाच्या चरणांस वंदन केल्यानें ब्रह्मानंद होतो.

* ॥ ३६४ ॥ *

॥ जडलों तों आतां पांईं । होउं काई वेगळा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली वोघाची ॥ ध्रु ॥
॥ सांभाळीलों मायबापा । केला तापा वेगळा ॥ २ ॥
॥ तोरसें या जीव धाला । तसा तेला मोलिची ॥ ३ ॥

( २६४ ) म्हणून तुमचे पायीं मी जो जडलों आहे तो वेगळा कश्यानें हि होणार नाहीं. तुम्ही संतानीं मजवर कृपा केली तो ओघ गंगेच्या चालीचा आहे. मायबापा, तुम्ही मला सांभाळलें—तापावेगळें केलें, या वोरसानें ( स्नेहभरीत पान्ह्यानें ) जीव धाला व म्हणून तुका—मुका होऊन थंड आहे.

येथे विषय व ओघ बदलतो.

॥ २६५ ॥

॥ वीस्टा भक्षी तया अमृत पारीखें । वोंगळासी सखे वोंगळाचे ॥
॥ धृ ॥ नये पाहों कांहीं गोन्हवाडीयेचा अंत ।
झणी टाका संत दुर्जनापे ॥ धृ ॥
॥ भेसळीच्या बीजा अमंगळ गुण । उपजवी सीण दरुशनें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे छी थू जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥ ३ ॥

( २६५ ) विष्टा खातो त्यास अमृत पारखें असतें. वोंगळास वोंगळ च सखे भेटतात. तेव्हां गुखाडीचा अंत पाहण्याची कांहीं जरूरी नाहीं, संतांनीं दुर्जनास चटकन टाकून द्यावें. ज्या बीजांत भेसळ झालेली असते तेथें अमंगळ गुण उत्पन्न होतात व अशा माणसांच्या दर्शनानें शीण तेवढा होतो. तुका म्हणे या असल्या घरीं छीः थूः हे धन असते—तेथें दुसरें कोणतें कार्य साधलें जावयाचें आहे !

॥ २६६ ॥

॥ सेजेचा येकांत आगीपासी कळे । झांकलीया डोळे अधःपात ॥ १ ॥
॥धृ॥ राहो अथवा मग जळो आगी मधीं । नीवाड तो आधीं होउनी गेला॥धृ॥
॥ भेणें झडपणी नाहीं येथें दुजे । पादरधीटा वोझें हतीयारें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मज नाहीं जी भरवंसा । तां वरी सहसा नीवाड तो ॥ ३ ॥

( २६६ ) बाईनें नवऱ्याशीं खरा च एकांत केला आहे कीं नाहीं हें सहगमन करण्याची वेळ येतें तेव्हां कळतें. त्यावेळीं जर तिनें डोळे झांकलें तर तिचा अधःपात झाला म्हणावा. मग ती आगींत जळो अगर राहो—तिनें डोळे झांकले कीं तिच्या भावाचा निवाडा होतो. जोपर्यंत दुसरा कोणी उभा राहिला नाहीं, भयाची झडपणी आली नाहीं, तोपर्यंत पादरधीटास, नुसतें अवसान आणणाऱ्या माणसास, हत्यारांचे ओझें शोभतें. पण तशी वेळ आली कीं मग, तो निवाडा आपोआप होतो.

॥ ३६७ ॥

॥ गौरव गौरवा पुरते । फळ सत्याच्या संकल्पें ॥ १ ॥
॥ धृ ॥ कठीण योगाहुनी क्षेम । वोकीलीया होतो श्रम ॥ धृ ॥
॥ पावले मरे सीवेपासीं । क्लेश उरले ते क्लेशीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बहु आणी । कठीण नीघालीयां रणीं ॥ ३ ॥

( ३६७ ) वर वर दिसणारें हें सोंग गौरवापुरतें ठीक आहे. पण फळ सत्य संकल्पानें च मिळतें. एखाद्यास क्षेम देणें ( ज्याच्याशीं सेजेचा एकांत केला अशा माणसाशीं ) हे योगाहून हि कठीण आहे – व तें टाकलें तर श्रम होतात. एकदां मनुष्य रणांगणावर निघाला कीं थोडे, फार, व कठीण असें काय आहे ! परंतु जो शूर नाहीं तो त्या क्लेशांनीं शिवेपाशीं च मरतो.

॥ ३६८ ॥

॥ संताचे गुण दोश आणीतां मंनां । केला या उगाणा सुकृताचा ॥ १ ॥
॥धृ॥ पीळुनीया पुष्प पाहे परीमळ । चीरुनी केळी केळ गाढव तो ॥ धृ ॥
॥ तुका म्हणे गंगे अग्नीसी वीटाळ । लावी तो चांडाळ दुख पावे ॥ २ ॥

( ३६८ ) येथें ओघ बदलतो. येथून पुढील ५ अभंग संताजीच्या गाथ्यांत ९१५।९१७।९२२।९२१।९१६ असे आहेत. संताजीच्या गाथ्यांत अभंग ९१३–९३४ असे एक मोठें संतपर प्रकरण आहे. पण तें येथें तसें आलें नाहीं बहुधा तीं पृष्ठें प्रसाद म्हणून मूळ वहीतून नेलीं असावींत.

संताचे गुणदोष मनांत आणून आपण त्यांची चर्चा करूं लागलों कीं आपल्या सर्व सुकृताचा उगाणा झाडा होतो. कारण संतांचे गुणदोष मनांत आणणें हें फूल चुरमडून त्याचा वास घ्यावा किंवा केळ ( झाड ) चिरून केळ पाहण्याचा प्रयत्न करण्यासारखें – गाढवपणाचें आहे व तुका म्हणे गंगेस अग्नीस विटाळ लावील तो चांडाळ समजावा – व तो दुःख पावतो.

॥ ३६९ ॥

॥ संतांसी तो नाहीं सन्मानाची चाड । परी पडे द्वाड अव्हेरीतां ॥ १ ॥
॥धृ॥ म्हणउनी तया नव जायें ठाया । होतुसे घात या दुर्बळाचा ॥ धृ ॥
॥ भावहीना आड येतीसे अशंका । उचीतासी चुका घालावया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जयां संकोच दरुशनें । तया ठाया जाणें अनुचीत ॥ ३ ॥

( ३६९ ) संतांस सन्मानाची चाड नसते. पण त्यांचा अव्हेर केला असतांना द्वाड ( नुकसान–हानी ) फार आहे. म्हणून जेथें संतांची अवहेलना

होत असेल अशा ठिकाणीं आपण जाऊं नये. त्यामुळें आपल्यासारख्या दुर्बळाचा घात होतो. भावहीन जे आहेत—त्यांच्या हिताच्या गोष्टींच्या आड येण्यास, —त्याच्या मनांत शंका आड उभी राहते. तुका म्हणे ज्या दर्शनानें मनांत शंका उभी राहील तेथें जाणें अनुचित होय.

॥ ३७० ॥

॥ नाहीं संतपण मीळत हाटीं । हींडतां कपाटी रानीं वनीं ॥ १ ॥
॥धृ॥ नये मोल देतां धनाचीया राशी । नाहीं तें आकाशी पाताळी तें ॥ धृ ॥
॥ तुका म्हणे मीळे जीवाचीये साटीं । नाहीं तरी गोस्टी सांगो नये ॥ २ ॥

( ३७० ) संतपण हें बाजारांत मिळत नाहीं, रानावनांत हिंडून, दऱ्याखोऱ्यांत मिळत नाहीं, धनाच्या राशी मोल देवून, किंवा आकाशांत किंवा पाताळांत तें मिळणार नाहीं. तुका म्हणे संतपण हें जीव वेंचला तर मिळते, नाहीं तर त्यावद्दल गोष्ट बोलूं नये.

॥ ३७१ ॥

॥ संतांचा महीमा तो बहु दुर्गम । शाब्दीकाचें काम नाहीं येथें ॥ १ ॥
॥धृ॥ बहु घड जऱ्हीं जाली म्हैस गाये । तरी होईल काये कामधेनु ॥ धृ ॥
॥ तुका म्हणे आंगें व्होवें जें आपण । तरी च महीमान येईल कळों ॥२॥

( ३७१ ) संतांचा महिमा हा बहु दुर्गम आहे. तेथें शाब्दिकाचें काम नाहीं. म्हैस किंवा गाय अति दुधाळ झाली तरी ती जशी कामधेनु होणार नाहीं, तसें संतपण हें शाब्दिकाचें काम नाहीं. तुका म्हणे आपण स्वतः संत होऊं, तेव्हां संतांचें महिमान कळूं लागेल.

॥ ३७२ ॥

॥ संत संगती न करावा वास । येखादे गुणदोष आंगा येती ॥ १ ॥
॥धृ॥ मग तया दोषा नाहीं परीहार । होये अपहार सुकृताचा ॥ धृ ॥
॥ तुका म्हणे ते नमस्कारचि दुरून । अंतरीं धरून राहे रूप ॥ २ ॥

( ३७२ ) संतांशी सलगी असेल अशा ठिकाणीं आपण राहूं नये. कारण त्यामुळें त्यांचे गुणदोष आपले अंगास चिकटतील. मग त्या दोषांचा कोठें हि परिहार करतां येणार नाहीं आणि जेवढें आपलें सुकृत असेल त्याचा अपहार होईल. तुका म्हणे असल्या संतांना लांबून नमस्कार करावा. आपण त्यांचें रूप मनांत धरून असावें. ( येथे ओघ वदलला. )

* ॥ ३७३ ॥ *

॥ काळा वरी सता । येस्या करीतो वारता ॥ १ ॥
॥ धृ ॥ तो मी हीणा हुणीं सांडे । देव दुन्हे काळ तोंडे ॥ धृ ॥
॥ माणुनीं भर्वसा । होतो दास मी येसा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मान । गेलो वाढउं थोरपण ॥ ३ ॥

( ३७३ ) मी काळावर हि सत्ता करतो—अशा मी ज्या गोष्टी सांगतों त्यामुळें मी हीनाहून हीन होऊन देव मला दुरावतो व मला लाज येते माझ्या शब्दाचा भरवसा मानून लोक मला दास म्हणत असत पण मी या गोष्टी सागून आपलें मोठेपण वाढवू गेलों. येथें ओळ बदलत.

* ॥ ३७४ ॥ *

॥ उचीताचा भाग होतो राखोनीयां । दीसती ते वायां कस्ट गेले ॥ १ ॥
॥धृ॥ वचनांची कांहीं राहे ची ना रुची । खेळा येसे वांची कुंची जाले ॥धृ॥
॥ वीस्वासाने माझे बुडवीले घर । करवीला धीर येथवरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सेकी थार नाहीं बुड । कैसे तुम्हीं कोड पुरवीले ॥ ३ ॥

( ३७४ ) योग्य काय, अयोग्य काय, या गोष्टी सभाळून मी आजवर होतों. पण ते कष्ट वाया गेल्यासारखे दिसताहेत, आता माझ्या शब्दांना कांहीं रुचि राहिली नाहींसें दिसतें. माझे शब्द हे खेळासारखे फुकट गेले मी आजवर धीर धरून होतों. पण विश्वासानें माझें घर बुडविल्यासारखें दिसत आहे तुका म्हणे मला शेवटीं बुड टेकावयास थार नाहीं. आतां देवा तुम्ही माझें कोड पुरविलें असें कसें म्हणावें ?

* ॥ ३७५ ॥ *

॥ समर्थाचे सेवे कोठे नाहीं घात । पाहो नये अंत पांडुरंगा ॥ १ ॥
॥धृ॥ आहे तैसी नीत वीचारावी बरी । येउनी भीतरी वास करा ॥ धृ ॥
॥ नीढळ राखीलें तरी भया भीत । हरश्य मरश चीत पावतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तरी कळेल नीवाड । दरशणाची वाड शुभकीर्ती ॥ ३ ॥

( ३७५ ) पांडुरंगा—समर्थाच्या सेवेंत कोठें घात नसतो तेव्हा माझा अंत पाहू नये. तेव्हा मी जसा वागतो आहे ती नीति बरी आहे असें म्हणून भाग्योदय झाला असला तरी माझ्या अंतःरात येवून वास करा. कपाळ राखिलें तरी म्हणजे माझें भाग्य उजळलें तरी, चित्त भयाभीत होऊन हर्ष व खेद

मनास होतो च. देवा तुमच्या दर्शनाची कीर्ति वाढ, मोठी, होईल – तुम्ही तसा निवाडा केलात तर, मला दर्शन दिलेंत तर!

* ॥ ३७६ ॥ *

॥ वेचावे तें जीवें। पुजा घडे येस्या नांवें ॥ १ ॥
॥ धृ ॥ बीगारीची ते बीगारी। साक्षी अंतरीचा हरी ॥ धृ ॥
॥ फळ बीजा येसे। कार्य कारणा सरीसें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मांनं। लवणा सारिखें लवण ॥ ३ ॥

(३७६) आपण जीवें वेंचलें जावें या नांवें देवाची पूजा. याशिवाय इतर कांहीं हि केलें तरी ती बिगारी – वेठ आहे. आपण काय करतो यास साक्ष अंतरीचा हरी आहे. जसें बीज तसें फळ असा कार्य कारणाचा संबंध आहे. तुका म्हणे मान हा मिठांत मीठ मिसळल्यानें होतो. तसा भक्ताचा मान देवांत सामाऊन गेल्यानें होतो.

* ॥ ३७७ ॥ *

॥ तुं माझा कोंवसा। परी न कळे या धसा ॥ १ ॥
॥ धृ ॥ कुट खाती मागें पुढें। जाती नरीये गांवां सुढें ॥ धृ ॥
॥ माझी म्हणती कवी। नीशेधुनी पापी जीवीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पांडुरंगा। आतां कोण लेखी जगा ॥ ३ ॥

(३७७) देवा, तूं माझें आश्रयस्थान आहेस. पण ती गोष्ट या मूर्ख (धस) लोकांस कळत नाहीं. तेव्हां मागें पुढें माझी निंदा करितात व हे पापी जीव मला कवि असें म्हणून माझा निषेध करितात. पण पांडुरंगा – आतां या जगाची कोण पर्वा करीत आहे! (येथें ओघ बदलतो.)

* ॥ ३७८ ॥ *

॥ दर्पणांसी बुजे। नकटे तोंड पळवी लाजे ॥ १ ॥
॥ धृ ॥ गुण ज्याचे तो अंतरीं। तो ची त्यासी पीडा करी ॥ धृ ॥
॥ चोरा रुचे नीसी। देखोनीया वीटे ससी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जन। देवा येसे भागे हीणं ॥ ३ ॥

(३७८) आरसा पाहिला कीं नकटा तोंड पळवितो – व लाजतो – अशा तऱ्हेनें ज्याचा जो गुण अंतरांत असतो तो त्यास पीडा करतो. चोरास रात्र आवडते व चंद्र पाहून तो विटतो. तुका म्हणे देवा, जन हे असे भाग्यहीन आहेत.

* ॥ ३७९ ॥ *

॥ न संडी अवगुण । वर्मे मानीतसे सीण ॥ १ ॥
॥ धृ ॥ भोग देतां करीती काई । फुटतां येम दंड डोई ॥ धृ ॥
॥ पाप पुन्नें झाडा । देतां तेथें मोठी पीडा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बोला । माझ्या सीणती वीठला ॥ ३ ॥

( ३७९ ) जन आपले अवगुण सांडीत नाहीं व त्यांस त्याचे वर्म सांगू जावें तों शीण मानतात. यमदूत दंड करण्यासाठीं जेव्हां डोई फोडतील व भोग देण्याची वेळ येईल तेव्हां काय करतील! तेथें पापपुण्याचा झाडा देण्याच्या वेळीं मोठी पीडा होईल. तुका म्हणे — विठला — माझ्या बोलांनीं हे शीणतात रे.

* ॥ ३८० ॥ *

॥ चावळलें काये न करी बडबड । नं म्हणे फीके गोड भुकेले तें ॥ १ ॥
॥धृ॥ उमजल्यावीण न धरी सांभाळ । असो खळखळ जनांची हे ॥ धृ ॥
॥ गरज्या लवाळे आपुलीया चाडा । करावी ते पीडा कोणां काई ॥२॥
॥ तुका म्हणे भोग भोगीतील भोगें । संचीत तें जोगें आहे कोणा ॥३॥

( ३८० ) मनुष्य चावळला की बडबड करीत कां नाहीं? व ज्यास भूक लागलेली असेल तो फिक्यास गोड म्हणतो च, मी काय बोल बोलतो हें उमजल्यावीण ते सांभाळाची गोष्ट कशी ऐकून घेतील! तेव्हां ही जनाची खळ-खळ असली तर असो, गरजवंताला आपल्या हिताचें काय तें कळत नाहीं. हे आपल्यासाठीं कोणास कांहीं पीडा करावयाची ती करतील. तुका म्हणे भोगानें भोग भोगावा असें संचित आहे कोणास?

* ॥ ३८१ ॥ *

॥ म्हउणी शेरण जावें । सर्व भावें देवासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ तो हा उतरील पार । भव दुस्तर नदीच्या ॥ धृ ॥
॥ बहु आहे करुणांवंत । अनंत हें नांमं ज्या ॥ २ ॥
॥ तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रकट ॥ ३ ॥

( ३८१ ) म्हणून देवास सर्वभावें शरण जावें — तो या दुस्तर भवनदीचा पार उतरील. त्याचें नांव अनंत असून तो फार करुणावंत आहे. तुका म्हणे मला याची साक्ष आली म्हणून मी तें प्रकट केलें.

* ॥३८२॥ *

॥ आपुला तो देहे आम्हां उपेक्षीत। कोठें जाउं हीत सांगों कोणा ॥१॥
॥धृ॥ कोण नाहीं दक्ष करीतां संवसार। आम्हीं हा वीचार वमनं केला ॥धृ॥
॥ नाहीं या धरीत जीवीत्वाची चाड। कोठें करूं कोड आणीकांचे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे असो चींतुनीयां देवा। मी माझें हा हेवा सारूनीयां ॥ ३ ॥

( ३८२ ) आमुचा देह आम्हीं उपेक्षिला आहे. तेव्हां इतरांस – कोठें त्यांचें हित सांगावयास जाऊं ? हा संसार करण्यास दक्ष कोण नाहीं ? आम्ही तो विचार वमन केला आहे. आम्ही स्वतः आपुल्या जीवीत्वाची चाड धरीत नाहीं – तेव्हां आणीकांचें कोड कोठें करीत बसू ? मी व माझें हा हेवा बाजूस सारून मी देवास चितून असतों.

पुढील अभंगापासून वेगळा ओघ आहे,

* ॥३८३॥ *

॥ गोविंदा वाचुनी वदे ज्याची वाणी। हागवण घाणी पीटपीटले ॥ १ ॥
॥धृ॥ मस्तक सांडुनी सीस फुल गुडगा। चार तो अवघा बावळयाचा ॥धृ॥
॥ अंगभुत म्हुणं पुजीतां वाहाणां। म्हणतां स्याहाणा येईल कैसा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वैस्या सांगे सवासीणी। इतर पुजनीं भाव तैसा ॥ ३ ॥

( ३८३ ) गोविंदाच्या गुणगानाशिवाय वाणी जें इतर बोलत असेल तीं घाण हागवण पीटपीट आहे. देवाचे मस्तकावर वहावयाचीं फुलें जर गुडघ्यास बांधलीं तर तो शहाणा म्हणतां येईल का ? माणसानें एखाद्या वेश्येस सुवासिनी सांगितली त्याचा भाव तसा निर्मळ आहे म्हणून समजावें का ? वाहणा पायांत घातल्या आहेत म्हणून पुजल्या तर माणूस शाहाणा होईल का ?

* ॥३८४॥ *

॥ कुतऱ्या येसें त्याचें जीणें। सांग कोण्हें न करीजे ॥ १ ॥
॥ धृ ॥ जाये तीकडे हाडे हाडीं। गोऱ्हवाडी च सोईरी ॥ धृ ॥
॥ अवगुणांचा त्याग नाहीं। खवळे पाहीं उपदेसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कैची लवी। ठेंग्या केवी आंकुर ॥ ३ ॥

( ३८४ ) कुतऱ्यासारखें ज्याचें जिणे असतें त्याच्याशीं कोणी हि संग करूं नये, तो जिकडे जाईल तिकडे सर्व जण त्याला हाड हाडंच करीत असणार व त्याचीं सोईरीं गुंखाडीत असावयाचीं, त्याच्या हातून अवगुणांचा कधीं त्याग व्हावयाचा नाहीं. व त्यास उपदेश करूं जावें तर तो खवळतो. तुका

म्हणे–त्यांना लवणें हें ऐकून तरी माहीत आहे कां? अहो ठेंग्याला (हिजड्यास) कधीं अंकुर फुटला आहे का?

* ॥ ३८५ ॥ *

॥ सर्वथा ही खोटा संग। उपजे भंग मनांसी ॥ १ ॥
॥ धृ ॥ बहुरंगे भरलें जनं। संपनंची अवगुणीं ॥ धृ ॥
॥ सेवीतीया नीहकायबुधीं। मदे शुधी सांडवी ॥ २ ॥
॥ त्रासोनीयां बोले तुका। आतां लोकां दंडवत ॥ ३ ॥

( ३८५ ) अशा माणसाचा संग सर्व बाजूंनीं खोटा, त्यामुळें आपल्या मनाचा तेवढा भंग व्हावयाचा. जग हें बहुरंगांनें भरलें आहे व अवगुणांनीं संपन्न आहे. मद्य सेवन केल्यानें बुद्धि निरुपयोगी होते व शुद्ध सांडवते. अशा या लोकांना त्रासून तुका दंडवत घालीत आहे. लांबून नमस्कार करून दूर सरतो.

* ॥ ३८६ ॥ *

॥ काये करूं जी दातारा। कांहीं न पुरे संवसारा ॥ १ ॥
॥ धृ ॥ जाली मांकडाची परी। येतां तळा जातां घरी ॥ धृ ॥
॥ घाली भलते ठाई हात। होती सीव्या वैसे लात ॥ २ ॥
॥ आदी अंत तुका। सांगे न कळे जाला चुका ॥ ३ ॥

( ३८६ ) देवा, या लोकांची स्थिति कशी आहे हें सांगूं कां, हें दातारा, संवसारास कांहीं केलें तरी यांच्या पुरत नाहीं. माकडाप्रमाणें आपण तळास जातो वर हि येतों अशी अवस्था यांची झाली आहे. भलतें च काम करावयास प्रवृत्त होतो व शिव्या खातो व लाथ बसते. यांच्या चुका कां होतात हें आदिअंत जाणणारा जाणतो – त्यांना तुका सांगतो हि, पण तें कोठें चुकतात हें त्यांस कळत नाहीं – तीं च गोष्ट पुढें सांगतात.

* ॥ ३८७ ॥ *

॥ धर्म तो नकळे। काये झांकीतील डोळें ॥ १ ॥
॥ धृ ॥ जीव भ्रमले या कामे। कैसी कळो येती वर्मे ॥ धृ ॥
॥ वीशयांचा माज। कांहीं धरु नेदी लाज ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लांसी। माया नाचवी ते कैसी ॥ ३ ॥

( ३८७ ) देवा, कोणास धर्म काय हें कळत नाहीं – त्याचे डोळे झांकलेले आहेत व या कामानें जीव भ्रमले आहेत तेव्हां हीं वर्मे तरी कशी कळूं

यावयाची ! विषयांच्या अंगीं एवढा माज कीं तो लाज सुद्धां धरुं देत नाहीं तुका म्हणे ही माया राक्षसिण ( लासी ) जशी कांहीं आपणास नाचवीत आहे.
येथें ओघ बदलतो.

* ॥ ३८८ ॥ *

॥ अज्ञा पाळुनीयां असे येकसरे । तुमची उतरें संतांचीं हीं ॥ १ ॥
॥धृ॥ भागउनी देहे ठेवीयेला पाई । चरणावरी डोई येथूनी च ॥ धृ ॥
॥ येणें जाणें हें तो उपाधीचें मुळ । पुजा तो सकळ अकर्तव्य ॥ २ ॥
॥ तुका म्हणे असे चरणीचा रज । पदीं च सहज जेथें तेथें ॥ ३ ॥

( ३८८ ) मायबापा, हा देह भागला आहे, तेव्हां तो तुमच्या पायीं—येथून च तुमच्या चरणावर डोई ठेवून—ठेवला आहे. तुम्हां संतांचीं मी आज्ञा पाळून—तुमचीं उत्तरें संभाळून—म्हणजे त्याप्रमाणें वागून आहे. येणें जाणें यांत फार उपाधि आहे. म्हणून तुमची पूजा म्हणजे कांहीं हि कामांत गुंतून रहात नाहीं. तुका म्हणे मी तुमच्या चरणींचा रज आहे तेव्हां कोठें हि सहज असलों तर त्या च ठिकाणीं—म्हणजे तुमचे पदीं च आहे.
(येथें ओघ बदलतो.)

* ॥ ३८९ ॥ *

॥ आईका जी संतजन । सादर मं ( नं ) करुनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ सकळाचे सार ये । कंटक ते वर्जावे ॥ धृ ॥
॥ वीशेसता कादयाहुणीं । सेवी त्या घाणी आगळी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बैसावें ॥ ३ ॥

( ३८९ ) अहो संतजनं मन सादर करून एक गोष्ट ऐका, सर्व शिकवणीचें सार एक आहे कीं कंटक जे आहेत ते वर्जावेत. त्यांच्याशीं संबंध कराल तर कांद्याहून आगळी घाण येईल. तुका म्हणे आपणास ज्याची गोडी—त्या परवडी—संगतींत=आपण असतो.

* ॥ ३९० ॥ *

॥ चुंभळी चाकरी चुंभळीचा संग । आंगी वसे रंग कीयाहीण ॥ १ ॥
॥धृ॥ बींजा यैसें फळ दावी परीपाकीं । परीमळ लौकीकी जाती यैसा ॥धृ॥
॥ माकडाचे गळा रत्न कुळांगणा । सांडुनीया सुणा वीदी धुंडी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे यैसा व्याली ते गाढवी । फजीती ते व्होवी आहे पुढें ॥ ३ ॥

( ३९० ) कुंटणीची चाकरी केली—कुंटणीशीं संग केला तर मग अंगीं हीन त्रीयेचा रंग येईल. बीजा सारखें शेवटीं परीपाकीं फळ यावयाचें व त्याचा परिमळ लोकांत पसरावयाचा. माकडाचे गळ्यांत रत्न अडकवून दिलें तर तें तो साडतो. तशा हे लोक कुलांगना सुना करून दिल्या तरी गल्ली कुचींत जातात च— *तुका म्हणे ऐशा लोकास त्याच्या आया जन्म तरी कां देतात ? जन्म देणाऱ्या* गाढवी असल्या पाहिजेत कारण पुढें फजीती वाढलेली असते.

* ॥ ३९१ ॥ *

॥ बरग्यासाठीं खादले सेणें । मीळतां अंनं न संडी ॥ १ ॥

॥ धृ ॥ फजीत तो केला लाहे । ताडनं साहे गोरवें ॥ धृ ॥

॥ बोढाळाची बांगळ बोढी । उगी खोडी नव जाये ॥ २ ॥

॥ तुका फजीत करी बुच्या । वीसरें कुच्या खोडी येणें ॥ ३ ॥

( ३९१ ) बरग्यासाठीं शेण खाल्लें कीं मग अन्न मिळू लागलें तरी शेण सोडीत नाहीं. त्यास किती हि फजीत करा किंवा ताडण करा तो तें गौरवानें सोसतो. बोढाळा ची बोंगळ ओढी उगी च जात नाहीं. तुका यांना फजीत करीत आहे. मग हे या खोड्या विसरले तर विसरतील. येथें देहुकराची वही संपते. ओघ बदलला.

॥ ३९२ ॥

॥ आम्ही घालो येकवीधें । सुधा सुध असावे ॥ १ ॥

॥ धृ ॥ यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा आकळ ॥ धृ ॥

॥ घेतले ते उसणे द्यावे । कांहीं भावे वीशेष ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कीयानस्ट । तरी कस्ट घेतसा ॥ ३ ॥

( ३९२ ) आम्ही एकविध भावानें घालों आहोंत, तू शुद्ध तेव्हां आम्ही हि शुद्ध होऊन तुझ्या पाशीं आहोंत. या नतर तुमचा काय मोळा ( रीत ) आहे तो आम्हांस अकळ आहे. तुम्हीं कांहीं विशेष भावानें जें आमचे उसनें घतलें आहे तें परत द्यावें. देवा, तुम्हास कांहीं च क्रिया करावी लागत नाहीं पण आम्हांपासून मात्र कष्ट घेतां.

॥ ३९३ ॥

॥ आम्ही आर्तभूत जीवीं । तुम्ही गोसावी उदास ॥ १ ॥

॥ धृ ॥ वादावाद समर्थासी । काशानसी करावा ॥ धृ ॥

॥ आम्ही मरो येरझारीं। स्वामी घरी बैसले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करीतां वाद। कांहीं भेद कळेना ॥ ३ ॥

( ३९३ ) आम्ही जीवीं आर्तभूत आहोंत—तुम्ही आमचे गोसावी—गों= इंद्रियें त्यांचे स्वामी=मालक=ते मात्र उदास आहांत. तेव्हां समर्थाशीं आम्ही वाद तरी कसा करावा? —आम्हांस या संसाराच्या जन्म—मरणाच्या येरझाऱ्या !. तुम्ही स्वामी, मात्र घरीं निवांत बसलेले! तुका म्हणे वाद करूं लागावें तो भेद होत नाहीं उत्तर येत नाहीं.—यास काय करावें ?

॥ ३९४ ॥

॥ होईल तरी पुसापुसी। उतर त्यासी योजावें ॥ १ ॥
॥ धृ ॥ तों वरी मी पुढें कांहीं। आपलें नाहीं घालीत ॥ धृ ॥
॥ जाणोनीयां आंतर देव। जेव्हां भेव फेडील ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धरील हातीं। करील खंती वेगळें ॥ ६ ॥

( ३९४ ) असा भेद करून जर तुम्हीं कांहीं विचारपूस कराल—तर त्यास उत्तर योजतां येईल. तुम्ही विचारपूस करीपर्यंत मी आपलें वचन कांहीं वेंचित नाहीं. जेव्हां त्याची लहर लागेल तेव्हां देव अंतरांत काय भाव आहे ते ओळखून भय निवारण करील—व हातीं धरून खंती काढून टाकील.

॥ ३९५ ॥

॥ हा तो नव्हे कांहीं नीराशेचा ठाव। भलें पोटीं वाव राखीलीया ॥१॥
॥धृ॥ वीस्वंभरे वीस्व सामावलें पोटी। तेथें ची सेवटीं आम्हीं असो ॥धृ॥
॥ नेणतां चींतन करीतो अंतरी। तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा। पुरखुं खुणें खुणा जाणतसे ॥ ३ ॥

( ३९५ ) ही जागा कांहीं अशी नव्हे कीं जेथें निराशा पदरीं घ्यावी लागेल. विश्वंभरानें सारें विश्व पोटीं सामावलें आहे. तेथें त्या पोटांत वाव मागितलेली ठीक झालें. व आतां तेथें सर्वां ( संतांच्या ) शेवटीं आम्ही असूं —आम्हांस तेथें जागा मिळेल. आपणास कळो न कळो अंतरीं चिंतन करावें म्हणजे ते विश्वंभराच्याँ अंतरी उमटेल. तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा आहे परंतु दुसऱ्याच्या अंतरांत ज्या खुणा होत असतात, त्या पुरवून पावण्याचें तो जाणतो.

येथें देवाची प्रगट होण्याची—प्रसाद करण्याची एक रीत सांगितली.

॥ ३९६ ॥

॥ नीस्तुर तो दीसे नीराकारपणें । कोंवळा सगुणे प्रतीपाळी ॥ १ ॥
॥धृ॥ केला च कराया केला कैवाड । होईल तें गोड न परते ॥ धृ ॥
॥ मथीलीयां लागे नवनीत हीता । नासे वीतुळतां आहा च ते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आंता मनाशी वीचार । करावा तो सार एक चीत ॥ ३ ॥

( ३९६ ) तो निराकारपणे निष्ठुर आहेसा वाटतो. पण सगुण रूपांत कोंवळा होऊन प्रतिपालन करतो. घुसळण केली तर नवनीत हातीं लागतें — व तें आहाचपणें वितुळवलें तर नासतें, तेव्हा तुका म्हणे आतां आपल्या मनांशीं एक च विचार करावा व तो हा कीं एकचित्त हें सर्वांचें सार आहे. तेव्हां एकविधतेंत तो कसा पावतो तें सांगितलें. तेव्हां भजन जें करावयाचें तें लोणी हातीं लागेल असें करावयाचे.

॥ ३९७ ॥

॥ हे चीं अनुवाद सदा सर्वकाळ । करुनीया गोपाळ काला सेवुं ॥ १ ॥
॥धृ॥ वोरसले कामधेनूचें दुभते । संपूर्ण आईते गगन भरी ॥ धृ ॥
॥ संत सनकादीक गोमट्या परवडी । विभाग आवडी इच्छेचीया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मधीं घालूं नारायण । मग नव्हे सीण कोणा खेळे ॥ ३ ॥

( ३९७ ) देव निराकारपणें निष्ठुर कसा — व सगुणपणानें कोंवळा कसा — व प्रतिपालन कसें करतो — या गोष्टीचा सदा अनुवाद करीत — गोपाळ काला सेवन करीत जाऊ. कामधेनूचें दुभतें आइतें गगनभर वोरसलेलें आहे. सनकादिक संत आपल्या इच्छेच्या आवडीप्रमाणें गोमट्या परवडी करून सुख भोगीत आहेत. तुका म्हणे कोणत्या हि खेळांत नारायण मध्यें घातला — घेतला — म्हणजे त्या खेळाचा शीण होत नाहीं.

हा एक अवतारकार्य स्पष्ट करणारा अभंग आहे.

॥ ३९८ ॥

॥ माझे गडी कोण कोण । नीवडा भीन यां तुनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ आप आपणया मध्ये मीळो । येक खेळो येकाशीं ॥ धृ ॥
॥ घावरीयाच्या मोडा काड्या । धाडा भाड्या वळतीया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवापासीं । वीटाळसी नसावी ॥ ३ ॥

( ३९८ ) वर जें सांगितलें कीं आपण कोणता हि खेळ खेळलों तरी त्यांत नारायण घालून खेळ खेळावा; असे खेळ खेळण्यासाठीः— सांगताहेत कीं या

जगांत आमचे गडी कोण कोण आहेत ते यामधून निवडा बरें. आपण आपल्या मध्यें मिळू व आपल्या मर्यी च खेळूं. जे गडी घाबरट असतील त्यांच्या काडच्या मोडा — असल्या भ्याडांना गाई वळावयास धाडा. तुका म्हणे देवापाशीं — विटाळशी नसावी — तुका म्हणे देवापाशीं विटाळशी नसावी ही एक म्हण आहे. शेंकेखोर — अवसानघातकी मनुष्य जवळ नको.

॥ ३९९ ॥

॥ बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोवळें ॥ १ ॥
॥ धृ ॥ धोवटाशीं पडली गांठी । जगजेठी प्रसादें ॥ धृ ॥
॥ गादल्याचा जाला झाडा । गेली पीडा वीकल्प ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बराबरी । नीर्मळ करी नीर्मळा ॥ ३ ॥

( ३९९ ) जगजेठी प्रसादानें धुवटाशीं गांठ पडली हें देवा फार चांगलें झालें — सोवळ्या ओवळ्याचें हें नसतें लचांड होतें तें गेलें. जे कांहीं गादल्या ( अस्ताव्यस्त ) सारखें होतें त्याचा झाडा — निकाल झाला व विकल्पाची पीडा उरली नाहीं. तुका म्हणे, देवा, तूं निर्मळ तेव्हां आम्हास — सहजासहजीं — निर्मळ करतोस.

॥ ४०० ॥

॥ अधीकाचा मज कंटाळा । तुम्हां गोपाळा संगती ॥ १ ॥
॥ धृ ॥ काय नाहीं तुम्हां पासी । सकाळावीसीं संपन्न ॥ धृ ॥
॥ उद्योगाचा नेघे भार । लागल्या सार पुरतें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अधीर जीणें । नारायेणें न करावें ॥ ३ ॥

( ४०० ) तुमच्या संगतींत असतांना देवा मला अधिकाचा कंटाळा येतो. तें घेऊन काय करावयाचें आहे ? तुमच्या संगतींत असतांना तुम्हापाशीं नाहीं असें कांहीं आहे का ? तुम्ही सर्वतोपरी संपन्न आहांत. उद्योगाचा भार मी माझ्या डोक्यावर घेणार नाहीं. तुम्ही त्याचें सार काढून जें मला द्याल तें मला पुरतें, पुरेसें होईल. कर्म तुमच्याकडे त्याचा बोध माझ्याकडे, तुका म्हणे नारायणानें माझें जीणें अधीर करूं नये.

॥ ४०१ ॥

॥ नव्हे आम्हीं आजी काळी ची । कांचा कुंची चाळवणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ येके ठाईं सुळढाळ । ठावा सकळ आहेसी ॥ धृ ॥
॥ तुमचे आमचेसें कांहीं । भीन नाहीं वाटलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जेथें असें । तेथें दीसें तुमचासा ॥ ३ ॥

(४०१) कारण देवा मी कोणी नवा, आजचा, काळचा, नव्हे. तेव्हां हीं कांचा कुंची चाळवणी कशाला ? तुझ्या मुळापासून टाळापर्यंत — आदि व अंत — मला ठाऊक आहेत. आजवर तुमच्या आमच्यांत कांहीं भिन्नता उरलेली नाहीं. तेव्हां तुका म्हणे मी कोठें हि असलों तरी तुमचासा आहे व तसा — दिसेन.

( येथें ओघ बदलतो. )

॥ ४०२ ॥

॥ योग्याची संपदा त्याग आणी श्यांती। उभयलोकीं कीर्ती सोहळा मान॥
॥घ्रु॥ येरयेरावारी जायाचें उसणें । भाग्यस्थळीं देणें झाडा वेशी ॥ घ्रु ॥
॥ केलीया फावला टाईच्या तो लाहो । तृष्णेचा तो काहो काळहवींत ॥ २॥
॥ तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शीवपद जीवें भोगीजेल ॥ ३ ॥

(४०२) योग्याची संपदा त्याग व शांति हीं आहेत, त्यामुळें उभयलोकीं सोहळा व मान होतो. परंतु या दोन्ही हि गोष्टी उसन्या — जाणाऱ्या — अशा आहेत. या दोन्ही हि भाग्याच्या ठिकाणीं वेशीवर झाडा द्यावा लागतो. हीं दोन्ही भाग्यें जीवानें तृष्णेचा जो लाहो ( छंद ) घेतला होता — व काहो ( घोष ) करीत जीव काळवीत होता — तीं फळास आल्यासारखीं वाटतात. परंतु तुका म्हणे — खरा लाभ हा कांहीं हि ( आटापीटा ) केल्याशिवाय स्वतः शिवपद जीवानें भोगणें हा आहे.

या अभंगांत योग मार्गानें जाऊन तुमचें ध्येय साध्य झालें — असें जरी मानलें — तरी तुम्हांस शिवपद *जीवें भोगतां येत नाहीं* — असा *योग मार्ग* व चैतन्य सांप्रदाय यांतील स्पष्ट फरक दाखविला आहे. वाद करण्याची ही रीत उत्कृष्ट होय. तुमच्या म्हणण्याप्रमाणें सर्व कांहीं झालें, तरी तुमची गादी कोठें अडेल हें सांगितलें कीं वाद संपला.

॥ ४०३ ॥

॥ स्वामीत्वाची वर्मे असोनी जवळी । वाहों जावें मोळी गुणसंगें ॥१॥
॥घ्रु॥ कावाटापासुनी सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥घ्रु॥
॥ धनमंत्र्याचीये आंगीं सतावळ । व्याधीतें सकळ तोडावया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आले मोड्यासी कोपट । सांटोव्याची वाट वीसरवी॥३॥

(४०३) देवा, तुमच्याजवळ स्वामीत्वाची वर्मे असून, इतर लोकांच्या संगतीनें आम्हीं मोळी वाहण्यास जावें का ? देवा, मला या कावाटापासून

सोडवा व काहीं भारे वाहण्यास पात्र करू नका नुसता मंत्र घालून सकळ व्याधी तोडण्याचें बळ तुमचे अंगीं असताना आम्हीं ओझीं का वहावींत देवा, हें सोपट्र मोडम्र्व्हस आलें आहे. आता आम्हास सोडून जाण्याची वाट विसरावी.

॥ ४०४ ॥

॥ ऋणाचा परीहारा जालो वोल्गणा । द्यावी नारायेणा वासीलाती ॥१॥
॥धृ॥ जालो उतराई शेरीर संकल्पे । चुको द्यावी पापे सकळ ही ॥ धृ ॥
॥ आजीवरी होतो धरूनी जीवासी । व्याजे कासावीसी वहु केलो ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मना आणीला म्यां भाव । तुमचा तेथे ठाव आहे देवा ॥ ३ ॥

(४०४) देवा, तुमचें ऋण फेडण्यासाठीं मी वोल्गणा (सेवाधारी) झालों आहे. तेव्हा आता मला वासलात (निकाल-फडशा) करून द्यावा. शरीर तुमच्या चरणावर वाहिल्यानें उतराई-कर्जमुक्त-झालों आहे -आता सर्व पापें नाहींशीं व्हावींत आजवर मी जी वासना धरून होतों, पण मीपणें होतो,-त्यामुळे व्याजापायीं कासावीशी फार झाली. देवा, मीं मनात असें आणलें कीं हें शरीर तुमच्या वस्तीचे ठिकाण आहे. तुमचा या शरीरावर भार फार आहे तेव्हा तें च तुम्हास देऊन मोकळें व्हावें

या अभगातील शब्दसृष्टी सावकाराची आहे.

॥ ४०५ ॥

॥ आपल्या आपण उगवा लींगाड । काय माझे जड करूनी घ्याल ॥१॥
॥धृ॥ उद्धारासी काय उधाराचे काम । वाढउनी श्रम नये देवा ॥ धृ ॥
॥ करा आता मजसाठीं वाड पोट । ठाव नाही तंट जाले लोकीं ॥२॥
॥ तुका म्हणे वाकी झडलीया वरी । न पडे वेव्हारीं सचीताचे ॥३ ॥

(४०५) आता देवा, हें तुमचें लिगाड - तुमचे तुम्ही सोडवा तेव्हा आता हें लिगाड जड करून का तुम्ही घेणार आहांत. देवा आमच्या उद्धारास उधारीचें काम कशास हवें, उगाच श्रम वाढवू नयेत. आता माझ्यासाठीं पोट मोठें (रुंद) करा जगात काय तट (हाकाटी, बोभाटा,) आहे ते काहीं मला माहीत नाहीं तुका म्हणे एकदा तुमची बाकी फिटल्यावर सचीताच्या वेव्हारात पडणार नाहीं अद्याप सावकाराचा दृष्टान्त च चालू आहे

॥ ४०६ ॥

॥ येण पागे पायापासीं । नीरवयेसीं राहीन ॥ १ ॥
॥ धृ ॥ सांगीतली करीन सेवा । सकळ देवा दास्येत्व ॥ धृ ॥

॥ बंधनाची तुटली बेडी । हे ची जोडी मग आम्हां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नव्हे क्षण । पायां वीण वेगळा ॥ ३ ॥

( ४०६ ) ऋणामुळें मी जो तुमच्या आधीन झालों आहे यामुळे तुमच्या पायाजवळ निश्चयपूर्वक राहीन. देवा, तुमचें सकळ दास्यत्व करीन व तुम्ही सांगाल तशी सेवा करीन—अशा तऱ्हेनें मी एक हि क्षण तुम्हांपासून, तुमच्या पायापासून, वेगळा होणार नाहीं—मग ती च आम्हांस जोडी होऊन पायांतली बिडी तुटेल.

॥ ४०७ ॥

॥ सर्वसंगी वीट आला । तूं चेकला आवडसी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ दील्ही आतां पायीं मीठी । जगजेठी न संडी ॥ ध्रु ॥
॥ बहु जालों खेद क्षीण । येणें सीण तो नासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गंगे वास । बहु त्या आस स्थळाची ॥ ३ ॥

( ४०७ ) देवा, मला सर्व संगांचा वीट आला आहे. फक्त तूं तेवढा आवडतोस, हे जगजेठी, मी तुमचे पायीं मिठी दिल्ही आहे ती कांहीं आतां सोडीत नाहीं. मी आजवर दुःखानें फार क्षीण झालों आहे. येथें—तुमचे चरणाजवळच—तो शीण नाहींसा होईल. तुका म्हणे तुमचे चरणाजवळ असणें म्हणजे गंगावास आहे. पावन होण्याचें हें एकटें एक स्थान आहे. म्हणून त्या स्थळाची फार आस लागून राहिली आहे.

॥ ४०८ ॥

॥ सीतळ हे सीतळाहुनी । पायवणीं चरणींचें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ सेवन हे सीरसा धरी । अंतरी हीं वरदळा ॥ ध्रु ॥
॥ अवघेची नासी पाप । तीर्थ बाप मांझ्याचें ॥ २ ॥
॥ बैसोनीयां तुका तळीं । त्या कल्लोळीं डोरला ॥ ३ ॥

( ४०८ ) तुमचे चरणाजवळ गंगावास आहे म्हणून सांगितलें. त्या चरणाचें पायवणी—तीर्थ—शीतळाहून शीतळ आहे. हें तीर्थ मी शिरसा, शिरावर, धारण करीन, सेवन करीन, व अंतरांत हि त्याची वरदळ संचय होईल. माझ्या बापाच्या तीर्थानें माझ्या अवघ्या पापाचा नाश होईल. तुका तुमच्या पायातळीं बसून त्या कल्लोळीं डोरला आहे.

॥ ४०९ ॥

॥ मरणा हातीं सुटली काया । वीचारें या नीस्चयें ॥ १ ॥
॥ धृ ॥ नासोंनिया गेली खंती । सहज स्थीती भोगाचे ॥ धृ ॥
॥ न देखेसे जाले श्रम । आलें वर्म हातां हें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कैची कींव । कोठें जीव नीराळा ॥ ३ ॥

( ४०९ ) बैसोनिया तुका तळीं । त्या कल्लोळीं डोलता । या निश्चयाच्या विचारानें भोगाची सहज स्थिती प्राप्त झाली; जीवीताची खंती नाहींशी झाली व मरणाच्या हातून ही काया सुटली. हें वर्म हातीं आल्यानें जन्माचे श्रम वाटत नाहींसे झाले. तुका म्हणे आतां जीव च वेगळा राहिला नाहीं तेव्हां आतां मरण कोणास येणार ! मरण जर नाहीं—तर मग त्याचें भय कसचें ? व तुका देवाच्या चरणाजवळ असतांना मरण कोणास येणार ! म्हणून मरणा हातीं सुटली काया ।—तेव्हां आतां कोणाची व कसली कींव करावयाची !

॥ ४१० ॥

॥ गोदे कांठीं होता आड । करुनी कोड कवतुकें ॥ १ ॥
॥ धृ ॥ देखण्यांनीं येक केले । आइरया नेलें जीवनापें ॥ धृ ॥
॥ राखोनीयां होतों ठाव । अल्प ची जीव लावुनी ॥२॥
॥ तुका म्हणे फीटे धणी । हे सज्जनीं वीश्रांती ॥ ३ ॥

( ४१० ) गोदेच्या काठीं एक आड ( विहीर ) खणून त्या कोडकौतुकांत मी होतों. परंतु देखणे—द्रष्टे—संत—जे होते त्यांनीं एक केलें कीं मला नेऊन त्या गोदेच्या प्रवाहा जवळ नेऊन सोडलें सर्व जीव लावून मी अल्प ठाव—गोदेच्या काठचा आड—सभाळून होतो. तुका म्हणे या सज्जनांनीं विश्रांतीचें असें ठिकाण दाखविलें कीं जेथें धणी—हौस—फिटेल.

यावान् अर्थे उद्पाने तावतः संप्लुतोदके । तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः । या श्लोकासारखा हा अभंग आहे.

॥ ४११ ॥

॥ न पाहे माघारें आतां परतोनी । संवसारा पासुनी वीटला जीव ॥१॥
॥धृ॥ सामोरे येउनी कवळी दातारा । काळाचा हाकारा न साहवे ॥ धृ ॥
॥ सावधान चीत होईल आधारें । खेळतां ही बरें वाटईल ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कंठ दाटला या सोसें । न पवेची कैसें जवळी हें ॥ ३ ॥

(४११) आतां संसाराकडे देवा, मी मागें वळून पाहाणार नाहीं. संसारापासून माझा जीव आतां विटला आहे. देवा, आतां तुम्हीं मला सामोरे येऊन आलींगन द्या. काळाचा हाकारा मला सोसत नाहीं. तुमच्या आधारानें चित्त सावधान होईल, आणि खेळण्यास हि बरें वाटेल. देवा, मला तुमच्या जवळ कां येतां येत नाहीं ? यामुळें कंठ दाटला आहे.

(येथें ओघ बदलला)

॥ ४१२ ॥

॥ नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥
॥ध्रु॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें। सांडावें ते धीरें आचा वाचा ॥ध्रु॥
॥ कापउनी टीरी शुरत्वाची मात । केले वाताहात उचीत काळें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करी जीव्हेसी वीटाळ। लटीक्याची मळ स्तुती होतां॥ ३॥

(४१२) बायको टाकली कीं ब्रह्मचर्य सिद्ध झालें असें नव्हे. देशत्याग केल्यानें, वनांतरास गेल्यानें, वैराग्य हि सिद्ध होत नाहीं. वासनेच्या द्वारानें, काम व भय हे आचा वाचा गोष्टी सांगून वाढतात. या गोष्टी धैर्यानें सांडाव्या लागतात. टीरी कांपवून शुरत्वाची मात सांगितली व उचीत काळ, शूरत्वाच्या परीक्षेची वेळ, आली कीं वाताहात होते. तुका म्हणे लटक्या गोष्टींची स्तुती केली असतां जीव्हेस मळ लागतो व विटाळ होतो. अशी आपली वाणी नाहीं. ती हरीगुण गानांत च रंगली आहे म्हणून सांगतात कीं.

॥ ४१३ ॥

॥ नाहीं सरो येत जोडील्या वचनीं । कवीत्वाची वाणी कुशलता ॥ १ ॥
॥ध्रु॥ सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचो येत ॥ध्रु॥
॥ काय आगीपासीं शृंगारीले चाले । पोटीचें उकलें कसापासीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येथें करावा उकल । लागे ची ना बोल वाटउनी ॥ ३ ॥

(४१३) चार ठिकाणीं भीक मागून जी वचनें जोडागोटी करून जोडली आहेत त्यांत कवित्वाची कुशलता येणार नाहीं. सत्य गोष्ट जेथें सांगितली असते तथें सत्याचा अनुभव असतो म्हणून ती वाणी वेध लावते व रुचो येते. आगीपाशीं शृंगारलेलें काय होय ? कस लावावयास गेले, कीं, पोटींचें तारें असतें, त्याचा उकल होतो. तुका म्हणे माझीं वचनें अशीं आहेत कीं, बोल वाढवून, त्यांचा उकल करावा लागत नाहीं. तर सत्याचा अनुभव त्यांत असल्यामुळें त्यांचा वेध लागून तीं रुचूं, आवडूं लागतात. येथें स्वत:च्या कवित्वाची

एक मुख्य खूण प्रकट केली आहे. स्वत.चें कवित्व ही अक्षरांची जोडाजोडी नसून—त्यात अनुभव सांठविला आहे ते हा त्याचा जे अनुभव घेतील त्यास त्या गोष्टी शब्द वाढवून सागाव्या लागत नाहीत तुका म्हणे येथें करावा उकल। लागे ची ना बोल वाढउनी। कारण मी त्या अनुभवाचा शब्द उच्चारिला कीं तो अनुभव प्रत्येकाचा असतो, तेव्हां माझ्या शब्दोच्चाराबरोबर श्रोता हो म्हणतो. त्यास ती गोष्ट पटते.

॥ ४१४ ॥

**॥ लाचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा। न कळे बेगळा उपदेस ॥ १ ॥**
**॥धृ॥ वचन चर्येची न कळे चाचणी। येसे संघस्टनीं अमंगळ ॥ धृ ॥**
**॥ समय न कळे वेडगळ बुधी। बीजाती ते शुधी चांच चाट ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे याचा धीक्कारची बरा। बहुमती खरा हुनी हीन ॥ ३ ॥**

(४१४) चावट जे असतात त्याच्या कामाचा ताळा—वाळा काहीं पाहतां येत नाहीं त्या वोंगळास उपदेश कळत नाहीं. त्याच्या शब्दावरून त्याची चर्या, राहणी, कशी असेल तें सागता येत नाहीं. असा हा मनुष्य सघट्टनात अमगळ असतो. वेळ काळ यास कळत नाहीं. बुद्धि वेडगळ असते. अशा विजाती माणसास शुद्धीची चाड नसते. तुका म्हणे असल्या माणसाचा धिक्कार केलेला बरा बहुमती—पुष्कळ मतें गोळा केलेला मनुष्य—खराहून हीन आहे.

॥ ४१५ ॥

**॥ काउळ्यासी नाहीं दया उपकार। काळीमा अंतर वीटाळसे ॥१॥**
**॥ धृ ॥ तैसे कुजनाचें जीणें अमंगळ। घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥ धृ ॥**
**॥ कडु भोपळ्याचा उपचारी पाक। सेवनें तींडीक कपाळासी ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे वीस सांडुं नेणे साप। आदरे ते पाप त्याच ठाई ॥ ३ ॥**

(४१५) कावळ्यास दया व उपकार काय होत. त्याचे अंतर काळिम्यानें विटाळलेलें असतें. तसें कुजनाचें जीणें अमगळ असतें. व तो घाणेरडी व वोंगळ वाणी वदतो. कडू भोपळ्यास मोठे उपचार करून जरी पाक केला तरी त्याच्या सेवनानें कपाळाची तिडीक च उठावयाची तुका म्हणे सापास विष टाकता येत नाहीं. त्याचे ठायीं त्या पापाचा आदर फार असतो.

हे वरील दोन अभग त्या वेळच्या टीकाकारांस केलेला आहेर आहे, स्वत ची कवित्वाची वाणी ही अनुभवाची, अगीं सत्य गुण असल्यामुळें कसा वेध लावते हे पुढील अभगापासूनच्या ओळींत पहावें.

॥ ४१६ ॥

॥ होतें बहुत हे दीवस मानसीं । आजी नवस वो पुरले नवसी।
॥ भेटी व्हावी ते जाली गोवींदासीं। आतां सेवा करीन निस्चीतीसी ॥१॥
॥ धृ ॥ स्थीर स्थीर मजची साहे करा। बहु कस्ट सोसील्या येरझारा।
॥ येथें आड मज न साहावे वारा। देऊनी कपाट आले ते दुसरे वारा ॥धृ॥
॥ मूळ सता हे सायासांचीं जोडी। नेदी वेगळे होउ एकी घडी।
॥ नाहीं लौकीक हा स्मरला आवडी। आतां येणे काळें या लोभे वेडी ॥२॥
॥ उदयीं उदय घडला अवकाश। नीस्चींतीनें नीस्चींती सावकाश।
॥ धैर्ये गोडी बहुत आली रस। तुका म्हणे हा मागुता नये दीस ॥ ३ ॥

( ४१६ ) अहो, आज नव्या नवसानें माझे नवस पुरले, गोविंदाची भेटी व्हावी असें माझ्या मनांत फार दिवस होतें, तशी ती गोविंदाशीं भेट आज झाली. आता त्याची सेवा मी निश्चिंतीनें करीन. मला येथें स्थिर होण्यासाठीं साहाय्य करा—आजवर मी पुष्कळ कष्ट व येरझाऱ्या सोसल्या, आता येथें गोविंदाच्या व माझ्यामध्यें आड वारा आलेला हि मला खपत नाहीं—तेव्हा देऊनी कपाट म्हणजे आडोसा करून, दुसऱ्या, सर्व, आड येणाऱ्या गोष्टी, वारा, बाजूस सारा. ही प्रेमाची सत्ता मुळची च आहे पण ती आम्हास सायासानी लाभली आहे—जोडली आहे. *त्यामुळें घडीभरसुद्धां ती जोडी वेगळी होऊं देत नाहीं या आवडी पुढे लौकिक हि* आठवला नाहीं, आतां या वेळी किंवा इतक्या वेळानतर हा लाभ झाला म्हणून या लोभानें मी वेडी झाले आहे. प्रेमाचा उदय होऊन त्यात नित्य नव्या रसानें रसता सापडत गेला, निश्चितीनें, ज्यास्त निश्चिती, होत गेली, अंगीं धैर्य आल्यानें गोडी व रस फार आला, तुका म्हणे असा हा दिवस पुन. मागुता येणार नाहीं, हो

॥ ४१७ ॥

॥ स्वयें सुखाचे जे जाले आनुभव। येक पासीं येकी सांगतील भाव।
॥ अवघ्या अवघा हा कैसा नवलाव। सर्व साक्षी तेथेंची त्याचा जीव ॥१॥
॥धृ॥ आप आपणासी करीती नवल। परी वादा वाद न खंडीती बोल।
॥ येका मेघस्यामे जलधर वोल। रसीं उताचीळ हृदय सखोल जे ॥धृ॥
॥ येक वीगय तो सकळांचा हरी। त्याचे आवडीनें आवडी इतरीं ॥
॥ अंध वधीर त्या प्रेते जनाचारी। त्यांची कीर्ती गाईली पुराणांतरी॥ १ ॥

॥ स्तुती परावीया मुखे रुचीकर। प्रीती पात्राचा गौरवीं आदर।
॥ परस्परें हीं सादरें सादर। येगें सज्जनाच्या सुखा नाहीं पार ॥३॥
॥ भग्ती वालभ न तुटे चराचरीं। आप्त अनात हे यैसी ठेवी उरी।
॥ दुरी जवळी संचीता यैसी धरी। रंगा रंगा यैसे होणें लागे हरी ॥४॥
॥ तुका लाधला हें उचीस्ट भोजन। आला बाहेरी परीमळ वोसंडुन।
॥ पडीलें कानीं त्या जीवाची जतन। धरीलें येकाभावें हृदयीं चरण गे ॥५॥

(४१७) प्रत्येक गवळण आपापल्या सुखाचे अनुभव एकमेकींपाशीं सांगून मोठ्या प्रेमभावानें याचा नवलाव—याचें कौतुक करीत आहेत कीं हा सर्वांना सर्वतोपरी कसा ग पावला —खरं च हा सर्व साक्षी आहे व येथें प्रत्येकीजवळ त्याचा जीव आहे. प्रत्येकजण आपापल्या परीनें, नवलाव, आश्चर्य करून आहे. परंतु वादावाद करतांना बोल कांहीं खंडूं देत नाहीं. एका च मेघःश्यामानें जलधर मेघ वोळला आहे. त्या रसासाठीं प्रत्येकीचें मन उतावीळ असून हृदय सखोल आहे—म्हणजे तें सुख सांठविण्यास जागा पुष्कळ आहे. सर्वांना बोलण्यास हरि हा एक च विषय आहे—त्याच्या आवडीनें त्यांस इतर विषयांची आवड आहे. जनाचाराचे ठिकाणीं त्या एक आंधळ्या तरी आहेत, बहिऱ्या तरी आहेत, किंवा प्रेतवत् तरी आहेत, आणि म्हणून व्यासादिकांनीं त्याचीं पुराणांतरीं किर्ती गाइली आहे. दुसऱ्याच्या तोंडून आपल्या प्रीतिपात्राबद्दल गौरवाचा आदरयुक्त शब्द ऐकला कीं तो रुचिकर वाटतो. व त्या एकमेक एकमेकाबद्दल हि आदर ठेवून वागत असतात. यामुळें या सज्जनांच्या सुखास पार नाहीं. हें भक्तीचें वालभ = प्रेम — हें चराचरांना हि तोडतां येत नाहीं. आप्त — अनाप्त — अशी उरी ठेवून वागतां येत नाहीं. परंतु असें अंतर ठेवून जे वागतात — त्यामुळें संचीताप्रमाणें दूर किंवा जवळ असें संचितासारखे — त्या हरीस हि दूर किंवा जवळ अशा रंगीं यावें लागतें. हा जो रासक्रीडेचा खेळ गोकुळांत झाला — त्याचा परिमल बाहेर ओसंडून आला त्या उच्छिष्टाचे तुक्यास भोजन झालें. त्यांत जीवाचें जीवन काय जीवाची जतन काय (भक्ति व लाभ हें) हें कानी पडलें. व त्यामुळें मी एकाभावें हृदयीं चरण धरिले आहेत.

तुकोबांस भामनाथगिरीवर साक्षात्कार झाला. त्यांत जो पद्मनाभ जोडला तो समचरणावर उभा आहे. त्याचें एक चरण ज्ञानस्वरूप सांगडी—हें, व दुसरें चरण प्रेमाचीं साठवण हें. असा हा विठ्ठराया ज्ञान व प्रेम या सम पाउलांवर उभा आहे. त्यापैकीं ज्ञानस्वरूपाचें निरूपण पहिल्या अभंगापासून झालें. आतां प्रेमस्व[illegible]

निरूपणास या दोन अभंगांत सुरुवात केली आहे. चरित्र तें उच्चारावें देवें केलें गोकुळीं. त्या गोकुळीच्या चरित्राच्या परिमळ तुकोबांस लाधला व तो वरील दोन व याखालील अभंग रूपानें ते आपणास देत आहेत.

॥ ४१८ ॥

॥ मथनीचें नवनीत । सर्व हीत कारक ॥ १ ॥
॥ धृ ॥ दंडवत दंडापरी । मागें उरी नुरावी ॥ धृ ॥
॥ वचनाचा तो पसर काई । तांतडीं डोई पाइं च ॥ २॥
॥ तुका म्हणे जगजेठी । लावी कंठी उचलोनी ॥ ३ ॥

( ४१८ ) सर्व हित कारक—मथनीचें नवनीत—कांहीं असेल तर त्या श्रीहरीस दंडाप्रमाणें दंडवत घालणें हे व त्यांत थोडी हि उरी ठेवूं नये. उगा च वचनाचा पसारा घालून काय उपयोग ? तांतडीनें पाईं डोई ठेवावी. असें केलें असतां जगजेठी हा उचलून कंठास लावतो. व आणीक

॥ ४१९ ॥

॥ आवचीत चीं हातीं ठेवा । दील्हा सेवा न करीतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ भागें फळलें जाली भेटी । नेघे तुटी यावरी ॥ धृ ॥
॥ दैन्य गेलें हारली चींता । सदैव आतां यावरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वांटा जाला । बोलो बोली देवासी ॥ ३ ॥

( ४१९ ) कांहीं सेवा न करितां, अवचित हातीं ठेवा देतो. आतां माझें भाग्य फळलें व भेटी झाली. आतां या गोष्टीस कधीं तुटी यावयाची नाहीं. आतां आपलें दैन्य गेलें, चिंता हरली. आतां यापुढें आपण सदा भाग्यवंत च आहोंत. तुका म्हणे माझ्या वाट्यास, देवाशीं बोली बोलण्याचें आलें आहे. ज्ञानस्वरूपांत आमुच्या हें आलें भागा । जीव्हार या जगाचें असें ३५ व्या अभंगांत सांगितलें तीच गोष्ट प्रेमस्वरूपांत अभंग ४१६ पासून सांगताहेत या अभंगांत देव भक्त यांच्या प्रिय संगमांतील खुणा प्रगट झाल्या आहेत—या अंतरांत प्रगट झालेल्या खुणा तुकोबा उकलून दाखवीत आहेत. ज्ञान व भक्ती अशा दोन्हीं अंगांच्या खुणा तुकोबा सांगताहेत

॥ ४२० ॥

॥ वचना फीरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ १ ॥
॥ धृ ॥ केला आतां आंगीकार । न मानीं भार समर्थ ॥ धृ ॥

॥ संवसाराचा नलगे पांग । देवें सांग सकळ ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कीर्ती वाणुं । मधें नाणुं संकल्प ॥ ३ ॥

( ४२० ) अधम लोक वचनास फिरतात तसा नारायण नाहीं. त्यानें माझा अंगीकार केला आहे. समर्थ हा कधीं हिं भक्ताचा भार मानीत नाही. बोलो बोली देवासी । तेव्हां तो आतां आम्हाशीं बोलूं लागेल, नाहीं म्हणणार नाहीं, अबोला धरणार नाहीं. आम्हांस आतां संवसाराचा पांग वाटत नाही. त्यांत देव असल्यामुळें सर्व कांहीं सांग आहे. तुका म्हणे आम्ही फक्त त्याची कीर्ती वानूं–मध्यें संकल्प येऊ देणार नाहीं.

॥ ४२१ ॥

॥ असो मंत्र हीन क्रीया । नको चर्या वीचारूं ॥ १ ॥

॥ सेवे मध्यें जमा धरा । कृपा करा सेवटीं ॥ धृ ॥

॥ वीचारुनी ठाया ठाव । येथे भाव राहीला ॥ २ ॥

॥ आतां तुक्यापासी हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ३ ॥

( ४२१ ) देवा मी मंत्र हीन असो, क्रीया हीन असो, माझी चर्या–वागणूक पाहू नका–सर्व कांहीं सेवेंत जमा धरा व शेवटीं कृपा करा. सर्व ठिकाणचे ठावठिकाणें विचारून माझा भाव येथें राहिला आहे. आतां देवा तुक्यापाशीं हेवा नाहीं, तांतडी नाहीं. कारण

॥ ४२२ ॥

॥ समर्थाची धरीली कास । आतां नास कशाचा ॥ १ ॥

॥ धृ ॥ धावे पावे करीन लाहो । नांवे अहो वीठला ॥धृ॥

॥ नलगे मज पाहणे दीशा । हाके सरीसा वोढसी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे नव्हे धीर । तुम्हां स्थीर दयेनें ॥ ३ ॥ ३ ॥

(४२२) मी आतां समर्थाची कास धरिली आहे आतां आमचा नाश कसा होईल ? अहो वीठ्ठला, धांव पाव असा मी तुमच्या नावाचा छंद धरीन. मला कांहीं वाट पाहावी लागणार नाहीं–तुझ्यासाठीं दिशा शोधावयास नकोत–तूं हाकेसरिसा येशील. देवा, तुमच्या मनीं दया फार म्हणून तुम्हास धीर निवत नाहीं. मी मात्र तुमच्या दयेनें स्थीर आहे.

॥ ४२३ ॥

॥ करूं तैसे पाठांतर । करणाकर भाषण ॥ १ ॥

॥ धृ ॥ जींहीं केला मूर्तीमंत । ऐसा संतप्रसाद ॥ धृ ॥

॥ सोज्वळ कैवल्य वाटा । आइत्या नीटा मागीला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे घेऊं धावा । करूं हांवा ते जोडी ॥ ३ ॥

(४२३) देवा ज्यांनीं तुला निराकारांतून साकार केला – व आपल्या प्रेमाच्या मुठींत ओतून तुला रूप व आकार दिला अशा संतांचा प्रसाद – जी करुणापर – संतांची – वचनें – त्यांचें पाठांतर करूं. या पूर्वींच्या लोकांच्या ज्ञानाच्या सोज्वळ वाटा आहेत. तीं वचनें कैवल्यपर आहेत – म्हणजे ज्ञानयुक्त – आहेत, त्या वाटा नीट आहेत. व त्या आमच्यासाठीं तेरया करून ठेविल्या आहेत. तेव्हां आम्ही धावा घेऊं – व हावा करून ती जोटी करूं – तीं वचनें कंठीं धरूं (हा उल्लेख स्पष्ट श्रीज्ञानेश्वर महाराजांस आहे.) कारण त्याचें असें कीं.

॥ ४२४ ॥

॥ पाहो ग्रंथ तरी आयुष्य नाही हातीं । नाहीं ऐसी मती अर्थ कळे ॥१॥
॥धृ॥ होईल तें हो या वीठोबाच्या नांवें। आचांलें तें भावे जीवें धरूं॥धृ॥
॥ अंगासी येखादा येईल प्रकार । वीचारीतां फार युक्ती बळ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येते दया ॥ ३ ॥

(४२४) आम्ही जर स्वतः ग्रंथ पाहूं म्हणूं तर आयुष्याचा काय भरवसा सांगावा ! बरें आयुष्य आहे म्हणून काणी सांगितलें तर त्या ग्रंथांचा अर्थ कळण्याइतकी आपणास बुद्धि नाहीं. तेव्हां आतां या विठोबाच्या नांवानें, नाम घेतल्यानें, जें व्हावयाचें तें होवो. जीवें भावें तें नाम मनीं धरूं. ग्रंथ पाहिले तर उगा च एखाद्या युक्तीचा, बळाचा, प्रकार अंगीं येईल (व त्या अभिमानानें गोवा उत्पन्न होईल ) तेव्हां तें आपणास नको. आपण मायबापाजवळ आळी करावी, ही, गोमटी, गोड गोष्ट आहे. कारण त्यामुळें मायबापा पोटीं दया उत्पन्न होते. व तशी दया उत्पन्न झाली कीं, काय होतें तें पुढील अभंगांत सांगितलें आहे. या अभंगांत पढीक ज्ञान बाजूस सारलें आहे. व देवाजवळ आळी घ्यावी असें स्पष्ट सांगितलें आहे. या अभंगांत देवास आळी केलेली आवडते ही खूण प्रगट केली आहे.

तुका म्हणे आळी करीतां गोमटी हें कसें तें स्पष्ट करून–सांगताहेत.

॥ ४२५ ॥

॥ धाकुट्याचे मुखीं घास घाली माता। वरी करी सता शहाणीया॥ १॥
॥धृ॥ ऐसें जाणपणें पडीलें अंतर । वाढे तो तो थोर अंतराय ॥ धृ ॥

॥ दोन्ही उभयतां आपण ची व्याली । आवडीची चाली भीन भीन ॥१॥
॥ तुका म्हणे आंगापासुनी नीराळें । नीवडीलें बळें रडते स्तनी ॥ ३ ॥

( ४२५ ) माता ही धाकट्याचे मुखांत घास घालते व शहाण्यावर सत्ता करते, असें जाणपणानें अंतर पडतें. जो जो मुलगा वाढतो तो तो अंतर च वाढत जातें. माता दोन्ही मुलांना आपण च व्याली आहे परंतु त्या मुलांच्या आवडीची चाली तेवढी भिन्न भिन्न असते. एकास अंगापासून वेगळें करतें व दुसऱ्यास बळानें ओढून स्तनास लावते.

॥ ४२६ ॥

॥ यैसी वर्मे आम्हां असतांनीयां हातीं । कां होऊं नेणती दीशा भुली ॥१॥
॥धृ॥ पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥ धृ ॥
॥ आपलें ईच्छेचे घालीन संपुटीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वहु सांडीयेली मतें । आपुल्या पुरतें धरुनी ठेलों ॥ ३ ॥

( ४२६ ) अभग ४१६ पासुन जी वर्मे सांगत आहेत. तीं आमच्या हातीं, ( ऐसी, वर्मे ) असतांनां ( ऐसी हा शब्द सापेक्ष आहे, ऐसी म्हणजे वर सांगितलेली ) दिशाभूली होऊन आम्ही नेणती कशी होवू ? श्रीहरींचे पाय कवटाळून उभा राहीन व त्यांस हालूं देणार नाहीं. मी आपल्या इच्छेच्या संपुष्टांत त्यास घालीन व त्याचे श्रीमुख दृष्टीनें न्याहाळीन. तुका म्हणे मी बहुतांची बहुमतें सांडियेलीं, टाकली, व मला जें योग्य, हितकर, असें होतें, तें ( म्हणजे पोटाळीन पाय – हें ) मी आपल्यापुरतें घट्ट धरिलें आहे.

४२३ व्या अभंगांत पढीक ज्ञान बाजूस सारलें व या अभंगांत सर्व मतें सांडिली; असें सांगितलें. तेव्हां पढीकज्ञानाच्या सर्व खुणा टाकल्या. बहुमतें हा शब्द सहा शास्त्रें–अठरा पुराणें –षट्दर्शनें या अर्थी आहे. पढिक ज्ञानानें बुद्धीस नैवेद्य दाखवितां येईल, पण बोधाचा प्रसाद सेवन करतां येत नाहीं, तो बोध प्रसादाचा पेढा, नारायणाच्या कृपेनें च खातां येईल. म्हणून पेढा खाऊन आपण काय केलें तें सांगताहेत. येवढें करून ( म्हणजे बहुमतें टाकली, जाणीव सोडली पण यांत प्रत्यक्ष करावयाचें असें कांहीं च नव्हतें ) आपण प्रत्यक्ष काय केलें तें पुढील अभंगांत सांगत आहेत.

॥ ४२७ ॥

॥ अचळ न चळे यैसे जालें मन । धरुनी नीज खुण राहीलों तीं ॥ १ ॥
॥धृ॥ आवडी बैसली गुणाची अंतरी । करूं धणी वरी सेवन ते ॥ धृ ॥

॥ येकवीध भावीं नव्हे अभावना । आणीकीया गुणा न मीळवे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मज पडील आहारीं । ध्यान वीटे वरी ठाकले ते ॥ ३ ॥

( ४२७ ) माझें मन अचळ — म्हणजे विटेवर जें ध्यान ठाकलें आहे तेथून चळत नाहींसें झालें. ही नीजत्वाची खूण मी अतरांत बळकट धरून होतो. यामुळें अतरात त्याच्या गुणाची आवडी — गोडी — वर करून राहिली — व त्याचें सेवन मी हौस पुरेल ऐवढें केलें एकवीध भावानें — या वरील भावात कधीं अंतर (अभावना होऊन) पडलें नाहीं — व दुसऱ्या कोणत्या हि गुणांत मिळावें असें वाटलें नाहीं. तुका म्हणे या सर्व गोष्टी एकवटून — विटेवर जें ध्यान ठाकलें आहे — तें माझ्या आहारीं पडलें. येथें

सुंदर तें ध्यान उभे वीटेवरी । कर कटावरी ठेवोनियां ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुळशीहार गळां कांसे पीतांबर । आवडे निरंतर हे चि ध्यान ॥ धृ ॥
मकर कुडलें तळपती श्रवणीं । कंठी कौस्तुभ मणी वीराजीत ॥ २ ॥
तुका म्हणे माझें हे चि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

हा अभग पुरवणीस घेणें सोईचें होईल. या अभगांत तुकोबारायांनीं फार सुदर दर्शन घेतलेलें आहे.

॥ ४२८ ॥

॥ जीवे साठीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥ १ ॥
॥ धृ ॥ पैलतीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भव नदी ॥ धृ ॥
॥ वीस्वासाची धन्य जाती । येथें वसती देवाची ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भोळीयांचा । देव साचा अंकीत ॥ ३ ॥

( ४२८ ) वीटेवर जी पाउलें उभी आहेत त्यांच्यावर दृढ भाव हा च ज्याचा यत्न त्याची नाव बळकट असते. तो मनुष्य भवनदीच्या पैलतीरास जाईल च त्याबद्दल संदेह नको. वीटेवर जी पाउलें उभी आहेत त्यांच्यावर ज्याचा विश्वास आहे त्याची जाती धन्य होय. कारण त्याचे अंत.करणात देव वस्ती करून असतो. तुका म्हणे भोळीयाचा । देव साचा अकीत । येथें देव भक्तांच्या नात्यातील आणखी एक खूण सांगितली.

॥ ४२९ ॥

॥ आशीर्वाद तया जाती । आवडी चीतीं देवाची ॥ १ ॥
॥ धृ ॥ कल्याण तीं असो क्षेम । वाटो प्रेम आगळे ॥ धृ ॥

॥ भगती भाग्य गांठी धन। त्या नमन जीवासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हरीचे दास। तेथें आस सकळ ॥ ३ ॥

( ४२९ ) तुकोबा म्हणतात—वर सांगितल्याप्रमाणें ज्याच्या चित्तांत देव वस्ती करून असतो, व ज्यांच्या चित्तांत देवाची आवडी असते, अशा जातीच्या लोकांना माझा आशीर्वाद आहे. तीं माणसें क्षेम असोत. त्यांचे कल्याण होवो—व त्यांचें देवाचें ठिकाणीं प्रेम आगळें—विशेष—नित्य नव्या रंगानें वाढीवर असो. भक्तीभाग्य हें त्यांचे गांठीं धन असो. अशा जीवास माझें नमन आहे. तुका म्हणे अशा हरींच्या दासांबद्दल आम्हीं त्यांचे क्षेम असावें—कल्याण असो. भक्तीभाग्य हें गांठी धन असावें अशा सर्व आशा करून असतो आणि पुढें सांगतात.

॥ ४३० ॥

॥ तयासाठीं वेचु वाणी। आइको कानीं वारता त्या ॥ १ ॥
॥ धृ ॥ क्षेम माझे हरीजन। समाधान पुसतां त्या ॥ धृ ॥
॥ परत्रीचे जे सांगाती। त्यांची याती न वीचारी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धैर्यवंतें। नीर्मळ चीतें सखी ती ॥ ३ ॥

( ४३० ) आम्ही वाणी त्यांचेसाठीं खर्चू—त्यांच्या सुखाच्या गोष्टी ऐकूं—त्यांचा ( हरीजनांचा ) क्षेम समाचार घेतांना मला समाधान होतें. तें परत्रींचें पैलतीरावरचें सांगाती आहेत, त्यांची भद्रजाती आहे. ती कधीं विचारावयाची नाहीं. तुका म्हणे ते हरीजन निर्मळ चित्ताचे ( जीवींचे ) सखे आहेत.

॥ ४३१ ॥

॥ अभय उतरीं संतीं केलें दान। जालें समाधान चीत त्यानें ॥ १ ॥
॥धृ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण। द्यावे कृपादान नारायणें ॥ धृ ॥
॥ आलें जें उचीत देह वीभागासी। तेणें पायापासी उभी असो ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करी पुजन वेखरी। बोबड्या उतरीं गातों गीत ॥ ३ ॥

( ४३१ ) असल्या हरिजनांनां संतांनीं अभय उत्तराचें दान केलेलें असतें. त्यानें माझे चित्तास समाधान झालें. या प्रेमरसाची खंडणा होणार नाहीं येवढें च नारायणानें कृपादान द्यावें. आमुच्या देह विभागासी जे उचित होतें तें आलें—म्हणजे आमचे जे संचित—पूर्वपुण्य होतें—त्यांनीं पायापाशीं उभें राहण्यास मिळालें—व

आता तुका म्हणे वोवडच्या उत्तरीं गीत गाऊन वैखरीनें नारायणाचें पूजन करीत आहे

॥४३२॥ *

॥ वैष्णवां संगती सुख वाटे जीवा। आणीक मी देवा कांहीं नेण॥ १॥
॥ध्रु॥ गाये नाचे उडे आपुलीया छंदें। मनाच्या आनंदें आवडीनें॥ ध्रु॥
॥ लाज भय शंका दुरावीला मान। न कळे साधन या परतें॥ २॥
॥ तुका म्हणे आतां आपल्या सायासें। आम्हां जगदीशें सांभाळावें॥३॥

( ४३२ ) ज्याच्या चित्तात देवानें वस्ती केली आहे, अशा वैष्णवाच्या ( हरिजनाच्या ) संगतीत जीवास सुख वाटतें व देवा, यापरतें आहास कांहीं हि कळत नाहीं – याच्या संगतीत – गाये – नाचे – उडे – आपुलीया छंदें। मनाच्या आनंदें आवडीनें – या परते आम्हीं दुसरें साधन ओळखत नाहीं, लाज, भय, शंका व मान, हीं सर्व त्यानीं (आम्हीं वैष्णवानीं) दुरावलेली असतात असले सर्व वैष्णव– हरीजन – टाळकरी – बरोबर घेऊन तुकोबा पंढरीरायास विनवीत आहेत कीं —

तुका म्हणे आता आपुल्या सायासें। आम्हा जगदीशें सांभाळावें।–

४१६ व्या अभंगात प्रेमाचा ओघ स्पष्टपण प्रकट होण्यास जी सुरवात झाली आहे – तो ओघ, ( ती मुळीच्या जिव्हाळयाची झरवणी ) वाहत आहे. येथें सर्व बाळगोपाळ गोळा करून त्या सर्वांच्या वतीनें सांभाळा म्हणून विनती केली – ओघ थांबला नाहीं – पण देवावरील कवित्वाचा विषय बदलून तो हरि-जनाकडे वळलेला दिसत आहे ओघ तो च आहे पण बाळगोपाळास शिदोरी हवी – म्हणून उपदेश करीत आहेत – हे सर्व गाये नाचे उडे आपुलीया छंदें। मनाच्या आवडीनें होत असताना च देवा आम्हा सर्वांस जगदीशानें आपल्या सत्तेनें, सायासानें, सांभाळावें (आम्हीं कांहीं करून नव्हे,) अशी विनवणी करून दृष्टि जी समोर होती ती सभोंवार फिरवून बाळगोपाळास सांगताहेत

* ॥४३३॥ *

॥ नको सांडुं अन्न नको सेऊं वन। चींतीं नारायण सर्व भोगीं॥ १॥
॥ध्रु॥ मातेचीये खांदीं वाळ नेणे सीण। भावना त्या भीन मुद्राचीया॥ध्रु॥
॥ नको गुंफो भोगीं नको पडों त्यागीं। लाउनी सरे आंगीं देवाचीया॥२॥
॥ तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां। उपदेस वेगळा उरला नाहीं॥ ३॥

( ४३३ ) बाबा, तू आमच्या संगतीत आहेस ना तेव्हा परमार्थाच्या इतरत्र ऐकिलेल्या, गोष्टी बाजूस ठेव, व आम्ही सांगतो तें ऐक.

नको सांडू अन्न । नको सेवू वन । तर सर्व भोग भोगतांना नारायणाचें चिंतन कर. तूं कांहीं हि भोग भोगीत असलास व तेथें भोग घेण्यास व भोग घेऊन काय सुख झालें तें सांगण्यास – समजण्यास, सत्तामात्रज्ञान, ज्ञानराजा नसेल तर, नारायण हजर नसेल तर, काय होय! तेव्हां सर्व भोगातील सुखाची संवेदना मालकास पोंहोचविणारा, ज्ञानराजा, नारायण, त्यांची सर्व भोगांत आठवण ठेव, कर. तो अनुकुल आहे म्हणून साखर गोड लागते व तें तसें समजतें – हा आपल्या समजुतींत फरक पडणें – यास अन्न सोडण्याची व वनात जाण्याची काय जरुरी? रोग रेडयाला आणि डाग पखालीला देऊन काय होणार आहे? फरक व्हावयाचा आहे समजुतींत – ज्ञानांत – दृष्टींत – व कष्टांत – दंडींत आहेत शरीर, त्याची कांहीं जरुरी नाहीं. शरीर क्षीण झालें तर नाचशील कसा – उडशील कसा? तेव्हां नको सांडू अन्न । नको सेवू वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं । असें केलेस म्हणजे तू त्या आठवात माउलीच्या खांद्यावर बसशील व क्षीण कसा असतो तो तुला समजणार हि नाहीं. याहून मातेच्या खांद्यावर म्हणजे माउली तुला उचलून घेईल व मग तुला क्षीण नाहीं. याहून भिन्न भावना मुद्यांच्या असतात – तेव्हां पहिल्या च चरणांतील धागा पुनः घेऊन सांगताहेत. नको गुंफो भोगीं । वा तूं कोणत्या हि भोगाच्या गोंवळ्यांत जाळ्यात – कटकटींत – सांपडूं नकोस – कोणती हि गोष्ट त्याग केली आहे – अशा अहंकारास बळी पडूं नकोस – दोन्ही हि गोष्टी देवाच्या अंगीं लाऊन दे. तुका म्हणे, पुनः पुनः आम्हांस उपदेश करा, उपदेश करा, म्हणून माझ्या पाठीस लागूं नका. या एका अभंगांत तुम्हांस ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या पलीकडे जगात वेगळा उपदेश उरला नाहीं. जाणीव नेणीव भगवतीं नाहीं हरिउच्चारणीं पाहीं मोक्ष सदा – हा ज्ञानोबाचा प्रसाद तुकोबा वाटताहेत –

चैतन्य सांप्रदायातील सर्व शिकवण – विधि – निषेध – युक्ति – यांत सांठविली आहे, यांत काय करावें तें सांगितलें आहे काय करू नये तें हि सांगितलें आहे. असा हा अतिश्रेष्ठ – बीज मंत्रा सारखा अभग आहे.

वरील अभगांस धरून त्याच्या निरुपणासारखे – पण त्यांत थोडी – ओघाओघानें भर घालीत – स्पष्टीकरण करीत पुढील अभग आहेत.

॥ ४३४ ॥

॥ अवघी मीथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥

॥ धृ ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पी हे मन ॥ धृ ॥

॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळें दंडे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आले भागा । देउनी चींतीं पांडुरंगा ॥ ३ ॥

( ४३४ ) जंववर राम नामानें कंठीं घर केलें नाहीं (कृष्णमणी कंठी घारण केला नाहीं ) तोंवरचे सर्व प्रयत्न — मिथ्या अटी — फुकट व्यर्थ — प्रयत्न आहेत. तेव्हां बाबानो, सावधान — सावधान — संकल्पापासून मन उगवा — मोकळे करून घ्या — कांहीं धरलें, कांहीं सोडलें — तरी त्याचा आग्रह च उरतो व काळ त्याबद्दल दंड हि करतो — तुका म्हणे — बासाठीं तुझ्या वांट्यास जें आलें आहे तें घेऊन चिंती पांडुरंगा । सर्व तो पाहून घेईल.

* ॥४३५॥ *

॥ शरण शरण वाणी । शरण त्रीवाचा वीनवणी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ स्तुती न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासाचा ॥ ध्रु ॥
॥ देह न सांभाळणें । पायावरी लोटांगण ॥ २ ॥
॥ वीनवी तुका संता दीन । नोहे गौरवीं उत्तीर्ण ॥ ३ ॥

( ४३५ ) वरील अभंगांत चिंतीं पांडुरंगा । म्हणून सांगितलें — हें चिंतन कसें करावयाचें तें पुढें सांगताहेत — शिकविताहेत. पांडुरंगा, मी तुला शरण आलों, वा, शरण आलों. अशी त्रिवार विनवणी करीत आहे. माझी वाचा तुझी स्तुती करावयास कशी पुरीं पडणार ! मी तुझ्या दासांचा दास आहे. मला माझा देह संभाळतां येत नाहीं — म्हणून तुझ्या पायावर लोटांगण घेत आहे. दीन तुका संतांना विनवीत आहे कीं त्याचा गौरव करून आपणास उत्तीर्ण होतां कसें येणार ! आपली वाणी त्याचा गौरव करण्यास पुरी पडणार नाहीं.

* ॥४३६॥ *

॥ हरीरता चपळा नारी । लागवरी नेघे रती ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगीं काम भोगावा ॥ ध्रु ॥
॥ वाचा वाचत्यासी न ये । कोठें काय धरावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा येसा । देव पीशा उदारा ॥ ३ ॥

( ४३६ ) हरीरता अशी नारी चपळा असून रती घेण्यास त्वरा करणार नाहीं. — असें कधीं झालें आहे ! अवघ्या अंगीं सर्वोत्तमाचा काम भोगावा — आणि ती गोष्ट कधीं शब्दांत आणूं च नये — कारण याचा कोठें व काय घर धरावा — तो केव्हां पत्ता काढील हें कोणी सांगावें ? तुका म्हणे देवासारख्या च या देवपिशा

गौळणी उदार आहेत. येथें आली संधी कशी साधून घ्यावी, त्यांत निवडानिवड करीत बसूं नये, ही गोष्ट हरीरता गौळणींचा दृष्टांत देऊन सांगितली आहे. हरीच्या खेळांत आपण कोठें हि—कशा हि परिस्थितींत त्या अडकल्या तरी त्या आपणास धन्य मानीत तशी वृत्ती ठेवावी—असावी—त्या गौळणी त्या हरीशीं असें च कां व तसें च कां नाहीं या वादावादींत गुतल्या नाहींत, कारण त्यांस माहीत होतें कीं.

॥ ४३७ ॥

॥ राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सापडे ॥ १ ॥
॥ धृ ॥ लव्हाळयासी कोठें बळ । करील जळ आपले ॥ धृ ॥
॥ कठीणासी बळ जोडा । नम्र पीडा देखेना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सर्व रसीं । मीळे त्यासी गोत ते ॥ ३ ॥

(४३७) आपण जर वादावादांत पडलों—वादावाद करण्यास (या हरीबरावर) तर फंदांत सांपडूं. लव्हाळ्यास जळ कधीं आपुलें बळ दाखवतें का? कठीणास जोडा खावा लागतो किंवा कठीणास बळ जोडावें लागतें व नम्र जो असतो त्यास पीडा दिसत च नाहीं—लव्हाळयास पाण्याची पीडा होते का—तुका म्हणे जळ हें सर्वरसीं मिळतें, समरस होतें, व तें ज्याच्याशीं मिळतें त्यासारखें होतें. त्याप्रमाणें हा हरी सर्वांशीं मिळून असतो. तेव्हां त्याच्याशीं मिळून असणें हें उत्तम. यांतील वर्म देवानें दाखविलें म्हणून सर्व भ्रम निरास पावला. यामुळें अहंकाराची भेटी च झाली नाहीं.

॥ ४३८ ॥

॥ म्हणउनी झाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥ १ ॥
॥ धृ ॥ दाखवीलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥ धृ ॥
॥ हातें मुरगाळीतां कान । नाहीं भीन वेदना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येका सुतें । अवघीं गोतें गुंतलों ॥ ३ ॥

(४३८) त्याच्याशीं तुटी च राहिली. अहंकाराचा वारा न लागे राजसा—म्हणून रोज विनंती केल्यासारखें झालें. आपल्या हातानें आपला कान मुरगळला तर त्याच्या काय भिन्न वेदना होतात? तुका म्हणे एका सुतानें—अवघीं गोतीं गुंतलेलीं आहेत—आपले च हात—आपले च कान—तशी हीं सर्व सृष्टी श्रीहरीची लीला आहे. व ती एका श्रीहरीच्या प्रेमाच्या सूत्रानें गुंतलेली आहे.

॥ ४३९ ॥

॥ न पडो आतां हालीं घाव । मधें कींव नासक ॥ १ ॥
॥ धृ ॥ करवीली अत्महत्या । जीवा कां त्या वधाचा ॥ धृ ॥
॥ आशापाशी गुंतला गळा । तेणें कळाहीन जालों ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लाऊं मुळीं । जीव कुळी थारेसी ॥ ३ ॥

( ४३९ ) वरील अभंगांत ज्या अहंकाराचा उल्लेख केला त्याचा घाव आमच्यावर—पडूं नये कारण तो नाशक आहे. आशापाशांत मीं गुंतल्यानें माझा गळा गुंतला गेला—व त्यामुळें मी कळाहीन झालों. तुका म्हणे जीवकुळी—मुळच्या थारेस लावूं आपण अहंकार धारण केला तर तो—हरीचें म्हणून घेण्यापुरता घेऊं. पुढील चार अभंग याच क्रमानें संताजीच्या वहींत ८४ – ८७ आहेत.

॥ ४४० ॥

॥ *त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं* ॥ १ ॥
॥धृ॥ आतां असो तुझें पायीं हे मोटळें । इंद्रीयें सकळ काया मनें ॥ धृ ॥
॥ सांडी मांडी वीधी नीसेधाचा ठाव । न कळतां भाव जाईल वांयां ॥२॥
॥ तुका म्हणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ३ ॥

( ४४० ) देवा, मी कोणत्या हि गोष्टीचा त्याग करूं जावें, तर तो भोग माझ्या अंतरांत येऊन घर करतो, यास, हे दातारा, मी काय करू ? आतां या शरीराची ही मोट ( सर्व इंद्रियें—काया—मन—यांची मोट ) तुझे पायीं असो. सांडी, मांडी, विधी, निषेध, यांचा ठाव तर कळणार नाहीं—पण त्या भानगडींत माझें मन सांपडल्यानें, आज तुझ्यापायीं जो भाव आहे. तो त्या सांडी मांडींत अडकून राहील. तेव्हां तुका म्हणे.—देवा आतां उजगरा ( विलंब ) नको. तूं मला तुझ्यांत सामावून घे. तूं मला अंगीं सामावून घेतलेंस तर अहंकर्तृत्व अंगावर येणार नाहीं.

॥ ४४१ ॥

॥ आम्हुचीया भावें तुज देवपण । हे कां वीसरोन राहीलासी ॥ १ ॥
॥धृ॥ समर्थासी नाहीं उपकार स्मरण । दील्या आठवण याचोनीयां ॥धृ॥
॥ चव्हण वव्हण सेवकांच्या बळें । नीर्गुणाच्या मुळें सांभाळावें ॥२॥
॥ तुका म्हणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनी हरी बुझावणे ॥३॥

( ४४१ ) देवा, आमच्या अन्तःकरणातील प्रिय प्रतीतीनें तुला देवपण लाधलें ही गोष्ट विसरून गेलास कीं काय ! थोर लोकांस—त्यांच्यावर केलेल्या उपकारांची आठवण नसते म्हणून वरचेवर त्यांस आठवण द्यावी लागते. देवा, तुमचें चलन वलन हें सर्व सेवकाच्या बळावर अवलंबून असतें. नाहींतर निर्गुणपण येईल म्हणून आम्हास सांभाळावें लागतें. देवा, मी, आतां खंडावर आलों आहे. म्हणजे तूं द्यावयाचा खंड मागावयास आलों आहे. तेव्हां आम्हांस प्रेम देऊन तूं आमची समजूत करावीस. अशा तऱ्हेनें देवाजवळ प्रेम मागावयास गेले तों त्याजवळ द्यावयास काय आहे !

॥ ४४२ ॥

॥ नीघालें दीवाळें । जाले देवाचें वाटोळें ॥ १ ॥
॥ ध्रु॥ आतां वेचु नये वाणी । वीचारावें मनींच्या मनीं ॥ध्रु॥
॥ गुंडाळीली पोती । भीतरी लावीयेली वाती ॥२ ॥
॥ तुका म्हणे करा । येसा राहे माजी घरा ॥ ३ ॥

( ४४२ ) म्हणून पाहूं लागलें. तों आपणांस कोणी कांहीं बाहेरून उचलून कांहीं देतो कां ? आपल्यात च नव्या नव्या कला उकलतात— उदीत होतात. तेव्हां आपला च भाव साकार होऊन आपणास भेटतो. ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन म्हणतात.

देवाचें वाटोळें जालें (भक्तहृदयांतील प्रिय प्रतीतिशिवाय त्यास वेगळें अस्तित्व च नाहीं—तेव्हां तो देणार काय ? आधीं भक्त मागेल तेव्हां देव देणार, त्यास वेगळी गोष्ट उचलून कोठें देतां येते ? तेव्हां त्याची केवीलवाणी स्थिति पाहून म्हणतात—कीं ) देवाचे वाटोळें झालें— दिवाळें निघालें. आतां आपण व्यर्थ वाणी वेंचूं नये. जो काहीं विचार करावयाचा तो आपण आपल्या मनाशीं करावा. आसन्यास जर भक्तहृदय नाहीं, तर मग देवाचा सर्व च पसारा गुंडाळला जाऊन तो अंतरात ( दुकानांत ) एक दिवा ( ज्ञानदीप ) लावून ठेवतो. तुका म्हणे तो घरामध्यें—देहामध्यें—भक्तहृदयांत राहील—असें करा.

सर्व पोतीं गुंडाळून—मालाचा फडशा करून एक शेणाचा दिवा—दुकानांत दिवाळें काढलें हें जाहीर करण्यास—पूर्वी लावून ठेवण्याचा प्रघात होता. त्या रिवाजास धरून हा दृष्टांत आहे. तुम्हांस द्यावयास मजजवळ कांहीं नाही. तुम्हांस ज्ञानाच्या अवस्थेंत सर्व स्पष्ट समजते आहे, अशी देवाची कबुली घेऊन वरील अभंग आहे. म्हणून सांगतात कीं:—

॥ ४४३ ॥

॥ न संगावें वर्म । जनी असो द्यावा भ्रम ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ उगी च लागतील पाठी । होती रीती च हींपुस्टी ॥ ध्रु ॥

॥ शीकवीलया गोस्टी । सीकोन धरीती पोटीं ॥ २ ॥

॥ तुका म्हणे सीण । होईल अनुभवावीण ॥ ३ ॥

( ४४३ ) देवाचें वाटोळें झालें, दिवाळें निघालें, असली वर्माची गोष्ट सांगू नये, जगांत त्याबद्दल भ्रम असूं द्यावा. या लोकांस ज्या गोष्टी शिकविल्या आहेत त्या पोटीं धरित नाहींत, त्याप्रमाणें वागत नाहीत, अनुभव घेत नाहींत, व या गोष्टी शिकवा म्हणून उगी च पाठी लागतील आणि उगाच रीतीं (पोकळ) व हिंपुटी ( उथळ ) होतील. कोणत्या हि गोष्टीचा अनुभव घ्यावा लागतो त्यास यांची तयारी नसते, तेव्हां उगा च अनुभवावीण शीण पावतील, तेव्हां असल्या वर्माच्या गोष्टी सांगत सुटूं नये, म्हणून म्हणतात.

॥ ४४४ ॥

॥ सुखरूप चाली । हळु हळु उसंतली ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ बाळ गोपाळांची वाट । सेव्य सेवकता नीट ॥ ध्रु ॥

॥ जऱ्ही जाला श्रम । तरी पडो नये भ्रम ॥ २ ॥

॥ तुका म्हणे दासा । देव सरीसा सरीसा ॥ ३ ॥

( ४४४ ) सेव्य – सेवकता –ही बाळ गोपाळांची वाट हळुहळुं आक्रमावयाची जरी असली तरी सुखरूप आहे. या वाटेनें जाताना थोडे श्रम पडले तरी चित्तांत भ्रम उत्पन्न होत नाहीं – कारण श्रम करावयास लागले तरी देव दासांच्या जवळ जवळ च असतो. तूं स्वामी – मी सेवक – या पदांत कधीं विघाड होऊं देऊं नये. कारण देव सरसा चाललेला असतो च. तेव्हां

॥ ४४५ ॥

॥ चुकली ते वाट । पुढें सांपडवीं नीट ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ म्हणउनी गर्भवास । नेणती ते हरीचे दास ॥ ध्रु ॥

॥ संचीताचा संग । काय जाणो पावो भंग ॥ २ ॥

॥ तुका म्हणे दुस्टी । उघडी तो नव्हे कस्टी ॥ ३ ॥

( ४४५ ) आपली वाट चुकली तर पुढें तो नीट वाट सांपडवितो. म्हणून हरीच्या दासांना गर्भवास माहीत नाहींत. देव सरिसा सरिसा हा जो आपला

संचिताचा ठेवा आहे. तो काय म्हणून भग पावेल! तुका म्हणे एकदां ज्याची दृष्टि उघडली—त्यास कष्टी होण्याचें कारण पडत नाहीं. म्हणून म्हणताहेत.

॥ ४४६ ॥

॥ कई तो दीवस देखिन मी डोळां। कल्याण मंगळा मंगळाचे ॥ १ ॥
॥धृ॥ आयुष्या शेवटीं पायांसवे भेटी। कलीवरे तुटी झाल्या तरे ॥ धृ ॥
॥ सरो हें संचीत पदरींचा गोवा। उतावीळ देवा मन जालें ॥ २ ॥
॥ पाउला पाउलीं करीतां वीचार। अनंत वीकार चीता अंगीं ॥ ३ ॥
॥ म्हणवुनी भयाभीत होतो जीव। भाकीतसे कींव आटाहासें ॥ ४ ॥
॥ दुःखाच्या उतरीं आळवीले पाय। पाहणें तें काय अजुनी अंत ॥५॥
॥ तुका म्हणे होईल आइकलें कानीं। तरी चक्रपाणी धाव घाला ॥ ६ ॥

( ४४६ ) देवा, माझ्या आयुष्याचा शेवट झाला आहे. माझें शरीर ( कलेवर ) नाहींसें झालें आहे, व माझी तुझ्या पायासवे भेटी झाली आहे, असा मंगलांतील मंगल, कल्याणप्रद, दिवस मी या डोळ्यांनीं कधीं रे पाहीन! हें संचित, हा पदरींचा गोवा, सरो, देवा, माझें मन फार उतावीळ झालें आहे. देवा, पावलांपावलांना विचार करतांना चित्ताच्या अंगीं अनंत विकार उठतात. म्हणून मी भयभीत झालों आहे व अट्टहासानें मी तुझी कींव भाकीत आहे. देवा जीवितांतील दुःखानें, अन्तर्यामीन्या दुःखानें, मी तुमचे पाय आळवीत आहे. अद्याप हि तुम्ही माझा अंत पाहात आहांत. तुका म्हणे चक्रपाणी ( हे विशेषण वापरण्याचें कारण असें की माझ्या वाटेंत जीं विघ्नें आहेत तीं त्या चक्रानें दूर करता येतील, ) तुम्हांस हें कानानें ऐकू येत असेल तर मला संभाळण्यास धाव घाला.

॥ ४४७ ॥

॥ कळों येतें वर्म। तरी न पवतो श्रम ॥ १ ॥
॥ धृ॥ तुम्हां शीरीं होतां भार। आम्हां कैचा संसार ॥ धृ ॥
॥ हातें अभयदान। तरी स्थीर हातें मन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पाहे। वैसी वाट उभा आहे ॥ ३ ॥

( ४४७ ) ही वर निवेदन केलेली गोष्ट कशी घडावी याचें वर्म जर मला कळत असतें तर श्रम पावलों नसतों—कारण मग तुमच्या शिरीं भार राहून आम्हांस संवसाराचा ताप लागला नसता. तुम्ही अभयदान केलें असतें तर मन

स्थिर झालें असतें. तेव्हां मला वर्म माहीत नाहीं—तुम्हीं काहीं सांगितलें नाहीं, अभयदान केलें नाहीं, म्हणून वाट पहात उभा आहे.

॥ ४४८ ॥

॥ करावा वरुशाव । तृपाक्रांत झाला जीव ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाहे आकाशाची वास । जाणतां तूं जगन्निवास ॥ धृ ॥
॥ संयोगें विस्तार । वाढी लागतो अंकुर ॥ २ ॥
॥ तुका म्हळे फळ । चरणांबुजें तीं सकळ ॥ ३ ॥

( ४४८ ) मी वाट पहात उभा आहे. या स्थितींत मी आकाशाकडे डोळे लावून बसलों आहे. देवा, तू जगन्निवास—जाणता आहेस—तेव्हा माझा जीव तृषाक्रांत झालेला आहे हें ओळखून वर्षाव करावास अशा तऱ्हेनें माझ्या आर्त चित्ताचा व तुझ्या कृपेच्या वर्षावाचा संयोग झाला कीं प्रेमाचा अंकुर वाढू लागतो. देवा तुमचीं चरणाबुजें पहावीं हें एक च माझ्या सकळ प्रयत्नाचें फळ आहे.

॥ ४४९ ॥

॥ आपलें आपण जाणावें स्वहीत । जेणें राहे चीत समाधान ॥ १ ॥
॥ बहुरंग माया असे वीखुरली । खुंटींत ची जाली होतां बरी ॥ धृ ॥
॥ पूजा ते अबोला चीताच्या प्रकारीं । भाव वीस्वंभरी समर्पावा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गेला फीटोनीयां भेव । मग होतो देव मनाचा चीं ॥ ३ ॥

( ४४९ ) आपुलें चित्त जेणेंकरून समाधानींत राहील हें च स्वहित, तेव्हा स्वहिताची गोष्ट आपली आपण ओळखिली पाहिजे. माया ही बहुरंगानें विखुरलेली आहे तेव्हा तिची गति कुंठीत झालेली च बरी. एकभाव वीश्वंभरीं समर्पावा व इतर सर्व चित्ताच्या प्रकाराशीं अबोला असावा, अशा रीतीनें चित्ताचा भेव म्हणजे भीति, निघून गेल्यावर मनाचा च देव होतो मन देव होतें शिवपद जीवीं कसें भोगता येतें—जीव च शीव कसा होतो—तें येथें सांगितलें आहे ही एक मोठी खूण प्रगट केली आहे.

॥ ४५० ॥

॥ असोनी न कीजे आलीस अहंकारें । उगी च या भारें कुंथाकुंथी ॥१॥
॥धृ॥ धावा सोडवणे वेगीं लवकरी । मी तों जालों हरी शक्ती हीन,॥ धृ ॥
॥ भ्रमल्याने दीसे बांधल्याचे परी। माझे मजवरी राहोनिया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धाव घेतलीसे सोई । आतां पुढें येई लवकरी ॥ ३ ॥

( ४५० ) देवा आमचे अंगीं अहंकार आहे पण त्यामुळें आम्हीं लिप्त होऊं नये. कारण त्या भारानें उगीं च कुंथाकुंथी व्हावयाची. मला सोडविण्यासाठीं तुम्हीं लवकर धावा. मी, हरि, शक्तीहीन झालों आहे. मी या अहंकारानें भ्रमल्यामुळें मला मी बांधला गेलों आहे असें वाटतें; आणि माझें च बंधन मला झाल्यासारखें वाटतें. देवा, मी आतां तुमच्या सोईनें—तुमच्याकडे माझी सोय लागेल या भावनेनें धांव घेतली आहे. आतां तुम्हीं लवकर पुढें या. ( येथें ओघ बदलतो. )

४५१

॥ असत्य वचनें होतां सर्व जोडी। जरी लग्नघडी पर उपकार ॥१॥
॥धृ॥ जाईल पतना यासी संदेह नाहीं। साक्ष आहे कांहीं सांगतो ते ॥धृ॥
॥ वदवीलें मुखें नारायणें धर्मा। अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें। अंतरीचें कुडें देईल दुःख ॥ ३ ॥

( ४५१ ) असत्य वचनानें सर्व कांहीं—लग्नघडी—परोपकार—या सारख्या जोडी होत असल्या तरी त्यामुळें मनुष्य—जीव—पतनासी जाईल याबद्दल संदेह नाहीं याबद्दल एक साक्ष आहे. ती सांगतो. नारायणानें—धर्माच्या मुखानें खोटें वदविलें. त्या पापकर्मासाठीं धर्माचा आंगठा गेला. तेव्हां तुका म्हणे आतां पुढें सांभाळून रहा. अंतरीं, हें, खोटें बोलण्याजोगें, जें, कुडें असतें तें दुःख देतें. ( येथें ओघ बदलावे. )

॥ ४५२ ॥

॥ देव वासर देव वासर। असे नीरंतर जेथें तेथें ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव खोळंबा देव खोळंबा। मज झळंबा म्हणुन कोंडी ॥ धृ ॥
॥ देव लागट देव लागट। लावीलीया चट जीवीं जडे ॥ २ ॥
॥ देव बावळा देव बावळा। भावें जवळा लुडबुडी ॥ ३ ॥
॥ देव न व्हावा देव न व्हावा। तुका म्हणे गोंवा करी कामीं ॥ ४ ॥

( ४५२ ) देव हा वासर म्हणजे उडाणटप्पू आहे. हा सदा सर्वदा कोठें हि असतो. तुम्हीं थांबवून मला धरा—मला कोंडा—मला शिवा—असें म्हणतो. असा हा लागट—चिकटणारा आहे. व आपण चट लाविली तर जीवीं जडून असतो. देव बावळा आहे. तो प्रत्येका जवळ लुडबुड करीत असतो. म्हणून हा देव आम्हांस नको. कारण तुका म्हणे हा कामांत गोंवा=गोंवळ उत्पन्न करतो.

॥ ४५२ ॥ अ

॥ देव नीढळ देव नीढळ । मुळ नाही टाळ परदेसी ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ देव अकुळी देव अकुळी । भलते स्थळी सोईरीक ॥ ध्रु ॥

॥ देव लीगाड्या देव लीगाड्या । तुका म्हणे भाड्या खडे ठकी ॥ २ ॥

( ४५२ अ ) देव हा नीढळ आहे. त्याला मूळ नाही. ढाळ नाहीं. असा परदेशी आहे. त्यास कुळ नाहीं. व त्याची सोईरीक भलत्या च ठिकाणीं असते. हा लिगाड्या म्हणजे सोंडकर आहे. हा भाड्या आहे तुका म्हणे हा दभानें ठकवतो.

॥ ४५३ ॥

॥ देव जाणता देव जाणता । आपली च सता येका येकी ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनी अंतर वर्ततसे ॥ ध्रु ॥

॥ देव नीराळा देव नीराळा । अलीत वीटाळा तुका म्हणे ॥ २ ॥

( ४५३ ) हा जाणता आहे. हा एकाएकीं आपली सत्ता स्थापतो हा चतुर आहे—भक्ताच्या अत करणात काय आहे तें ओळखून हा वागतो तुका म्हणे हा सर्वांहून वेगळा आहे यास कसला हि विटाळ शिवत नाहीं.

॥ ४५४ ॥

॥ देव मजुर देव मजुर । नाहीं उजुर सेवेपुढ ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥ ध्रु ॥

॥ देव तर काई देव तर काई । तुका म्हणे राई तऱ्ही मोठी ॥ २ ॥

( ४५४ ) हा भक्ताचा मजुर आहे त्याची सेवा करण्यात याला इकडे तिकडे पाहण्यास सवड होत नाहीं. भक्ताच्या अगचे बळ पाहून हा लपतो ( त्याच्या हृदयात ), असा हा गाढ्याळ घाबरट आहे तुका म्हणे एक वेळ राई मोठी असेल एवढा हा लहान आहे तेव्हा हा देव तर खरा पण केव्हढासा आहे !

॥ ४५५ ॥

॥ देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देउं जाणे ॥ ध्रु ॥

॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणासी ॥ २ ॥

( ४५५ ) हा दयाळ आहे किती जणाची कल्हिाळ—आरडाओरड हा सहन करतो—हा उदार आहे हा थोडें घेऊन पुष्कळ देतो असा हा चागला आहे—म्हणून तुका चरणीं लागला आहे.

॥ ४५६ ॥

॥ देव बराडी देव बराडी । घाली देठासाठीं उडी ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ धृ ॥
॥ देव भावीक भावीक । होय दासांचा सेवक ॥ २ ॥
॥ देव होया देव होया । जैसा म्हणे तैसा तया ॥ ३ ॥
॥ देव लाहान देव लहान । तुका म्हणे अनुरेण ॥ ४ ॥

( ४५६ ) हा बराडी = वाटेल तें आधाशीपणानें खाणारा आहे. म्हणून यानें द्रौपदीकडे भाजीच्या देठासाठीं उडी घातली. बळीस भिऊन हा त्याचा द्वारपाळ झाला आहे. हा देव तुम्ही म्हणाल तसा होयवा आहे—तसा होईल. तुका म्हणे हा अणुहून हि लहान आहे.

॥ ४५७ ॥

॥ देव भला देव भला । मोळोनी जाय जैसा त्याला ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव उदार उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ धृ ॥
॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ २ ॥
॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वा जीवां ॥ ३ ॥
॥ देव चांगला चांगला । तुका चरणीं लागला ॥ ४ ॥

( ४५७ ) हा भला आहे—हा भक्तांशीं समरस होतो. हा उदार आहे—द्यावयाचें वेळीं थोडें फार म्हणत नाहीं. हा बळी आहे. यास भूमंडळांत दुसरा जोडा नाहीं. हा सदा व्हावा, व्हावा, असा वाटतो, तो सर्व जीवास आवडतो, असा हा चांगला आहे म्हणून तुका त्याच्या चरणीं लागला आहे.

॥ ४५८ ॥

॥ देव पाहो देव पाहो । उंचे ठायीं उभे राहो ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव देखीला देखीला । तो नाहीं कोणा भ्याला ॥ धृ ॥
॥ देवा कांहीं मागो मागो । जीवभाव त्यासी सांगो ॥ २ ॥
॥ देव जाणे देव जाणे । पुरवीं मनींचीये खुणे ॥ ३ ॥
॥ देव कातर कातर । तुका म्हणे अभ्यंतर ॥ ४ ॥

(४५८ ) आपण देव पाहूं या—देव पाहूं या. उंच ठिकाणीं उभे राहून देव पाहूं या. आपण देव पाहिला देव पाहिला. तो कोणास भीत नाहीं. आपण देवाजवळ कांहीं तरी मागू—त्यास आपला जीव भाव सांगू—तो आपल्या

मर्माचे जाणून खुणेनें ती गोष्ट पुरवितो. तुका म्हणे – अंतःकरणात – देव ही एक कातरी च आहे अडचणीची घोटाळ्याची जागा आहे त्या पासून कांहीं चोरून, लपवून ठेविता येत नाहीं.

॥ ४५९ ॥

॥ देव आमचा आमचा । जीव सकळ जीवाचा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ देव आहे देव आहे । जवळी आम्हा अंतरबाहे ॥ ध्रु ॥
॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचे ही कोड ॥ २ ॥
॥ देव आम्हां राखे राखे । घाली कळीकाळाशीं काखे ॥३॥
॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥ ४ ॥

( ४५९ ) देव हा आमचा – सकळ जीवाचा जीव आहे हा – आंत बाहेर सर्वत्र आहे हा गोड आहे – कोडाचे हि कोड पुरविता हा कळीकाळास साकेस मारून आम्हास राखतो. हा दयाळ आहे. हा तुक्याचा सांभाळ करतो

॥ ४६० ॥

॥ जाऊ देवाचीया गावा । देव देईल विसावा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ देवा सांगों सुख दुःख । देव नीवारील भुक ॥ ध्रु ॥
॥ घालु देवासी च भार । देव सुखाचा सागर ॥ २ ॥
॥ राहो जवळी देवापाशी । आता जडोनी पायासी ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे आम्हीं बाळ । या देवाची लडीवाळ ॥ ४ ॥

( ४६० ) चला आपण देवाच्या गावीं जाऊं, तो आपणास विसावा देईल. आपण त्यास आपलें सुखदुःख सांगू – तो आपली तहान भूक निवारील आपण आपला भार देवावर घालूं तो सुखाचा सागर आहे त्याच्या पायास जडून आपण त्याच्या जवळ च राहूं तुका म्हणे आम्ही या देवाचीं लडीवाळ बाळें आहोत

( ४६१ ) आपण तोंडानें हरी हरि म्हटल्यानें प्रेम हें तेथें वास करावयास येतें. आपण हरि हरि म्हणूं लागलों कीं प्रेमास आपणास धुंडीत यावें लागते. प्रेम हें भोळे भक्त पाहून आपण होऊन पाठीस लागतें. प्रेम हें जोरानें बळ करून घालविलें तरी जात नाहीं—व जेथें हरिकीर्तन असेल तेथें बळे च शिरतें— तुका म्हणे भक्तांच्या घरीं प्रेम मोठ्या आशेनें येतें.

देवाचें हे येवढें कौतुक जिजाबाईना आवडलें नसावें म्हणून त्या उसळून म्हणाल्या कीं:—

॥ ४६२ ॥

॥ काय नेणो होता दावेदार मेला। पुर्वी तो साधीला होउनी गोऱ्हा ॥ १ ॥
॥धृ॥ कीती सर्व काळ सोसावें हें दुख। कीती लोकां मुख वासुं तऱ्ही॥धृ॥
॥ ह्मवे आपली आई काय माझें केलें। धड या वीठलें संवंसाराचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येती वाइलें आसडे। फुंदे कांही रडे कांहीं हासे ॥ ३ ॥

( ४६२ ) या विठलानें माझें धड असें काय हो केलें? जसा कांहीं पूर्वीचा हा माझा दावेदार होता! देवानें मला असा हा नवरा दिला आतां मी ऱ्यान्यामुळे सर्वकाळ दुःख तरी किती काढावें!— व लोकांच्या पुढें तोंड तरी किती वासूं!— या विठ्ठलानें माझें चांगलें असें काय केले? जशीं कांहीं मेल्यानें आपली माय ह्मवली. तुका म्हणे अशा तऱ्हेचें आमच्या बाइलीला आसडे येतात कांहीं फुंदते—कांहीं थोडी रडते—कांहीं हांसते—हि. हा च विषय पुढें चालूं आहे.

॥ ४६३ ॥

॥ मज चीं भोवता केला यानें जोग। काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
॥धृ॥ सर्व सुखें घरा चालोनीयां येती। माझी ते फजीती चुकेचीना ॥ धृ ॥
॥ कोणाची बाईल होउनीयां वोढु। सवंसारी हे काढु आपदा कीत्ती॥२॥
॥ येकयेका मागें तोडीतील पोरें। मरती तऱ्ही बरें होतें आतां ॥ ३ ॥
॥ कांहीं नेदी वांचो भोवीयेलें घर। सारयाया ढोर सेण नाहीं ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे रांड न करीतां वीचार। वाहोनीयां भार कुंथे माथा ॥५॥

( ४६३ ) या माझ्या नवऱ्यानें सर्वस्वाचा त्याग केला. यामुळें याचा कोणता भोग अंतरला आहे कां? सर्व सुखें घरीं चालून येतात पण माझी फजीती कांहीं चुकत नाहीं मला का आतां दुसऱ्याची बायको होतां येईल? वरें याच्या संवसारांत दुःख तरी किती सोसूं? मुलें एकेक मागून तोटताहेत. तीं मेलीं असतीं तरी बरें झालें असतें. हा घरांत कांहीं राहूं देत नाहीं. यानें घर

धुवून स्वच्छ केलें आहे. घरांत घर सारवीन म्हणावें तर ना शेण ना ढोर. तुका म्हणे ही रांड विचार न करितां उगाच कुंथते आहे. विचार कसला करावयाचा तें पुढें सांगताहेत.

॥ ४६४ ॥

॥ देव सखा तरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसा असोनी अनुभव । कासावीस होती जीव ॥ धृ ॥
॥ देवाची जतन । तया न बाधु सके अग्न ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हरी । प्रल्हादासीं यत्न करी ॥ ३ ॥

( ४६४ ) देव साहाय्य करावयास सखा म्हणून जवळ असतांना सर्व जग कृपा करतें. असा अनुभव असून जीव उगा च कासावीस होतात. प्रल्हादास देवाची जतन होती. तेव्हां त्यास अग्नी बाधूं शकला नाहीं. तुका म्हणे हरीनें प्रल्हादासाठीं यत्न केला.

॥ ४६५ ॥

॥ वर्णावे ते कीती । केले पवाडे श्रीपती ॥ १ ॥
॥ धृ ॥ वीश्वासीया घडे लाभ । देईल तरी पद्मनाथ ॥ धृ ॥
॥ भाव शुध तरी । सांगीतलें काम करी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देव । भोळा तरी नागवी संदेह ॥ ३ ॥

( ४६५ ) असे या देवाचे पवाडे तरी किती वर्णावेत! त्यांनीं पवाडे करण्याजोग्या किती तरी गोष्टी केल्या. पद्मनाभ मनांत आहे असा विश्वास असणाऱ्याला मनांत येईल तो—लाभ होतो. आपला भाव शुद्ध असेल तर देव सांगितलें काम करतो. तुका म्हणे देव भोळा आहे—आपणास आपला संदेह नागवितो. ही घरांतली तक्रार जगांत मांटली आहे. पतिपत्नीच्या दृष्टींतील फरक या ठिकाणीं स्पष्टपणें मांडला आहे. कांहीं नेदी वाचो धोवीयेलें घर।—या आरोपाबद्दल तुकोबांचें म्हणणें असें कीं:—

॥ ४६६ ॥

॥ क्षुधेलीया अन्न । द्यावें पात्र न वीचारून ॥ १ ॥
॥ धृ ॥ धर्म आहे वर्मा आंगीं । कळले पाहिजे प्रसंगीं ॥ धृ ॥
॥ द्रव्य आणि कन्या । येथें कुळकर्म शोधुन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पुण्य गाठीं । तरी च उचीतासी भेटी ॥ ३ ॥

( ४६६ ) आपण एखादा क्षुधेनें पीडलेला मनुष्य पाहिला तर त्याची योग्यायोग्यता न विचारतां त्यांस अन्न द्यावें. व्यवहारांत कोणत्या हि गोष्टीचें वर्म कळणें म्हणजे धर्म होय, व तें वर्म प्रसंगीं च कळलें पाहिजे. द्रव्य व कन्या हीं कुळ कर्म शोधून मग द्यावींत. तुका म्हणे गांठीं पुण्य असेल तर च उचितासी गांठ पडेल, बुद्धीचें साहाय्य होऊन हातून योग्य तें च वर्तन घडेल. उचित काय हें पुढील अभंगांत सांगताहेत.

॥ ४६७ ॥

॥ वारंवार हा ची न पडावा वीसर । वसावे अंतर तुमच्या गुणीं ॥१॥
॥ धृ ॥ ईछेचा ये दाता तुं येक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥ धृ ॥
॥ लाभाचीये वोढी उतावीळ मन । त्यापरी चींतन चरणाचे ॥२॥
॥ तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥३॥

( ४६७ ) देवा, तूं इच्छिलें देणारा आहेस, समर्थ आहेस, कृपावंत आहेस, मायबाप आहेस—लाभाच्या आशेनें मन जसें ओढलें जातें तसें च माझ्या मनानें तुझ्या चरणांचे चिंतन करावें—हें माझें उचीत आहे. तुझ्या चरणाचा मला विसर पडूं देऊं नकोस—व तुझ्या गुणांनीं माझ्या अतरांत नेहमीं स्थान केलेलें असावें. तुका म्हणे हा माझ्या जीवाच्या जीवनाचा ओलावा आहे व तो पांडुरंगानें आता शीघ्र द्यावा.

॥ ४६८ ॥

॥ भागल्यांचा तुं वीसांवा । करीन नांवा नींबलोण ॥ १ ॥
॥ धृ ॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हारी त्या श्रमा पासुनी ॥ धृ ॥
॥ अनाथांचा आंगीकार । करीतां भार न मानीसी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे इछा पुरे । ते वो धुरे गे वीठले ॥ ३ ॥

( ४६८ ) तूं भागल्याचा विसावा आहेस, मी तुमच्या नांवावरून निंब-लोण करून टाकीन. जीव ओवाळून टाकीन. परमानंदा, पुरुषोत्तमा, मला त्या श्रमापासून वा हरि—रास, तूं अनाथांचा अंगिकार करताना भार मानीत नाहींस. तुका म्हणे तुझ्याजवळ सर्व इच्छा पुरनात असा तूं विठ्ठला, धूरेचा ( आघाटीचा ) कर्णधार, आहेस.

धुरे वीठ्ठले—यास म्हणतात.

॥ ४६९ ॥

॥ कुरवंडी करीन काया । वरुनी पाया गोजिरिया ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ बैसले तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ ध्रु ॥
॥ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वीसांवलों । येथें धालों धणीवरी ॥ ३ ॥

( ४६९ ) तुझ्या गोजीरीया पायावरून काया कुरवडी करीन तुझे रूप जें डोळ्यांत बसलें आहे त्यानें मनाला चाळा लागला आहे. मला तें सोडून पलीकडे सरकवत च नाहीं—एवढी पुरी आवडी बैसली आहे. तुका म्हणे मी येथ विसावलों व माझी हौस फिटली.

॥ ४७० ॥

॥ आइकावीं माझीं कवतुकें उत्तरें । देउनी सादर चीत देवा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ वोरसें आवडी आलों पायांपासीं । होय तें मानसीं सुख दीजे ॥ध्रु॥
॥ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करीतां समाधान लेकराचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जरी बोलतों बोबडें । तरी लाडें कोडें कवतुकें ॥३॥

( ४७० ) म्हणून विसावलेला व धणीवरी धालेला मी जीं कवतुकानें उत्तरें ( वचनें ) बोलत आहे तीं देवा, सादर चित्त देऊन ऐकावीं. मी तुमच्या वोरसाच्या—पान्ह्याच्या—आवडीनें तुमच्या पायापाशीं आलों आहें. तेव्हा तुमच्या मनास येईल, मर्जीस येईल, तसें मला सुख द्यावें लेकराचें समाधान केलेंत तर तुमचें सर्वोत्तम पण काहीं भंग पावणार नाहीं! तुका म्हणे जरी माझे बोल बोबडे आहेत तरी ते लाडे कोडें आलेले आहेत, तुम्ही ते तसें स्वीकारावेत.

॥ ४७१ ॥

॥ कैसा तो देखीला होसील गोपाळीं । पुण्यवंतीं डोळीं नारायणा ॥१॥
॥ध्रु॥ तेणें लोभें जीव जाळासे बराडी । आम्ही ऐसी जोडी कई लाभों ॥ध्रु॥
॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभवीतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाटे देसी आलींगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ३ ॥

( ४७१ ) वरील अभंगात माझीं उत्तरें = शब्द, कौतुकानें ऐका म्हणून म्हटलें तसल्या कवतुकाचे शब्द काहीं वरील अभंगात आले, त्याचा च विस्तार पुढें चालू आहे.

देवा, तुझ्या सवंगड्या गोपाळांनीं तुला केवढा तरी गोड पाहिला असेल! काय रे त्याचे डोळे पुण्यवान म्हणावयाचे! देवा त्या लोभानें माझा जीव बराडी झाला आहे, आम्हांस ही जोडी कधीं होईल, असें मला सारखें वाटत आहे! देवा, तुझें श्रीमुख प्रत्यक्ष पाहाण्याचें, तुझें दर्शन घेण्याचें केवढें रे सुख असेल! तुका म्हणे देवा, तूं मला आलींगन देत आहेस, अशी मला क्षणक्षणा अवस्था होत आहे.

॥ ४७१ ॥

॥ कासया या लोभें केले आर्तभूत। सांगा माझें चीत नारायणा ॥ १ ॥
॥धृ॥ चातकाचे परी येकची नीर्धार। लक्ष भेदी तीर फीरें नेणें ॥ धृ ॥
॥ सावळें रूपडें चतुर्भुज मुर्ती। कृष्ण नाम चीतीं संकल्प हा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करी आवडीसीं ठाव। नको माझा भाव भंगो देऊं ॥ ३ ॥

( ४७१ ) देवा नारायणा! तुम्हीं माझें चित्त येवढें आर्तभूत कां हो केलेंत! मला येवढा लोभ कां लावलात? माझ्या चित्तांत सारखें सावळें चतुर्भुज मूर्तीचें रूपडें चमकत आहे व मुखीं कृष्णनाम असावें असा सारखा मनांत संकल्प उठत आहे. देवा माझी आवडी पुरेल असें ठिकाण निर्माण करा. माझा भाव भंग पावेल असें कांहीं हि करू नका. चातकाप्रमाणें माझा एक च निर्धार आहे, चतुर्भुज सांवळें मी पाहीन, भोगीन ही गोष्ट मी लक्ष्यभेद करून नेमकी साधीन परत फिरणार नाहीं.

॥ ४७२ ॥

॥ काय माझा पण होईल लटीका। ब्रीद्रावळी लोकां दावीली ते ॥ १ ॥
॥धृ॥ खरी करोनीयां देई माझी आळी। येउनी कुरवाळी पांडुरंगे ॥ धृ ॥
॥ आणीक म्यां कोणा म्हणवावे हातीं। नये काकुळती दुजीयासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मज येथें ची ओळखी। होईन तो सुखी पायांनींच ॥ ३ ॥

( ४७२ ) देवा, आजवर तुझी ब्रीदावळी गाऊन लोकांस दाखविली तो माझा पण लटिका का होणार आहे! देवा तसें नका करुं. देवा माझी आळी म्हणजे हट्ट खरा करून दे—मला एकवार कुरवाळ वरें! देवा मला दुसऱ्यांची काकुळती करावी लागेल असें करू नका! मी दुसऱ्या कोणाम काकुळतीस यावयाचे! तुका म्हणे मला येथें ओळख पटली आहे. प्रचीती आली आहे कीं मी या पायांजवळ च सुखी होईन. हे कवतुकाचे बोल आहेत, त्या कोड-कौतुकानें तुम्ही ते स्वीकारावेत.

॥ ४६९ ॥

॥ कुरवंडी करीन काया । वरुनी पाया गोजीरीया ॥ १ ॥
॥ धृ ॥ बैसले तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ धृ ॥
॥ परते न सरवें दुरी । आवडी पुरी बैसली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वीसांवलो । येथें घालों धणीवरी ॥ ३ ॥

( ४६९ ) तुझ्या गोजीरीया पायावरून काया कुरवंडी करीन. तुझें रूप जें डोळ्यांत बसलें आहे त्यानें मनाला चाळा लागला आहे. मला तें सोडून पलीकडे सरकवत च नाहीं — एवढी पुरी आवडी बैसली आहे. तुका म्हणे मी येथें विसांवलो व माझी हौस फिटली.

॥ ४७० ॥

॥ आइकावीं माझी कवतुके उतरें । देउनी सादरें चीत देवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ वोरसें आवडी आलो पायांपासी । होय तें मानसीं सुख दीजे ॥धृ॥
॥ तुमचे न भंगे सर्वोत्तमपण । करीतां समाधान लेकराचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जरी बोलतो बोबडे । तरी लाडें कोडें कवतुकें ॥३॥

( ४७० ) म्हणून विसावलेला व धणीवरी घालेला मी जीं कवतुकानें उत्तरें ( वचनें ) बोलत आहे तीं देवा, सादरें चित्त देऊन ऐकावीं. मी तुमच्या वोरसाच्या — पान्ह्याच्या — आवडीनें तुमच्या पायापाशीं आलों आहें. तेव्हां तुमच्या मनास येईल, मर्जीस येईल, तसें मला सुख द्यावें. लेकराचें समाधान केलेंत तर तुमचें सर्वोत्तम पण कांहीं भग पावणार नाहीं ! तुका म्हणे जरी माझे बोल बोबडे आहेत तरी ते लाडे कोडे आलेले आहेत, तुम्हीं ते तसे स्वीकारावेत.

॥ ४७१ ॥

॥ कैसा तो देखीला होसील गोपाळीं । पुण्यवंती डोळीं नारायणा ॥१॥
॥धृ॥ तेणें लोभें जीव जाळासे वराडी । आम्हीं यैशी जोडी कई लाभो ॥धृ॥
॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवे श्रीमुख अनुभवीतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाटे देसी आलींगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ३ ॥

( ४७१ ) वरील अभंगांत माझीं उत्तरें = शब्द, कौतुकानें ऐका म्हणून म्हटलें. तसल्या कवतुकाचे शब्द काहीं वरील अभंगांत आले, त्याचा च निस्तार पुढें चालू आहे.

देवा, तुझ्या सवंगड्या गोपाळांनीं तुला केवढा तरी गोट पाहिला असेल! काय रे त्यांचे डोळे पुण्यवान म्हणावयाचे! देवा त्या लोभानें माझा जीव वराडी झाला आहे, आम्हांस ही जोडी कधीं होईल, असें मला सारखें वाटत आहे! देवा, तुझे श्रीमुख प्रत्यक्ष पाहाण्याचें, तुझें दर्शन घेण्याचें केवढें रे सुख असेल! तुका म्हणे देवा, तूं मला आलींगन देत आहेस, अशी मला क्षणक्षणा अवस्था होत आहे.

॥ ४७२ ॥

॥ कासया या लोभें केलें आर्तभूत। सांगा माझें चीत नारायणा ॥ १ ॥
॥ध्रु॥ चातकाचे परी येकचीं नीर्धार। लक्ष भेदी तीर फीरों नेणें ॥ ध्रु ॥
॥ सावळें रूपडें चतुर्भुज मुर्ती। कृष्ण नाम चीतीं संकल्प हा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करीं आवडीसीं ठाव। नको माझा भाव भंगों देऊं ॥ ३ ॥

( ४७२ ) देवा नारायणा! तुम्हीं माझें चित्त येवढें आर्तभूत कां हो केलेंत! मला येवढा लोभ कां लावलात? माझ्या चित्तांत सारखें सावळें चतुर्भुज मूर्तीचें रूपडें चमकत आहे व मुखीं कृष्णनाम असावें असा सारखा मनांत संकल्प उठत आहे. देवा माझी आवडी पुरेल असें ठिकाण निर्माण करा. माझा भाव भंग पावेल असें कांहीं हि करूं नका. चातकाप्रमाणें माझा एक च निर्धार आहे; चतुर्भुज सांवळें मी पाहीन, भोगीन ही गोष्ट मी लक्ष्यभेद करून नेमकी साधीन परत फिरणार नाहीं.

॥ ४७३ ॥

॥ काय माझा पण होईल लटीका। ब्रीद्रावळी लोकां दावीली ते ॥ १ ॥
॥ध्रु॥ खरी करोनीयां देई माझी आळी। येउनी कुरवाळी पांडुरंगे ॥ ध्रु ॥
॥ आणीक म्यां कोणा म्हणवावे हातीं। नये काकुळती दुजीयासी ॥२॥
॥ तुका म्हणे मज येथें चीं ओंळखी। होईन तो सुखी पायांनींच ॥ ३ ॥

( ४७३ ) देवा, आजवर तुझी ब्रीदावळी गाऊन लोकांस दाखविली तो माझा पण लटिका को होणार आहे! देवा तसें नका करूं. देवा माझी आळी म्हणजे हट्ट खरा करून दे —मला एकवार कुरवाळ बरें! देवा मला दुसऱ्यांची काकुळती करावी लागेल असें करू नका! मी दुसऱ्या कोणास काकुळतीस यावयाचे! तुका म्हणे मला येथें ओळख पटली आहे. प्रचीती आली आहे कीं मी या पायांजवळ च सुखी होईन. हे कवतुकाचे बोल आहेत, त्या कौट-कौतुकानें तुम्ही ते स्वीकारावेत.

॥ ४७४ ॥

॥ नको माझे मानूं आहाच ते शब्द। कळवळ्याचा वाद करीतसे ॥ १ ॥
॥धृ॥ कासयाने वळ करूं पायापाशीं। भाकावी ते दासी करुणा आम्हीं॥धृ॥
॥ काय मज चाड असे या लौकीक। परी असे नीके अनुभवाचें ॥ २ ॥
॥ लाचावल्यासाठीं वचनाची आळी। टकळ्यान घोळी जवळी मन॥३॥
॥ वाटतसे आस पुरवीसी येसं। तरी अंगीं पीस लावीयेल ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे माझी येथेंची आवडी। श्रीमुखाची जोडी ईच्छतसे ॥५॥

( ४७४ ) देवा हे माझे शब्द उगा च काहीं तरी आहेत असं मनात आणू नकोस, मी तुझ्यापाशीं हा वाद जिवाच्या कळकळीनें करीत आहे देवा, तुमच्या पायाजवळ येऊन मी काहीं शक्ति का दाखविणार आहे – का दांडगाई करणार आहे! आम्ही दासानीं आपली करुणा भाकावी येवढें च आम्हास ठाऊक मला या लौकिकाची काहीं चाड वाटतें का – पण मला खरा अनुभव असावा अशी चाड वाटते. देवा मी जी आळी घेतली आहे ती तुमचें काहीं तरी वचन मी ऐकाव म्हणून व त्यासाठीं टकळा करून मन चरणाजवळ घोळत आहे तू माझी आस पुरविशील असें मला वाटतें – व त्यानें अंगीं वेडसरपणा ( पिसें ) आला आहे तुका म्हणे माझी आवडी येथें जडली आहे व श्रीमुखातून काहीं शब्द यावेत – व त्याची मला जोडी व्हावी ही मी इच्छा करून आहे

॥ ४७५ ॥

॥ तुम्हा आम्हा जव जालीया समान। तेथ कोणाकोण सनमानी ॥ १ ॥
॥ धृ ॥ उरी तों राहीले गोमटें गौरव। वोढे माझा जीव पायापाशीं ॥ धृ ॥
॥ नेणपणे आम्हीं आळऊ वोरसे। बोलावीतो रस शब्दरत्नें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लळे पाळीं वो वीठले। का हे उरवीले भेदाभेद ॥ ३ ॥

( ४७५ ) देवा तुम्ही आम्ही जर समान ( बरोबरीचे ) सारखें झालों तर मग येथें कोणास कोण सन्मानील? तुमचें गौरव करावयास मला वाव आहे हें गोमटें, चागलें – गोड आहे माझ्या जिवास तुमच्या पायाजवळ वोढ घेण्यास वाव आहे हें हि गोमटें आहे आम्हीं तुम्हास नेणपणें वोरसें ओळवू – व या शब्दरत्नानीं तुम्हास बोलावीत आहे तुका म्हणे विठ्ठले हे लळे पाळ वर का – तेवढ्यासाठीं तर हे भेदाभेद ठेवले आहेत. राखले आहेत हा अभंग सडा खाली सासर, या अभगास पूरक आहे

॥ ४७६ ॥

॥ तीर्थाचीये आसे पंथ तो नीदैव । पावीजेतो ठाय अंतराये ॥१ ॥
॥ ध्रु ॥ म्हणउनी भले नीस्चळची स्थळी । मनाचीये मुळीं वेसोनीया ॥ ध्रु ॥
॥ संकल्पारूढ ते पराधीन जीण । कार्यची कारण वाढतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कामा नाहीं येक मुख । जीरवितां सुख होते पोटीं ॥ ३ ॥

( ४७६ ) तीर्थाच्या आशेनें जो रस्ता चालू लागतो —तो निर्देवी समजला पाहिजे कारण त्यामुळे—मूळ ठिकाणाशीं, श्रीहरीशीं, अतराय होतो म्हणून मन एकाग्र करून निश्चळ बसलेलें उत्तम. जें मन सकल्पारुढ असतें तें पराधीन असतें कारण त्यामुळें कार्यकारणभाव वाढत च असतो तुका म्हणे—कामास—इच्छेस काहीं एक च मुख नाहीं. तेव्हा तीं जिरविली असतां पोटीं सुख होतें.

॥ ४७७ ॥

॥ अभीनव सुख तरी या वीचारे । वीचारावे वरे संत जनी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ रुपाच्या आठवे दोन्ही हीं आपण । वीयेग तो क्षण होत नाहीं ॥ध्रु॥
॥ पुजा तरी चीती कल्पा ते ब्रह्मांड । आहा च तो खंड येक देसी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझा अनुभव यापरी । डोई पायांवरी ठेवीतसे ॥ ३ ॥

( ४७७ ) तेव्हा तीर्थाची आशा न करिता देवाच्या रूपाचा आठव झाला कीं आपण दोन्हीं ठिकाणीं होतों, असतों. तेव्हा या अभिनव सुखाची गोष्ट सतजनानीं अनुभव घेऊन स्वतःस च विचारून पहावी. कारण रूपाच्या आठवानें आपणास अतरात तें ठिकाण पावतें व लाव आहोंत म्हणून तो आठव कमी होत नाहीं देवाची पूजा करू म्हणाल तर कल्पा तें ब्रह्माड, सर्व ब्रह्माड जरी त्यास वाहीलेत तरी कमी च पडेल. तेव्हां एकदेशी काहीं खड पाहून पूजा केली तर तीं आहाच—कशीशीच होणार—तुका म्हणे माझा अनुभव हा असा आहे म्हणून मी पायावरी डोई ठेवीत आहे. देहीं देव आहे—जीवीं शीव आहे—तेव्हा देव शोधीत तीर्थे धुडाळावयास नकोत.

॥ ४७८ ॥

॥ क्षीणक्षीणा हाची करावा वीचार । तरावया पार भवसींधु ॥ १ ॥
॥ध्रु॥ नासीवत देह जाणा रे सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥ध्रु॥
॥ संत समागमीं धरुनी आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येहलोकीच्या वेव्हारे । नये डोळे धुरे भरुनी राहो ॥ ३ ॥

( ४७८ ) भवसिंधु तरून जाण्यासाठीं हा क्षणक्षणाला विचार करावा कीं हा देह नाशिवंत आहे व काळ आयुष्य खात आहे — तेव्हां सावधान! तेव्हां सत्‍-समागमीं आवडी धरुन परमार्थाची तांतडी करावी. तुका म्हणे — इहलोकींच्या वेव्हारे डोळे भरून घेऊन — आंधळे होऊन धुंद होऊन राहू नये.

॥ ४७९ ॥

॥ कोणासी वीचार करावा सेवटीं। येवढ्या लाभे तुटी जाल्या तरे ॥१॥
॥धृ॥ सांभाळीं तो शुर आला घाव डाव। पुढें दीला पाय न करी मागें ॥धृ॥
॥ घात तो या नांवे येथे अंतराय। अंतरल्या पाय गोवींदाचे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गडसंदीचा हा ठाव। केला तो उपाव कार्या येतो ॥ ३ ॥

( ४७९ ) आपलें काय थोर पुण्य होतें म्हणून मनुष्यदेहासारखा लाभ झाला, यास जर भवसिंधु पार होतां आलें नाहीं तर कोणाच्या आधारानें विचार करावा? शूर तो कीं आलेला घाव, डाव सहन करतो व पुढें टाकलेला पाय कधीं हि मागें घेत नाहीं. जगांत घात म्हणून कांहीं असेल तर गोविंदाच्या पायांशीं अंतराय होणें हा. तुका म्हणे हा गडसंदीचा ठाव — पेचप्रसंग आहे — येथें जो उपाय करावा तो कार्यास येतो. वरील चार अभंग याच क्रमानें संताजीच्या गाथ्यांत ( ८८—९१ ) आहेत. गोडव्यांत शूर शब्दार्चा व्याख्या आहे.

॥ ४८० ॥

॥ जन्मा आलीयाचा लाभ। पद्मनाभ दरुषणे ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाठीलागा येता काळ। तुं कृपाळ माउली ॥ धृ ॥
॥ कोण्या उपायें हे घडे। भव आंगडें सुटकेचें ॥ २ ॥
॥ बहु उसंतीत आलों। तया भ्यालों स्थळासी ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे तुं जननी। ये नीर्वाणी वीठले ॥ ४ ॥

( ४८० ) पाठीवर काळ सारखा येत आहे च पण देवा, तू माउलीपणानें सांभाळ करतोस. म्हणून, पद्मनाभ दर्शनानें, जन्मास आल्याचा लाभ झाला, — हें भवरोगाचें आंगडें कोणत्या उपायानें सुटेल — अशा भीतीनें — त्या स्थळाच्या भीतीनें मी पुष्कळ वाट उसंतींत — आक्रमण करीत आलों तेव्हां निर्वाणाचें ( निवाड्याचें ) वेळीं हे विठ्ठलें तूं च आईसारखें सांभाळतेस.

॥ ४८१ ॥

॥ जेणे वाढे आपकीर्ती। सर्वार्थी ते वर्जावे ॥ १ ॥
॥ धृ ॥ सत्य रुचे भलेपण। वचन ते जगासी ॥ धृ ॥
॥ होईजेत शुर त्यागें। वाउगें ते सारावे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खोटें वर्म। नीच कर्म काळीमा ॥ ३ ॥

(४८१) जेणें अपकीर्ती वाढेल—अशी गोष्ट—सर्वतोपरी त्याज्य आहे. जगाला सत्य हें भलेपणानें मानवते. वावगें जें आहे तें बाजूस सारून—त्यागानें शूर व्हावें. तुका म्हणे खोटें वर्म जर हातीं आलें तर हातून कर्म निंद्य व्हावयाचें व तोंडास काळीमा यावयाची.

॥ ४८२ ॥

॥ सहज पावतां भगवंती। परी हीं वीकल्पें परती।
॥ फुकाची हे चीती। आठवण कां न धरीती ॥ १ ॥
॥ धृ ॥ हरी व्यापक सर्वगत। हें तच मुख्यत्वें वेदांत।
॥ चींतनासी चीत। असों द्यावें सावध ॥ धृ ॥
॥ वीरजा होम याची नांवें। देह नव्हे मी जाणावें।
॥ मग कां जी यावें। वरी लागे संकल्पा ॥ २ ॥
॥ कामक्रोधें देह मळीण। स्वाहाकारीं कैचें पुण्य।
॥ मंत्रीं पुजीयेला यज्ञ। मन मुंडण न घडे ची ॥ ३ ॥
॥ अनन्य भक्तीचे उपाय। ते या वीठोबाचे पाय।
॥ ध्याईल तो काय। चुकी जाणें मारग ॥ ४ ॥
॥ आतां सांगे तुका। तुम्ही येक चुकों नका।
॥ सांडी मांडी धोका। शरण रीघतां गोमटें ॥ ५ ॥

(४८२) माणसांना देव सहज प्राप्त होण्याजोगा असतांना—म्हणजे तो सह—ज—जन्मतःच बरोबर असतांना विकल्पानें ही माणसें परती पारखी-होतात—नुसती फुकाची त्याची आठवण हि ठेवीत नाहींत यास काय म्हणावें! आहो—हरी हा सर्वव्यापक सर्वगत—सर्व—ठिकाणीं आहे. हें वेदांताचें मुख्य तत्त्व आहे ना? मग या येवढ्या चिंतनास चित्त सावध कां ठेवीत नाहीं? देह म्हणजे कांहीं मी नव्हे, याच नांव विरजा होम ना? (म्हणजे संन्यास देतांना जो होम करतात तो) तर मग हा होम करून तुम्ही संकल्पावर कसें येता? मी संन्यासी आहे. मला अमुक त्याज्य अमुक ग्राह्य या संकल्पावर कसें येतां? यावें कां लागतें? असें जर आहे—तर मग कामक्रोधानें देह मळीण असतांना किंवा नंतर होत असतांना तुम्ही स्वाहा म्हणून काय वाहिलेंत? व असा शाब्दिक स्वाहाकार केल्यानें—तुम्हांस पुण्य तें काय व कसचें लागावयाचें? मनाचें मुंडण न होतां—तुम्ही नुसता क्षौर करतां—तर तुम्हांस मंत्रानें यज्ञ पुजिल्याचा लाभ हा काय होणार? तेंव्हां हा विरजा होम, हा स्वाहाकार, हें मुंडण व हा यज्ञ हीं तुम्हांला भगवंता

जवळ नेणारीं नाहींत — नेत नाहींत. तर अनन्यभक्तींच्या उपायांनी जो कोणी या विठोबाचे पाय ध्याईल तो मार्ग चुकेल काय? कधीं हि चुकणार नाहीं. म्हणून तुका तुम्हांस स्पष्ट बजावीत आहे कीं सांडीमांडींत धोका आहे, विठोबास अनन्यत्वानें शरण जाणें ही एवढी च गोमटी गोष्ट आहे, तेव्हां यांत चूक होऊं देऊं नका.

हा अभंग यज्ञसंस्था, संन्यास धर्म यांवर स्पष्ट बोट फिरवीत आहे. तुम्ही म्हणता त्या गोष्टी सर्व कबूल करून तुमचें ध्येय साधले असें जरी कबूल केल तरी तुम्ही देवापासून दूर राहता — तेव्हा हे उपाय निरर्थक आहेत. त्यांत धोका आहे, असें सांगून अनन्य भक्तीचा उपाय सांगतात व या अभंगास पूरक म्हणून पुढील अभंगांत स्पष्टपणें आपला स्वतःचा अनुभव सांगतात कीं:—

॥ ४८३ ॥

॥ हा गे माझा अनुभव। भरती भाव भाग्याचा ॥ १ ॥
॥ धृ ॥ केला ऋणी नारायण। नव्हे क्षण वेगळा ॥ धृ ॥
॥ घालोनीयां भार माथा। अवघी चींता वारीली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वचनासाठीं। नाम कंठीं धरुनी ॥ ३ ॥

(४८३) माझ्या ठिकाणीं जो भक्तीच्या प्रत्यक्षतेचा भाव आहे त्या भाग्यानें मला जो अनुभव मिळाला तो असा कीं नारायण माझा ऋणवई होऊन मला एक क्षण हि सोडून नसतो. मी माझ्या जीवित्वाचा अवघा भार त्याचे माथ्यावर घातला व त्यानें माझी अवघी चिंता वारली. हा त्याचेवर भार मी एका वचनानें घातला व त्याची खूण म्हणून त्याचे नाम कंठीं धारण केलें आहे.

॥ ४८४ ॥

॥ देव आहे सुकाळ देसीं। अभाग्यासी दुर्भीक्ष्य ॥ १ ॥
॥ धृ ॥ नेणती हा करुं सांटा। भरले फाटा आडरानें ॥ धृ ॥
॥ वसउनी असे घर। मग दुर घातला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मन मुरे। उरला उरे तो गे तुं ॥ ३ ॥

(४८४) अहो, जगांत देवाचा सुकाळ आहे. जे अभागी असतात, त्यांना त्याचें दुर्भिक्ष असतें. त्यांच्या बुद्धीस फाटा पडून ते आडरानांत शिरतात यामुळें त्यांस हा साठा करतां येत नाहीं. अहो, हा देव इतका सोपा आहे कीं आपण जें शरीर धारण केलें आहे. त्यात च तो घर करून आहे. तुका म्हणे आज,

मी मी पणानें जें मन उडचा घेत आहे—तें जर जागच्या जागीं मुरलें. व कोणी च मी नव्हे—कोणीये जातीचा।—ही प्रतीति आली कीं मग जें उरलें—उरतें, तो च तो.

अर्जुनपण न घेतां। मी ऐसें जें पंडुसुता। उठतसे तत्वतः। ते तयाचें रूप॥

४८२ व्या अभंगांत सुरवातीस—सहज पावता भगवंतां—अशी सुरवात करून त्यांत येणाऱ्या विकल्पांचीं ठिकाणें सांगून भगवंत सहज अनन्य भक्तीनें कसा लाधतो हा स्वतःचा अनुभव सांगतो म्हणून सांगून तो कसा आहे हें—तुका म्हणे मन मुरे। उरला उरे तो गे तूं—असें, शेवटच्या चरणांत सांगितलें व देव प्रत्येकाचे हातांत दिला. नाहीं देखिला जो डोळा। देव दासवूं सकळा—तो हा येथें दाखविला—हातांत दिला.

तुका म्हणे मन मुरे। उरला उरे तो गे तूं।—त्यास उद्देशून म्हणताहेत

॥ ४८५ ॥

**॥ नटनाट्य तुम्हीं केलें याचसाठीं। कवतुकें द्रुस्टी नीववावी॥ १ ॥**

**॥ध्रु॥ नाहीं तरि काय कळलें चि आहे। वाघ आणि गाय लांकडाची॥ धृ ॥**

**॥ अभेदची असें मांडियेले खेळा। केल्या दीपकळा बहु एकु॥ २ ॥**

**॥ तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत। संतोपाची मात दुसरें तें॥ ३ ॥**

(४८५) देवा, माझी दृष्टी कवतुकानें निववावी म्हणून तुम्हीं हा विश्वाचा पसारा मांडला—एरव्हीं लाकडाची च गाय व वाघ आहे. म्हणजे मूळ जिन्नस—जिवंतपण—हे दोघांत हि एक च आहे. व तें सूत्र तुझ्या हातीं आहे. एका च दिव्यावर पुष्कळ दिवे लावावेत—अशा तऱ्हेनें भेद करून अभेदाचा खेळ मांडियेला आहेस. देवा, रूप कांहीं दर्पणांत नसतें—तर त्या रूपाचा संतोप स्वतःजवळ च असतो.

॥ ४८६ ॥

**॥ सुटोनीयां दोरी आपणीयापासीं। वावडी आकासीं मोकलीली॥ १ ॥**

**॥धृ॥ आपलीया आहे मालासी जतन। गाहाणाचे रुण बुडो नेणं॥ धृ ॥**

**॥ बीज नेलें तेथें येईल अंकुर। जतन तें सार करायाचीं॥ २॥**

**॥ तुकां म्हणे माझी नीरच्चींतीची सेवा। वेगळे नाहीं देवा उरी दीलें॥३॥**

(४८६) तुम्हीं पतंगाची दोरी आपणाजवळ ठेवून पतंग तेवढा आकाशांत सोडला आहे. तेव्हां ही जी पतंगाची दोरी तुम्हीं आपल्या हातांत ठेविली

आहेत ही तुमची मालाची जतन आहे. व जिवदान देऊन—जीवास जो आकाशांत सोडून त्याची दोरी स्वतःजवळ ठेविली आहेत— ही आपलें गाहाण जपण्याची तुमची सावकारी रीत आहे. बीज हें कोठें हि नेलें तरी त्यास अंकुर येईल च — मुख्य गोष्ट त्या बीजाची जतन करणें ही आहे. देवा तुझ्याबद्दल मी पूर्ण निश्चिंत होऊन तुझी सेवा करीत आहे— मी निश्चितीनें अशाबद्दल आहे कीं — तुम्ही या पतंगाची दोरी हातांत ठेविली आहेत. तेव्हां याचे खेळ तुम्ही सूत्र हालवाल तसे —तेवढे— होतील. तुम्ही खेळ पुरे म्हणाला कीं तो पुरे होईल.

॥ ४८७ ॥

॥ नाहीं गुण दोष लींपो देत आंगीं । झाडीतो प्रसंगीं बरावरी ॥ १ ॥
॥धृ॥ नीकट वासीया आळवीतों धावा । येथुनी देवा सोडउनी ॥ धृ ॥
॥ उमटे अंतरीं तें करुं प्रगट । काढोनी बोभाट धांव घाली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तरी वाचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी आसो ॥३ ॥

(४८७) वेगळे नाहीं देवा उरो दिल्हे। ही गोष्ट देवा, तुम्हीं आति कसोशीनें करतां. तुम्ही माझ्या अंगास गुणदोषाचा मळ लागूं देत नाही. तो वरचेवर झाडून टाकतां, म्हणून हे निकटवासीया, मी धावा करून तुम्हांस आळवीत आहे कीं देवा, मला येथून सोडवावें. अंतरांत जें उमटेल तें बोभाट करून प्रगट करूं. तेव्हां तुम्ही धाव घालता म्हणून आजवर आम्हीं वाचलों. समर्थाच्या बळानें आम्ही सुखी आहोत.

वरील तीन अभंगांत भक्त हृदयांत देवाची प्रतीति काय असते ती सांगितली तीं च गोष्ट पुढें सांगताहेत.

॥ ४८८ ॥

॥ हारपोनी गेली नीशी । नीद्रा कैसी न देखों ॥ १ ॥
॥ धृ ॥ नारायणीं वसलें घर । नीरंतर आनंद ॥ धृ ॥
॥ आवघा रुधवीला ठाव । नेलें वाव मी माझें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येके ठायीं । असों नाहीं सीण भीन्न ॥

(४८८) समर्थाचें बळें सुखी असो म्हणून म्हटलें तें कसें हें सांगताहेत. अज्ञानाची रात्र असते ती काय, त्यांत बुद्धीवर झापड येऊन झोप येते ती काय, लागते. ही गोष्ट आम्हांस दिसूं दिली नाहीं. ज्ञाननिष्ठेवर आम्ही घर केल्यानें आम्हांस निरंतर आनंद च आहे. काळास रुधविला (अडसर घातला) व मी—माझें ही गोष्ट काढून टाकली. तुका म्हणे आम्हीं एके ठायीं आहोंत—आम्हांस

भिन्नपणाचा गोण नाहीं. जीवपरमात्मा दोन्हीं एकासनीं विराजमान झालेले आहोंत.

॥ ४८९ ॥

॥ याची सवे लागली जीवा। गोडी हेवा संगाचा ॥ १ ॥
॥ धृ ॥ परते न सरवे दुरी। क्षण हरी पासोनी ॥ धृ ॥
॥ जाले तरी काय तट। आता चट न संडे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चक्रवाळे। वेड बळे लावीलें ॥ ३ ॥

( ४८९ ) तुका म्हणे एके ठायीं असो—तें इतकें कीं त्यापासून पलीकडे क्षणभर हि दूर सरवत नाहीं, याची सवय आम्हास एवढी लागली आहे—व याच्या संगाच्या गोडीचा हेवा इतका वाढला कीं आतां काहीं जरी तट पडले ( पक्ष पडले ) तरी याची चट मला सोडता येणार नाहीं. यानें मला बळानें येवढें वेड लावल आहे कीं माझी स्थिति चक्रवाक—चक्रवाळ—पक्ष्यासारखी झाली आहे.

चक्रवाक पक्ष्यासारखी स्थिति झाल्यावर—याती कुळ माझें गेलें हारपोनी—अशा स्थितींत म्हणताहेत.

॥ ४९० ॥

॥ याचा तव हाची मोळा। देखीला डोळा उदंड ॥ १ ॥
॥ धृ ॥ नेदी मग फीरों मागे। आगां अंगे संचरे ॥ धृ ॥
॥ कां गे याची नेणा खोडी। जीभा जोडी करीतसा ॥ २ ॥
॥ पाचरें ते बहु काळे। गोवळे ही ठाईचे ॥ ३ ॥
॥ अंगीं वसेची ना लाज। न म्हणे माज कोणाची ॥ ४ ॥
॥ सर्व साक्षी अबोल्यानें। दुश्चीत कोणे नसावें ॥ ५ ॥
॥ तुका म्हणे धरीले हातीं। मग नीश्चींती हरीन ॥ ६ ॥

( ४९० ) यानें मला येवढें वेड लावलें आहे कीं हा मला मागे फिरूं च देत नाहीं अगात अंग घालून संचार करतो याचा हा मोळा ( रिवाज, प्रकार—वागण्याची तऱ्हा ) मीं आजवर उदंड पाहिला आहे हा आपल्या जीभेला त्याची जीभ लावतो—ही याची खोडी का ग तुमच्या लक्ष्यात येत नाहीं हें ठाइचें—बहुकाळें—यानें पाचरलें आहे याच्या आगीं लाज कशी ती नाहीं—हा, ही कोणाची बायको हें हि गोवळा विचारीत नाहीं हा अबोल्यानें सर्व साक्षी असतो तेव्हां येथें कोणी दुश्चीत राहू नका तुका म्हणे एकदा या हरीनें हातीं धरिल कीं निश्चिंती समजावी.

॥ ४९१ ॥

॥ प्रसीद्ध हा असे जगा। अवघ्या रंगा रंगाचा ॥ १ ॥
॥ धृ ॥ तरी वाटा न वजे कोणी। नारायणी घरबुडी ॥ धृ ॥
॥ बहुतां ऐसें केलं मागें। लाग लागे लागेना ॥ २ ॥
॥ हो कां नर अथवा नारी। लहान थोरीं आदर ॥ ३ ॥
॥ जालें वेगळें लोकीं पुरे। मग नुरे समुळ ॥ ४ ॥
॥ कळे ना तो आहे कैसा। कोणी दीशा बहु थोडा ॥ ५ ॥
॥ तुका म्हणे दुसऱ्या भावें। छाये नावें न देखवें ॥ ६ ॥

(४९१) हा निरनिराळ्या रंगानें रंगांत मिळून असतो अशी याची प्रसिद्धि आहे—म्हणून याच्या वाटेस कोणी जात नाहीं—हा नारायण घरांत—या देहांत बुडी मारून असतो. यानें मार्गे पुष्कळांना असें च केलें. त्यांचा लाग हि लागत नाहीं. मग तो नर असो वा नारी—लहान असो कां थोर असो—त्याचा याला कांहीं आदर वाटत नाहीं. तुम्ही जनांतून—लोकांतून—वेगळे निघाला की याला पुरतें. मग तो सर्वस्वीं तुम्हांस मारून टाकतो—समूळ नुरे—कोणत्या दिशेला तो आहे—फार आहे कां थोडा हें—हि कळत नाहीं—तुका म्हणे दुसऱ्या—नांवें—भावें—दुसऱ्या छाये—न देखवे.

॥ ४९२ ॥

॥ न संडावा आतां ऐसे वाटे ठाव ॥ भयासी उपाव रक्षणाचें ॥ १ ॥
॥धृ॥ म्हणउनी मनें वळीयेलें मनें। कारीया कारणें चाड नाहीं ॥ धृ ॥
॥ नाणावी उपाधी करुनीयां मुळ। राखतां वीटाळ तें चीं व्हावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येथें न वेचे वचन। नीजीं नीज खुण सांपडली ॥ ३ ॥

(४९२) याचा ठाव आतां सोडूं नये असें वाटतें, कारण, भवभयास याचा रक्षणाचा उपाय असतो. म्हणून कार्याकारणावर लक्ष्य न ठेवितां मनानें मन वळवून याचे सोईं लावलें. कांहीं तरी निमित्तानें, उपाधी, मध्यें आणली, तिला जर मूळ धरूं दिलें तर तो विटाळ राखतांना आपण च तसें होऊं, तुका म्हणे येथें मी कोणतें हि वचन वेचीत नाहीं. कारण नीजीं—निजरूप—सांपडली.

॥ ४९३ ॥

॥ सत्तेचें भोजन समयी आतुडे। सेवन ही घडे रुचीनें चीं ॥ १ ॥
॥धृ॥ वर्मे भ्रम नेला जाले एकमय। हृदयस्थीं सोय संग जाला ॥ धृ ॥
॥ कोथळीस जमा पडलें संचीत। मापल्याचा वीत्त नेम जाला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धणी ऐसा जालों आतां। करीन ते सता माझी आहे ॥३॥

( ४९३ ) यामुळें, निजखूण सांपडल्यानें, सत्तेचें भोजन, वेळीं च वेळेवर त्यापुढें सांपडतें – मिळतें. व त्याचें सेवन हि रुचीनें होतें. मला सर्व वर्मे ठाउक झाल्यानें भ्रम नाहींसा झाला. आपली सोय हृदयस्थाशीं च आहे असें कळलें व त्याच्याशीं संग झाला. संचित हें कोथळींत भंडारांत पडलें व आपलें वित्त किती हें मापलें गेलें. तुका म्हणे मी आतां धनी झालों आहे, व जी करीन ती सत्ता माझी आहे. करीन ती सत्ता माझी आहे या साध्या वचनांत केवढा अर्थ सांठविलेला आहे ! त्या सत्तेचें वर्णन करितात:—

॥ ४९४ ॥

॥ रवीचा प्रकाश । तो ची नीशी घडे नाश ।
॥ जाल्या बहुवस । तरी त्या काय दीपीका ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां हा ची वसो जीवीं । माझें अंतरीं गोसावी ।
॥ होउ येती ठावी । काय वर्मे याच्यानें ॥ धृ ॥
॥ सवे असतां धनी । आड येउं न सके कोण्ही ।
॥ नलगे वीनवणी । पृथकाची करावी ॥ २ ॥
॥ जन्माचीया गती । येणें अवस्था खुंटती ।
॥ कारण ते प्रीती । तुका म्हणे जवळी ॥ ३ ॥

( ४९४ ) रवीचा प्रकाश होतां च रात्रीचा नाश होतो आणि तारका पण त्या ( गो म्हणजे इंद्रियें त्यांचा स्वामी म्हणजे मालक किंवा त्या इंद्रियांत जी ज्ञानसत्ता वास करीत आहे ती ) पुष्कळ जगीं असल्या तरी त्या दीपिकाचें काय होय ? तेव्हां आतां हा गोसावी माझें अंतरीं वसो, याच्यानें सर्व वर्मे ठाऊक होतील. धनी आपल्याबरोबर असतांना – कोण्ही हि आड येऊं शकत नाहीं, व प्रत्येकाची वेगवेगळाली विनवणी करावी लागत नाहीं. याच्यानें जन्माच्या अवघ्या गती खुंटतात. याचें कारण हें कीं याची प्रीति आपणाजवळ असते.

॥ ४९५ ॥

॥ आतां येणें पडीपाडें । रस सेउं हा नीवाडें ।
॥ मुंगी नेली गोडें । ठेवीलीये अडचणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडी केशवा ।
॥ वीशय बुधी हेवा । वोस पडो मकळ ॥ धृ ॥
॥ भुकेलीया स्वाना । गाठी पडे सवें अन्ना ।
॥ मुकों पाहे प्राणा । परी तोंडीचें न सोडी ॥ २ ॥
॥ कामें जींकीयेलें मन । जीवीत्व कामातुरा तृण ।
॥ मागे व्यभीचारीण । भक्ती तुका ये जाती ॥ ३ ॥

(४९५) हा जवळ असताना जन्माच्या गती कुंठित होतात म्हणून सांगितलें.

तैसें माझ्या जीवास होऊं दे – देवा, मी तुमचे चरण सोडीत नाहीं, माझ्या ठिकाणीं वसत असलेला विषयबुद्धीचा हेवा ओस पडो व याचा रस – याच्या प्रीतीचा रस – गोड असेल तेथें मुगी जशी – कोणती हि अडचण न जुमानता जाईल – तसा पहीपाडें – यत्नाप्रयत्नानें सेवन करण्यास मला बुद्धि दे. यास दृष्टांत असे –भुकेलीया कुत्र्याची अन्नासवें गाठी पडल्यावर तो एकवार प्राण देईल पण (१) तोंडचें सोडणार नाहीं (२) कामानें मन जिंकल्यावर जीवित्व हें जसें तृणवत् वाटतें तशा जातीची व्यभिचारिणी भक्ति – हा रस सेवन करावयास मला दे.

॥ ४९६ ॥

॥ सरे थैसें ज्याचें दान। त्याचे कोण उपकार ॥ १ ॥
॥ धृ ॥ नका आतां वाढूं काचें। दे वो साचें वीठले ॥ धृ ॥
॥ रडत मागें सांडी पोर। ते कां थोर माउली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कीर्ती वाढे। धर्म गाढे ते थैसे ॥ ३ ॥

(४९६) ज्याचें दिलेले दान सपतें त्याचे कसले उपकार आले आहेत ? तेव्हां विठ्ठले, मला जें दान द्यावयाचें तें साचें दे – काचे वाढु नको माकडीण पोर रडत मागें टाकून पळते तिला काय थोर माउली – म्हणावयाची ! तुका म्हणे ते धर्म गाढे श्रेष्ठ की ज्यामुळें कीर्ति वाढते.

॥ ४९७ ॥

॥ न पवीजे तया ठाया। आलों काया क्लेशेंसी ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां माझें आणी मना। नारायणा ओंजेचें ॥ धृ ॥
॥ बहु रीणें पीडीलो फार। परीहार करावा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीर्बळशक्ती। काकुळती म्हणुनी येतों ॥ ३ ॥

(४९७) पुष्कळ कायाक्लेश सोसून जें ठिकाण कोणास सापडणार नाहीं तेथें आलों. आता माझें (जीवित) ओंजेचें (काळजीपूर्वक) मनावर घ्या (माझा योग्य तो उद्धार करा) ऋणानें मी फार पीडलों आहें. माझी शक्ति निर्बळ झाली आहे म्हणून काकुळतीस आलों आहे तरी माझ्या ऋणाचा परिहार करावा म्हणजे माझें प्रारब्ध संचित व क्रियामाण पार लयास जावीत.

॥४९८॥

॥ बहु फीरलों ठायाठाव। कोठें भाव पुरे ची ना ॥ १ ॥
॥ धृ ॥ समाधान तों पावलों। उरलों बोलो यावरी ॥ धृ ॥
॥ घे गा देवा आशीर्वाद। आमच्या नांद भाग्यानें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जेउं आधीं। खवखव मधीं सारावी ॥ ३ ॥

(४९८) काकुळतेनें देवाजवळ आल्यानें समाधान तर पावलों. (आधीं ठाव फार हिंडलो-कोठें हि भाव पुरेना) तेव्हां आतां बोलावयास उरलों आहे. देवा तूं आमचा आशीर्वाद घे व भाग्यानें नांद. तुका म्हणे तुम्ही वाढाल तें आधीं जेवूं. खवखव मधीं काय म्हणून घेऊन येवू-तों बाजूस सारूं.

॥४९९॥

॥ कोण येथें रीता गेला। जो जो आला या ठाया ॥ १ ॥
॥ धृ ॥ तांतडी ते काय आतां। ज्याची चींता तयासीं ॥ धृ ॥
॥ नावासाटीं नेघे फार। नलगे फार व्युत्पती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नलगे जावें। कोठें देवें सूचनें ॥ ३ ॥

(४९९) तुमच्या जवळ आल्यावर तांतडी ते काय आतां? तांतडी कशाची करावयाची? कशासाठीं करावयाची? ज्याची त्याला चिंता आहे च. आपण चिंता कशाची करावी? म्हणून या ठिकाणीं येऊन कोणी रिता-रिकामा-गेला नाहीं. याचें नांव घेण्यास फार भार उचलावे लागत नाहींत फार व्युत्पत्ति-विद्वत्ता लागत नाहीं. आणि देवास सूचना द्यावयास हि कोठें जावें लागत नाहीं.

॥५००॥

॥ देईल ते उणे नाहीं। याचें कांहीं पदरीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाहीजे ते संचीत आतां। येथें सत्ता कराया ॥ धृ ॥
॥ गुणा येसा भरणा भरी। जों जें चारी ते लाभे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवीं देव। फळे भाव आपला ॥ ३ ॥

(५००) याचे पदरीं कांहीं हि उणें नाहीं. तुम्हांस जें हवें असेल तें हा देईल. फक्त येथें सत्ता करावयास आपणांस तेवढें संचित हवें. तुमचा जसा गुण असेल तसा हा भरणा करितो—तुम्हांस जें हवें असेल तें येथें मिळतें. तुका म्हणे देहांत देव बरोबर आहे फक्त आपला भाव फळास आला पाहिजे. किंवा आपला च भाव आपणास फळतो हा देव देहीं च आहे.

॥ ५०१ ॥

॥ तेव्हां होतो भोगाधीन । तुम्हां भीन पासुनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां बोलो नये ऐसें । अनारीसे वेगळे ॥ धृ ॥
॥ सन्मुख जालो स्वामीकडे । भव आंगडे नीराळे ॥ २ ॥
॥ चींतीले ते चींतामणी । फीटे धणी तो द्यावें ॥ ३ ॥
॥ सहज स्थीती आहे आंगी । ते प्रसंगी वंचेना ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे जाणोनी वर्म । कर्माकर्म ठेवीली ॥ ५ ॥

(५०१) देवा, जेव्हां मी तुम्हा पासून भिन्न होतो तेव्हां भोगाधीन होतों—आतां अनारीसें—वेगळें—वोंगळ—असें तुम्हीं कांहीं म्हणूं नका—आतां भव आंगडें—संसार—येथीचा पसारा—टाकून स्वामीकडे सन्मुख झालों आहे. चिंतामणीचें चिंतन करीत आहे. तेव्हां हौस फिटे पर्यंत जें द्यावयाचें भातुकें तें द्यावें. माझे अंगीं सहज स्थिति आहे ती कांहीं हि कारणानें वंचना होऊं देत नाहीं. तुका म्हणे प्रपंचाचा नाश केला—कर्माचीं वर्में जाणोन ठेविलीं व तुमची कास धरली.

॥ ५०२ ॥

॥ कीती रांडवडे । घालोनि व्हाल रे बापुडे ।
॥ संवसाराच्या भीडे । कासाविस झालेली ॥ १ ॥
॥ धृ ॥ माझ्या स्वामीस शरण रीघा । कृपाळुवा पांडुरंगा ।
॥ ठेवी अंगसंगा । वीश्वासीया जवळी ॥ धृ ॥
॥ कांहीं न मागतां भले । होईल तें ची काम केलें ।
॥ नसावें आथीलें । कांहीं येका संकल्पें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भाव । पावचील ठाया ठाव ॥
॥ येक वीध जीव । ठेवीलीया सेवेसी ॥ ३ ॥

(५०२) स्वतः देवाची कास धरून उपदेश करीत आहेत कीं अरे—कृपाळुवा पांडुरंगास शरण रिघा—तो विश्वासी जे असतील त्यांस अंगसंगानें जवळ ठेविती—तेव्हां मी मेल्यावर माझ्या बायकोसाठीं रांडवडा—पोटगी काय ठेवूं—असल्या संसाराच्या भीडेनें बापुडे व्हाल—कासावीस व्हाल तेव्हां तसें न करतां त्यास शरण जा. तो सर्व कांहीं (जेणें होय हित असें) करील., त्याचे जवळ कांहीं हि मागूं नका. जें होईल तें काम करीत जावें, आपण कोणा हि एका संकल्पानें आथिले नसावे—लडबडलेले नसावें. तुका म्हणे—आपण—

त्याच्या सेवेशी जीवानें एकवधि भाव ठेविला असता तो भाव आपणास ठिकाणावर पोहोंचवील

॥ ५०३ ॥

॥ येसे सांडुनीया धुरे। कीवीलवाणे दीसा कां रे।
॥ कामे उर भरे। हाती मुरे मृतीका ॥ १ ॥
॥ धृ ॥ उदार हा जगदानी। पांडुरंग अभीमानी।
॥ तुळशी दळ पाणी। चींतनाचा भुकेला ॥ धृ ॥
॥ नलगे पुसावी चाकरी। कोणी वकील ये घरी।
॥ त्याचा तो ची करी। पारपत्य सकळ ॥ २ ॥
॥ नाहीं आडकाठी। तुका म्हणे जातां भेटी।
॥ न बोलता मीठीं। उगीच पाई घालावी ॥ ३ ॥

( ५०३ ) अशी धुरेची – आधाडीची श्रेष्ठ – स्पष्ट – गोष्ट असताना ती टाकून – बाबानो, केवीलवाण्यासारखे का रे दिसता – तुमचे उर कामानें भरल्यावर हातात मृत्तिका हि राहणार नाहीं. अरे हा जग मागाल तर दान देईल एवढा जगदानी उदार पांडुरंग भक्ताचा अभिमानी असून – तुम्हीं त्याचें चिंतन करावें म्हणून भुकेलेला असतो – व तुळशीचें पत्र व पाणी येवढें च तुमच्या जवळ मागतो याला चाकरी विचारण्यास याला कोणी वकील यावा लागत नाहीं – त्याचा तो सर्व निवाडा करून पारपित्य करीत असतो याच्या भेटीस जावयास कशाची हि आडकाठी नाहीं उगाच – काहीं न बोलता – याचे पायीं मिठी घालावी—

॥ ५०४ ॥

॥ केलासे कैवाड संतांच्या आधारे। अनुभवे खरें कळों आले ॥ १ ॥
॥ धृ ॥ काय जीवीत्याची धरूनीया आशा। व्हाव गर्भवासा पात्र भेणे ॥ धृ ॥
॥ आवाळीनें जावे नीश्चीतीच्या ठाया। रांडारोटावाया करूं नये ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बळी साधतें नीधान। भीकेसाठीं कोण राज्य देतो ॥ ३ ॥

( ५०४ ) यानें आपली तजवीज ( कैवाट ) केवढीं केली आहे हें सरें सताच्या वचनानें व आपल्या अनुभवानें कळू लागतें मग असें वाटतें कीं या जीवित्वाची* आशा धरून काय होय – त्या भयानें गर्भवासास पात्र व्हावें लागतें.

---

*॥ तुमची सेवा घरीता कास। केला नास मरचा॥ हा चरण सरवारंचि वहींत नाहीं॥

जगांत आपली आबाळ झाली तर निश्चित असें जें ठिकाण आहे तेथें आपण जावें. उगा च रांडारोटा (विधवेची पोटगी) काळजी करून सांठवून मिरवून राहूं नये, व तसें वाया जावूं नये—तुका म्हणे जगांत बळ असलें तर निधान हातीं लागत—कोणी भीकेवारी राज्य देतो कां ? श्रेष्ठ गोष्ट ही कशी लाभते ते सांगतां-हेत कीं —आपण एक गोष्ट मनांत धरून असावें की.

॥ ५०५ ॥

**॥ संगतीने होता पंगतीचा लाभ । अशोभीं अशोभ असीजे ते ॥ १ ॥**
**॥धृ॥ जैसी तैसी असो पुढीलांचे सोई । धरीती हाती पायी आचारीये ॥धृ॥**
**॥ उपकारी नाही देखत आपदा । पुढीलाचो सदा दया चीतीं ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ती । पुरवावी आर्ती नीर्बळाची ॥३॥**

( ५०५ ) *संगतीनें होतो पंगतीचा लाभ*—तेव्हां आम्हीं जरी अशोभ्य असलों तरी अशोभ्य असूं दे—कारण आचार्य सत जे आहेत ते—आम्ही जैसी असू तैशीं हातीं पायी धरून तेथवर म्हणजे मूळ ठिकाणावर आम्हाला नेतील. जो मनुष्य उपकार करावयास निघाला तो आपदा=त्रास—दुःख पाहूं शकत नाहीं. पुढीलांची दया ही त्यांच्या चित्तावर सत्ता करीत असते. तुका म्हणे *निर्बळांची आर्ती म्हणजे आस पुरवावी ही सज्जनाची कीर्ति आहे.*

॥ ५०६ ॥

**॥ पर उपकारी असे आरोनी उरला । आपलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥**
**॥धृ॥ लाभावरी घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न वीचारुनी ॥धृ॥**
**॥ जीवा यैसे देखे आणीका जीवासी । नीखळची रासी गुणाची च ॥२॥**
**॥ तुका म्हणे देव तयाचा पांगीला । न भंगे संचला धीर सदा ॥ ३ ॥**

( ५०६ ) पर उपकारी जे असतात ते अरोनी ( शब्दार्थ लागत नाहीं ) *उरतात—त्यांस आप पर उरत नाहीं. ते आपणास करावयास* काम सांपडलें आहे. हा च मोठा लाभ झाला असें मानून आपल्या श्रमाचा कधीं विचार करीत नाहींत. तो आपणाप्रमाणें इतरांस हि प्रत्येक जण—गुणाची ( निखळ ) पूर्ण राशी आहे असें समजून वागत असतो. तुका म्हणे देव त्यांच्या ऋणांत असतो. यामुळें त्यांचा धीर कधीं खचत नाहीं. संचला=वाढलेला साठविलेला, असतो. आरोणी हा शब्द लागत नाहीं. येथें करोनी असा मूळ पाठ असावा. सार परोपकारी मनुष्याचें मनांत एखादी गोष्ट आली कीं ती करून तो मोकळा होतो,

दुसरें काय करावयास सांपडतें या विचारांत असावयाचा, हा भावार्थ. ही परोपकारी माणसाबद्दलची भावना किती सुंदर मांडली आहे!

॥ ५०७ ॥

॥ कोण पुण्यें यांचा होईन सेवक। जीं हीं द्वंद्वादीक दुन्हावीली ॥१॥
॥ धृ ॥ येसीं वर्मे मज दावी नारायणा। अंतरींच्या खुणा प्रकटोनी ॥ धृ ॥
॥ बहु अवघड असे संतभेटी। तरी जगजेठी करूणा केली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मग नये वृत्ती वरी। सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ३ ॥

(५०७) ज्या गृहस्थांनीं सर्व द्वंद्वें दुरावलीं आहेत. अशा पर उपकारी गृहस्थांचा मी कोणतें पुण्य केले असतांना सेवक होईन, देवा, अंतरीं च खुणा प्रकट करून मला हीं वर्मे दाखीव. संत भेटी ही बहु अवघड आहे. जगजेठी करुणा करील तर च संतांची गांठ पडेल. तुका म्हणे अशी संतभेट झाल्यावर मी सुखाचे शेजारीं पहुडेन—पडून राहीन—मग पुनःकांहीं वृत्तीवर, देह-वृत्ती वर, येणार नाहीं.

॥ ५०८ ॥

॥ करीतां वीचार सांपडले वर्म। समुळ नीश्रम परीहाराचें ॥ १ ॥
॥ धृ ॥ मज घेउनीयां आपणासी द्यावे। साटीं जीव जीवें नारायणा ॥धृ॥
॥ उरी नाहीं मग पडदा कां आला। स्वमुखें ची मला करीतां वाद ॥२॥
॥ तुका म्हणे माझें खरें देणे घेणें। तुम्ही साक्षी जाणा अंतरींचे ॥ ३॥

(५०८) सर्व परीहाराचें (निश्रम), (श्रम केले) (दमलों,) (ही भावना नाहीशी होण्याचें) मूळ मला सांपडलें—नारायणा, हा जीव आपल्या हातांत घेऊन आपल्या (नारायणाच्या) चरणीं वहावा हें त मूळ आहे, तुमच्या आमच्यांत जरा हि उरी नसावी, मग तुमच्या आमच्यांत पडदा कसा येईल! हा वाद स्वमुखें च केलेला बरा. देवा, माझें देणें—घेण—हे खरें आहे व यास तुम्ही साक्ष आहांत शिवाय माझ्या अंतरीचें तुम्हीं जाणते आहांत. नारायणास जीव वाहिल्यावर भक्तास देव आपला जीव देतो. अशी देवघेव तुकोबा व विठोबा यांची झाली म्हणून सांगताहेत:—

॥ ५०९ ॥

॥ बरवे येसे मना। नारायणा या काळें ॥ १ ॥
॥ धृ ॥ देव आम्हां प्राण सखा। जाले दुखा खंडण ॥ धृ ॥
॥ जन्मांतरीच्या पुण्य रासी। होत्या त्यासी फळ आले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीज ठेवा। होईल देवा लाधलो ॥ ३ ॥

( ५०९ ) या काळीं—आतां, देवा, नारायणा, माझ्या मनांत असें बरवें आलें कीं देव आम्हांस प्राणसखा असतांना—दुःखाचें खंटण आपोआप होतें च. जन्मांतरी ज्या पुण्य राशी होत्या त्यास फळ आलें—व जो निज ठेवा होता—तो आतां लाधलो. तेव्हां हा अनुभव आल्यावर स्वतःच्या पूर्वचरित्राकडे पाहून म्हणतातः—

॥५१०॥

॥ बहु गर्भवासीं । सोसें मेलों उपवासी ।
॥ नाहीं सखी ऐसी । तेथे कोणी भेटली ॥ १ ॥
॥ धृ ॥ करीं करीं रे स्वहीत । देहे तवं हे अनीत ।
॥ नाहीं दील्हे चीत । सोडउ मोहापासुनी ॥ धृ ॥
॥ पाळीं तोंडीचीया घांसें । ते ची होय अनारीसें ।
॥ ज्याच्या नव्हे ऐसें । खेदी परी सोडवीना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धन मानें । माझ्या बाटलें मीपणें ।
॥ नाहीं दलिहा जनें । देखो लोभें हा लाभ ॥ ३ ॥

( ५१० ) हा निज ठेवा लाधलों म्हणून म्हटलें, तों हा, महा लाभ, मला आजवर झाला नाहीं. याचें कारण, धन, मान यांच्यानें, माझ्या मीपणानें, मी आजवर बाटलों होतों. लोकांनीं मला हा लाभ पाहूं दिला नाहीं. तसा च गर्भवासाच्या बहुसोसानें उपवाशी मरत होतों पण अशी सखी कोणी भेटली नाहीं कीं जी हा लाभ करून देईल—दाखवील. लाभ कोणता ? अरे बाबा—तूं आपलें स्वहित कर. देह हा अनित्य आहे, तेव्हां मोहापासून चित्त सोडवून घे, असें सांगणारी सखी कोणी भेटली नाहीं. एखाद्यास आपण तोंडीचा घास काढून देऊन वाढवावा—व तो त्याच्या मनाजोगें काहींतरी झालें नाहीं कीं लागलीच—वेगळा होतो या गोष्टीचा आपणास खेद होतो—पण त्याचा संग आपणास सोडवत नाहीं. आतां मला तू भेटलास हा लाभ ठीक झाला.

तेव्हां आपला लाभ लक्ष्यांत घेऊन स्वतःस व पर्यायानें स्वानुभवानें जनास उपदेश करताहेत कीः—

॥५११॥

॥ आतां उघडीं डोळे । जरी अद्यापी न कळे ।
॥ तरी मातेचीये खोळे । दगड आला पोटासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ मनुष्य देहा ऐसा नीध । साधील ते साधे सीद्ध ।
॥ करुनी प्रबोध । संत पार उतरले ॥ धृ ॥

॥ नांव चंद्रभागे तीरीं । कट धरुनीयां करीं ।
॥ उभा पुंडलिकाचे द्वारीं । उभा उभी पाववी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे फुका साठीं । पाई घातलीयां मीठीं ।
॥ होतो उठाउठीं । लौकरी च उतार ॥ ३ ॥

( ५११ ) आतां लाभ काय झाला आहे त्याचें वर्णन करितातः—आतां माझें डोळे उघडले व अद्याप हि जर हा लाभ काय स्वरूपाचा आहे हें मला कळत नसेल तर मातेच्या खोळींस दगड आला म्हणावयाचा. मनुष्य देह हा ऐसा ठेवा आहे कीं अमुक एक गोष्ट साधावी असें त्यानें मनांत आणलें तर ती गोष्ट सिद्ध होते. सतांनीं हा बोध प्रगट केला कीं भवसागर पार तरून जावयाचें तर पुंडलिकाचे द्वारीं कट धरूनिया करी—चद्रभागेच्या तीरीं जी विठ्ठल-रूपानें नाव उभी आहे, ती त्या मनुष्यास पलीकडे पाववीते व तो नावाडी कांहीं घेतें नाहीं. उगा च फुकासाठीं त्याच्या पायीं मिठी घातली कीं तो उतार करतों—म्हणजे ही भवनदी उतरवून आपणास पलीकडे नेतो. नाव या एका च शब्दांत नाम व नांव असे दोन्हीं अर्थ सामावलें आहेत.

॥ ५१२ ॥

॥ आतां कोठे धांवे मन । तुझे चरण देखीलीयां ॥ १ ॥
॥ धृ ॥ भाग गेला सीण गेला । आवघा जाला आनंदु ॥ धृ ॥
॥ प्रेमरसें बैसली मीठी । आवडी लाठी सुखासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आम्हां जोगे । वीठल घोगें खरें माप ॥ ३ ॥

( ५१२ ) देवा, मी आता तुझे चरण देखीले, आतां माझें मन कोठें धावेल ! आतां माझा शीण भाग सर्व गेला व अवघा आनंद झाला आहे. प्रेम-रसानें तोंडास एक च लाठी मिठी बसली आहे. तुका म्हणे विठ्ठल हें घोगें ( मोठें ) खरें माप ठीक आहे. हे माप आम्हां जोगे कां आहे तें पुढील अभंगांत सागताहेत.

॥ ५१३ ॥

॥ चींतीलें तें मनींचे जाणे । पुरवी खुणें अंतरींचे ॥ १ ॥
॥ धृ ॥ रात्री न कळे दीवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥ धृ ॥
॥ नवसीयाचे नवस । भोगी त्यास भीन नाहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सम ची देणें । समचरणीं उभे असे ॥ ३ ॥

(५१३) विठ्ठल हा आपण जें चितावें तें मनींचें जाणतो; व अंतरीच्या खुणेनें तें पुरवितो. यास दिवस नाहीं, रात्र नाहीं,—हें दैवत सारखें अंगीं खेळत असतें. नवसीयाचे नवस भोगतांना पुरवितांना हि तो भिन्न होत नाही. तुका म्हणे सम देण्यासाठीं तो समचरणावर उभा आहे.

वरील २।३ अभगांत देव भक्त यांच्या नात्यांतील खुणा प्रकट केल्या आहेत, व सांगताहेत कीं:—

॥ ५१४ ॥

॥ कुळींची हे कुळदेवी। केली ठावी संतांनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ बरवे जालो शरण गेलो। उगवीलो संकटीं ॥ धृ ॥
॥ आणीला इही रूपा बळे। करुनी खळे हरीदासीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे समागमे। नाचो प्रेमें लागलो ॥ ३ ॥

(५१४) ही सतकुळींची कुळदेवी संतांनी ठावी केली. म्हणजे नामदेवरायांनीं मला या देवतेच्या पायावर घातलें बरवें झालें कीं मी त्या कुळदेवीस शरण गेलों. यामुळें संकटांतून (भवसिधून्या) उगवलो. ज्या संतांनीं त्याला हट्ट करून रूपास आणला—साकार व्हावयास लाविलें, त्यांच्या समागमांत तुका म्हणे मी प्रेमानें नाचू लागलों.

॥ ५१५ ॥

॥ आतां देह अवसान। हे जतन तोवरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ गाउ नाचुं गदारोळें। जींको बळे संसार ॥ धृ ॥
॥ याची जीऊं अभीमाने। सेवा धने बळकट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे न सरे मागे। होईन लागे आगळा ॥ ३ ॥

(५१५) आतां देह अवसान होईपर्यंत—म्हणजे जिवंत आहे तोंपर्यंत—गाऊं—नाचूं—गदारोळें। जींको बळें संसार—हीं गोष्ट जतन करू. याच्या च—या च—अभिमानानें जगूं. मागें सरणार नाहीं व बळकट सेवा अशी करीन कीं—माझें हें सेवा धन कधीं हि संपणार नाहीं—व मला भलता च लाग लागेल—लाभ होईल.

॥ ५१६ ॥

॥ ज्याणे आड यावे कांहीं। त्याचे नाहीं बळ आतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ मन येथे साहे जाले। हरीचया धाले गुणवादीं ॥ धृ ॥
॥ चुकुर तो गेला काळ। जाले बळ संगाचे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धरु सत्ता। होईल आतां करुं ते ॥ ३ ॥

(५१६) वर सांगितलेली सेवा करण्यास ज्यानें कांहीं अडचण होऊन माझ्या सुखास व्यत्यय होईल अशाचें आतां कांहीं बळ उरलें नाहीं येथें माझें मन मला साहाय्य होऊन ते हरीच्या गुणानुवादानें धालें आहे, मन चुकुर ( गोंधळलें ) होईल असा काळ जाऊन, सगाचें बळ झालें आहे तुका म्हणे आतां माझी अशी सत्ता झाली आहे कीं जें करूं असें म्हणेन तें होईल येथें केवढी सत्ता हातीं आली त स्पष्ट सांगितलें आहे.

॥ ५१७ ॥

॥ देवासी तो पुरे भाव येक गाठीं । तोचीं त्याचे मीठी देईल पायीं ॥१॥
॥ ध्रु ॥ पाहोनी राहीन कवतुक नीराळा । मी मज वेगळा होउनीयां ॥ध्रु॥
॥ कांहीं नेघे शीरीं नीमीत्याचा भार । नलगे उतर वेचावे चीं ॥ २॥
॥ तुका म्हणे जीवें पडीलीया गाठीं । मग नाहीं मीठी सुटों येत ॥३॥

(५१७) देवासी तुमच्या जवळ गाठीं एक ( एकविध ) भाव असला कीं तेवढा पुरतो मग तो च तुमच्या पायीं मिठी घालता मी माझ्यापासून वेगळा होऊन तें कवतुक पाहून रहीन मीं आपल्या शिरीं कोणत्या हि निमित्यानें कसला हि भार घेणार नाहा किंवा एक हि वचन सर्ची घालणार नाहीं तुका म्हणे एकदा जन्माची गाठ पडल्यावर मग ती मिठी सुटत नाहीं, सोडता येत नाहीं तुका म्हणे जीवें पडीलीया गाठीं । मग नाहा मीठी सुटों येत । हें वचन किती गोड आहे [1] नित्याच्या व्यवहारात हि ह वचन जीवास भेटलें पाहिजे

॥ ५१८ ॥

॥ लोकीकासाठीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागों येत ॥ १ ॥
॥ध्रु॥ ठवावा माथा तो नुचलावा पायीं । ठायींचीया ठायीं हाला नये ॥ध्रु॥
॥ ढहुळल्या मन वीतुळल रूप । नाव येस पाप उपाधीच ॥ २ ॥
॥ तुका म्हण देव प्रीतीन कवळी । ठेवील जवळी उठउनी ॥ ३ ॥

(५१८) लौकीक हा पसारा आहे. हा गोवा आहे हा कांहीं लागीं—उपयोगीं—पडत नाहीं बसल्या ठिकाणीं जो देवाच्या पायीं माथा ठेवावा तो कांहीं केल्या उचलू नये आपल मन उपाधीन ढवळलें तर रूप वितळतें या प्रमाणें कोणत्या हि उपाधीच्या मुळें पुढें पाप उभें राहतें तुका म्हण वर सांगितल्या-प्रमाण ठेवावा माथा तो नुचलावा पायीं । ठायींचीया ठायीं हालों नये—असें आपण केलें कीं देव आपणास उठवून प्रीतीनें आलिंगन देता व जवळ ठेवितो

*येथें देवभक्ताची आणखी एक खूण प्रगट झाली आहे देवाच्या पायावर माथा ठेविला कीं तो काय करतो तें सांगताहेत*

॥ ५१९ ॥

॥ नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळ ही ॥ १ ॥
॥धृ॥ येसा नाहीं मज येकाचा अनुभव । धरीला तो भाव उद्धरील ॥ धृ ॥
॥ उतावीळ असे शरणांगना काजे । धांवा केशीराजे आइकता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हीत चींतन भरवसा । नेदी गर्भवासा येउ देव ॥ ३ ॥

(५१९) तुका म्हणे याच्या चिंतनात हित आहे, हा भरवसा असावा—हा देव कधीं हि गर्भवास येऊ देत नाहीं हा भक्तास पुन केव्हा हि गर्भवास येऊ देत नाही, म्हणून सांगितलें, त्याचे कारण सांगताहेत, हा देव असा आहे कीं त्याच्यावर भार घातला तर तो उदास असत नाहीं आपण जी जी आस करावी ती ती आस तो पुरवितो. आपण कोणता हि भाव धरिला तरी तो उद्धार च करितो असा अनुभव मला दुसऱ्या कोणत्या हि देवाचा आला नाहीं हा शरणागताचें काम करण्यास फार उतावीळ असतो.

॥ ५२० ॥

॥ पाहा रे हे दैवत कैस । भक्तीपीसे भावीक ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाचारील्या सरीसे पावे । येसी सवे बराडी ॥ धृ ॥
॥ शुष्क काष्ठी गुरुगुरीं । लाज हरी न धरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अर्धनारी । येसी धरी रूपडीं ॥ ३ ॥

( ५२० ) अरे, हे दैवत कसें भक्तीचें पीसें— वेड —असलेलें भावीक आहे तें पाहून घ्या. त्याला पाचारण केलें कीं जवळ येतें, अशी या बराड्यास हावरटास सवय आहे शुष्क काष्टात सुद्धां हा गुरगुर करावयास तयार ! तसें च अर्धनारीच रूप घे म्हटलें तर घेतो त्यास त्याची लाज वाटत नाहीं

॥ ५२१ ॥

॥ पाहावया भाजी नभा । दीसे शोभा चागली ॥ १ ॥
॥ धृ ॥ बैसला तो माझ मनीं । नका कोण्हीं लाजउ ॥ धृ ॥
॥ जीवा आवडे जीवाहुनी । नव्हे क्षण वेगळा ॥ २ ॥
॥ जाले वीस्वभरा येसी । तुकया दासी स्वामीची ॥ ३ ॥

( ५२१ ) आकाशात पाहिलात तरी ज्याची शोभा चागली दिसते असा, आकाशा एवढी ज्याची प्रभा फाकली आहे असा, आकाशासारखी नीळ प्रभा

ज्याची फाकली आहे असा, देव माझ्या मनीं बैसला आहे, मला कोणी लाजऊं नका. या जीवास तो जीवाहून आवडतो आहे व तो एक क्षण हि वेगळा होणार नाहीं. मी या विश्वंभराची, स्वामीची तुकया दासी झालें आहे माझे अंगीं उमटली हो सावळी प्रभा म्हणून त्याचेपासून क्षणभर वेगळी होणार नाहीं. या सर्व देवभक्तपणाच्या सुखाच्या सोहळ्याच्या खुणा आहेत.

वरील तुकया दासी म्हणते.

॥५२२॥

॥ आतां देवा मोकलीले। तुम्ही भले दीसेना ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां नाही जीवभाव। उरला ठाव वेगळा ॥ धृ ॥
॥ सांभाळुनी घ्यावें देवा। आपणासवा यावरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नग्न भाज। तरी ते लाज स्वामीसी ॥ ३ ॥

(५२२) वरील अभगांत न हे क्षण वेगळा म्हणून म्हटलें व जाले विश्वंभरा येसी म्हणून तुकया दासी म्हणाली. पण विश्वभरानें दिलेली मिठी अतरांत पुरेना—अपुरी वाटे, म्हणून म्हणाले कीं—आतां देवा मोकलीले। ही उत्कटत्वाची खूण आहे. देवानें टाकलें—सोडलें असा अर्थ नव्हे. देवा, आतां तुम्ही मला सोडल्यासारखें दिसते. तुम्ही काहीं भले गृहस्थ दिसत नाहीं. आतां देवा, मला तुमच्या शिवाय जीव भाव ठाव कांहीं हि वेगळा उरला नाहीं. तेव्हां देवा, आतां आपणा सवा—बरोबर, साभाळून घ्यावें. तुका म्हणे—एखाद्याची बायको जर नागवी बसली तर ती लाज स्वामीस.

ही तुकया दासी च बोलते आहे.

॥५२३॥

॥ कां रे माझा तुज न ये ची कळवळा। असोनी जवळा हृदयस्था ॥१॥
॥धृ॥ अगा नारायणा नीस्तुरा नीर्गुणा। केला शोक नेणां कंठस्फोट ॥ धृ ॥
॥ कां हे चीत नाहीं पावलें वीश्रांती। इंद्रीयांची गती खुंटे चीना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कां हो धरीयेला कोप। सरलें नेणो पाप पांडुरंगा ॥ ३ ॥

(५२३) अगा निष्ठुरा, निर्गुणा, नारायणा, मी शोक करतें आहे—माझा कंठस्फोट झाला असें असून, तू जवळ असून, हृदयस्था, माझा तुला कळवळा का रे येत नाहीं—? हें चित्त आजवर तुझ्याठायीं विश्रांती कां पावलें नाहीं? या इंद्रियाची गती खुंटत नाहीं हें काय आहे! अहो पांडुरंगा, तुम्ही माझ्यावर

कोप कां धरिला आहे? माझे पाप अद्याप सरलें नाहीं कां? सुख पुरत नाहीं, एवढाच अर्थ.

॥ ५२४ ॥

॥ आमची वीश्रांती। तुमचे चरण कमळा पती ॥ १ ॥
॥ धृ ॥ हे ची येक जाणे। काया वाचा आणी मने ॥ धृ ॥
॥ पुढती पुढती नमन। घालुनीयां लोटांगण ॥ २ ॥
॥ नीच जन लोकां। तळील पायरीस तुका ॥ ३ ॥

( ५२४ ) वरचेवर नमन करून तुमच्या चरणावर लोटांगण घेणें ही आमुची विश्रांती आहे. काया–वाचा–मनानें मला ही एवढी एक गोष्ट समजते. या जनातील जी नीच पाहिरी आहे त्याच्या तळीच्या पाइरीस तुका आहे. व तसा तो आहे म्हणून–

॥ ५२५ ॥

॥ अस्त नाहीं आतां येकची मोहरा। पासुनी अंधारा दुरी जालों ॥ १ ॥
॥धृ॥ साक्षत्वे या जालों गुणाचा देखणा। करी नारायणा तरी खरें ॥ धृ ॥
॥ आठवे वीसरु पडीयेला मागे। आले तेची भागे येत्न केले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझा वीनोद देवासी। आम्हीं तुम्हां यैसी दोन्हीं नव्हो ॥३॥

( ५२५ ) आतां आम्हीं अंधारापासून दूर झालों आहों. अधार गेला–झांपड गेली–प्रकाश झाला–हा आम्हांस मोहरा (नागाच्या फण्यावरील मणी ) भेटला. आतां आमच्या तेजास कधीं अस्त असणार नाहीं. या गुणाच्या साक्षीत्वानें देखणा झालों आहे. तरी देवा तूं हें खरें कर. मागें माझ्या वांट्यास जे यत्न आले ते केले–त्याचा मला आतां आठव व विसर कांहीं च उरला नाहीं, उरु नये. तुका म्हणे हा माझा विनोद देवाशीं आहे–आम्ही दोघें हि तुमच्यासारखीं नाहीं.

मोहरा = नागाच्या फण्यावरील मणी–याचें तेज काळोखांत सुद्धां चमकतें. म्हणून लक्षणेनें शेषशायी भगवान् याचा उदय, चिन्मणीदीप, लागून अंतरात झाला तेव्हां–याचें तेज कधीं च नष्ट होणार नाहीं, म्हणून तो हातात असतांना अंधार–अज्ञान–कसें भेटणार! पुढील अभंग आतां देवाशीं विनोद आहे.

॥ ५२६ ॥

॥ क्षर अक्षर हे तुमचे वीभाग। कासयाने जग दुरी धरा ॥ १ ॥
॥धृ॥ तैसें आम्हीं नेणो पलटो ची कांहीं। त्यागीलयाची नाहीं मागे चाड ॥धृ॥
॥ प्रतीपादीता तुं सम वीपमाचा। प्रसाद तो याचा पाप पुण्य ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्हां नाना अवगुणीं। लागे संपादणी लटीक्याची ॥३॥

( ५२६ ) देवा क्षर झालांत तरी तुम्ही च—अक्षर झाला तरी तुम्ही च मग हे दोन भाग करून त्याहून वेगळा पुरुषोत्तम हें तुम्ही कसें काय करितां ? व जग तरी वेगळें कसें धरतां ? आम्हीं मात्र मागें ज्याचा त्याग केला—त्याची चाड धरीत नाहीं—व जी गोष्ट एकदां पालटली—ती पुनः आठवीत नाहीं. तुम्ही ज्या समविषमाच्या गोष्टी सांगतां—त्यांचा प्रसाद म्हणजे पापपुण्य आहे. देवा तुम्हांस नाना अवगुणांची संपादणी—लटीक्याची संपादणी करावी लागते—आम्ही कांहीं त्या भानगडींत सांपडणार नाहीं.

॥ ५२७ ॥

**॥ समर्थपणे हें करा संपादणी । नसते ची मनीं धरील्याची ॥ १ ॥**
**॥धृ॥ दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तरी मी नीचांत पाय पाहे ॥ धृ ॥**
**॥ खोटीयाचे खरें खरीयाचे खोटें । मानीलें गोमटे तुम्हांसी तें ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे तुम्हां सवे करीतां वाद । होईजे तें नींद्य जनीं देवा ॥ ३ ॥**

( ५२७ ) भलतें सलतें मनांत धरून—तुम्ही खऱ्याचे खोटें—खोट्याचें खरें—गोमटें मानून घेऊन—खुशाल समर्थपणें संपादणी करीत असता. येथें तुमच्या पुढें कोणाचा शब्द चालणार नाहीं—म्हणून मी चरणावर दृष्टी ठेवून निवांत राहीन—देवा, तुमच्या बरोबर जो वाद करील तो जगीं निंद्य समजला जाईल विनोद अद्याप सपलेला नाही. ५२६।७ या दोन्ही अभंगांत ( १ ) यम नियम आम्हांसी । आपण भलतें ची करिसी । —हा ज्ञानराजांचा व पुण्यवत पाताळ लोकी नेला ।—हा जनाबाईचा असे दोन अभंग अभिप्रेत आहेत.

॥ ५२८ ॥

**॥ तुम्हां आम्हां सवे न पडावी गांठीं । आलेती जगजेठी कळों आतां ॥१॥**
**॥धृ॥ कीती म्हणों आतां वाईटा वाईट । शीवो नये वीट आल्यावरी ॥ धृ ॥**
**॥ बोलील्याची आतां हें चि परचीत । भीड भार थीत उडवीली ॥ २ ॥**
**॥ तुका म्हणे आली रोकडी परचीत । झांकणे तें कीती कोठें देवा ॥ ३ ॥**

( ५२८ ) अहो जगजेठी, तुमची आमची गांठ पडावयास नको होती हें आतां कळलें. आतां वाईटास वाईट तरी किती म्हणू—आणि मला तुमचा इतका वीट आला आहे कीं तुम्हांस शिवूं नयेसें वाटतें. मी जें बोललों त्याची हीच प्रचीती की मला आतां भीड भार कांहीं उरली नाहीं—पार उडाली. एकदां रोकडी प्रचीति आल्यावर—कोणती गोष्ट झांकावयाची व किती झांकावयाची ? हा जीवशीवांचा विनोद आहे.

॥ ५२९ ॥

॥ नीस्तुर मी जालों अतीवादागुणें । हें कां नारायणें नेणीजेल ॥ १ ॥
॥धृ॥ सांडीयेली तुम्ही गोत पती सोय । फोडीवीली डोय कर्मा हातीं ॥धृ॥
॥ सांपडुनी संदी केली जीवेसाठीं । घ्यावयासी तुटी कारण हे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुज काय म्हणो उणें । नाहीं अभीमानें चाड देवा ॥ ३ ॥

(५२९) अति वादामुळें मी निष्ठुर जालों, हे नारायणास समजत कां नाहीं ? तुम्हीं माझ्याकडून गोत, पति सोय हीं सर्व सांडविलीत—आणि कर्मा हातीं डोई फोडविलीत. वरील सर्व गोष्टींची तुटी करण्यास कारण सांपडतां च त्या गोष्टी केल्या व जीवास संधी साधून दिली. देवा, तुला मी आतां काय उणा बोल लावूं—मला अभिमानानें कसली च चाड नाहीं—येथें विनोद संपतो, सरळ बोलण्यास सुरवात होते.

॥ ५३० ॥

॥ माझें माझ्या हातां आलें । आतां भले सकळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ काशासाठीं वीपम थारा । तो अंतरा वीटाळ ॥ धृ ॥
॥ जाली तया दुखें तुटी । मागील पोटीं नसावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे शुद्ध कुळ । तेथें मळ काशाचा ॥ ३ ॥

(५३०) आतां माझ्या हातीं माझें सरळ भलें आलें. तेव्हां आतां विपमास काय म्हणून थारा द्यावा व अंतरांत विटाळ करून घ्यावा ! ज्या दुःखाशीं तुटी झाली—तें पुनः पोटांत कशास वागवावें ! अशा तऱ्हेनें कुळ शुद्ध असतांना मळ कसला लागणार ?

॥ ५३१ ॥

॥ जालों आतां येके ठायीं । न वंचुं कांहीं येकमेका ॥ १ ॥
॥ धृ ॥ सरलों हें गे देउनी मोट । कटकट काशाची ॥ धृ ॥
॥ सोडोनीयां गांठी पाहे । काय आहे त्यांत तें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जालों नीराळा । आतां गोपाळा देउ बोभा ॥ ३ ॥

(५३१) आतां आपण एका ठिकाणावर आलों आहोंत, आतां आपण कांहीं एकमेकांस फसविणार नाहीं. हीं मोटे (इंद्रियें—काया—वाचा—मन) तुला देऊन, तुझे चरणावर वाहून मी सरलों, माझें स्वतंत्र अस्तित्व संपलें, आतां कशाची कटकट राहिली ? देवा, त्या मोटेंत काय आहे. तें तूं गांठ सोडून पहा. त्या गांठीपासून—मोटीपासून मी निराळा झालों आहे. म्हणजे मरणा हानोनी सुटली काया

आतां कांहीं हवें असलें कीं गोपाळास आरोळी द्यावयाची एवढी च माझ्यावर कामगिरी.

॥५३२॥

॥ वोळलीचा दोहु पान्हा । मज कान्हा सांगीतला ॥ १ ॥
॥ धृ ॥ घ्या जी हें गे क्षीर हातीं । नीगुतीनें वाढावें ॥ धृ ॥
॥ सांगीतलें केलें काम । नव्हे धर्म सत्तेचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नवें जुनें । येसें कोणें सोसावें ॥ ३ ॥

(५३२) कान्होबानें मला सांगितलें—कीं जी वोळली (जिची कास भरलेली) असेल तिच्या पान्ह्याचें दोहन करा. अरे, हें दूध हातीं घ्या व युक्तीनें दूध काढा. आपण काय, सांगितलेलें काम करावयाचें ! आपला धर्म सत्ता करावयाचा नव्हे. तुका म्हणे—आपण नवें जुनें असें कशास सोसावें !

॥५३३॥

॥ येईल तें घेईन भागा । नव्हे जोगा दुसरीया ॥ १ ॥
॥ धृ ॥ आवडी ते तुम्ही जाणा । बहु गुणां सारीखी ॥ धृ ॥
॥ मज घेती डांग वरी । सवें हरी नसलीया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे राववा देवा । करीन सेवा सांगीतली ॥ ३ ॥

(५३३) माझ्या वांट्यास जें येईल तें मी घेईन—मला दुसऱ्याचा छंद नाहीं. देवा मला फार गुणांची आवड आहे हें तुम्ही लक्ष्यांत घ्या. तुम्ही जर जवळ नसला तर माझ्याशीं दांडगाई (लोक—इतर विचार) फार फार करतात. तुका म्हणे—देवा, तुम्ही मला खुशाल राववा—तुम्ही सांगाल ती सेवा मी करीन.

॥५३४॥

॥ अंतरली कुटी भेटी । भय धरूनीयां पोटीं ।
॥ म्हणतां जगजेठी । धांवे करुणा उत्तरीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ बाप बळीया शीरोमणी । उतावीळ या वचनीं ।
॥ पडलीया कानीं । धावा न करी आळस ॥ धृ ॥
॥ बळ दुणी शरणागता । स्वामी वाहों नेदी चींता ।
॥ आईतें ची दाता । पंगतीस बैसवी ॥ २ ॥
॥ वाहे खांदी पावची घरा । त्याच्या करी येरझारा ।
॥ बोबड्या उतरा । स्वामी तुकया मानवे ॥ ३ ॥

( ५३४ ) आपल्या अंतरांत कांहीं भय उत्पन्न झालें व कांहीं किडुक मिडुक अंतर पाडीत आहे असें वाटलें — तर जगजेठीस हांक मारतांच — करुणेचा शब्द ऐकतां च — धांवतो — माझा मायबाप बळीयांचा शिरोमणी आहे — पण करुणेचा शब्द ऐकला कीं तो उतावीळ होतो. यत्किंचित् आळस करीत नाहीं. शरणागत जो होतो त्याचें बळ दुणावतें — कारण स्वामी त्यास चित्ता वाहुं देत नाहीं. तो आइते देणारा दाता आहे व शरणागतास स्वत:चे पगतीस बसविता. शरणागतास खांद्यावर वाहून त्यास त्याच्या घरीं पोहोचवितो. त्याच्या ( शरणागताच्या ) अंबऋषीसारख्या येरझान्या तो करितो व तुकयाचे बोबडे शब्द त्यास मानवतात.

॥ ५३५ ॥

॥ यारे करु गाई । जमा नीजलेती काई ॥
॥ बोभाट्यानें आई । घरा गेल्या मारील ॥ १ ॥
॥ धृ ॥ घाला घालारे कुकारे । ज्याची त्याने चीं मोहरे ॥
॥ येवढे चीं पुरे । केलीयाने सावध ॥ धृ ॥
॥ नेणोनीयां खेळा । समय समयाच्या वेळा ॥
॥ दुख्खीता जवळा । मीळाले तीं दुख्खीत ॥ २ ॥
॥ तुका म्हणे शीक । न धरीतां लागे भीक ॥
॥ धरा सकळीक । मने धावा वळतीयां ॥ ३ ॥

( ५३५ ) यारे — निजलात काय म्हणून — गाई गोळा करूं. जर आपण निजलों आहोंत हा बोभाटा झाला तर आई घरीं गेल्यावर मारील. तेव्हां आतां ज्यानें त्यानें आपल्या मोहरें कुका घाला — आपल्या गाईचा ओळखीचा शब्द उच्चारा — त्यांना आपण परततो आहोंत एवढें सावध केलें म्हणजे पुरे. खेळ खेळावयाचा तरी वेळ काळ पाहून खेळला पाहिजे. एरव्हीं — दुख्खिताजवळ दुख्खित गोळा होतील. तुका म्हणे मनानें कांहीं शिकवणूक शिकलो नाहीं तर भीक लागते. तेव्हां मन जी धांव घेत असेल त्यास कुक म्हणून सर्वजण आवरून धरा. गाईंना जसा खुणेचा शब्द घालून गाई आवरतात — तसें नाम घेऊन वृत्ती आवरावयाच्या. तुका म्हणे शीक । न धरीतां लागे भीक । — ही म्हण आहे.

॥ ५३६ ॥

॥ सकळ सत्ताधारी । व्हावे येसे काय हरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ परी या कृपेच्या वोरसें । कुढावयाचे चीं पीसें ॥ धृ ॥
॥ आंग सर्वोत्तम । अवघाची पुर्णकाम ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दाता । तरी जीव दान देता ॥ ३ ॥

(५३६) या कृपेच्या वोरसें—आम्ही सकळ सत्ताधारी झालों आहोंत. तेव्हां आतां असें काय म्हणून व्हावें ? हें कुढावयास लावणारें पिसें मग आमच्या वांट्यास कां आलें आहे ? देवा तूं अंगें (जातीनें—स्वतः) सर्वोत्तम असून—अवघा चि पूर्णकाम आहेस, तुझ्यासारखा जीव दान देणारा दाता पाठीशी असतांना—आम्हीं सकळ सत्ताधारी कां न व्हावें ? बारीक सारीक गोष्टींत मन कां रमतें ? वोरस=स्नेहभरीत पान्हा.

॥ ५३७ ॥

॥ कोणापाशी द्यावे माप । आपीआप राहीले ॥ १ ॥
॥ धृ ॥ कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥ धृ ॥
॥ येके दाखवीलें दाहा । फांटा पाहा पुसुन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ॥ ३ ॥

(५३७) तुझ्यासारखा जीवदान देणारा दाता असतांना—आम्ही आमच्या कर्तृत्वानें माप तरी कोणास द्यावयाचें व कसलें माप द्यावयाचें अशा स्थितींत भरोवरी तरी कशी करावयाची ! दूर असें काय आहे ! जवळ असें तरी काय आहे ! दहा म्हटलें काय व फांटा पुसून शून्य म्हटलें काय सारखें च. तेव्हां देवा, तुझ्यासारखा दाता भेटल्यानें तुका म्हणे माझें सर्व ओझें सरलें. एक (देव) असून त्यापुढें किती शून्यें (जीव) असलीं तरी ती शोभतील पण एक नसता—त्याचा फाटा पुसला कीं किती हि शून्यें असली तरी फुकट च.

हीं च गोष्ट दुसऱ्या शब्दांत सांगावयाची तर

॥ ५३८ ॥

॥ नभोमय जालें जळ । येकीं सकळ हारपले ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ धृ ॥
॥ कैचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कल्प जाला । अस्त गेला उदय ॥ ३ ॥

(५३८) सर्वत्र पाणी च पाणी होऊन—आकाशापर्यंत पाणी च झाल्यावर एका पाण्यांत सर्व कांहीं सामावलें जातें. आतां सरासरी कसली—त्याच्या लहरी त्याच्यांत च सामावल्या जातात. तेथें कोण कोणाला सांडतो—व कोण कोणाला कोंडतो, तुका म्हणे कल्प झाल्यावर—अस्त व उदय उरले च कोठें ? तसा तुकोबाचा विठोबांत अस्त झाला आहे. आतां विठोबा च तेवढा उरला.

॥ ५३९ ॥

॥ राजा करी तैसें दाम । चाम ते ही चालती ॥ १ ॥
॥ धृ ॥ कारण ते सता शीरीं । कोण करी अव्हेर ॥ धृ ॥
॥ वाहीले ते सुनें खांदीं । चाले पदीं बैसवीलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वीस्वंभरें । करुणाकरें रक्षीले ॥ ३ ॥

( ५३९ ) राजा करील तसे चामाचे कातड्याचे दाम हि चालतात कारण त्याच्या शिरीं सत्ता असते. ही सत्ता सर्वांना मान्य करावी च लागते. त्यांचा कोणी अव्हेर करू शकत नाहीं. कुत्रें उचलून खांद्यावर घेतलें तरी व-पायानें चालविलें तरी चालतें-तुका म्हणे-करुणाकरे-विश्वंभरे, तू मला सभाळले आहेस. सध्यां कागदाचे रुपये आहेत.

॥ ५४० ॥

॥ आम्हीं देव तुम्ही देव । मधें भेव आधीक ॥ १ ॥
॥ धृ ॥ केंचाडाच्या धांवा लागे । मागें मागें वीठले ॥ धृ ॥
॥ भेडसावीले हाके नादें । वोळखी भेदें मोडली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे उभा राहे । मागें पाहे परतोनी ॥ ३ ॥

( ५४० ) देवा, आम्ही देव-तुम्ही देव-फक्त तुम्हां-आम्हांमध्यें भय तेवढें अधिक आहे. तेव्हां आमच्या कैवारानें-तुम्हास आमच्या मागें मागें धावावें लागणार ! हाकेनें, नादानें, मला तुम्हीं भेडसावीलें, भेदानें ओळखी मोडली.- तुका म्हणे देवा, उभा राहे व मागें पहा परतोनी. म्हणजे मला धीर येईल.

॥ ५४१ ॥

॥ सत्य संतें देतें फळ । नाहीं लागत चीं बळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ धृ ॥
॥ करावी च चींता । नाहीं लागत तत्त्वता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भावें । होतें सकळ बरवें ॥ ३ ॥

( ५४१ ) सत्य गोष्ट ही सत्यपणानें फळ देते-तेथें बळ खर्चावें लागत नाहीं. आपण देवाचे पाय ध्यावेत. व धीर धरल्यानें सर्व उपाय आपोआप होतील. आपणास कशाची हि तत्त्वता चिंता करावी लागत नाहीं. तुका म्हणे एका भावानें सर्व काहीं बरवें-चांगलें, होतें, कोणी धीर न धरील तर काय होईल तें सांगताहेत.

॥ ५४२ ॥

॥ आहाच तो मोड वाळलीया मर्धी । अधीराची बुधी तेणें न्यायें ॥१॥
॥धृ॥ म्हणउनी संग न करी दुसरें । चीत मळीण द्वारें दोड पडे ॥ धृ ॥
॥ वीशासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तो सकळीक जाणतसां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कांचे कुळ्ठाकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ३ ॥

( ५४२ ) जमीनीवर उगवलेला मोड हा वाळल्यावर फुकट जातो. (त्याचा वृक्ष होत नाहीं ) तशी अधीर माणसाची बुद्धि फुकट जाते. म्हणून दुसऱ्या कसल्या हि गोष्टीचा संग करूं नये; चित्तास मलीनपणा येऊन दोड (दोष) पडतो, घडतो, सर्पाला लोक विषामुळें भितात, हें तुम्हां सर्वत्रांस माहीत आहे च. तुका म्हणे वाईट लाकूड—कचें. राहतें, नीट जळत नाहीं. प्रत्येकास ज्याच्या त्याच्या अवगुणाची नाड आहे. तशी नाड दासांस नसते.

॥ ५४३ ॥

॥ तरी सदा नीर्भर दास । चींता आस वीरहीत ॥ १ ॥
॥ धृ ॥ अवघाची येकी ठाव । सर्व भाव वीठलीं ॥ धृ ॥
॥ नीरवीलें तेव्हां त्यास । जाला वास त्या माजीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गुण गावें । नाहीं ठावें गुण दोष ॥ ३ ॥

(५४३) हरिचे दास हे चिंता व आस या विरहित असल्यानें सदा निर्भर भीती रहित असतात. त्यांचा सर्व भाव एका ठिकाणीं—विठ्ठलीं—असतो. त्यांनीं एकदां च श्रीविठ्ठलास स्वतःस निरविल्यानें—विठ्ठलांत च त्यांचा वास झालेला आहे. तुका म्हणे या हरीच्या दासांना गुण गावें एवढें कळतें; दुसऱ्याचे गुणदोष कळत नाहींत.

॥ ५४४ ॥

॥ सर्व रसीं मीनले चीत । अखंडीत आनंद ॥ १ ॥
॥ धृ ॥ गोत पतीं वीस्वंभरी । जाला हरी सोयरा ॥ धृ ॥
॥ वोळखी ती येका नांवें । इतर भावें खंडणा ॥ २ ॥
॥ तुका म्हणें नांवें रुपें । दुखरीं पापें हरपली ॥ ३ ॥

( ५४४ ) हरि सोयरा झाल्यानें गोत पती हे सर्व एका विश्वंभरांत सामावलें आहे. सर्व रस चित्तांत एकत्रित झालें व अखंडित आनंद तेवढा उरला. आतां त्या विश्वंभराची ओळखी सुद्धां एका नांवानें आहे. इतर

भावांची खंडणा झाली आहे. तुका म्हणे याच्या नांवानें, रूपानें, म्हणजे यांच्या आठवानें दुसरीं सर्व पापें हारपलीं, नाहींशीं झालीं.

॥ ५४५ ॥

॥ मी हें ऐसें काय जाती । अवघड कीती पाहतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं होत उलंघन । नसतां भीनं दुसरं ॥ धृ ॥
॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टी खालें अंतर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सवें देव । घेतां ठाव दावील ॥ ३ ॥

( ५४५ ) सर्वरसीं चित्त मिळाल्यानंतर – तुकोबा व विठोबा – असा भेद कोठें उरला च नाहीं. तेव्हां *मी माझें असला कांहीं प्रकार च उरला नाहीं. ती* स्थिति शोधूं लागलों तरी सांपडणें कठीण आहे. जेथें दुजाभाव च नाहीं. तेथें *मी माझें अशी मर्यादा उल्लंघून स्थिति सांपडेल कोठें ? अंधार होऊन तेज* लोपल्यावर दृष्टीसमोर – अंतर असत नाहीं. कीं जेथें तेज राहूं शकेल – सर्वत्र *अंधार च. बरें – बरोबर देव असला – तेज असलें – प्रकाश असला, कीं तो कोणतें* हि ठिकाण दाखवील च.

॥ ५४६ ॥

॥ नाहीं लोपो येत गुण । वेधी आणीकें चंदन ॥ १ ॥
॥ धृ ॥ न सांगतां पडे ठाळा । रुप दर्पणीं सकळा ॥ धृ ॥
॥ सारवीलें वरी । आहे च ते क्षणभरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥ ३ ॥

( ५४६ ) कोणती हि गोष्ट वर वर सारविली सजविली असली तर तें सोंग क्षणभर टिकतें. कोणास कांहीं न सांगतां आरशांत रूप पाहून ज्याचा त्याला ठाळा कळतो. गुण हा कांहीं झांकतां येत नाहीं. चंदन आपल्या गुणांनी इतर झाडांना वेधतो ( म्हणजे त्यांच्या अंगीं चंदनाचा वास लागतो ) वरवर संपादणी केलेली असली तर ओहोळानें सागराच्या सारखें कसें होतां येईल ! ओहोळानें सागरांत समावून घ्यावें हें उत्तम. बरोबरी करण्याची हांव धरूं नये. तसें केलें तर.

॥ ५४७ ॥

॥ खद्योतें फुलवीलें रवीपुढें ढुंग । साक्षी तवें जग उभयतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ आपल्या आपण नाहीं शोभो येत । चार करी स्फीत दाखउनी ॥धृ॥
॥ खाणार ताकाचें आसे ते मार्जारें । आपण ची अधीरें कळों येतें ॥२॥
॥ तुका म्हणे जळो मैंदाची मवाळी । दाउनीयां नळी कापी सोंगें ॥३॥

( ५४७ ) काजव्यानें जसें सूर्यापुढें आपलें प्रकाशमय ढुंगण फुल्रावें, तसें ओहोळानें मी सागराची बरोबरी करीत आहे हे म्हणणें हास्यास्पद आहे. त्या उभयतांना साक्षी जग आहे. तसें आपला आपण गौरव करून टाळी वाजवून कांहीं चार केले तर ते शोभा देत नाहींत. खाणारा पडला ताकाचा—व दाखवितो माज, हें कसें चालणार ? तो आपल्या अधीरपणानें च स्वतःची टाळी स्वतः वाजविल्यानें—कोण आहे तो कळतो. तुका म्हणे ही मेंदांची । मवाळी जळो—सोंगें दाखवून हे नळी (गळा) कापतात. मेंद ही वाटसरूस फसवून त्याची गळा कापणारी एक लुटारुंची जात आहे. मेंद = भोंदु असा हि अर्थ आहे. हा व पुढला असे दोन्ही अभंग तात्कालिन ज्ञानी व सिद्धी वापरणाऱ्या मनुष्यास उद्देशून आहेत.

॥ ५४८ ॥

॥ नाहीं सरो येत कोरड्या उतरीं । जीव्हाळ्याची वरी वोल ठायीं ॥१॥
॥ धृ ॥ आपलीया हीता मनासी कारण । सत्या नारायण साह्य असे ॥ धृ ॥
॥ नीवाणीं नीवाड होतो आगी मुखे । तप्त लोही सुखें धरीतां हातीं॥२॥
॥ तुका म्हणे नेमें न टळतां बरें । खऱ्यासी च खरे येसे नांव ॥ ३ ॥

( ५४८ ) कोरडया उत्तरानें कांहीं भागत नाही. तेथें मुळची जिव्हाळ्याची ओल हवी. नारायण हा कोणत्या हि सत्यकार्यास सहाय्य करतो, तेव्हां आपलें हित आपल्या मनास माहीत आहे. खऱ्या खोट्याचा निवाडा करण्याची वेळ आली कीं जो कोणी लोखड तापवून सुखानें हातांत धरील तो खरा—असा अग्नीच्या मुखानें च निवाडा होतो. तेव्हां तुका म्हणे—आपण आपल्या नेमास चुकं नये—खऱ्यास केव्हां हि खरें च म्हणतील, ही पूर्वीची दिव्य करण्याची रीत सागितली.

॥ ५४९ ॥

॥ वचनें चीं व्हावे आपण उदार । होईल वीस्वंभर संतुस्ट चीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ सत्य संकलपाची फळें बीजा येसी । शुध नाहीं नासी पावो येत ॥धृ॥
॥ वंचीलीया काय येतसे उपेगा । शरीर हें आळे गा नरकाचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जीव जीतां थारे लावा । पडीलीया गोवा देगधडी ॥३॥

( ५४९ ) आपण वचनानें उदार असावे—त्यामुळें विश्वंभर सतुष्ट होईल. सत्य संकल्पाचीं फळें सत्य च यावयाचीं, शुद्ध गोष्ट ही केव्हां हि नाश पावत नाहीं. आपण दुसऱ्यास फसवून आपल्या काय उपयोगास येणार आहे?

शरीर हें नरकाचें आलें आहे ना ? तुका म्हणे शरीर तुम्ही जीवतपणीं थारेस = आश्रयास—देवाच्या आश्रयास लावा, त्यात जर कसला गोवा पडला तर देशवडीस ला विं लागेल

॥ ५५० ॥

॥ मारूं नये सर्प संतांचीया दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥ १ ॥
॥ घृ ॥ येक सुत्र जीव शीवीं आइक्यता । रोम उपडीतां अग कापे ॥ घृ ॥
॥ नाही साहो येत दुखाची ते जाती । परपीडा भुती साम्य जाले ॥२॥
॥ तुका म्हणे दीला नीतीचा सकेत । पुजा नांव चीत सुखी तेण ॥३॥

( ५५० ) सताच्या समोर सर्प मारू नये ते त्यामुळें जीव–शिवाच्या ठिकाणीं ऐक्यता असल्यामुळें व्यापकपणानें कष्टी होतील म्हणजे एक केस उपटला तर जसें आपलें सारें अग दुखतें तसें एक साप मारता च ते कष्टी होतील. त्यास दुःख, भूत–मात्रास, परपीडेनें झालेलें—सोसवत नाहीं एवढें त्याचें भूतमात्राशीं साम्य झालेलें असतें तुका म्हणे मी तुम्हास हा नीतीचा सकेत करून दिला आहे. तो मानलात, पुजलात, तर, तेणें सुखी व्हाल नीतीचे सकेत सागताहेत.

॥ ५५१ ॥

॥ उखते आयुष्य जायाचे कलेवर । अवघे वोडवर वीपयांचे ॥ १ ॥
॥ घृ ॥ कोणासी हा लागे पुसणें वीचार । मन ची सादर करुं आता ॥ घृ ॥
॥ उत्पत्ती प्रळय पडोले दळण । पाकाचे भोजन वीज वाटे ॥ २ ॥
तुका म्हणे जाउ अभयाच्या ठाया । रीघो देवराया शरण वेगीं ॥ ३ ॥

( ५५१ ) उखतें = अवघें आयुष्य जाईल—हें कलेवर हि जाणारें च आहे व हा सर्व विषयाचा पसारा आहे तेव्हा यात नित्य काय—हा विचार कोणास विचारावयाचा ? तेव्हा आपण आपल्या मनास शरण गेलेलें बरें जगाची उत्पत्ति—प्रळय—हें वळण पडलेलें आहे. बीज वाटीस लागेल येवढें च पाकाचें भोजन—खरें भोजन—आहे तेव्हा—उत्पत्ति—प्रलय—याची बाधा नसलेलें एक च ठिकाण आहे—व तें म्हणजे (देवराया जवळ—तेव्हा) वेग करून त्यास शरण जावें

॥ ५५२ ॥

॥ बोलावें म्हूण वोलतो उपाय । प्रवाह ट जाय गगाजळ ॥ १ ॥
॥ घृ ॥ भाग्य योग कोणा घडेल सेवन । कैचे येथें जन अधीकारी ॥ घृ ॥
॥ मुखीं देतां घांस पळवीती तोडें । अंगींचीया भाडे असुकान ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पुजा करीतों देवाची । आपुलीया रुची मनाचीये ॥३॥

(५५२) मी या गोष्टी येवढ्या स्पष्टपणें बोलतो आहे याचें कारण अंतरांत बोलविणारा बोलतो आहे. म्हणून, एरव्हीं गंगाजळा प्रमाणें हें आपल्या प्रवाहानें वाहून जाईल. गंगा वाहत आहे–त्या प्रवाहांत जे कोणी स्नान करून घेतील ते पावन होऊन जातील. कोणी स्नान केलें नाहीं.–म्हणून गंगेचा ओघ थांबतो आहे असें नाहीं. तेव्हां माझ्या वाणीनें जो गंगेचा ओघ वाहतो आहे–त्यांत जे भाग्यवान असतील–ते स्नान करून घेतील. एरव्हीं येव्हढे अधिकारी लोक–आहेत कोठें ? तोंडांत (ब्रह्मरसाचा) घांस देऊं गेलों तरी हीं माणसें अंगीच्या असुखीं व भिक्षेवारी पोट भरण्याच्या वृत्तीनें तोंड पळवितात. तुका म्हणे मी या अभंगांच्या द्वारें देवाची मनाच्या आवडीनें पूजा बांधतो, करतो.

॥ ५५३ ॥

॥ भक्ती तो कठीण सुळावरील पोळी । नीवडे तो बळी वीरळा शुर ॥ १ ॥
॥धृ॥ जेथे पाहे तेथें देखीचा पर्वत । पाया वीण भींत तातडीची ॥ धृ ॥
॥ कामावले तरी पाका वोज चढे । रूची आणी जोडे श्लाघ्यता हे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नीत्य नवा दीस जागृतीचा ॥ ३ ॥

(५५३) माझी–अभंग युक्त पूजा ही या लोकांस पटत नाहीं. त्यांना भक्ति ही भोळसट वाटते. पण भक्ति ही सुळावरील पोळीसारखी कठीण आहे. तीं ज्याला निवडतां (पारख करतां) येईल असा एखादाच बळी–शूर असावयाचा–जेथें पहाल तेथें दिखाऊ मालाचे पर्वत आहेत–जशा पायाशिवाय भिंती घालाव्यात तशा. कोणती हि गोष्ट नीट कमावली तर त्या पाकास तेज चढतें, रुची हि येते, व गौरव हि होतो. तुका म्हणे–नित्य नवा दिवस जागृतीचा व्हावा असा मनाला अंकुश हवा,–टोचणी हवी, भक्ती बगळून इतर साधनें करण्याच्या.

॥ ५५४ ॥

॥ लटीक्याचे वाणी चवी ना स्वाद । नाहीं कोणा वाद रूचो येत ॥१॥
॥धृ॥अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायवापीं वेळा न साधीली ॥धृ॥
॥ अनाचर आंगीं प्रबळ अवगुण । तांतडीने मन लाहो साधी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे ॥ ३ ॥

(५५४) लटिक्याच्या वाणींस चव नसतें, स्वाद हि नसतो, त्याचा वाद कोणास रुचत नाहीं. हा अन्याय त्या वायचाळ्याचा नव्हे. त्याच्या आई-बापांनीं वेळ नीट साधली नाहीं ही त्यांची चूक आहे. त्यांच्या अंगी प्रबळ अवगुण अनावर असतात. त्याचें मन हें केव्हां हि तातडीनें छंद साधीत असतें.

तुका म्हणे त्यांस दोष लागतात व अवकळा येते. या गोष्टी कोणत्या हि गोष्टीचा ताळा नसतो म्हणून होत असतात.

॥ ५५५ ॥

॥ नये स्तवुं काचें होते क्रीयानस्ट । फुंदाचें ते कस्ट भंगा मुळ ॥ १ ॥
॥धृ॥ नाहीं परमार्थ साधत लौकीकें । धरूनी होतो फीक आंगा आलें ॥धृ॥
॥ पारखीया पुढें नये घालुं तोंड । तुटी लाभ खंड होतो माना ॥२॥
॥ तुका म्हणे तरी मीरवतो परवडी । कामावल्या गोडी अवीनाश ॥३॥

( ५५५ ) कोणा भक्ताचें मडकें कचें असतांना त्याची स्तुती करूं नये. त्यामुळें तो क्रियानष्ट होतो. फुंदतो—गर्वानें फुगतो—व ती गोष्ट त्याच्या नाशाचें मूळ होतें. परमार्थ हा कांहीं लौकिकानें साधत नाहीं. तुम्ही लौकिक साभाळूं लागाल तर परमार्थ फिका पडेल, फिकेंपण अंगीं येईल. जे जाणते आहेत त्यांन्या पुढें आपलें तोंड घालूं नये ही गोष्ट ५५२ अभंगांत भांड सांगितले यांस उद्देशून आहे. आपण त्याच्या बोलण्यांत तोंड घालूं नये, त्यामुळे लाभांत तुटी पडते—मान खंडण होतो. तुका म्हणे आपण परमार्थ खरं च कमावला असला तर आपण करूं त्या परवडी—प्रकार—मिरवितां येतील. व त्यांस अविनाश गोडी येईल.

॥ ५५६ ॥

॥ माया साक्षी आम्ही नेणो भीडभार । आप आणी पर नाहीं दोन्ही ॥१॥
॥धृ॥ सत्याचीये साठीं अवघाची भर । नावडे व्यापार तुटीचा तो ॥ धृ ॥
॥ पोभाळीतां चरे अंतरींचें दुःख । लासे फासे मुख उघडावे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नव्हे स्फीतीचा हा ठाव । नीवाड्यासी देव साक्षी केला ॥३॥

( ५५६ ) आम्ही मायेचे साक्षी आहोंत. आम्हांस तिच्या भीडेचा भार नाहीं त्याबरोबर च आम्हांस आप—पर हि नाहीं. तो सर्व व्यापार तुटींचा आहे. तो आम्हांस आवडत नाहीं—आमचा सर्व भर सत्यासाठीं आहे. अंतरांत दुःख असेल तें पोभाळलें ( चोळलें—घासलें ) तर आंतल्या आंत चरतें —त्या दुःखास लासावें फांसावें—व त्याचें तोंड उघडावें— तुका म्हणे हे ठिकाण कांहीं स्फीतीचें—वाहवा करण्याचें = नाहीं. हें ठिकाण निवाड्याचें आहे व येथें देव साक्षी आहे.

॥ ५५७ ॥

॥ संतां आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ॥१॥
॥धृ॥ परीसतां तेथें नाहीं येकावीणें । मोह न पवे सीण येसे रासे ॥ धृ ॥
॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखे दुसरें नासा मुळ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मुख्य कल्पतरू छाया । काय नाहीं दया तये ठाई ॥ ३ ॥

( ५५७ ) समर्थाचें बाळ जसे समर्थ असतें—तसा तो काळाचा काळ सताना आवडतो. परंतु तेथें एकाच्या सत्ते शिवाय दुसऱ्या कोणाची सत्ता चालत नाहीं. तो मोहानें शीण पावणार नाहीं—असें तुम्हांस राखतो. आपण जे अन्याय दोष, केले असतील ते, उपचार, इलाज, करून सांडनितो—आपल्या नाशास दुसरें कांहीं मूळ होणार नाहीं अशी तो काळजी घेतो. तुका म्हणे मुख्य गोष्ट ही आहे कीं आपण कल्पतरूच्या छायेखालीं बसलों आहोंत—तेव्हां तेथें आपल्याबद्दल फक्त पोटांत दया च आहे. दुसरा विचार च नाहीं. असा पूर्ण भरवसा हवा.

ही पंढरीनाथाबद्दलची स्पष्ट कल्पना येथें मांडिली आहे.

॥ ५५८ ॥

॥ संताच्या धीकारें अमंगळ जीणें । वीश्वशत्रु तेणें सांडी परी ॥ १ ॥
॥धृ॥ कुळ आणि रूप वांयां संवसार । केला भरतार मोकलीतां ॥ धृ ॥
॥ मुळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सायास तो येकठायीं । दीप हातीं तई अवघें वरें ॥ ३ ॥

( ५५८ ) संतांच्या धिकारें ज्यांचें जिणें अमंगळ असतें तें सदा अमंगळ असतें. त्यास विश्वाचा शत्रू म्हणून सोडून द्यावा. नवऱ्यानें सोडल्यावर—गेल्यावर—मेल्यावर—रूप—कूळ व केलेला संवसार हा जसा वाया. तसें संतांच्या धि.काराचें जिणें. जो कोणी मूळ राखून राहील त्यास सुखास काय उणें आहे ? तेव्हां चतुर जो असतो तो हीं लक्षणें सांभाळतो. म्हणून तुका म्हणे सायास जो करावयाचा तो फक्त एक च—एका ठायीं च करावयाचा. जोंपर्यंत तो दीप हातीं आहे तोंवर करावा म्हणजे सर्व बरें आहे.

॥ ५५९ ॥

॥ घ्यावी तरी घ्यावी उदंडची सेवा । द्यावें तरी देवा उदंडची ॥ १ ॥
॥धृ॥ येसी कैचीं आम्हीं पुरती भांडवलें । आल्या करी बोलें समाधान ॥धृ॥
॥ व्हावें तरी व्हावें बहुत ची दुर । आलीया अंतर वसवावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुझे सख्यत्व आपणीं । अससील रुणी आवडीचा ॥ ३ ॥

( ५५९ ) देवा माझ्याकडून घ्यावयाची ती सेवा उदंड घ्यावी व मला द्यावयाचें तें हि उदंड द्यावें अशी कांहीं आमच्याजवळ पुण्याई—भांडवल नाहीं—कीं त्या जोरावर मी उदंड मागेन—परंतु आम्ही तुमच्याजवळ आलो आहोंत. म्हणून आमचें समाधान करा. तुम्हांस दूर जावयाचें तर पुष्कळ दूर

जा. बरें जवळ यावयाचें तर अतरात वस्ती करा तुका म्हणे तुझें सत्यत्व हें आपण होऊन होईल तें च, म्हणजे माझ्या कर्तृत्वानें नव्हे तर तुझ्या कृपेने होईल तेवढें च व तें तू आवडीनें जितका ऋणी असशील तेवढें होईल.

सर्व सत्ता तुझे हातीं आहे तूं मनात आणशील तर तारशील, नाहीं तर, तार च, अस म्हणण्याइतकी माझी पुण्याई नाही, हा भावार्थ पण व्हावयास काय हवें तें गौळणींचा दृष्टात घेऊन सागतात

॥ ५६० ॥

॥ वीरह तापे फुदे छंद करी ते जाती ।
हा गे तो गे सावधान सवेचीं दुस्चीती ॥
॥ न सांभाळुनी अंग लोटी पाहे भोवती ।
॥ वेगळी च पडो पाहे कुळाहुनी याती ॥ १ ॥
॥ धृ ॥ खुटलीसी जाली येथे अवघी यांची गती ।
आपुली परावी कोण नेणे भोवती ॥
॥ त्यांची नांव वोभे अहो अहो श्रीपती ।
नवलाव हा येरा वांटोनीयां हासती ॥ धृ ॥
॥ बाहेरी च धावे रानां न धरी च घर ।
न कळे बंधना जाला तेण सचार ॥
॥ वीसरुनी गेली कीं सासुरे की माहेर ।
येका अवलोकी येका पडीला वीसर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्ही अवध्या राहा नीस्चळा ।
न ये आतां येउ येथे सर्वथा बळा ॥
॥ त्याचा त्याच्या मुखे अवघाची नीर्वाळा ।
बहुतां मते येथे तर्कवादी नीराळा ॥ ३ ॥

( ५६० ) एक गवळण विरह तापानें फुदत – व छद करीत जात होती – हा – गे – तो. गे सावधान – असें म्हणत पण दुश्चित्त अशी होती. स्वत'ला न साभाळता – आंग लोटी – आजुबाजूस पाही व अशी हिची कुळाहुनी वेगळी च याती पडू पहात होती. येथें कोणाची हि गती चालत नाहींशी झाली – आपलीं माणसें जवळ आहेत का दूर आहेत हें तीस कळत नव्हतें त्याची अहो अहो श्रीपती म्हणून नावें घेऊन ओरडत होती इतर गवळणींना त्याचें आश्चर्य वाटून त्या

हासत होत्या. ती बाहेर धावत होती, रानांत पळत होती. घरांत राहत नव्हती, तिला कसलें च बंधन वाटत नव्हतें, हा तिचा आचार झाला. सासर माहेर कांहीं आठवत नव्हतें. एकाचा एकदां विसर पडावयाचा, एकाचा एकदां आठव व्हाव-याचा. तुका म्हणे तुम्ही आतां अवघ्या निश्चळा रहा, येथें तुम्ही कोणी हि कसलें हि वळ करूं नका. त्याच्या मुखानें म्हणजे एका शब्दानें सर्व गोष्टींचा निर्वाळा होईल. बहुताच्या मतें येथें तर्क व वाद — निरनिराळे होतील. त्याच्या—कृष्णाच्या एका शब्दानें जसा निर्वाळा होईल तें कार्य बहुतांच्या बहुमतांनीं होणार नाहीं. म्हणजे त्याच्या एका शब्दानें ती सावध होईल. पण तुम्हीं सर्व जण बोलत राहिलांत तरी ती देहभानावर येणार नाही.

॥५६१॥

॥ नेणे जपतप अनुस्टान याग । काळें तय लाग घेतलासे ॥ १ ॥
॥धृ॥ रीघालो या भेणें देवाचे पाठीसी। लागे त्याचे त्यासी सांभाळणें ॥धृ॥
॥ मापे माप सळे चालीली चढती । जाली मग राती काय चाले ॥२॥
॥ तुका म्हणे चोरा हातीं जे वाचले । लाभावरी आलें वारी लेखु ॥३॥

(५६१) मला जपतप अनुष्ठान याग हें कांहीं कळत नाहीं. काळानें माझा लाग — पाठलाग — चालविला आहे. या भीतीनें देवाच्या पाठीशीं दडलों. आतां त्याचें त्याला सांभाळावें लागेल. मापावर माप चढून सळी — माप — चढत चाललें असतांना — रात्र झालेली केव्हां कळणार? तुका म्हणे (काळाच्या) चोराच्या हातून जे वांचले ते लाभावर आले म्हणून समजावेत.

॥५६२॥

॥ कळी आलें येसें आतां । नाहीं सता तुम्हांसी ॥ १ ॥
॥ धृ ॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥ धृ ॥
॥ आड येसें येते पाप । वाढे ताप आगळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गुण जाला । हा वीठला हीन शक्ती ॥ ३ ॥

(५६२) देवा तुम्हांस सत्ता नाहीं असें आतां कळी आलें. तुझ्या नामास वीर्य नाहीं — यामुळे प्रेम खंडत जातें. पाप आड येतें व ताप आगळा वाढतो. तुका म्हणे = विठ्ठला तूं हीन शक्ती झालास असा तुला गुण आला!

॥५६३॥

॥ स्वामीचे हे देणें । येथे पावलो दरुशण ॥ १ ॥
॥ धृ ॥ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥ धृ ॥
॥ कळावया वर्म । हा तों पायांचा ची धर्म ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सीधी । हे ची पाववावी बुधी ॥ ३ ॥

( ५६३ ) येथें दर्शन पावलों हें स्वामीचें देणें आहे. देवा, तुमच्याशीं आवडीनें वाद करूं तो आम्हांस सुखाचा संवाद होईल. यांतलि आम्हांस धर्म कळणें हा तुमच्या पायाचा धर्म आहे. तुका म्हणे ही माझी बुद्धि तुम्ही शेवटास पाववावी. [ येथें ओघ बदलला. खालील अभंग लोहगांवच्या वेढ्याचे आहेत. ]

॥ ५६४ ॥

॥ लागो दीलें आंगा । येसें कां गा सनीध ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ कोण्या पापें उदय केला । तो देखीला प्रळय ॥ ध्रु ॥
॥ न देखे पीडला सर्प । दया दर्प वीषाचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भले । मज तो न वजे साहीलें ॥ ३ ॥

( ५६४ ) देवा, कोण्या पापें उदय केला—व हा प्रलय देखीला. देवा—हें पाप माझ्या इतकें जवळ येऊन कां दिलेस ? हें माझ्या अंगास लागूं कां दिलेस ? मला हा प्रकार पहावत नाहीं, मला जो केवळ विषाचा दर्प च असा सर्प हि पीडलेला पहावत नाहीं, आणि येथें तों सर्व भले लोक पीडले आहेत. मला कांहीं हे सोसत नाहीं.

॥ ५६५ ॥

॥ धांवा शीघ्रवत । कींवा घ्यावें दंडवत ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ तुमचा जातो बडीवार । आम्ही होतो हीनवर ॥ ध्रु ॥
॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थीर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाणी । माझी लाजली त्या गुणीं ॥ ३ ॥

( ५६५ ) झटकन् धावा—किंवा आमचें दंडवत घ्या. देवा तुमचा लौकिक जात आहे. आणि आम्ही हीनाहून हीन ठरत आहोंत. आतां मात्र तुम्ही धीर धरूं नका. किंवा सावकाश चालूं नका. तुका म्हणे माझी वाणी तुमच्या गुणगानांत लाजली हो. हीनवर हा शब्द बिजवर यासारखा आहे. ज्या बाईनें आपल्यापेक्षां हीन कुळांतला नवरा केला कीं त्यास हीनवर म्हणतात. तशी विठला तुझी भक्ति हीनवर ठरत आहे.

॥ ५६६ ॥

॥ न देखवे डोळां येसा हा आकांत । परपीडे चीत दुखी होतें ॥ १ ॥
॥ध्रु॥ काय तुम्हीं येथें नसालसें जालें । आम्हीं न देखीलें पाहीजे हें ॥ ध्रु ॥
॥ परचक्र कोठें हरीदासांच्या वासें । न देखीजेत देशें राहातीया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझी लाजवीली सेवा । हीनपणें देवा जीणें जालें ॥ ३ ॥

( ५६६ ) डोळ्यांनीं पहावत नाहीं. पाहूं नये असा हा आकांत झाला, या लोकांच्या पीडेची हकीगत ऐकून चित्त दु:खी झालें देवा हा वेढा आला तेव्हां तुम्ही तेथें नव्हतां असें कसें झालें? देवा तुम्ही आम्हांस हें दृश्य दाखवावयास नको होतें. देवा, हरिदासांच्या वासास, जवळपास, कोठें परचक्र असतें कां, बरें, त्याच्या राहत्या देशांत हें दिसूं च नये. तुका म्हणे माझी सेवा लाजविलीस व माझें जिणें हिनिपणाचें झालें.

॥५६७॥

॥ काय म्या मानावें हरीकथेंचे फळ। तरीजे सकळ जनीं येसे ॥ १ ॥
॥धृ॥ उछेद तो असे हा गे आरंभला। रोकडे वीठला परचक्र ॥ धृ ॥
॥ पापावीण नाहीं पाप येत पुढें। साक्षीसी रोकडे साक्ष आले ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जेथे वसतील दास। तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ३ ॥

( ५६७ ) देवा, मी व या सकळ जनानीं हें हरीकथेचें फळ आलें असें कां मानावें? देवा, रोखठोक परचक्र! हा आमच्या भक्तीचा उच्छेद च माडला आहेस! पदरीं पाप असल्याशिवाय काहीं पुढें पाप येत नाहीं तेव्हां हें परचक्र रोकडें साक्षीस आलें. तेव्हां जेथें वसतील दास—म्हणजे या लोकांना गुलाम करून नेलें तर मग तेथें तुझा वास कसा होणार?

॥५६८॥

॥ भीत नाहीं आतां आपुल्या मरणा। दुखी होतां जना न देखवे ॥ १ ॥
॥धृ॥ आमची तो जाती येसी परंपरा। कां तुम्ही दातारा नेणा येसे ॥ धृ ॥
॥ भजनीं वीक्षेप ते ची पै मरण। न वजावा क्षण येक वाया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा। ते स्थळीं दातारा ठाव मागे ॥३॥

( ५६८ ) देवा, मी माझ्या मरणाला भीत नाहीं. पण जनाना दु:ख झालेलें पाहून मला दु:ख होतें. ते मला पहावत नाहीं. भजनामध्यें विक्षेप होणें यापेक्षां भक्तांना मरण बरें, भजनाशिवाय वाया असा एक हि क्षण जाऊ नये ही आमची जात व परंपरा—हें, दातारा, तुम्हांस माहीत नाहीं कां? देवा ज्या स्थळीं, असल्या आघाताचा वारा लागणार नाहीं, अशा स्थळीं मी ठाव मागत आहे.

॥५६९॥

॥ बोलीलीं ते तुम्हीं पाळावे वचन। येसे पुण्य कोण माझे गांठीं ॥ १ ॥
॥धृ॥ जातां आतां आज्ञा घेउनीया स्वामी। काळक्षेप आम्हीं करूं कोठें॥धृ॥
॥ न घडे याचरी न धरवे धीर। देखोनी राष्ट्र पीडलीया जग ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्ही दीसे मोकलीले। काय आतां आले जीवीत्वाचे ॥३

(५६९) देवा, आम्ही बोलूं तें वचन तुम्ही पाळावें ऐसें माझे गाठीं पुण्य नाहीं. तेव्हां स्वामी, आम्ही तुमची आज्ञा घेऊन जातों. आम्ही कोठें हि कालक्षेप करूं. राष्ट्र पीडिलेलें व जन त्रासलेले असें मला पाहवत नाहीं. तेवढा मला धीर नाहीं. धैर्य नाहीं. देवा, तुम्ही मला सोडल्यासारखें दिसत आहे. आतां राहिल्या जीवित्वाचें काय होय ? काय करावयाचें आहे ? राष्ट्र पीडिलेलें मला पाहवत नाहीं. असे स्पष्ट शब्द असतांना संत राष्ट्राबद्दल उदासीन असतात या प्रवादास आधार कोठें आहे !

॥ ५७० ॥

॥ हागतां ही खोडी । चळण मोडवीते काडी ॥ १ ॥
॥ धृ ॥ येंसें अनावर गुण । आवरावे काय म्हुण ॥ धृ ॥
॥ नाहीं जरी संग । तरी बडबडवीती रंग ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । तुमची न घडेची सेवा ॥ ३ ॥

(५७०) हागतां हागतां मनुष्य काडी मोडतो—असे माझे अंगीं अनावर गुण आहेत. ते कसे काय म्हणून आवरावेत, तुमचा संग नसतांना हि उगा च बडबडीचा रंग असतो. देवा, असल्या गुणांनीं तुमची सेवा घडत नाहीं. मी नको म्हटलें तरी कवित्व होतें च पण तीं कांहीं सेवा म्हणतां येत नाहीं.

॥ ५७१ ॥

॥ नाहीं तरी आतां कैचा अनुभव । जालासी तुं देव घरघेणा ॥ १ ॥
॥धृ॥ जेथें तेथें देखे लाचाचे पर्वत । ध्यावे तरी चीत समाधान ॥ धृ ॥
॥ आधीं वरी हात या नांवे उदार । उसण्याचे उपकार फीटा फीट ॥२॥
॥ तुका म्हणे जैसीं तैसीं करु सेवा। सामर्थ्यानें देवा पायापाशीं ॥ ३ ॥

(५७१) देवा, तूं घरघेणा झाला आहेस, आतां आम्हांस कसला अनुभव येणार ? जेथें पहावें तेथें लांडीलबाडीचे लाचाचे डोंगर आहेत. तुम्हांस कांहीं द्यावेंसें वाटत असेल तर चित्त समाधान पावेल असें द्यावें. जो उदार असतो त्याचा हात वर देण्यास मागणाऱ्याचा हात पुढें होण्यापूर्वीं च वर उचललेला असतो. उसनें फिटलें ते काय उपकार होत ? तुका म्हणे तुमच्या सामर्थ्यानें जशी हवी असेल तशी सेवा करूं.

॥ ५७२ ॥

॥ आम्हीं सर्वकाळ कैचीं सावधान । व्यवसायें मन अभ्यासलें ॥ १ ॥
॥धृ॥ तरी म्हणा मोट ठेवीली चरणीं । केलो गुणागुणीं कासावीसीं ॥ धृ ॥
॥ याचे कानसुली मारीतसे हाका । मज घातुं नका मधीं आतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नीद्रा जागृती सुषुप्ती । तुम्हीं हो श्रीपती साक्षी येथें ॥३॥

( ५७२ ) देवा, व्यवसायानें आमचें मन अभ्यासांत—नित्याच्या व्यवहारांत असल्यामुळे आम्ही सर्व काळ सावधान कसें रहावें ? तरी आम्ही हीं आपली मोट तुमचे पायीं ठेविली आहे. असें असून हि गुण अवगुण यांच्या विचारानें मन कासावीस होत आहे. मला घाटुं नका म्हणून याच्या कानाशीं हाका मारीत आहे—देवा—मी निद्रेंत असो—जागृतीत असो, सुषुप्तीत असो, श्रीपती तुम्हीं सर्वत्र साक्षी असा.

॥ ५७३ ॥

॥ नसता चि दाउनी भेव । केला जीव हिंपुटी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जालों तेव्हां कळलें जगा । वाउगा हा आकांत ॥ ध ॥
॥ गवसीलो पुढें मागें । लाग लागे पावला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केली आणी । सलगीच्यांनीं सन्मुख ॥ ३ ॥

( ५७३ ) देवा, तुम्हीं नसतांच, भलता च, भेव=भय= दाखवून जीवास हिंपुटी केलेत. जेव्हां जागा जालों तेव्हां कळलें कीं, हा आकांत वाउगा आहे. मागें पुढें तुम्हीं सांपडवीलें आहे—व माझा लाग लाविला आहे. देवा, सलगीनें आळी केली व मी सन्मुख आहे. या अभंगाचा संदर्भ नीट लागत नाहीं.

॥ ५७४ ॥

॥ हें कां आम्हां सेवादान । देखो सीण वीषमाचा ॥ १ ॥
॥ धृ ॥ सांभाळा जी ब्रीदावळी । तुम्ही कां कळीसारीखे ॥ धृ ॥
॥ शरणागत वैन्याहातीं । हे नोस्वीती देखीली ॥ २ ॥
॥ तुका म्हणे इछी भेटी । पाय पोटीं उफराटे ॥ ३ ॥

( ५७४ ) असा मी असतांना विषमाचा शीण देखावा हें कां आम्हांस सेवादान ? देवा, तुम्हीं आपली भक्त करुणाघन ही ब्रीदावळी सांभाळा—तुम्हीं कळीसारखे कां होता ? तुमचा शरणागत वैन्याहातीं जावा ही गोष्ट निश्चित पाहिली. तुका म्हणे तुमच्या पायांची भेटी व्हावी म्हणून इच्छा करून आहे. तों हें उरफाटें कां दिसतें ?

॥ ५७५ ॥

॥ कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझीया ॥ १ ॥
॥ धृ ॥ उफराटी तुम्हां चाली । क्रीया गेली सत्याची ॥ धृ ॥
॥ साक्षी हे गे माझें मन । आर्त कोण होतें तें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे समर्थपणें । काय नेणें करीतसा ॥ ३ ॥

( ५७५ ) पांडुरंगा, देवा, हें माझ्या भागास का आलें हें मला समजत नाहीं. तुमची सत्याची क्रीया जाऊन ही उफराटी चाली कोठून आली? माझें मनात काय आर्त होतें याबद्दल माझें मन साक्ष आहे तुका म्हणे देवा–तुम्ही समर्थ आहात मग तुम्हास हू समजत नाहीं असें कसें वागता ?

॥ ५७६ ॥

॥ शकुनाने लाभ हानी। येथुनी च कळतसे ॥१॥

॥ धृ ॥ भयारूढ जाले मन। आतां कोण वीस्वास ॥ धृ ॥

॥ भीत कळे आलींगनी। संपादनीं अत्यंत ॥ २ ॥

॥ तुका म्हणे मोकलीले। कळो आलें बरवे ॥ ३ ॥

( ५७६ ) माझें मन भयारूढ झालें, तेव्हा आतां या शकुनानें च लाभ किंवा हानि कळून आली. आता विश्वास कसा धरू ? भीति ही आलिंगनात कळो येते मग किती हि संपादणी केलेली असो. देवा, तुम्ही मला टाकलेंत हे बरवें ( स्पष्ट ) कळून चुकलें भीत कळ आलींगनीं हा गोड अनुभव आहे, गोड म्हण आहे.

॥ ५७७ ॥

॥ न व्हवे नीग्रह देहासी दंडण। न वजे भुक ताहान साहावली ॥ १ ॥

॥धृ॥ तरी नीत्य नीत्य करी आळवण। माझा अभीमान असों द्यावा ॥धृ॥

॥ नाहीं वींटाळले काया वाचा मन। सकल्पासी भीन असे ची या ॥२॥

॥ तुका म्हणे भवसागरीं उतार। कराया आधार इछीतसे ॥ ३ ॥

( ५७७ ) देवा, माझ्या हातून देहासी दंडण होत नाहीं–निग्रह होत नाहीं–तहान भूक सहावली जात नाहीं–हें असून मी नित्य आळवण करीत आहे, कीं देवा, माझा काहीं तरी अभिमान धरा, दुसऱ्या कोणत्या हि भिन्न आगोच्या सकल्पानें काया वाचा मन विटाळून दिलें नाहीं तुका म्हणे भवसागर–उतरून जाण्यास मी आधार मागत आहे.

॥ ५७८ ॥

॥ आइकीलीं कीर्ती संतांच्या वदनीं। तरी हे ठाकोनी आले स्थळ ॥१॥

॥धृ॥ मागीला पुढीला करावे सारीखें। पालटो पारीख नये देवा॥ धृ ॥

॥ आम्हांसी वीस्वास नामाचा आधार। तुटतां हे थार उरी नाहीं ॥२॥

तुका म्हणे येथे नसावे ची दुजे। वीनती पढरीराजे परीसावी हे ॥ ३ ।

(५७८) देवा, संतांच्या तोंडून तुमची कीर्ती ऐकून या स्थळास आलों. तेव्हां मागें जसें संतांस पैलपार केलेंत तसें च आम्हांस हि करावें—त्या तुमच्या वागण्यांत फरक होऊं नये. आम्हांस नामाचा आधार हा विश्वास आहे—व तें ठिकाण तुटल्यावर—आम्हांस उगी नाहीं—टेकावयास जागा नाहीं. देवा, येथें दुसरें कांहीं हि नसावें—पंढरीराजानें ही एवढी विनंती ऐकावी.

॥ ५७९ ॥

॥ कराल तें करा। हातें आपल्या दातारा ॥ १ ॥
॥ धृ ॥ बळीयाची आम्हीं वाळें। असो नीर्भर या सळें ॥धृ॥
॥ आतां कोठें काळ। करील देवापासीं बळ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पंढरीराया। थापटीतों ठोक बाह्या ॥ ३ ॥

(५७९) हे दातारा, तुम्हांस जें कांहीं करावयाचें तें आपल्या हातानें करा—या वेढ्यांत दुसऱ्यांच्या हातानें आम्हांस दुःख झालें असें करूं नका. आम्हीं बळीयाची बाळें आहोंत या सळें (अभिमानानें) निर्भर (भीतिशिवाय—निर्भय) आहोंत. आतां तुम्हां-आम्हां मध्यें ओंगळ काळ कसा काय शिरेल? तुका म्हणे मी निर्भयतेनें बाह्या ठोकतों. तू हि ठोक. येथवर लोहगांवच्या वेढ्याचें दुःख आहे. हे अभंग राष्ट्रहितांबद्दल व प्रपंचाबद्दल उदासीनता दाखवितात का? मी बाह्या थापटीतों व तूं हि बाह्या ठोक हें देवास वेढ्याचा प्रतिकार करण्याबद्दल आव्हान आहे. येथें रंग पालटतो तेव्हां म्हणतात.

॥ ५८० ॥

॥ डोळां भरीलें रूप। चींता पांयां पें संकल्प ॥ १ ॥
॥ धृ ॥ अवघीं घातलीं वाटणी। प्रेम राहीलें कीर्तनीं ॥ धृ ॥
॥ वाचा केली माप। रासीं हरी नाम अमुप ॥ २ ॥
॥ भरूनीयां भाग। तुका बैसला पांडुरंग ॥ ३ ॥

(५८०) माझ्या डोळ्यांत तुझें रूप भरलें आहे, चित्तांत सर्व संकल्प तुमच्या चरणसुखाचे आहेत. सर्व इंद्रियें वांटणीस घालून त्यांस काम लावून तुमच्या कीर्तनीं प्रेम तेवढें मनांत धरिलें आहे. वाचेनें हरीनामाचें अमुप माप केलें. मी आपल्या वांट्याचें काम करून पांडुरंगा बसलों आहे.

॥ ५८१ ॥

॥ आम्हां आहे नाहीं। न कळे आळीकरा कांहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ देसी पुरउनी इच्छा। आतां पंढरी नीवासा ॥ धृ ॥
॥ नेणे भाग सीण। दुजें कोणी तुम्हांवीण ॥ २ ॥
॥ आतां नव्हे दुरी। तुका पायीं मीठी मारी ॥ ३ ॥

( ५८१ ) आम्हां आळीकरांना — तुमच्याजवळ काय आहे, काय नाहीं, याची चिंता करण्याचें कारण काय ? तेव्हा आम्ही जी जी इच्छा करूं ती ती तूं पुरवशील. तुम्हांशिवाय दुसरा कोणीं आमचा शीणभाग जाणत नाहीं. लक्ष्यांत घेत नाही. आतां मी कांहीं तुम्हांपासून दूर होणार नाहीं — तेव्हां तुमच्या पायीं मिठी धालतो. येथें ओघ बदलला.

॥ ५८० ॥

॥ दुर्जनाचें आंग अवघेंची सरळ । नरकाचा कोथळ साठवण ॥ १ ॥

॥धृ॥ खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ सघटणे ॥ धृ ॥

॥ सर्पा मंत्र चाले धरावया हातीं । खळाची हे जाती नीखळची ॥ २ ॥

॥ तुका म्हणे कांहीं न साहे उपमा । आणीक अधमा वोखट्याची॥ ३ ॥

( ५८२ ) दुर्जनाचें अंग अवघें सरळ असतें. पण तें केवळ नर्काची साठवण असल्यासारखें आहे. तो अमंगळ खातो, अमंगळ बोलतो — व त्याच्या संघट्टनानें कपाळ उठवितो. सर्पास हातीं धरावयास मंत्र चालतो — पण खळाची जाती — निखळ चि. तुका म्हणे या अधमाला वोखट्याची आणीक कसली हि उपमा च देतां येत नाहीं — याच्यासारखा हा च.

॥ ५८३ ॥

॥ आइका जी सज्जन जन । सादर मन करुनी ॥ १ ॥

॥ धृ ॥ सकळाचे सार येक । कंटक ते त्यजावे ॥ धृ ॥

॥ वीशेषता कांद्याहुनी । सेवीतां त्या घाणी आगळी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बैसी जे ॥ ३ ॥

( ५८३ ) तेव्हां सज्जन हो, मन सादर करून ऐका — सर्व शिकवणींचें एक सार आहे व तें हें कीं कंटक जे आहेत ते वर्जावेत. यांच्याशीं विशेष संबंध आला तर कांद्याहून घाण ज्यास्त येईल. तुका म्हणे ज्याची जोडी करावी त्याचे पंक्तीस बसावें लागतें. ओघ बदलला. तेव्हां कंटक वर्जून काय करा ?

॥ ५८४ ॥

॥ संकल्पासी अधीस्टान । नारायण गोमटें ॥ १ ॥

॥ धृ ॥ अवघीयांचे पुरे कोड । फीटे जड देहत्व ॥ धृ ॥

॥ उभय लोकीं उतम कीर्ती । देव चीती राहीलीया ॥ २ ॥

॥ तुका म्हणे जीव धाय । नये हाय जवळी ॥ ३ ॥

( ५८४ ) नारायण हें संकल्पाशीं फार गोमटें अधिष्ठान आहे. येथें सर्वांचे कोड पुरून देहाचें जडत्व फिटतें. नारायणानें चित्तांत घर केलें तर उभय लोकीं कीर्ति होते – हाय – हाय – जवळ येत नाहीं व जवि घातो. संतुष्ट होतो – समाधान पावतो.

॥ ५८५ ॥

॥ भाग्यवंता येसी जोडी । परवडी संतांची ॥ १ ॥
॥ धृ ॥ धन घरी पांडुरंग । अभंग जें सरेना ॥ धृ ॥
॥ जना वीरहीत हा लाभ । टांचे नभ साठवणें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वीष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ३ ॥

( ५८५ ) भाग्यवंत जे असतात त्यांस संतांची संगत ही मोठी जोडी असते. त्यांचे घरीं पांडुरंग हें धन असतें व तें अभंग – कधीं हि भंग न पावणारे व न संपणारें असें असतें. हा लाभ जनविरहित नेहमी पेक्षां वेगळा आहे. लोकांना न होणारा असा आहे. धन घरीं पांडुरंग ही साठवण आकाशास जाऊन भिडणारी आहे. तुका म्हणे विष्णुदासांना याशिवाय दुसरी कसली – हि – आशा नसते.

॥ ५८६ ॥

॥ दुर्बळ हे अवघे जन । नारायणीं वीमुख ॥ १ ॥
॥ धृ ॥ झाडोनीयां हात जाती । पात्र होती दंडासी ॥ धृ ॥
॥ सीदोरी तें पापपुण्य । सवें सीण भीकेचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पडीला वाहो । कैसा पाहो लटीक्याचा ॥ ३ ॥

( ५८६ ) जे नारायणास विमुख असतात ते दुर्बळ ( भाग्यवंताच्या विरुद्ध हा शब्द आहे ) येथें हात झाडून जातात व दंडास पात्र होतात. त्यांचे जवळ पाप–पुण्य व भिकेचा शीण ही शिदोरी असते. तुका म्हणे हा या लटि-क्यांचा कसा प्रवाह वाहतो आहे तो पाहून घ्या.

॥ ५८७ ॥

॥ जऱ्ही आलें राज्य मोळवीक्या हातां । तरी तो मागुता वेवसाई ॥ १ ॥
॥ धृ ॥ तृष्णेची मजुरें नेणती वीसावा । वाढ हावा हावा काम कामीं ॥ धृ ॥
॥ वैभवाचीं सुखें नातळती आंगां । चींता करी भोगा वीघ्र जाळी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाहे मरणाचें भय । रक्षण उपाय करुनी असे ॥ ३ ॥

(५८७) मोळीविक्यास जरी राज्य मिळालें तरी त्यास श्रम केल्याशिवाय गोड वाटणार नाहीं, तृष्णेचीं मजुरें असतात त्यास विसावा माहीत नसतो, कामानें काम वाढवावें तसे हावेनें हाव त्याची वाढत च असते त्याच्या अगास वैभवाचीं सुखें सुख देत नाहींत यास कांहीं विघ्न होणार नाहीं ना, अशी चिंता त्यास जाळीत असते. तुका म्हणे मरणाचें भय वाहून ते रक्षणाचे उपाय करीत असतात. ते हां त्यांस खालील अभगातील तत्त्व पटणार कसें ?

पहिले दोन चरण म्हणी आहेत.

॥ ५८८ ॥

॥ अमर आह्मां अमर आह्मां। खरं की पाहा खोटं ते ॥ १ ॥
॥ धृ ॥ न म्हणा देह माझा येसा। मग भरवसा कळेळ ॥ धृ ॥
॥ कैचा धाक कैचा धाक। सकळीक हे आपुले ॥ २ ॥
॥ देवची वरे देवची वरे। तुका म्हणे खरे तुम्ही ॥ ३ ॥

(५८८) अमर आहा ! अमर आहा ! हें खरें कीं खोटें येवढें एकवार सर पहा ! हा देह माझा आहे असें म्हणू नका मग तुम्हास तुम्ही अमर आहा या गोष्टीचा भरवसा वाटेल. अरे, धाक कसला धरतां हे सर्व आपले च आहेत, देव बरा आहे व तुम्ही खरे आहात.

॥ ५८९ ॥

॥ कोण होईल आतां संसार पांगीलें। आहे उगवले सहजे ची ॥ १ ॥
॥धृ॥ केला तो चालवी आपला प्रपंच। काय कोणा वेच आदा घे द ॥ धृ ॥
॥ सहज ची घडे मोल केल्यावीण। येथे काय सीण आणी लाभ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जालों सहज देखणा। ज्याच्या त्याने खुणा दाखवील्या ३

(५८९) वर केलेला बोध मनीं धरून उगाच संसारानें पांगलेलें — गाजलेलें होण्याचें कारण काय ? हें सर्व आपोआप उगवलें — मोकळें आहे. ज्यानीं हा प्रपच केला आहे तो हा प्रपच चालवीत आहे. त्यात आदा — घे दे करून कोणाचें काय वेचे ? येथें लाभ काय, शीण काय याचें मोल कांहीं हि केल्याशिवाय आपण च होतें. ज्याच्या त्यानें स्वतः खुणा दाखविल्यानें मीं सहज च देखणा-द्रष्टा झालों आहे.

॥ ५९० ॥

॥ काम नाही काम नाहीं। जालों पाहीं रीकामा ॥ १ ॥
॥ धृ ॥ फावल्या या करू चेस्टा। नीश्चळ द्रस्टा बेसोनी ॥ धृ ॥
॥ नसत्या छंदे नसत्या छंदे। जग वीनोदे वीहरतसे ॥ २ ॥
॥ येका येकी येका येकीं। तुका लोकीं नीराळा ॥ ३ ॥

(५९०) असा हा द्रष्टा निश्चळ बसून—ज्या फावतील—साधतील त्या चेष्टा करीत आहे. मला कांहीं हि काम नाहीं. मला कांहीं हि धाम नाहीं. मी रिकामा आहे पहा. जग हें नसत्या उगाच वायफळ छंदानें वागत असतें. एका एकीं तुका जगांतून वेगळा निघाला—निराळा झाला. या ५।७ अभंगांत तुकोबांचें दर्शन कसें आहे तें पहावें.

सर्व जगाहून वेगळा—निराळा—जगाचा द्रष्टा झालेला तुका—काय करीत आहे ते सांगताहेत.

॥५९१॥

॥ हातीं घेउनीया कांठीं । तुका लागला कलीवरापाठीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ नेउनी नीजवीले समसानीं । माणसे जाळी ते ठीकाणीं ॥ धृ ॥
॥ काढीले ते वाढे । मागील उपचाराचे पुढे ॥ २ ॥
॥ नाहीं वाटो आला भेव । सुख दुख भोगीता देव ॥ ३ ॥
॥ याजसाठीं हे नीर्वाण । केलें कसीयेलें मन ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे अनुभव बरा । नाहीं तरी शास्त होय चोरा ॥ ५ ॥

(५९१) मी हातांत काठी घेऊन कलीवराच्या, शरीराच्या, पाठीस लागलों, जेथें माणसें जाळतात त्या ठिकाणीं त्यास नेऊन निजविलें. मागील उपचाराचे जे ओढे—पूर्व संस्काराची जीं ओझीं होतीं तीं सर्व पुढें काढलीं—तेव्हां लक्ष्यांत आलें कीं—सर्व सुखदुःख देव भोगीत आहे तेव्हां भय वाटलें नाहीं, स्मशानांत नेऊन कलीवरास तेथें निजविण्याचें मी जें निर्वाण केलें तें मन कसून केलें. तुका म्हणे हा अनुभव बरा, नाहीं तर, चोरांना—शास्त करावयास—अंमल चालविण्यास फावते. या अभगांत मनाचे व्यापार कसे चालतात याचें आमूलाग्र आकलन झाल्यानें बरा अनुभव आला म्हणून म्हटलें.

॥५९२॥

॥ आम्हां शरणांगतां । येवढी काय करणे चींता ॥ १ ॥
॥ धृ ॥ परी हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहतो सकळ ॥ धृ ॥
॥ अभयदान वृंदे । आम्हां केंची भेद-द्वंद्वे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आम्ही । हरीजन साधनाचे स्वामी ॥ ३ ॥

(५९२) आम्हां शरणागतांना येवढी चिंता करण्याचें कारण नाहीं.—परंतु कवतुकानें सर्व खेळ पाहत आहे. पाप—पुण्य—सुख—दुःख—हीं द्वंद्वें—अभयाचे आम्हांस दान होत असल्यामुळें आम्हांस बाधत नाहींत. तुका म्हणे

आम्ही हरीजन केवळ साधनाचे स्वामी आहोत. नाम घेणें येवढें आमचें काम — व एवढें च आम्हांस साधन तें आम्ही सदा करीत असतों.

तुका म्हणे आम्ही । हरीजन साधनाचे स्वामी ।—

॥ ५९३ ॥

॥ न करीं तुमची सेवा । बापुडें मीपण देवा ।
॥ बोलीलों तो पावा । पण सीधी सकळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ आणीक काय तुम्हां काम । आम्हां नेदा तरी प्रेम ।
॥ कैसे धर्मा धर्म । नीस्चयेसी राहाती ॥ धृ ॥
॥ आम्हीं वेचलो शरीरें । तुम्ही बीज पेरा खरें ।
॥ संयोगाचें वरें । गोड होतें उभयतां ॥ २ ॥
॥ येका हातें टाळी । कोठें वाजते नीराळी ।
॥ जाला तरी बळी । स्वामी वीण शोभेना ॥ ३ ॥
॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुढाची त्या सता ।
॥ होईन सरता । संतामाजी पोसणा ॥ ४ ॥
॥ ठेवीलें उधारा । वरी काय तो पातेरा ।
॥ तुका म्हणे बरा । रोकडाची नीवाड ॥ ५ ॥

( ५९३ ) म्हणून जें म्हणालो तें साधन — देवा मी बापुडेपणानें, दीन — पणानें करणार नाहीं. तुम्ही मी केलेले सर्व पण सिद्धीस न्या. आम्हांस जर तुम्ही प्रेम दिलें नाहींत तर तुम्हांस याशिवाय काम तरी काय आहे? व असें आम्हांस प्रेम दिल्याशिवाय तुमचे धर्माधर्म तरी कसे सांभाळीले जातील? आम्ही शरीर वेचीत आहोंत म्हणून तुम्ही खरें बीज पेरा. त्या सयोगानें उभयतांस हि गोड वाटेल. देवा, एका हातेनें कधीं टाळी वाजवितां येते कां? तसें तुम्ही स्वामी आहांत हें कबूल, पण सेवक हजर नसेल तर स्वामी शोभणार नाहीं. तेव्हां आतां अनंता, तुम्ही रूपास यावें, त्यांचेपुढें मी सत्ता धरीन. तुम्ही रूप धारण केल्यानें मला सत्ता करावयास स्थान होईल. व त्यामुळें संतांमध्ये पोसणा सरता होईन. तुका म्हणे जर ही गोष्ट उधारावर ठेविलीत तर फार फजिती होईल! तेव्हां रोकडाच निकाल केलेला बरा. एका हातानें टाळी वाजत नाहीं. म्हणजे भांडण होत नाहीं अशा अर्थानें ही म्हण प्रसिद्ध आहे. पण चांगली गोष्ट सुद्धां एका हातानें होत नाहीं या अर्थानें येथें उपयोग केला आहे.

॥५९४॥

॥ भुके नाहीं अन्न। मेल्यावरी पींडदान॥ १॥
॥ धृ॥ हे तों चाळवा चाळवी। केले आपणची जेवी॥ धृ॥
॥ नैवेद्याचा आळ। वेच ठाकणीं सकळ॥ २॥
॥ तुका म्हणे जड। मज न राखावें दगड॥ ३॥

(५९४) जर ही गोष्ट उधारीवर नेलीत तर मग भुकेच्या वेळीं अन्न न दिल्यानें—मी मेल्यावर पिंडदान केल्यासारखें होईल. किंवा जेवण तयार करून तें आपण खावें व चाळवाचाळव करावी तशासारखें होईल. किंवा नैवेद्याचा आळ घेऊन जसें सर्व कांहीं संपवावें तसें होईल. तुका म्हणे मला या जड दगडासारखा ठेवूं नका. येथें ओघ बदलला.

॥५९५॥

॥ देवाचीये चाडे प्रमाण उचीत। नये वाहुं चीत नीपेधासी॥ १॥
॥धृ॥ नये राहो उभे कसमळा पासीं। भुंकतील तैसी सांडावीं तीं॥ धृ॥
॥ तुका म्हणे क्षमा सुखाची हे रासी। सांडुनी कां येसी दुखी व्हावें॥१॥

(५९५) देवाच्या चाडे, देवासाठीं, ज्या गोष्टी कराव्या लागतील त्या सर्व प्रमाण—उचीत होत. या व्यतिरिक्त ज्या गोष्टी त्या निषिद्ध त्यांत आपलें मन वाटूं नये—खर्चू नये. जेथें कांहीं घाण असेल तेथें आपण उभे राहूं नये तसें च जेथें माणसें कुत्र्यासारखीं भुंकत असतील तेथें हि उभें राहूं नये. तुका म्हणे क्षमा ही सुखाची राशी असतांना—आपणाजवळ असतांना—आपण दुःखी काय म्हणून व्हावे?

॥५९६॥

॥ खळा सदा क्षुद्रीं दृष्टी। करी कष्टी सज्जना॥ १॥
॥ धृ॥ करीती आपुलाले परी। धणी वरी व्यापार॥ धृ॥
॥ दया संतां भांडवल। वेची बोल उपकारें॥ २॥
॥ तुका म्हणे आपुलाले। उसंतीलें ज्यांणीं ते॥ ३॥

(५९६) खळाची नेहमीं क्षुद्र दृष्टी असते व तो सज्जनांना सदा कष्टी करीत असतो. दया हें संतांचें भांडवल असतें व ते बोल वेंचून क्षमा करीत असतात. प्रत्येक जण आपआपल्यापरीनें हौस फिटावी इतका व्यापार करून आहे, तुका म्हणे प्रत्येक जण आपलें काम शेवटास नेत आहे.
(येथें ओघ बदलला.)

॥ ५९७ ॥

॥ जग येसे बहुनांवें । बहुभावे भावना ॥ १ ॥
॥ घृ ॥ पाहो बोलो बहु नये । सत्य काय सांभाळा ॥ घृ ॥
॥ कारीयासी जे कारण । ते जतन करावे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे संतजनीं । हेची मनीं धरावे ॥ ३ ॥

(५९७) जग म्हटले कीं त्याला अनत नांवें आहेत, व त्यांत भावना हि अनत आहेत. तेव्हां आपण फार पाहू नये, फार बोलू नये, सत्य काय आहे, तें पाहून, सभाळावें म्हणजे झालें. त्या सत्याचा जो कार्यकारणभाव असेल तो सभाळला म्हणजे झालें तुका म्हणे संत जनांनीं—सत्य काय आहे ते सांभाळा—म्हणून सांगितलें—ही गोष्ट मनी सांठवावी ही मनांत साठवायची गोष्ट पुढील अभगांतून सांगताहेत.

॥ ५९८ ॥

॥ नीघाले ते आगीहुनी । आतां झणी आतळे ॥ १ ॥
॥ घृ ॥ पळवा परपरले दुरी । आतां हरी येथुनी ॥ घृ ॥
॥ धरीले तैसे श्रुत करा हो । येथे आहों प्रपंचीं ॥ २ ॥
॥ अबोल्याने ठेला तुका । भेउनी लोकां नीराळा ॥ ३ ॥

(५९८) देवा, या आगींतून जे बाहेर पडलें आहे तें कदाचित्—पुनः स्पर्श करील न करील तेव्हां हरि, तें वरचेवर पळवा, दूर करा आम्ही या प्रपचांत आहोंत म्हणून काय सुतक लागावयाचें ते लागो—तुका अबोल्यानें ठेला आहे. तेव्हां त्यास निराळा ठेऊन भीववू नका.

॥ ५९९ ॥

॥ आतां दुसरे नाही वनीं । नीरंजनीं पडलों ॥ १ ॥
॥ घृ ॥ तुमची च पाहे वास । अवघी आस नीरसली ॥ घृ ॥
॥ मागीलांचा मोडला माग । घडला त्यास अरुची ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करुणाकरा । तुं सोईरा जीवींचा ॥ ३ ॥

(५९९) आतां मी दुसऱ्या कोणत्या रानावनांत जात नाहीं—तर माझा वास निरजनीं आहे. व इतर सर्व गोष्टाची आस सोडून तुमची वाट पाहात आहे माझ्या सचिताच्या सर्व गोष्टींची माझ्या ठिकाणीं अरुची उत्पन्न होऊन माग मोटला आहे तुका म्हणे बा करुणाकरा—तू च तेवढा माझा जीवींचा सखा आहेस.

॥ ६०० ॥

॥ धरुनीया सोई परतले मन । अनुलक्षी चरण करोनीयां ॥ १ ॥
॥धृ॥ येई पांडुरंगे नेई सांभाळोनी । करुणा वचनीं आळवीतो ॥धृ॥
॥ बुधी जाली साहे परी नाहीं बळ । अवलोकीतो जळ वाहे नेत्री ॥२॥
॥ न चलती पाय गळीत जाली काया । म्हणउनी दया येउं व्हीवी ॥३॥
॥ दीशेच्या करीतो वारयासी मात । जोडोनीयां हात वास पाहे ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे वेग करावा सत्वर । पावावया तीर भवनदीचे ॥ ५ ॥

(६००) तुमच्या चरणाचें अनुसधान ठेवून तुमच्या पायाची सोय धरून माझें मन परतलें आहे तेव्हां येई पाडुरगे नेई साभाळूनी या करुणावचनांनीं तुम्हास आळवीत आहे. मला बुद्धी सहाय्य झाली आहे पण बुद्धी जो रस्ता दाखवीत आहे तो चालण्यास मला बळ नाहीं—तुझी वाट पाहात आहे व नेत्रीं-जल वाहात आहे. देवा, माझे पाय चालत नाहींत, काया गळीत झाली आहे. म्हणून तुम्हांस माझी दया यावी. तुमच्या दिशेकडून जो वारा येईल त्याच्याशीं मी गोष्टी सागतो व हात जोडून वाट पहात आहे. देवा—भवनदीचें पैलतीर मला गाठण्यास सत्वर वेग करावा.

॥ ६०१ ॥

॥ न संडावा ठाव । ऐसा नीस्चयाचा भाव ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां पुरे पुन्हा यात्रा । हे चीं सारुनी सर्वत्रा ॥ धृ ॥
॥ सनीधची सेवा । अम्ही करूनीयां देवा ॥ २ ॥
॥ आज्ञेच्या पाळणे । असे तुका संता म्हणे ॥ ३ ॥

(६०१) देवा, ज्या ठिकाणावर मी उभा आहे. तो न संडावा असा माझा निश्चयाचा भाव आहे. जें काहीं करावयाच तें करून बाजूस सारून—पुन: ही यात्रा नको. देवा तुमच्या जवळ सेवा करून मी तुमची आज्ञा पाळून राहीन असें तुका संतांना म्हणतो.

॥ ६०२ ॥

॥ उपाधीचे बीज । जळोनी राहीले सहज ॥ १ ॥
॥ धृ ॥ आम्हां राहीली ते आतां । चाली देवाचीया सता ॥ धृ ॥
॥ पराधीन ते जीणे । केले संता नारायणे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पाय । खुंटले आणीक उपाय ॥ ३ ॥

(६०२) सर्व उपाधींचें बीज सहज च जळोन गेलें आतां राहिली ती सत्ता देवाची चालूं आहे. नारायणानें माझें जिणें स्वत:च्या आधीन केलें—ताब्यांत घेतलें तुका म्हणे याच्या पायाची ओळख झाल्यावर आणीक उपाय खुटले.

॥ ६०३ ॥

॥ वळींवंत आम्ही समर्थाचे दास। घातलीया कास सकळीकासी ॥ १ ॥
॥ध्रु॥ तेथें माणसाचा कोण आला पाड। उलंघोनी जड गेलों आधीं ॥ ध्रु॥
॥ संसाराचे वळी साधीलें नीधान। मारीले दुर्जन पडवर्ग ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येक उरला धरीतां ठाव। येर केले वाव तृणवत ॥ ३ ॥

(६०३) आम्ही समर्थाचे दास सर्वांस कास घालून मोठे बळींवंत आहोंत. आम्ही केव्हां च जड—जडत्व उल्लंघून गेलों आहोंत आतां येथें माणसाचा काय पाड आहे! संसाराचें आम्ही निधान बळवान होऊन साधलें म्हणजे दुर्जन षड्वर्ग मारले. तुका म्हणे इतर सर्व गोष्टी तृणवत करून एक ठाव उरला तेवढा धरिला आहे. तो ठाव कोणता तें सांगताहेत:—

॥ ६०४ ॥

॥ येक गावें आम्हीं विठोबाचें नाम। आणीकां पें काम नाहीं आतां ॥१॥
॥ध्रु॥ मोडोनीयां वाटा सुक्षम सगर। केला राजभार चाले ऐसा ॥ध्रु॥
॥ लाउनी मृदंग टाळ श्रुती घोष। सेवुं ब्रह्म रस आवडीनें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे महा पातकी पतीत। ऐसीयांचे हीत हेळामात्रें ॥ ३ ॥

(६०४) तुका म्हणे एक उरला धरीतां ठाव. तो ठाव. एक विठोबाचें नाम गावें—इतर कोणत्या हि गोष्टीचें आतां काम उरलें नाहीं.—बारीक—सूक्ष्म—अरुंद अशा ज्या परमार्थाच्या वाटा होत्या त्या मोडून राजरस्ता ऐस पैस केला. मृदंग टाळ लावून श्रुती घोष करूं—व आवडीनें ब्रह्मरस सेवन करूं; तुका म्हणे कोणी पतित—महापातकी असतील तर त्यांचें हित क्षणमात्रांत येथें होईल.

॥ ६०५ ॥

॥ भावीका हें वर्म सांपडलें नीकें। सेवीती कवतुकें धणीवरी ॥ १ ॥
॥ध्रु॥ इछीतील तैसा नाचे त्यांचे छंदें। वंदीती तीं पदें सुकुमारें ॥ध्रु॥
॥ वीसरले मुक्ती भक्ती अमीळासें। वोढत सरीसें सुर आलें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाहीं मागायाची आस। पांडुरंग त्यांस वीसंवेना ॥ ३ ॥

(६०५) भावीकांस हें निकें (स्पष्ट, स्वच्छ, शुद्ध—खणखणीत) वर्म (वरील अभंग) सांपडलें ते त्याचें सेवन कवतुकानें हौस फिटेपर्यंत करीत

राहतील—देव त्यांच्या छंदानें—ते इच्छितील तसा नाचत राहील—व ते (भावीक) तीं सुकुमार पदें घणीवरी हीस फिटेपर्यंत वद्वीतील. सुख हें आपण होऊन त्यांचे जवळ वोढत आले व ते (भावीक) भक्तीच्या अभिलापानें—मुक्ती विसरले. तुका म्हणे त्यांस कांहीं हि मागण्याची आस नाहीं, आस करावी लागत नाही. नारायण त्यांस कधीं हि विसंबणार नाहीं.

॥ ६०६ ॥

॥ भक्तां समागमें सर्व भावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥ १ ॥
॥ध्रु॥ सांठवला राहे हृदय संपुष्टीं । बाहेर धाकुटी मुर्ती उभा ॥ ध्रु ॥
॥ मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतील्या रोकडे मनोरथ ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जीव भाव देवापायीं । ठेवुनी ते कांहीं न मागती ॥ ३ ॥

(६०६) मागील अभंगांत तुका म्हणे नाहीं मागायाची आस। नारायण त्यांस विसंबेना॥—म्हणून सांगितलें—ती गोष्ट ज्यास्त स्पष्ट करून सांगताहेत, भक्तांच्या समागमांत सर्व कामें कोणी कांहीं सांगितलें नसतांना देव सर्व भावे करितो. तो त्यांच्या हृदय संपुष्टांत जसा सांठविलेला असतो तसा च धाकटी मूर्ती होऊन बाहेर उभा राहतो. आपल्या मनांत कांहीं मनोरथ आहेत का—म्हणून चितन करीत असतो. व आपण कांहीं मागावें म्हणून आपल्या तोंडाकडे सारखा पाहात असतो. तुका म्हणे भक्त हे आपला जीवभाव देवापायीं ठेऊन त्याच्याजवळ कांहीं हि मागत नाहींत.

॥ ६०७ ॥

॥ प्रेम अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ती पायीं ॥ १ ॥
॥ध्रु॥ सकळ हीं तेथें वोळली मंगळें । वृष्टी केली जळें आनंदाच्या ॥ध्रु॥
॥ सकळ इंद्रीयें जालीं ब्रह्मरूप । ओतले स्वरूप मार्जी तया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ३ ॥

(६०७) या भक्तांच्या मनाची वृत्ति देवापायीं राहिल्यानें त्यांची रसना हीं (प्रेम हेंच अमृत त्या) अमृतानें सदा ओलावलेली असते. हे भक्त जेथें असतात तेथें सर्व मंगल गोष्टींचा वर्षाव होत असतो—व आनंदाच्या जलाची वृष्टि होत असते. या भक्तांची सर्व इंद्रियें ब्रह्मरूप झालेलीं असतात व त्यांत श्रीहरीचे स्वरूप ओतलेलें असतें म्हणजे तीं हरिरूप झालेली असतात. तुका म्हणे असा भक्तराव जेथें राहतो—तेथें देव नांदत असतो याबद्दल संदेह नको. तेव्हां आतां

॥ ६०८ ॥

॥ जळो आतां नांव रुप । माझे पाप गांठीचे ॥ १ ॥

॥ धृ ॥ संताचीया चरण रजे । उतरुं ओझे मातीचे ॥ धृ ॥

॥ लटीक्याचा अभीमान । होता सीण पावयीत ॥ १ ॥

॥ तुका म्हणे आरुपीचे । सुख साचे नीनांवे ॥ ३ ॥

(६०८) या भावीकांच्या सगतीत आता माझें नाव रूप हें च कोणी एक पाप आहे तें जळो. या सताच्या चरणरजानें या मातीचें ओझें उतरवू लटीक्याचा (नाव व रूप यांचा) अभिमान धरला होता म्हणून शीण पावत होतों तुका म्हणे अरुपीचें सुख नीनावे साचें आहे. येथें ओघ बदलतो.

॥ ६०९ ॥

*॥ नींदा स्तुती करवी पोट । सोग दाखवी बोभाट ॥ १ ॥*

॥ धृ ॥ जटा राख वीटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ धृ ॥

॥ शृंगारीलें मढें । जीवे वीण जैसें कुडें ॥ १ ॥

॥ तुका म्हणे रागे । भलते चावळे वाउगे ॥ ३ ॥

(६०९) पोट हें निंदास्तुती करवितें. व बोभाटयानें सोंग दाखवितें, जटा–राख ही शरीराची विटंबना आहे मनास धीर हि नसतो क्षमा हि नसते. शृगारिलेलें मढें हें जीव नसल्यामुळें जसें कुडें असतें तसें हें जटा–राख लावलेलें मढें असतें तुका म्हणे हे रागारागानें भलनें, वाउगें–चावळलेले–बडबडतात. तसें च भिक्षापात्र हातात घेणारे

॥ ६१० ॥

॥ भीक्षा पात्र अवलंबणे । जळो जीणे लाजीरवाणे ॥

॥ येसीयासी नारायणे । उपेक्षीजे सर्वथा ॥ १ ॥

॥ धृ ॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ती वरी वरी भाव ॥ धृ ॥

॥ समर्पीला जीव । नाहीं तो हा व्यभीचार ॥ धृ ॥

॥ जगा घालावे सांकडे । दीन होउनी वापुडे ॥

॥ हेची अभाग्य रोकडे । मुळ आणि वीश्वास ॥ २ ॥

॥ काय न करी वीश्वंभर । सत्य करीतां नीर्धार ॥

॥ तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ३ ॥

(६१०) हातांत भिक्षापात्र घेऊन जे लोक जगतात, म्हणजे भिक्षा हें ज्याच्या उपजीविकेचें साधन आहे–अशाच्या जिण्याला–जगण्याला आग

लागो—अशा लोकांची नारायणानें उपेक्षा च करावी. या लोकांचा देवापायीं भाव नसतो—यांची भक्ती ही कांहीं तरी वाव = व्यर्थ असते—ते देवास देह अर्पण करित नाहींत—म्हणजे (स्पष्ट बोलावयाचें तर) यांचा देवाशीं व्यभिचारच असतो. म्हणजे देवाची हे लोक वंचना च करितात. यांच्या जवळ भक्तीचें मूळ जो विश्वास तो नसल्यामुळें—हे दीन होऊन जगास साकडें घालतात. हें रोकडें अभाग्य नाहीं कां ? यांच्या जवळ भक्तीचें मूळ जो विश्वास तो असता—व त्याचा निर्धार धरून हे राहते तर विश्वंभर काय करूं शकणार नाहीं ? तुका म्हणे जगांत जर कांहीं सार असेल तर विश्वंभराचे पाय घट्ट धरावेत हें आहे.

या अभंगाच्या आधारें एवढें म्हणावेसें वाटतें कीं तुकोबांवर केव्हां हि भिक्षा मागण्याची वेळ आली नसावी. ती गोष्ट त्यांस सर्वस्वीं त्याज्य वाटत होती. येसीयासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा । हें वचन स्पष्ट आहे. व म्हणून सांगताहेत—

॥ ६११ ॥

॥ भाव बळें वीष्णुदास । नाहीं नाश पावत ॥ १ ॥
॥ धृ ॥ योग भाग्यें घरां येती । सर्व शक्ती चालत ॥ धृ ॥
॥ पीत्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचील ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कडे बैसों । तेणें असों नीर्भर ॥ ३ ॥

(६११) विष्णुदास विश्वासानें देवाचे पाय घट्ट धरितात म्हणून ते कधीं हि नाश पावत नाहींत. त्यांच्या भाग्ययोगें सर्व शक्ती त्यांच्या घरीं चालत येतात. पित्याचें जें धन आहे. तें पुत्रास न देतां कोणता बाप त्यास फसवील ?

तुका म्हणे आपण त्याच्या कडेवर बसलों आहोंत व त्यायोगें आपण निर्भय आहोत. बापाचें धन, जोडी, मुलास मिळणार नाहीं असें कसें होईल ?

॥ ६१२ ॥

॥ कोरड्या गोष्टी चटक्या बोल । शीकल्या सांगे नाहीं ओल ॥ १ ॥
॥धृ॥ कोण यांचें मना आणी । आइको कानीं नाइकोनी ॥ धृ ॥
॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भुस सीणें कांडीती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आपल्या मती । काय रीती पोकळें ॥ ३ ॥

(६१२) हा कोरड्या शिकल्या गोष्टी सांगतो, चटक्या बोल ऐकवितो. त्यांस कोठे हि ओलावा नसतो—तेव्हां याचें बोलणें कोण मनावर घेणार ? तो बोल

ऐकून कानानें न ऐकल्यासारखे च होत. वरोवर ज्ञानाच्या गोष्टी सांगताहेत. जसें-शीण घेऊन भूस कांडावा. तुका म्हणे हे आपापल्या मतीं चालवितात पण आपल्या परीनें सर्व पोकळ च आहेत.

॥ ६१३ ॥

॥ आम्ही क्षेत्रीचे संन्यासी । देह भरीत ह्रषीकेसी
॥ नाहीं केली येसी । आशा काम बोहरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ आलें अयाचीत अंगां । सहज तें आम्हां भागा ।
॥ दाता पांडुरंगा । येसा करीतां नीस्चीती ॥ धृ ॥
॥ दंड धरीला दंडायमान । मुळीं मुंडलि मुंडण ।
॥ बंदी बंद कोपीन । बहीर वास औठडे ॥ २ ॥
॥ काळें साधीयेला काळ । मन करुनी नीस्चळ ।
॥ लौकीकीं वीटाळ । धरूनी असो येकांत ॥ ३ ॥
॥ कार्य कारणाची चाली । वाचा वाच्यत्वें नेमीली ।
॥ येका नेमें चालीं । स्वरूपीं च राहाणें ॥ ४ ॥
॥ नव्हे वेषधारी । तुका आहा च वरीवरी ।
॥ आहे तैसी वरी । खंडे नीवडी वेदाची ॥ ५ ॥

( ६१३ ) हा देह म्हणजे एक क्षेत्र च आहे व या क्षेत्रांत आम्ही *संन्यस्त वृत्तीनें राहत आहोंत. या क्षेत्रांत सर्वत्र ह्रषीकेशी भरलेला आहे; व हा* क्षेत्रसंन्यास मी माझ्या ठिकाणीं असलेल्या आशा किंवा काम मारून केलेला नाहीं — ही वृत्ति — ही क्षेत्रसंन्यस्त वृत्ति - आमच्या वांट्यास - सर्व गोष्टींचा दाता पांडुरंग आहे *असा मनाशीं निश्चय करतां* च — सहज — कोणापाशीं कांहीं न मागतां आलेली आहे. मनाचें मुळांतच मुंडण झालें — त्या मनानें च स्वतःस दंड म्हणजे शिस्त लावून घेतली, हा त्या क्षेत्र संन्याशाच्या हातांत धरावयाचा दंड झाला. त्या मनानें आपण होऊन जीं बंधनें घालून घेतलीं — तीं त्यांस कोपीन म्हणजे करुनी झाली — व तीन दिवसांपलीकडे एका ठिकाणीं रहावयाचें नाहीं — हा नियम आम्ही औढ-पीठांत राहून ( त्रिकुट, श्रियांट, गोलाट, औठपीठ हीं जीं महाकारण स्थानें आहेत — येथें राहून ) पाळला. या औठपीठांत मला राहतां आलें याचें कारण असें कीं — माझें मन निश्चळ झाल्यानें — मला काळाचें केव्हांच भय उरलें नाहीं — व मी लौकिकाचा विटाळ धरून असल्यामुळें मला आपोआप च एकांत आला. श्री विठ्ठलाच्या स्वरुपांत राहणें हा एक च नेम मी पाळीत असल्यामुळें — कार्यकारण

परंपरा माझ्या पाठीस लागली नाहीं हा तुका — बाहेरचा सन्याशाचा कसातरी वेष घेतलेला सन्याशी नसून — तो वेदांचीं म्हणजे जे सत्तामात्र ज्ञान आहे — त्या ज्ञानाचीं जीं तीन कांडें आहेत — तीं निवडीत असतो — त्यांत बरें कोणतें — श्रेष्ठ कोणते — हें निवडीत असतो.

वर ६१० अ मध्यें भीक्षापात्र अवलंबणें । म्हणून जीं माणसे सांगितलीं ते वेषधारी सन्याशी असावेत. असल्यांचा सुकाळ केव्हां हि कोठे हि असतो च तेव्हां काय नसावें तें ६१० त सांगितलें व आपण कसें आहोंत हें येथें सांगितलें स्पष्ट च आहे कीं हा अभग आत्मचरित्रपर आहे. या एका अभगात कोणी मनांत आणले तर तुकोबाचें स्वरूप पाहाता येईल.

॥ ६१४ ॥

॥ नव्हती याचा सोस होता । झडो आतां पदर ॥ १ ॥
॥ धृ ॥ देखणे ते देखीयेलें । आतां भले साक्षीत्वे ॥ धृ ॥
॥ लाभे कळो आली हानीं । राहों दोन्हीं नीराळीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे येकायेकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ३ ॥

( ६१४ ) जन्मांत येऊन जें पहावयाचें ते पाहिलें. आता जर भलत्या गोष्टीचा आदर वाटला च तर पदर झडों झाडून—टाकावयाचा. देखीलें—पाहीलें आहे त्याची साक्ष पुरे. आतां जो लाभ झाला आहे त्यानें आजवर हानी काय झाली ते कळते आतां एकाएकीं या दोन्हींपासून मी निराळा राहीन. तुका म्हणे हा लोकांत पसारा कशाला ?

॥ ६१५ ॥

॥ कौले भरीयेली पेठ । नीग्रहाचे खोटे तंट ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसें माता जाणे वर्म । बाळा वाढवीतां धर्म ॥ धृ ॥
॥ कामाचोतां लोह कसे । तांतडीनें काम नासे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे खडे । देतां अक्षर ते जोडे ॥ ३ ॥

( ६१५ ) कौल ( परवाना ) असल्यानें ही पेठ भरलेली आहे. तेव्हां निग्रहाचे येथें खोटे तंट कशाला ? मुलास कसे वाढवावें याचें वर्म माता जाणते. लोखंड हे चागले शोधलें तर कसास चढते. नाहींतर कामाचा नाश होतो. तुका म्हणे लहान मुलान्या हातीं खडे दिले कीं अक्षरओळख होते.

॥ ६१६ ॥

॥ सोसें वाढे दोष । जाला न पालटे कस ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसें बरवें वचन । करीतां ते नारायण ॥ धृ ॥
॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमची उरे श्रमे ॥ २ ॥
॥ सुख देते शांती । तुका म्हणे धरीतां चीतीं ॥ ३ ॥

( ६१६ ) नारायण असें बरवें वचन करीत ( उच्चारीत ) आहेत कीं सोस केल्यानें दोष वाढतो. जो कस झाला असेल तो पालटत नाहीं. प्रारब्ध नेमानें जें होतें तें होतें एरव्हीं श्रम होतात. तुका म्हणे शांती चित्तांत नांदत असली कीं सुख देते.

॥ ६१७ ॥

॥ सर्व भाग्यहीन । येसें सांभाळीलो दीन ॥ १ ॥
॥ धृ ॥ पायीं संतांच्या मस्तक । असो जोडोनी हस्तक ॥ धृ ॥
॥ जाणो तरी सेवा । दीन दुर्बळाची देवा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जीव । समर्पुन भाकी कीव ॥ ३ ॥

( ६१७ ) आम्हीं जरी सर्वस्वीं भाग्यहीन—दीन असलों तरी आमचा सांभाळ झालेला—केलेला आहे. कारण आम्हीं संतांच्या पायीं हात जोडून मस्तक ठेविलें आहे. आम्हीं हीन दुर्बळ असलों तरी देवाची सेवा करावी हें जाणतों. तुका म्हणे आम्हीं देवास जोव समर्पून त्याची कीव भाकतों.

॥ ६१८ ॥

॥ वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ १ ॥
॥ धृ ॥ जींकोनीयां अहंकार । पावरणी केलें शीर ॥ धृ ॥
॥ काळा नाहीं वाव । पराश्रमा कोठें ठाव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ३ ॥

( ६१८ ) अहंकार जिकून आम्हीं संतांचे पायावर मस्तक ठेविलें आहे. काळास मध्यें शिरण्यास वाव नाहीं— व आम्हांस दुसऱ्याचा॰ आश्रय करण्याची जरूरी नाहीं—आम्हीं अहंकार जिंकीला आहे तेव्हां आतां आमच्या नांवानें वाद्यें वाजतील व वैकुंठास जाणें आम्हांस सोपें आहे.

॥ ६१९ ॥

॥ चालीलें न वाटे । गाउनीयां जातां वाटे ॥ १ ॥
॥ धृ ॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ धृ ॥
॥ नाहीं भय आड । कांही वीषमाचे जड ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भगती । सुखरूप आदीअंतीं ॥ ३ ॥

( ६१९ ) वैकुंठीच्या वाटेनें गात गेलों कीं आपण चालतो आहोंत असें वाटत नाहीं एवढा वैष्णवाचा, संग बरवा होतो व श्रीरंग सामोरा येतो काहीं विषमाचें जड, किंवा काहीं भय आड येत नाहीं तुका म्हणे भक्ति ही आदि व अंतीं सुखरूप आहे

भक्ति सुखरूप कशी ते सांगताहेत

॥ ६२० ॥

॥ करीतां विचार । तो हा दुढ संवसार ।
॥ ब्रह्मादीकां पार । नुलंघवे सामर्थ्ये ॥ १ ॥
॥ धृ ॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ।
॥ आले ते वचनां । पासीं माझ्या सामर्थ्य ॥ धृ ॥
॥ पाठीवरी मोळी । तों चीं कळवा पायी तळीं ।
॥ सांपडला जळीं । मत्स्य जाला तो न्याय ॥ २ ॥
॥ आतां करीन तांतडी । लाभाची ते या च जोडी ।
॥ तुका म्हणे ओढी । पायां सोई मनाची ॥ ३ ॥

( ६२० ) शरण शरण नारायणा — मज अंगीकारा दीना । असे म्हणण्यास आपल्या वचनापाशीं सामर्थ्य आलें की मग आपणास काय कमी आहे ? कारण आपण विचार करू लागावें तो हा संवसार एवढा बलवत्तर आहे की ब्रह्मादिकास-हि त्याचा पार उलंघिता येत नाहीं पाठीवर मोळी आहे तोंच पायीं तळीं कळले ( ओझे पाठीवर आहे असें ) किंवा मासा जसा जाळ्यात सापडतो तसा हा संवसार आहे. आता मी तातडी करून या लाभाची जोडी करीन कीं माझ्या मनास तुमच्या पायाजवळ सोय आहे असें वाटून तें तेथें वोढेल

॥ ६२१ ॥

॥ काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम ।
• ॥ उचीतांच धर्म । भागा आलें ते करूं ॥ १ ॥
॥ धृ ॥ देईन हाक नारायणा । ते तो नाकळे वचना ।
॥ पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ धृ ॥

॥ सातां पांचांचे गोठलें । प्रारब्धे आकारलें ।
॥ आतां हें संचलें । असो भोगा सांभाळी ॥ २ ॥
॥ फावली तों बरवी संधी । सावधान करु बुधी ॥
॥ तुका म्हणे मधीं । कोठें नेघे वीसावा ॥ ३ ॥

(६२१) या शरीरास तुमची कृपा व प्रेम साधण्यास्तव जें कांहीं उचित धर्म असतील ते करण्यापलीकडे दुसरें काम काय आहे? तेव्हां त्याची कृपा व प्रेम साधण्यास्तव मी नारायणास हांक देईन. त्यास कसलेंच बंधन नाहीं. व नारायणास हांक देण्यास हि कसलें बंधन नाहीं. तेव्हां ती हांक ऐकून पंढरीचा राणा धांव घेईल. हें शरीर सात तत्त्वांचें व पांच तत्त्वांचें गोठलें आहे. तें प्रारब्धानें मनुष्य देह घेऊन आलें आहे. तव्हां आतां हें संचित भोगाचे सांभाळीं खुशाल असो. नारायणास हांक देण्यास कोठें हि बंधन नाहीं. आपणांस उत्तम संधि साधली आहे, आपली बुद्धि सावधान झाली आहे. तेव्हां आतां नारायणास हांक देतांना—आपणांस विसांवा घ्यावयास नको. सात पांच तीन दशकांचा मेळा हा हरिपाठांतील अभंग मनश्चक्षूपुढें या अभंगाचे वेळीं होता

॥ ६२२ ॥

॥ न लगे देश काळ । मंत्र वीधानें सकळ ॥
॥ मनें ची नीस्चल । करुनी करुणा भाकावी ॥ १ ॥
॥ धृ ॥ येतो वैसलीया ठाया । आसने व्यापी देवराया ।
॥ नीर्मळ ते काया । अधीस्टान तयाचें ॥ धृ ॥
॥ कल्पनेचा साक्षी । तरी आदेरेंची लक्षी ॥
॥ आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥
॥ घेणें तरी भाव । लक्षी दासांचा उपाव ॥
॥ तुका म्हणे जीव । जीवीं मेळवील अनंत ॥ ३ ॥

(६२२) आपण देश, काळ, मंत्र, विधि कांहीं पहावयास नको. मन निश्चळ करून मनानेंच करुणा भाकावी म्हणजे तो देवराया आपण बसलों असूं तेथें येतो. कारण निर्मळ शरीर हें त्याच्या वस्तीचें ठिकाण असतें. आपण नुसत्या कल्पनेनें त्यास आपल्या सर्व कर्मांचा साक्षी करावा म्हणजे तो आपणांकडे मोठ्या आदरानें पाहूं लागतो. व विदुराच्या कोरड्या कण्या जशा त्यानें मटमटा खाल्या—तसें आपण कांहीं केलें तरी तें तो गोड करून घेतो. तुमच्या भावाचा तो स्वीकार करतो व आपला भक्त जो उपाय

कीत असेल त्या उपायातील भाव तो पाहतो. तुका म्हणे हा अनत आहे. तेव्हा सहज जीवात जीव मिसळून समरस होतो असा हा जीवात जीव मिळवून समरस होऊन—

॥ ६२३ ॥

॥ बहुता जातींचा केला अगीकार। बहुत ही फार सर्वोत्तम ॥ १ ॥
॥धृ॥ सरलाची नाहीं कोणाचीये वेचे। अक्षोभ ठाईचे ठाई आहे ॥ धृ ॥
॥ लागतची नाहीं घेता अत पार। वसवी अतर अणुचे ही ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केला होय ठाकी यैसा। पुरवावी इच्छा धरीली ते ॥ ३ ॥

(६२३) या अनतानें पुष्कळ जातींच्या भक्ताचा व पुष्कळाचा (गजेंद्रासारख्या पशूचा रामनाम गाणा या पक्ष्याचा) अगीकार केला आहे हा कोणाच्या हि वेचानें सरला नाहीं. व ठाईच्या ठायीं अक्षोभ्य—अक्षय, नाश, न पावणारा असा आहे याचा अतपार काढू म्हणाल तर लागणार नाहीं. व अणूच्या अतरात सुद्धा हा शिरेल असा हा अनत लहानाहून लहान व मोठ्याहून मोठा आहे तुका म्हणे हा आपणास हवा असेल तसा लहान किंवा मोठा होतो. आपण धरू ती इच्छा पुरवितो.

॥ ६२४ ॥

॥ नाहीं आले भक्तीसुख अनुभव। तो मी ज्ञानदेवा काय करू ॥ १ ॥
॥धृ॥ नसाव जी तुम्हीं कांहीं नीश्चीतीनें। माझीया वचने अभेदाच्या ॥धृ॥
॥ येकायेकीं मन नेदी समाधान। देखील्या चरण वाचुनीयां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाचा गुणीं लाचावली। न राहे उगली मौन्य मज ॥ ३ ॥

(६२४) जोंवर देवा माझ्या अनुभवात हें वर सागितल्यासारखें भक्तीचें सुख काय असतें तें आलें नाहीं—तोंवर हें नुसतें ज्ञान घेऊन काय करू? मी अभेदाचीं किती हि वचनें बोललों तरी तुम्ही त्या निश्चीतीनें स्वस्थ राहू नका. देवा, तुमचे चरण देखील्यावाचून हें मन एकाएकी (एकटेपणानें) समाधान पावत नाहीं तुका म्हणे ही माझी वाचा गुणीं लाचावली आहे. ही मला मौन्य धरून राहू देत नाहीं (भक्तीसुखाचा अनुभव मागताहेत व सागताहेत)

॥ ६२५ ॥

॥ काया वाचा मना श्रीमुखाची वास।
आणीक उदास वीचारासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ काय आता मोक्ष करावा जी देवा।
तुमचीया गोवा दर्शनासी ॥ धृ ॥

॥ केलीया नेमासी उभे ठाउ व्होवें।
नेमलें तें भावें पालटेना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जो जो कराल उशीर।
तों तों मज फार रडवील ॥ ३ ॥

(६२५) मी कायावाचामनानें श्रीमुखाची वास–वाट–पाहात आहे व इतर सर्व विचारांबद्दल उदास आहे. आतां मला मोक्ष मिळवून काय होय? त्यामुळे तुमच्या दर्शनास गोवा येईल. तुमचा जो नेम असेल तो उभा ठाकतो. तुम्हीं माझे अमुक एक करावयाचें म्हणून ठरविलें असेल तें होईल–व तो नेम कांहीं पालटत नाहीं. त्यामुळें तुम्ही माझा अंगीकार करण्यास जो जो उशीर कराल तो तों मला रडवाल. तेव्हां मोक्षापलीकडील गुरुवी भक्ती येथें अभिप्रेत आहे; व वरील अभंगांत नाहीं आलें भक्ती सुख अनुभवा। म्हणून म्हटलें, तें मोक्षापलीकडील सुख हवें आहे.

॥ ६२६ ॥

॥ पुढीलांचे सोई माझ्या मना चाली। मताची आणीलीं नाही बुद्धी ॥ १ ॥
॥ध्रु॥ केलासी तो उभा आजीवरी संतीं। धरवीलें हातीं कट देवा ॥ध्रु॥
॥ आहे ते ची मागे नाहीं खोटा चाळा। नये येउं बळा लेकरासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझा साक्षीचा वेव्हार। कृपण जी थोर परी तुम्ही ॥ ३ ॥

(६२६) देवा, हीं माझ्या मनाची चाली –ओढ– पुढीलांचे सोईनें, इतरांची आपण जी सुंदर सोय लावली म्हणजे पुंडलीक, ज्ञानदेव, नामदेव, जनाबाई यांची जी सोय लाविलेली मला आढळली हें पाहून आहे. ही गोष्ट मी आपल्या मतानें ठरविली नाहीं. आजवर तुला संतांनीं कटावर कर धरून पंढरीस विटेवर उभा केला आहे. तेव्हां तें च दर्शन आम्ही मागत आहों. हा माझ्या मनाचा कांहीं खोटा वावगा चाळा नाहीं.–तुम्हीं या लेकराजवळ वागतांना बळास येऊं नये–दांडगाई करूं नये. देवा, संतांच्या साक्षीचा माझा व्यवहार आहे–परंतु तुम्ही मात्र फार कृपण आहांत.

॥ ६२७ ॥

॥ बहुत करुनी चाळवा चाळवी। किती तुम्ही गोवी करीतसां ॥ १ ॥
॥घ्रु॥ लागटपणें मी आलों येथवरी। चाड ते दुसरी न धरुनी ॥ ध्रु ॥
॥ दुर्जीयाचा तंव तुम्हांसी कांटाळा। राहमी नोराळा येकायेकीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां यावरी गोविंदा। मजसी विनोदा येऊं नये ॥ ३ ॥

( ६२७ ) देवा, तुम्ही कृपण आहांत इतकें च नव्हे तर चाळवाचाळव करून तुम्ही गोवा (गोंधळ) तरी किती करतां ? मी दुसरी कसली हि आस न धरतां येथें लागटपणें आलों. पण देवा, तुम्हांला दुसऱ्याचा–माझा, कंटाळा आला आहेसें दिसतें व एकाएकीं ( एकटें ) रहावयास तुम्हांस आवडतेंसें दिसतें. सगुण साकार दर्शन–सुंदर तें ध्यान उभे विटेवरी–असें हवें आहे. आतां या पुढें गोविंदा, तुमचा विनोद पुरे.

॥ ६२८ ॥

॥ आलों उलंघोनी दुःखाचे पर्वत । पायापासीं हीत तुमच्या तरी ॥ १ ॥
॥धृ॥ न देखे त्रासा दुखी होते मन । कठीणे कठीण वाटतसे ॥ धृ ॥
॥ नव्हे सांडी परी वाटतें नीरास । न ये माझा दीस संकल्पाचा ॥२॥
॥ तुका म्हणे तुम्हीं सदैव जी देवा । माझ्या हा चीं जीवा येक ठाव ॥३॥

( ६२८ ) मी तुमच्याजवळ दुःखाचे पर्वत ओलांडून आलों आहे कारण तुमच्या पायापाशीं माझें हित आहे. मला त्रास किती होत आहे हें तुम्हांस दिसत नाहीं. पण त्यामुळें माझें मन मात्र दुःखी होतें, व अति कठीण वाटतें. तुम्ही माझी सांडी केलेली नाहींत पण निरास मात्र वाटते कारण माझ्या संकल्पासारखा दिवस येत नाहीं. देवा, तुम्ही सदैव आहांत म्हणजे तुम्ही म्हणाल तें होईल. व तुम्ही हा एक च माझ्या जीवास ठाव आहे.

॥ ६२९ ॥

॥ जींकावा संवसार । येणें नांवें तरी शुर ॥ १ ॥
॥ धृ ॥ येर काय तीं बापुडीं । कीर अहंकाराची घोडी ॥ धृ ॥
॥ पण येशा नांवें । देव धरीजे तों भावें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ज्यावें । सत्य कीर्तीनें वरवें ॥ ३ ॥

( ६२९ ) माणसानें संसार जिंकिला तर तो शूर एरव्हीं इतर हीं केवळ अहंकाराची, बापुडी –दीन, ओझ्याचीं घोडीं आहेत. देवानें आपणांस हाताशीं धरावें हा भाव असणें हा पण असावा व संतांच्या कीर्तीनें जगावें हें बरें. "शूर" व "पण" या शब्दांच्या व्याख्या थोड्या शब्दांत आहेत.

आतां मागची च ओळ चालू आहे.

॥ ६३० ॥

॥ हे ची जतन करा दान । धरुनी चरण राहींलों ते ॥ १ ॥
॥ धृ ॥ द्यावी माझ्या हातें सेवा । हे चीं देवा वीनवणी ॥ धृ ॥
॥ आणीक कांहीं न घाली भार । बहुत फार सांकडें ॥ २॥
॥ तुका तुमचा म्हणवी दास । त्याची आस पुरवावी ॥ ३ ॥

(६३०) तुमचे चरण मी धरून राहिलों आहे, तेव्हां एवढें दान तुम्ही मला जतन करून द्या. देवा तुम्ही माझ्या हातें सेवा घ्यावीत येवढी च माझी विनवणी आहे. आणिक तुम्हाला कांहीं भार घालून सांकडें घालीत नाहीं. तुका तुमचा दास म्हणवितो—तरी त्याची आस पुरवा. व हें करणें—माझी आस पुरविणें तुम्हांस अगदीं सोपें आहे कारण—

॥ ६३१ ॥

॥ न सरे भांडार । भरलें वेचीतां अपार ॥ १ ॥
॥ धृ ॥ मवीत्याचे पोटभरे । पुढीलासी पुढें उरे ॥ धृ ॥
॥ कारण पुरता । लाहो आपुलाल्या हीता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥ ३ ॥

(६३१) देवा तुमचें भांडार इतकें भरलेलें आहे कीं तें कधीं हि सरणार नाहीं—मोजणाऱ्याचें पोट भरेल व पुढिलांना तें उरेल च. प्रत्येकानें आपआपल्या पुरता हा लाहो—त्वरा करावी. तुका म्हणे देवाजवळ कांहीं हि हेवा केला तरी चालतो.

॥ ६३२ ॥

॥ बहुतां पुरे येसा वाण । आले धन घरासी ॥ १ ॥
॥ धृ ॥ घ्या रे फुका मोले वीण । नारायण न भुला ॥ धृ ॥
॥ आइको नीवळल्या मने । वरव्या कानें सादर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करुनी अंतीं । नीरचींती हे ठेवावी ॥ ३ ॥

(६३२) बहुतांना पुरेल अशा जातीचें हें वाण—हें धन—घरासी—आलें आहे. अरे नारायण, हा मोलाशिवाय फुकट—घ्या व भुलू नका. ही गोष्ट तुम्ही निवळल्या मनानें ऐका—सादर वरव्या कानें ऐका. तुका म्हणे सरते शेवटीं नारायण सर्व गोष्टींचें मूळ आहे. ही निश्चिती करून ठेवावी. (येथें ओघ बदलतो.)

॥ ६३३ ॥

॥ अतीत्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचे त्या ॥ १ ॥
॥ धृ ॥ हें तो आपुलीया गुणे । असे जेणे योजीले ॥ धृ ॥
॥ अवचटे अग्नी जाळी । न सांभाळी दुख पाव ॥ २ ॥
॥ जैसे तैसे दावी आरसा । नकट्या कैसा पालटे ॥ ३ ॥

( ६३३ ) मगेंत कोणी आततायीपणानें बुडाला-जीव दिला-तर त्यास त्याचें पाप लागतें. या गोष्टी ज्यानें ही योजना केली आहे त्याच्या गुणानें योजनेनें होत असतात. आपणास त्यांत ढवळाढवळ करतां येत नाही, अग्नि हा तुम्हीं सांभाळलें नाहीं तर अवचटें जाळतो व दुःख होतें. आरसा हा तुम्हीं जसे असाल तसें दाखवील. तो तुमच्या नकट्या नाकांत पालट कसा करील ?

॥ ६३४ ॥

॥ येका वेळे प्रायश्चीत । केले चीत मुंडण ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ अहंकाराचें नांवें दोप । त्याचे वोस पाडीले ॥ ध्रु ॥
॥ अनुतापे स्नानवीधी । यज्ञ सीधी देह होम ॥ २ ॥
॥ जीव शीवां होतां चुका । तेथें तुका वीनटला ॥ ३ ॥

( ६३४ ) प्रायश्चित्त घ्यावयाचें तर एकदां च चित्ताचें मुंडण करावें. अहंकार हा दोष समजून तो ओस पाडला तर तें मुंडण खरें. नंतर स्नान करावयाचें तें अनुतापानें करावें व यज्ञ जो करावयाचा त्यांत आपल्या देहाचा होम करावा. अशा रीतीनें केलें असतां-झालें असतां-जिवांत व शिवांत चुकभूल होईल. म्हणजे जीव कोणता व शिव कोणता हें ओळखतां येणार नाहीं. त्या ठिकाणीं तुका नटून, रंगून, तल्लीन आहे.

॥ ६३५ ॥

॥ माझी मज जाती आवरली देवा । नव्हतां या गोवा इंद्रीयांचा ॥ १ ॥
॥ध्रु॥ कासया मी तुझा म्हणवीतो दास । असतो उदास सर्व भावें ॥ ध्रु ॥
॥ भयाचीया भेणें धरीयेली कास । न पुरतां आस काय थोरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाहीं आपली जतन । कैचें थोरपण मग तुम्हां ॥ ३ ॥

( ६३५ ) देवा, मी तुझा दास म्हणवितों. किंवा म्हणविलें असतें-जर माझी जात मला आवरली असती, जर मी सर्वभावें देहाबद्दल उदास असतो, तर तुझा दास म्हणवून घेतलें असतें. परंतु माझी थोडीफार हि आस पुरलेली नाहीं म्हणून मी भीतीनें तुमची कास धरली आहे. तुका म्हणे माझें मला जतन करावें लागलें. मला माझ्या रक्षणाची काळजी वाहावी लागली तर मग तुमचें थोरपण कोठें आलें !

॥ ६३६ ॥

॥ वीनवीतो तरी आणीतोसी परी । याचकानें थोरी दातयासी ॥ १ ॥
॥धृ॥ अमुचें ही कांही असो द्या प्रकार । येकल्यानें थोर कैंचे तुम्ही ॥धृ॥
॥ नेम्यावी जी कांहीं बहुसालसेवा । गौरव ते देवा यत्न कीजे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नाहीं आमची मीरासी । असावेसी येसी दुर्बळें ची ॥ ३ ॥

( ६३६ ) याचक याचना-विनवणी करितो हें खरें-पण त्यामुळे दात्यास मोठेपण येतें ना ? तेव्हां तुम्ही एकटे एकाकी थोर असणार नाहीं. ( आम्ही शेजारी असल्याशिवाय ) ! तेव्हां आमचे कांहीं तरी तुमच्यावर उपकार असोत, आहेत. तुम्ही आमच्याकडून पुष्कळ प्रकारची सेवा घ्या-नका घेऊं-पण आम्ही जे यत्न करूं त्याचा गौरव तर कराल तुका म्हणे आम्हां दुर्बळांची काही मिरासी असावी असें नाहीं का तुम्हांस वाटत ?

॥ ६३७ ॥

॥ येका येसें येक होतां कोणाकाळे । समर्थाच्या बळे काय नव्हे ॥ १ ॥
॥धृ॥ घालुनी वैसलों मीरासीस पाया । जींको देवराया संदेह नाहीं ॥ धृ ॥
॥ केला तो न संडी आतां कइवाड । वारीन हे आड कामक्रोध ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जाली आळसाची धाडी । नव्हती आली जोडी कळो साच ॥ ३ ॥

( ६३७ ) देवा, एकासारखे एक कधीं काळीं होणार ? जीव शिवांतील भेद कधीं मिटणार ? पण समर्थाच्या बळानें काय होणार नाही ! मीं मिराशीस पाया घालून बसलों आहे, तेव्हा देवरायास जिंकूं याबद्दल संदेह नाहीं. आजवर जे अवसान ( कैवाड ) धरलें आहे, तें सोडणार नाहीं व काम क्रोध आड येतील तर त्यास निवारून बाजूस ठेवीन. तुका म्हणे माझ्यावर आळसाची धाड आली तर ती गोष्ट मला कळली च नाहीं असा मी वागेन.

॥ ६३८ ॥

॥ मागतां वीभाग । कोठें लपाल जी मग ॥ १ ॥
॥ धृ ॥ संत साक्षी या वचना । त्यांसी ठाउकी या खुणा ॥ धृ ॥
॥ होईन धरणेकरी । मग मी रीघो नेदी वाहेरी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥ ३ ॥

( ६३८ ) देवा, तुमच्याजवळ तुम्हांस शिवपण भोगावयास वाव करून दिली यामुळें भक्तिप्रेम सुखांत माझा हिस्सा आहे, तो मी मागितल्यावर तुम्ही

कोठें लपाल ? संत या वचनास साक्षी आहेत. त्यांस या खुणा ठाऊक आहेत. देवा, मी धरणेकरी होऊन तुमच्या दारांत बसल्यावर तुम्हांस बाहेर पडं देणार नाहीं. देवा, मी अक्षर आहे व तुला देवपणाचा भार ओझें आहे.

॥ ६३९ ॥

॥ मी ठेवण्याचा धनी। तुम्हीं वेवसाई जनीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोण पडीलें लींगाडी। केली तैसी उगवा कोडी ॥ धृ ॥
॥ केलें सांगीतलें काम। दीलहे पाळुनीयां धर्म ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आतां। असो तुमचे तुमचे माथा ॥ ३ ॥

(६३९) जनांत तुम्ही व्यवसाई आहांत, म्हणजे तुमच्या पाशीं जगाचा व्यवहार चालविण्याचा उद्योग आहे. मी ठेविल्याचा—म्हणजे संचीताचा धणी मालक आहे. म्हणजे तुम्ही घाल ते अन्न व सांगाल तें काम करून राहीन. तेव्हां तुम्ही आपल्या व्यवसायांत जेवढीं लिगाडें करून ठेविलीं आहेत तेवढीं उगवा, मी जेवढें म्हणून काम नेमून दिलें तेवढें केलें—व तुम्ही जे धर्म घालून दिलेत ते पाळले. तुका म्हणे आतां—बऱ्या वाईटाचा सर्व भार तुमच्या माथ्यावर.

॥ ६४० ॥

॥ द्या जी माझा वीचारोनीयां वीभाग। न खंडे हा लाग आहाचपणें ॥ १ ॥
॥धृ॥ कीती नेणो तुम्हां साहाते कटकट। आम्हींच वाइट नीवडलों तें ॥धृ॥
॥ करीतां कलह जीवाचीयेसाठीं। हे तुम्हां वोखटी टाळ देवा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धीर कारण आपुला। तुम्ही तों वीठला मायातीत ॥ ३ ॥

(६४०) देवा, माझा जेवढा भाग असेल तेवढा विचार करून द्या बरं. हा लाग म्हणजे पाठलाग कांहीं, कसें तरी, करून सुटणार नाहीं. तम्हांला ही एवढी कटकट सोसवते तरी कशी? आम्ही वाईट हें निवडलेलें, ठरलेलें, आहे च. तुम्ही माझ्या जीवाशीं कलह फार करतां. तुमची घासाघीस फार! ही तुम्हांस वाईट खोड आहे. तुका म्हणे आम्ही आम्हांकडून धीर करीत आहोंत—तुम्ही तों विठ्ठला, मायातीत आहांत. म्हणजे आम्ही जीवें मेलों तरी त्याची तुम्हांस दाद लागणार नाहीं.

॥ ६४१ ॥

॥ आमुचे ठाउके तुम्हां गर्भवास। बळीवंत दोष केले भोगा ॥ १ ॥
॥धृ॥ काय हा सांगावा नसता नवलाच। मंदपणे भाव भुलवणेचा ॥धृ॥
॥ येका पव्ढवुनी येका पाठीं लाया। कवतुक देवा पहावया ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जेणें असें चेतवींलें। त्याच्यानें उगले कैसे नव्हे ॥ ३ ॥

(६४१) देवा, आमचे गर्भवास तुम्हांस ठाउक आहेत तसे भोग होण्यासाठीं आम्ही बळीवंत दोष केलेलें आहेत— देवा एकास पळ म्हणून म्हणतां दुसऱ्यास त्याचे पाठीस लावतां हा काय भुलवणीचा, मैंदपणाचा, प्रकार आहे. तुका म्हणे ज्यानें असें चेतवीलें जातें—त्याच्यानें उगलें—कसें होणार नाहीं. म्हणजे आम्हांस भुली दाखवून तुम्ही दोष करावयास लावतां—तेव्हां त्या दोषांतून आम्ही सुटावें म्हणून तुम्हाला च योजना करतां येईल. ते प्रयत्न आम्ही स्वतःच्या बुद्धीनें केले तर कसे चालतील!

॥ ६४२ ॥

॥ नीर्दयासी तुम्ही करीतां दंडण । तुमचें गाऱ्हाणें कोठें यावें ॥ १ ॥
॥धृ॥ भाकीतों करुणा आइकती कान । उगलें ची मौन धरीले असे ॥धृ॥
॥ दीनपणें पाहे पाय भीडावोनी । मंजुळा वचनीं वीनवीतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे गांठी मनाची उकला । काय जी वीठला पाहातसा ॥ ३ ॥

(६४२) देवा, तुम्ही निर्दयासी दंडण करतां पण तुमच्याविरुद्ध गाऱ्हाणें द्यावयाचें तर तें कोठें यावें? मी करुणा भाकलेली तुमचे कान ऐकतात—आणि सहज मौन धरून तुम्ही बसतां यास काय म्हणावें? देवा दीनपणें तुमचे पायासीं भिडूं पाहतों आहे. मंजुळ वचनांनीं तुम्हांस विनवीत आहे. तेव्हां देवा आतां मनाची गांठी उकला—विठला, काय पाहतां जी? वाट कशाची पहाता? विलंब कां लावतां?

॥ ६४३ ॥

॥ नसतो कींवीलवाणें । कांहीं तुमच्या कृपादानें ॥ १ ॥
॥ धृ ॥ हे ची तयाची ओळखी । धाले टवटवींत मुखीं ॥ धृ ॥
॥ वांयां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥ ३ ॥

(६४३) तुम्ही कृपादान केलें असतें तर आम्ही अशी केविलवाणी कां दिसलों असतों—तुम्ही कृपादान केल्याची ही च ओळखी—खूण—कीं धालेपणानें आम्ही—टवटवीत—दिसावें. व आमचे प्रीतीचें कोणतें हि वचन वायां जाऊं नये. तुका म्हणे देवा, सत्य गोष्ट केव्हां हि अनुभवास येते, सांगावी लागत नाहीं. सांगावी लागत नाहीं, तेव्हां माझा चेहरा टवटवीत दिसत नाहीं याचा अर्थ तुम्ही कृपा केली नाहीं.

॥ ६४४ ॥

॥ जालों तंव साचें । दास राहवणें काचें ॥ १ ॥
॥ धृ ॥ हें कां मीळलें उचीत । कांजी नेणा कृपावंत ॥ धृ ॥
॥ सींहाचें तें पीलें । जाय घेउनीयां कोल्हें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नास । आम्हां म्हणवीलीया दास ॥ ३ ॥

(६४४) देवा आम्ही याच भावानें दास झालों पण तुम्हीं काच्या लटिक्या भावानें आम्हास राहवीत — राखीत आहा. कृपावंत म्हणजे काय हें का आम्हांस ठाऊक नाहीं? सिंहाचें पिल्लू हें केव्हां हि कोल्हे घेऊन जातें. आम्ही तुझे दास म्हणून आम्हांस नाश यावा हें कांहीं कृपचें लक्षण नव्हे. आम्हांस उचित मिळालें नाहीं हें च खरें.

॥ ६४५ ॥

॥ झाड कल्प तरू । न करी याचकी अव्हेरु ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुम्ही सर्वीं सर्वोत्तम । येसा वीसरता धर्म ॥ धृ ॥
॥ परीसा तुमचें देणें । तो त्या जाये अभीमानें ॥ २ ॥
॥ गान्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥ ३ ॥

(६४५) कल्पतरु हें झाड — पण तें कांहीं याचकाचा अव्हेर करीत नाहीं, व तुम्हीं तर सर्वी सर्वोत्तम — मग आपला धर्म असा विसरता कसा? परिसाला त्याचें गुण तुम्ही दिलेत — व त्या अभिमानानें तो जागतो आहे, व तुम्ही कृपा करीत नाहीं या गान्हाण्यानें तुका हाका मारून गर्जना करून सांगत आहे.

गर्जना काय करीत आहेत?

॥ ६४६ ॥

॥ समर्पीली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस ओवीया मंगळीं ॥ धृ ॥
॥ धार अखंडीत । बोध चालीयेला नीत्य ॥ २ ॥
॥ पुर्णाहुती जीव । तुका घेउनी ठेला भाव ॥ ३ ॥

(६४६) ही वाणी एकदां च पांडुरंगीं समर्पिली आहे व तेथें धणी घेऊन आहे. गोडीनें आवडी धरून आहे. तेथें श्रीविठ्ठलाची मुक्ताफळांनीं मोलाच्या मोत्यांनीं पूजा मंगळ ओवीयाच्या रसानें होत असते. या मगळ ओवीयाच्या

रसाची धार अखंडीत चालू आहे व तो ओघ नित्य चालू आहे – जिवाची पूर्णाहुती देऊन तुका त्या भावानें स्वस्थ आहे.

या अभंगांत सर्व कवित्वाचें बीज प्रकट केलें आहे.

॥ ६४७ ॥

॥ देवाच्या उद्देशे जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव वीस्वंभरे ॥ १ ॥
॥ धृ ॥ लोभाचे संकल्प गाळलीया वरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥ धृ ॥
॥ शुद्ध भगती मन जालीया नीर्मळ । कुश्चळीं वीटाळ वज्रलेप ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हीत ज्याचें तया कळे । प्रांत येतो फळें कळों मग ॥ ३ ॥

(६४७) देवाच्या उद्देशानें आम्ही जेथें जेथें भाव धरूं तेथें तेथें विश्वंभराची वस्ती होईल. एकदां लोभाचें संकल्प गाळल्यावर – दूर केल्यावर – तेथें पापपुण्यास कोठें वाव आहे? शुद्ध भक्तीनें मन निर्मळ झाल्यावर कुश्चीळ = घाणरडा विटाळ वज्रलेप होतो. तुका म्हणे प्रथम ज्याचें हित त्यास कळू लागतें व मग त्या लाभाचा प्रांत कळूं लागतो.

॥ ६४८ ॥

॥ कडसणी धरीतां अडचणीचा ठाव । म्हणउनी जीव त्रासलासे ॥१॥
॥धृ॥ लौकीका बाहेरी राहीलों नीराळा । तुजवीण वेगळा नाहीं दुजा ॥धृ॥
॥ संकोचानें नाही होत धणीवरी । उरवुनी उरी काय काज ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केले इछेची सारीखे । नाहींसे पारीखें येथें कोणी ॥ ३ ॥

(६४८) कोणती हि कडसणी (विचाराची) ची गोष्ट करूं लागावें तों अडचण उत्पन्न होते. म्हणून माझा जीव त्रासला आहे. मी लौकिकाबाहेर राहिलो आहे. पण तुझ्यापासून दुजा – वेगळा – झालों नाहीं. दूर सरलों नाहीं. दुसरीकडे पाहिले नाहीं – संकोचानें केव्हां हि धणी = हौस = आवड फिटत नाहीं – तेव्हां उरी उरउन काय होय? तुका म्हणे येथें विठ्ठलानें इच्छेसारिखें केलें – येथें कोणी हि पारीखें परके – नाहीं. आतां या पलीकडे काय राहिलें? सर्व लाभ झाल्याचें हे धन्योद्गार आहेत.

॥ ६४९ ॥

॥ देवें जीव धाला । संवसार तो कडु झाला ॥ १ ॥
॥ धृ ॥ ते ची येतातीं ढेकर । आनंदाचे हरीहर ॥ धृ ॥
॥ येथीं आर्णीकास । येसा अंगी जया रस ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भुक । येणें न लगे आर्णीक ॥ ३ ॥

( ६४९ ) देवाच्या संगतीनें जीव धाला—संवसार कडू जाला. जीव धाल्यानें आनंदाचे—हरिहर—असे ढेकर येतात. दुसऱ्यास वेधील असा कस ज्याचे अंगीं—अशाच्या सहवासात आणीक कसली हि भूक लागत नाहीं असें तुका सांगत आहे.

॥ ६५० ॥

॥ जाली होती काया। वहु मळीण देवराया ॥ १ ॥
॥ धृ ॥ तुझ्या उजळली नामे। चीत प्रक्षाळीले प्रेमें ॥ धृ ॥
॥ अनुतापे जाला झाडा। प्रारब्धाचा नीतोडा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देह पायीं। ठेउनी जालो उतराई ॥ ३ ॥

( ६५० ) देवा ही काया फार मलिन झाली होती ती तुझ्या नामानें उजळली, व चित्त प्रेमानें प्रक्षाळिलें. अनुतापाचा झाडा होऊन प्रारब्धाचा निकाल लागला. तुका म्हणे तुमच्या पायीं देह ठेऊन मी उतराई झालों आहे—तरलों अहे.

॥ ६५१ ॥

॥ वहु दुरवरी। वेठी ओझे होते शीरीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां उतरला भार। तुम्ही केला अंगीकार ॥ धृ ॥
॥ वहु काकुळती। कीती आलो मागे कीती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा। आजी सफळ जाली सेवा ॥ ३ ॥

( ६५१ ) फार दूरपासून पुष्कळ जन्म शिरावर वेठीचें ओझें होतें. देवा तुम्ही अंगीकार करून तो भार उतरला मागें आजवर किती तरी काकुळतीस आलो होतो. तुका म्हणे देवा, आज माझी सेवा सफळ झाली.

येथें सेवा सफळ झाली म्हणून म्हटलें. नंतर आजवर जो लकडा लावला, आळवणी केली त्याचा परिहार देऊन हा ओघ संपेल.

॥ ६५२ ॥

॥ मीच वीरखळ मीच वीखळ। येर सकळ वहु वरे ॥ १ ॥
॥ धृ ॥ पाहीजे हे क्षमा केले। येणे वोले वीनवणी ॥ धृ ॥
॥ मीच माझें मीच माझें। जालें ओझे अन्याय ॥ २ ॥
॥ आर्धी आचवला आर्धी आचवला। तुका जाला नी मनुष्य ॥ ३ ॥

(६५२) देवा–मीच दुष्ट (विखळ) मीच खरा विखळ—आजवर इतर भक्त झाले ते फार चांगले होते. मी आजवर जे बोललों तें क्षमा केलें पाहिजे, ही विनवणी या बोलानें करीत आहे. देवा, माझें मला च ओझें झाले होतें हा तुझा मोठा अन्याय केला. आधीं तुका सर्व सुखास आंचवला होता तो माणसांतून उठल्यामुळें आचवला होता. (येथें ओघ पुरा होतो)

॥ ६५३ ॥

॥ नीर्वाहा पुरतें अन्न आछादीन। आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥
॥धृ॥ कोठें ही चीता न व्हावें बंधन। हृदईं नारायण सांठवावा ॥ धृ॥
॥ न ये फार बोलो बेसो जनांमधीं। सावधान बुधी इंद्रीयें दमीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे घडी घडीने साधावीं। त्रीगुणांची गोवी उगवोनी ॥ ३ ॥

(६५३) निर्वाहापुरते अन्न आच्छादन—व रहावयास कोंपी (झोपडी) किंवा गुहा. चित्तास कोठें हि बंधन नसावें नारायण तेवढा हृदयांत साठवावा. जनामध्यें फार बसू नये, जनामध्ये फार बोलू नये, बुद्धी सावधान ठेवून इंद्रियास दमु. तुका म्हणे अशा तऱ्हेने त्रिगुणाची गोवी उगवून घडीन घडी साधावी— हा एक च अभंग सुटा आहे.

॥ ६५४ ॥

॥ बाईल सवासीण आइ। आपण पीतरांचे ठाईं ॥ १ ॥
॥ धृ ॥ थोर वेच जाला नस्टा। अवघ्या अपसव्य चेस्टा ॥ धृ ॥
॥ वीषयांचे चर्वणी। केली आयुष्याची गाळणी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे लंडा। नाहीं दया देव धोंडा ॥ ३ ॥

(६५४) बाइलीस आई बदला सवासीण म्हणून बसवून व आपण पितरांचे ठिकाणीं बसून—अरे नष्टा—तूं थोर वेच केलास. तुझ्या सर्व चेष्टा अपसव्य—उलटया आहेत. तूं विषयाच्या चर्वणांत आयुष्याची गाळणी केलीस. तुका म्हणे या लंडास देव, दया, नसते. त्याला देव म्हणजे धोंडा वाटतो. हें कोणा तरी त्यावेळीं समोर दिसत असलेल्या माणसाचें शब्दचित्र आहे.

॥ ६५५ ॥

॥ मागें नेणपणें घडलें तें क्षमा। आतां देतों सीमा करुनीयां ॥ १ ॥
॥धृ॥ पर नारीच जया घडले गमन। दावी तो वदन जननी रत ॥ धृ ॥
॥ उपदेशावरी मन नाहीं हातीं। तो आम्हां पुढती पाहों नये ॥ २ ॥
॥ तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन। घातली ते आण पाळावया ॥ ३ ॥

( ६५५ ) मागें तुमच्या हातून जे दोष झाले असतील ते असोत; पण आतां सीमा–मर्यादा घालून देतो कीं परस्त्रीचें ज्यास गमन घडेल तो जननी रत झाला म्हणून समजावें. तसेंच ज्यांचे उपदेशावर मन नाहीं त्यांनीं आमचे समोर येऊं नये. तुका म्हणे साक्षी असो यातें मन म्हणजे या गोष्टींस तुम्ही आपले मन च साक्षी ठेविलें पाहिजे. ही आण–शपथ–पाळण्यासाठीं मी घालून दिली आहे.

॥ ६५६ ॥

॥ या ची नांवें दोष । राहे अंतरीं कील्मीष ॥ १ ॥
॥ धृ ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उतम संकल्प ॥ धृ ॥
॥ बीजा येसी फळें । उत्तम कां अमंगळें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चीत । शुध करावे हे नीत ॥ ३ ॥

( ६५६ ) अंतरीं जे किल्मीष राहतें त्याचे नांव दोष. मनाचे अंगीं पुण्य पाप, शुभ–उत्तम संकल्प हे सर्व मनाचे खेळ आहेत–तेव्हां उत्तम किंवा अमंगळ हीं फळें बीजासारखीं यावयाचीं. म्हणून तुका म्हणे नित्य चित्त शुद्ध करावें–राखावें ही एवढी च नीति आहे.

॥ ६५७ ॥

॥ पाहतां ठाया ठाव । जातो अंतरोनी देव ॥ १ ॥
॥ धृ ॥ नये वाटो गुण दोषीं । मना जतन ये वीशीं ॥ धृ ॥
॥ त्रीविध देह परीचारा । जनीं जनार्दन खरा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे धीरें –। वीण कैसें होतें बरें ॥ ३ ॥

( ६५७ ) आपण ठाव ठिकाणें पाहूं गेलों, जास्त खोलांत शिरूं लागलों–कीं देव अंतरतो. मन गुणदोषांत वाटलें जाणार नाहीं अशी आपण मनाची जतन करावी. जनीं जनार्दन खरा–येवढा च–विधी आपण परिचारास ( आचरण्यास ) घ्यावा. देह हा त्रिविध आहे हें खरें. तुका म्हणे धीर धरल्याशिवाय बरें कसें होणार !

॥ ६५८ ॥

॥ बोलणें ची नाहीं । आतां देवावीण कांहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ येकसरें केला नेम । देवा दील्हे क्रोध काम ॥ धृ ॥
॥ पाहेन ते पाय । जों वरी हे द्रुष्टी धाय ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मनें । हे ची संकल्प वाहाणें ॥ ३ ॥

(६५८) आतां देवाविण कांहींहि बोलणें नाहीं. देवास काम–क्रोध दिले हा एकदांच नेम केला–ही दृष्टि निवेपर्यंत, समाधान होईपर्यंत – पाय – चरण पाहीन–मनानें जर कांहीं संकल्प वाहावयाचे असतील तर ते एवढेच पहावेत.

॥ ६५९ ॥

॥ दुःखाची संगती । तिच्या ठाईं कोण प्रीती ॥ १ ॥
॥ धृ ॥ अवघे असो हे निराळें । करुं सोइरे सावळें ॥ धृ ॥
॥ क्षिण भंगुर ते ठाव । करुनी संडावे ची वाव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बरा । ठाव पावलो हा थारा ॥ ३ ॥

(६५९) येथील सगती दुःखाची आहे. तिच्या ठायीं कसली प्रीति धरतां? आतां हें सर्व निराळें असो, बाजूस सरो, यापुढें सांवळें–आपलें सोइरें करूं–आजवरींचे ठाव हे क्षणभगूर म्हणून, वाव म्हणून, सांडावेत. तुका म्हणे या ठिकाणचा थारा धरून राहिलों हे बरें झालें–हें ठिकाण केव्हां हि चलन पावणारें नाहीं.

॥ ६६० ॥

॥ येथुनीयां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥
॥ धृ ॥ उंचो देवाचे चरण । तेथें जाले अधीस्टान ॥ धृ ॥
॥ आघाता वेगळा । असे ठाव हा नीराळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे स्थळ । धरुनी राहीलो अचळ ॥ ३ ॥

(६६०) ज्या ठिकाणचा थारा मिळाला आहे –तें ठिकाण आघाता –वेगळें आहे. या ठिकाणावरून सर्व भाव लक्ष्यांत येण्याजोगे आहेत–देवाचे चरण उच आहेत–तेथें अधिष्ठान झालें. तुका म्हणे हें अचळ स्थळ धरून राहिलों आहे.

तुका म्हणे स्थळ । धरूनी राहीलों अचळ ।
म्हणून जे वरील अभंगांत म्हटले–तें स्थळ कोणतें तें सांगताहेत.

॥ ६६१ ॥

॥ भरला दीसे हाट । अवघी वाटली कटकट ॥
॥ संचीताचे वाट । वाटा होउनी फांकती ॥ १ ॥
॥ धृ ॥ भोगा येसे ठाया ठाव । कर्मा त्रींवीधाचे भाव ॥
॥ द्रस्टा येथे देव । वीरहीत संकल्पा ॥ धृ ॥

॥ दीला पाडुनीया धडा । पाप पुण्याचा नीवाडा ॥
॥ आचरती गोडा । आचरणे आपुलाल्या ॥ २ ॥
॥ तुका म्हणे पराधीनें । जाती वोटलीया रीणें ॥
॥ तुटती बंधने । जरी देवा आळवीते ॥ ३ ॥

( ६६१ ) हा संसार—हें जग—हा एक बाजार भरलेला आहे. त्यांत सर्व कटकट वाढलेली आहे—त्यांत सचीतानें वाट फुटून—मार्ग फांकतात. हें जे मार्ग होतात—ते आपल्या भोगा ऐसें निरनिराळे—ठाया ठाव विविध कर्माचे—त्रिविध भावाचे होतात—येथें सकल्पाविरहित—असा द्रष्टा एक देव आहे त्यानें पापपुण्यानें निवाडा होतो असा एक धडा घालून दिला आहे—व त्या निवाड्यानें लोक आपापल्या गोडीनें आचरणें करीत असतात—तुका म्हणे अशा रीतीनें आपण ज्या ऋणानें बांधले असू त्या ओढीनें आपलें जिणें पराधीन असतें—पण ही सर्व बंधनें ते जर देवाला आळवितील तर तुटतात.

तुटती बधनें । जरी देवा आळवीते ।

॥ ६६२ ॥

॥ कीती सोसीती करंटी । नेणो संवसाराची आटी ।
॥ सर्वकाळ पोटीं । चींतेची हळहळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ रीकामीया तोंडे राम । काय उचारीतां श्रम ।
॥ उफराटा भ्रम । गोवी वीपय माजीरा ॥ धृ ॥
॥ कळतां न कळे । उघडे झाकीयेले डोळे ।
॥ भरले त्याचे चाळे । अंगीं वारं मायेचं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जन । यैसे नांव बुधी हीन ।
॥ वहुरंगें भीन्न । येकीं येक न मीळे ॥ ३ ॥

( ६६२ ) परंतु तें होत नाहीं. तेव्हां, हीं करंटी संसाराची आटी किती सोसतात कांहीं कळत नाहीं. याच्या पोटीं चिंतेची हळहळ सर्व काळ असते. याचें तोंड रिकामें असतें तेव्हां राम राम म्हणावयास यांना कांहीं श्रम पडणार आहेत का ? पण भरा हा उफराटा भ्रम माजीऱ्या विषयाच्या गोवीनें होत असतो. यांना एकादी गोष्ट स्पष्ट सांगून कळली तरी न कळल्यासारखे उघडे डोळे झाकतील, त्यांच्या अगीं मायेचें वारें भरलेले असतें. त्याचे चाळे अगीं असतात. तुका म्हणे जन ह असें नांव व बुद्धिहीन बहुरंगी व भिन्न आहे—व एकाचा विचार दुसऱ्यास पटणार नाहीं.

॥ ६६३ ॥

॥ येक वीध नारायण । तेथे वीषमाचा सीण ।
॥ पालटो ची भीन्न । नये अणु प्रमाण ॥ १ ॥
॥ अवघे सारावे गाबाळ । चुकवोनीया कोल्हाळ ।
॥ आनंदाचे स्थळ । येका येकीं येकांत ॥ धृ ॥
॥ काया वाचा मन । स्वरूपीं च अनुसंधान ।
॥ लक्ष भेदी बाण । येणे पाडे लवलाहे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आळस नीद्रा । येथें देउनीयां चीरा ।
॥ देउनीयां धीरा । मीठी जाणा जागृती ॥ ३ ॥

( ६६३ ) आणि नारायण तर एकवीध आहे. तेथें विषमाचा शीण होतो तेथें अणुभर पालट—फरक प्रमाण होत नाहीं, खपत नाहीं—मानवत नाहीं—म्हणून अवघे गबाळ सारावें—कोल्हाळ—आरडा ओरड—गवगवा बाजारांत असतो तसा ( ६६१ व्या अभगांत हाट म्हटला तेथील ) व एकांतांत एकटेंच आनंदाचें स्थळीं जावून बसावें. कायावाचामनानें स्वरूपीं अनुसधान ठेवून—आणि येणें पडीपाडे—या रीतीनें, लवकर, लक्ष्य, तें ठाण—एकवीध नारायण—भेदून जाईल तुका म्हणे—आळस व निद्रा याच्या डोक्यावर चिरा—दगड—ठेवून—धीरानें जागृतीस मिठी द्यावी. म्हणजे मग.

॥ ६६४ ॥

॥ मंगळाचा मंगळ सांठा । वीण तोटा नेणे ते ॥ १ ॥
॥ धृ ॥ हे भरा साते आलें । भले भले म्हणवावे ॥ धृ ॥
॥ जनीं जनार्दन वसे । येथे दीसे ते शुध ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वहुतां सुखे । खरं सुखे ठेवावे ॥ ३ ॥

( ६६४ ) मगळाचा मगळ साठा—ज्यास वीट माहीत नाहीं—तोटा माहीत नाहीं—असे साते— ( एका मागून एक ) भरास येईल तेव्हा भलें म्हणावें म्हणवावें. जनीं जनार्दन राहतो, वास करून असतो. तेव्हा येथें त्याचें शुद्ध स्वरूप दिसतें तुका म्हणे बहुता सुखें—खरें हें सुखानें ठेवावें.

येथवर सरळ मार्ग सागितला, याच्या उलट जपी काय करताहेत तें हि सांगताहेत.

॥ ६६५ ॥

॥ घालुनीया मापीं । देव भक्त बैसला जपीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ तैसी होते सांडी उलंडी । नीज नीजाची मुर्कुडी ॥ धृ ॥
॥ अमुपीं उखतें । आपण चोस आपण यातें ॥ २ ॥
॥ देव आतां जाला । उगवे संकोची राहीला ॥ ३ ॥
॥ अखंड नेले वेठी । भार सत्यावीण गांठीं ॥ ४ ॥
॥ आडकीलों झोंपा । रीता कलेवराचा खोंपा ॥ ५ ॥
॥ गोदातीरीं आड । करीते करचीते द्वाड ॥ ६ ॥
॥ तुका म्हणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ७ ॥

( ६६५ ) जपी हा देवांस मापांत अडकवून भक्त म्हणवून जपास बसला आहे. ही त्यांची खटपट ( सांडी ) उलंडी ( पार तरून जाण्याचें साधन ) कशी होणार ? त्याची स्वतःची त्यांत मुर्कुडी वळणार ! देव अमूप ( माप न करतां येण्याजोगा ) उखता ( अवघा सर्वत्र ) असतांना आपण त्यांस मापांत आणूं म्हणूं तर आपण मोकळें राहूं. आतां देव जपानें झाला — अशा संकोचानें हा राहतो — अखंड जरी वेठी केली तरी सत्यावीण गाठीं भार च पडणार. आपण आपल्या झोंपडीचा झांप लावल्यानें कां बाहेरच्या गोष्टी बाहेर राहणार आहेत ? नदीच्या काठीं एक आड बांधला व त्यांत पाणी आहे — नदींत पाणी नाहीं — असें सांगणें — व बलानें तसा उपदेश करणारांचें तोंड काळें असतें.

येथें जपीं — तपी वर बोळा फिरवीला.

॥ ६६६ ॥

॥ वसवावें घर । देवें बरें नीरंतर ॥ १ ॥
॥ धृ ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजन भोजनीं ॥ धृ ॥
॥ संकल्प वीकल्प । मावळोनी पुण्य पाप ॥ २ ॥
॥ तुका म्हणे काळ । अवघा गोवींदीं सुकाळ ॥ ३ ॥

( ६६६ ) देवानें या आपल्या देहांत निरंतर वास करावा हें बरें — त्यामुळें बसलों असतांमी निजलों असतांना भोजन करीत असतांना — आपणास त्याचा संग होतो. संकल्प — विकल्प — पुण्य पाप — हें सर्व मावळून अवघा काळ गोविंदीं सुकाळ होतो.

उपदेश—ओघ पुढें चालू आहे.

॥ ६६७ ॥

॥ न करावी टांचणी। येथें कांहीं आडचणी ॥ १ ॥
॥ धृ ॥ जीव्हे अमुप करी माप। वींठल पीकला माय बाप ॥ धृ ॥
॥ आठ ही महर। बारा मास नीरंतर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वाणी। वरजेना ही घेतां धणी ॥ ३ ॥

( ६६७ ) येथें कांहीं अडचणी नाहींत तेव्हां सांठा करूं नका. जिव्हेनें अमूप – विठ्ठल विठ्ठल – असें माप करावें. म्हणजे मायबाप विठ्ठल पिकेल – आठ प्रहर, निरंतर बारा हि महिने – वाणी – विठ्ठल विठ्ठल – या नामाची धणी – आवडी घेउन वरजेना ( अर्थ लागला नाहीं. )

॥ ६६८ ॥

॥ नसतां अधीकार। उपदेशासी बळात्कार ॥
॥ तरी ते केले हो चार। माकडा आणि गारोडी ॥ १ ॥
॥ धृ ॥ धन धान्य राज्य बोल। वृथा रंजवणे फोल।
॥ नाहीं तेथें वोल। बीज वेची मूर्ख तो ॥ धृ ॥
॥ नये बांधो गांठी। पदरा आणी येसी तुटी।
॥ असोन कसोटी। शीस्टाचार अनुभव ॥ २ ॥
॥ उपदेशी तुका। मेघ वृस्टीनें आइका।
॥ संकलपासी धोका। सहज तें उतम ॥ ३ ॥

(६६८) उपदेश करण्याचा–घेण्याचा, अधिकार नसतां–उपदेश करण्याचा जे बलात्कार करितात त्यांचे ते चार – आचार – चाळे – हे माकडाच्या किंवा गारुड्याच्या खेळासारखे खेळ आहेत – धन धान्य राज्य मिळविण्यासाठीं हे बोल फोल वृथा रंजवणें आहे. जेथें जिव्हाळ्याची ओल नसेल तेथें उपदेशाचें बीज वेचतो तो मूर्ख होय. जेणेंकरून आपल्या पदरास तुटी येईल अशी गोष्ट गाठीं बांधूं नये. हा शिष्टाचाराचा अनुभव ही उत्तम कसोटी आहे. तुका मेघवृष्टीनें उपदेश करीत आहे तें ऐका. संकल्पाच्या ठिकाणीं धोका आहे. जी गोष्ट सहज असते ती उत्तम असते.

॥ ६६९ ॥

॥ रुसलो संवसारा। आम्ही आप आणी परा ॥ १ ॥
॥ धृ ॥ म्हणउनी केली सांडी। देउनी पडीलो मुरकुंडी ॥ धृ ॥
॥ परतेची ना मागें। मोहो नीस्टुर जाली अंग ॥ २ ॥
॥ सांपडला देव। तुका म्हणे गेला भेव ॥ ३ ॥

( ६६९ ) आम्हीं ससारावर, आपपर, भावावर, रुसलो, त्याची सांडी केली—देवाच्या पायीं मुर्कुडी दिली. तेव्हां आतां मागें परतत नाहीं—व त्याबद्दल आम्हीं =अगें—जातीनें निष्ठुर झालों. यामुळें—तुका म्हणे- देव सापडला व भय गेलें. तेव्हां देवाशीं वागण्याची रीत सागताहेत.

॥ ६७० ॥

॥ येथील हा ठसा । गेला पडोनीयां ऐसा ॥ १ ॥
॥ धृ ॥ घरी देवाचे अबोला । त्याची ते ची सवे त्याला ॥ धृ ॥
॥ नाही पाहावें लागत । येकायेकीच ते रीत ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जन । तयामध्ये येवढे भीन्न ॥ ३ ॥

( ६७० ) येथील हा असा ठसा पडोन गेला आहे कीं देवाचे घरीं अबोला आहे—त्याची त्याला फार सवय आहे. ही रीत पहावी लागत नाहीं—एकाएकीं च ती लक्ष्यात येतें तुका म्हणे जनामध्यें—लोकाचारात—हें एवढें च भिन्न असतें.

॥ ६७१ ॥

॥ मज नाहीं धीर । तुम्ही न करा अंगीकार ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसे पडीले वीषम । बळी देवाहुनी कर्म ॥ धृ ॥
॥ चालों नेणे वाट । केल्या नपवाची बोंभाट ॥ २ ॥
॥ येचो नेणे जीवे । तुका उदास धरीला देवे ॥ ३ ॥

( ६७१ ) देवा, तुम्ही अंगीकार करीत नाहींत—मला तर धीर निघत नाही अशा तऱ्हेनें कर्म हें देवाहून बळी होऊन विषम पडलें आहे. आम्हास चालून जाण्याची वाट माहीत नाहीं व आम्हीं आरडाओरड केली तरी ती तुम्हास पोहोचत नाहीं. तुम्यास सर्व जीव देवास कसा वहावा हें माहीत नाहीं, साधत नाहीं, म्हणून देवानें उदासपणा धरला आहे.

॥ ६७२ ॥

॥ न गमेसी जाली दीवस रजनी । राहीलो लाजोनी न बोलावे ॥ १ ॥
॥धृ॥ रुचीवीण काय शब्द वाऱ्या माप । अनादरे कोप येत असे ॥ धृ ॥
॥ आपुलीया रडे आपुलेची मन । दाटे समाधान पावतसे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुम्ही असा जी जाणते । काय करुं रीते वादावाद ॥ ३ ॥

(६७२) दिवस व रात्र जात नाहींशी झाली. तेव्हां या गोष्टीची लाज वाटते. मला कांहीं बोलवत नाहीं. आपल्या शब्दास जर रुचि नाहीं तर वाऱ्यावर माप करून शब्द सर्चून काय होय ? देवा, तुमच्या अनादरानें मला कोप येत आहे. आपलें मन आपणाशीं च रहतें आहे, तेव्हां तें समाधान कोठें पावणार ? तुका म्हणे तुम्ही हे जाणते आहांत तुम्हांस या गोष्टी समजत नाहींत असें नाहीं. मग—उगाच वादावाद कशासाठीं करूं ?

॥ ६७३ ॥

॥ मेल्यावरी मोक्ष संवसार बंधन । आरालीया वंधें ठेवा आम्हां ॥ १ ॥
॥ध्रु॥ वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ ध्रु ॥
॥ गाणें गीत आम्हां नाचणें आनंद । प्रेम कोठें भेदें अंगा येते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे कीती साधावे दृस्टांत । नसतां अनंत सानुकुल ॥ ३ ॥

(६७३) जीवंत असतांना—आम्ही तुम्हांस अनुकूल असतांना (आरालिया) तुम्ही संसारसंबंधानें आम्हांस बंधनांत ठेवतां—आणि मेल्यावर मोक्ष देतां—तेव्हां असा संदेह मी कोठवर राखूं ? असें करावें लागलें तर सेवकत्वाची थोरवी ती काय ? आम्ही गीत गात आनंदानें नाचावें—त्यांत कोठें तरी प्रेमभेदावर येऊन अंगीं यावें पण अनंत सानुकूल नसेल तर हे असले दृष्टांत किती हि साधले तरी ते फुकट आहे.

॥ ६७४ ॥

॥ नामाचा महीमा बोलीलों उत्कर्ष । अंगा कांहीं रस नयेची तो ॥ १ ॥
॥ध्रु॥ केसें समाधान राहे पांडुरंगा । न लगे ची अंगा सांगा कांहीं ॥ ध्रु ॥
॥ लाभाचीये अंगीं सोस कवतुकें । फीक्याचे ते फीके वेवसाव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करा आपुला महीमा । नका जाउं धर्मावरी माझ्या ॥ ३ ॥

(६७४) देवा, मी नामाचा महिमा उत्कटत्वानें मांडला पण त्याचा रस कांहीं अंगीं येत नाहीं हें कसें ? तो रस अंगावर कांहींच आला नाहीं तर मग पांडुरंगा समाधान कसें राहावें हें सांगा ना ! लाभाचीये अंगीं कवतुकाचा सोस असतो—*फिक्याचे व्यवसाय फिकेच असतात. तेव्हां देवा, तुम्ही आपुल्या धर्मा*-प्रमाणें वागा—महिमा दाखवा—माझ्या धर्माकडे पाहूं नका.

॥ ६७५ ॥

॥ हे ची वारंवार । पडताळुनी उतर ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ करीतो पायांसी वीनंती । नुपेक्षावे कमळापती ॥ ध्रु ॥
॥ गंगोदकें गंगे । आर्घ्य द्यावे पांडुरंगे ॥ २ ॥
॥ जोडोनीया हात । करी तुका प्रणीपात ॥ ३ ॥

(६७५) पुनः पुनः उलटूनपालटून पायाशीं एकच विनवणी आहे कीं, अहो कमळापति—माझी उपेक्षा करूं नका. हें माझें म्हणणें गंगेनें गंगेस अर्घ्योदक द्यावें तसें आहे. मी हात जोडून तुम्हांस प्रणिपात करीत आहे.

॥ ६७६ ॥

॥ अवचीत या तुमच्या पाया । देवराया पावलो ॥ १ ॥
॥ धृ ॥ बरवें जालें देशाउर । आल्या दुर सारीखें ॥ धृ ॥
॥ राहोनियां जातो ठाया । आलीयाची नीशाणी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चरणसेवा । जोडी हेवा लाधलो ॥ ३ ॥

(६७६) देवराया, मी तुमच्या पायाजवळ अवचित पावलों. इतक्या लांबवर आल्यासारखें देशाउर झालें हें बरवें झालें. मी मोठ्या हेव्यानें चरणसेवेची जोडी लाधलों आहे. हीं येथें आल्याची निशाणी म्हणून घेऊन जातो. येथून देशाउर झालें म्हणजे काय झालें तें सांगताहेत.-

॥ ६७७ ॥

॥ आतां पावीजेल घरा । या दातारा संगती ॥ १ ॥
॥ धृ ॥ पायावरी ठेवुं माथा । सर्वथा हा नुपेक्षी ॥ धृ ॥
॥ येथुनी तेथवरी आतां । नाहीं सत्ता आणीकांची ॥ २ ॥
॥ तुका म्हणे चक्रपाणी । शीरोमणी बळींयांचा ॥ ३ ॥

(६७७) या दात्याच्या संगतींत मी घरीं पोंहोचेन. याच्या पायावर माथा ठेवीन—हा केव्हां हि कसली हि उपेक्षा करणार नाहीं. येथपासून तेथपर्यंत आतां दुसऱ्या कोणाची हि सत्ता नाहीं. तुका म्हणे चक्रपाणी हा बळीयांचा शिरोमणी आहे.

॥ ६७८ ॥

॥ बरवे माझ्या केले मनें । पंथे येणें नीघालें ॥ १ ॥
॥ धृ ॥ अभयें च जायें ठाया । देवराया प्रतापें ॥ धृ ॥
॥ साधनाचा न लगे पांग । अवघें सांग कीर्तन ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥ ३ ॥

(६७८) या पंथानें माझें मन निघालें—हें त्यानें बरें केलें—कारण देवरायाच्या प्रतापानें अभयाच्या ठिकाणीं जातां येतें. मला कोणत्या हि साधनाचा पांग करावा लागत नाहीं. सर्व कांहीं एका कीर्तनानें सांग होतें. तुका म्हणे याची सत्ता थोर आहे तेव्हां आम्हांस खोळंबा कोण करूं शकेल!

॥ ६७९ ॥

॥ मागे पुढे नाहीं । दुजे या वेगळे कांहीं ॥ १ ॥

॥ धृ । नाहीं उरले आणीक । केला झाडा सकळीक ॥ धृ ॥

॥ विश्वासा वाचून । नांवे दुजीयाचे शून्य ॥ २ ॥

॥ देवावीण कांहीं । तुका म्हणे उरी नाहीं ॥ ३ ॥

( ६७९ ) याशिवाय मागें पुढें दुसरें कांहीं वेगळें राहिलें नाहीं. सर्व गोष्टींचा झाडा दिला—दुसरें कांहीं हि आता उरलें नाही तेव्हा त्याचा विश्वास च नाहीं तेव्हा दुसऱ्याच्या नावानें शून्य घातलें आहे. एका देवावीण—तुका म्हणे—येथें—या मनात दुसऱ्या कोणास वाव नाहीं

॥ ६८० ॥

॥ नाही दुकाळलो अन्ना । परी या मानु जनार्दना ॥ १ ॥

॥ धृ ॥ देव केला सर्व साक्षी । काळी आणी शुध पक्षी ॥ धृ ॥

॥ भोगी भोगवीता । बाळासवें तो पीता ॥ २ ॥

॥ कर्म अकर्म जळाले । प्रौढ तुका ते उरले ॥ ३ ॥

( ६८० ) मी अन्नासाठीं दुष्काळलेलों नाहीं. परतु या जनार्दनास मानू. बऱ्या वाईट—काळ्या गोऱ्या—भल्या बुऱ्या—सर्व पक्षीं आम्हीं देव साक्ष केला आहे तो पीता बाळास सवे ( बरोबर ) भोग भोगविणारा आहे प्रौढपणानें—माझे कर्म अकर्म जळालें—व प्रौढपण तेवढें मला उरलें

प्रौढपणा कसा भोगीत आहेत—कर्म अकर्म कसें जळलें तें सागताहेत.

॥ ६८१ ॥

॥ देव आड जाला । तो भोगीता मी उगला ।

॥ अवघा नीवारला । शीण शुभ अशुभाचा ॥ १ ॥

॥ धृ ॥ जीव शीवाचे भातुके । केल क्रीडाया कवतुके ।

॥ कैचीं येथे लोके । हा आभास अनीत्य ॥ धृ ॥

॥ वीष्णुमय खरे जग । येथे लागतसे लाग ।

॥ वाटीले वीभाग । वर्ण धर्म हा खेळ तयाचा ॥ २ ॥

॥ अवघी येकाची च वीण । तेथे कैचें भीन्नाभीन्न ।

॥ वेद पुरुष, नारायण । तेणे केला नीवाडा ॥ ३ ॥

॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस ।

॥ पायापासीं वास । नीकट नव्हे नीरापी ॥ ४ ॥

(६८१) जीव = हा शिवानें स्वतः कौतुकानें क्रीडा करण्यासाठीं केलेलें बाहुलें आहे. तो जीवास आड घालतो व सर्व भोग भोगतो व मी उगला = शांत = असतो. येथें हे लोक येतात कोठें—हा अनित्य = अशाश्वत आभास आहे. खरोखर हें सर्व जग विष्णुमय आहे. येथें कोणत्या हि गोष्टीचा लाग लागतो. वर्ण धर्म करून विभाग वाटून देणें हा त्याचा खेळ आहे. ही सर्व एकाची च वीण आहे. असें म्हटल्यावर येथें भिन्न तरी काय व अभिन्न तरी काय—असा निवाडा वेदपुरुष नारायणानें केला आहे. तुका या वेदपुरुष नारायणाच्या प्रसादाचा सोरस प्रेमपान्हा लाधला आहे. त्यामुळें त्यास देवापायीं वास करावयास मिळाला आहे. व तो देवास सोडून केव्हां हि निरोप सांगतांना सुद्धां वेगळा नसतो.

॥ ६८२ ॥

॥ कैसी दीसो वरी । आम्ही आळवीतां हरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं सांग अलंकार । दास जाला संवसार ॥ धृ ॥
॥ दुख आम्हां नाही चींता । हरीचे दास म्हणवीतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । यैसा जालो करीतां सेवा ॥ ३ ॥

(६८२) देवा तुम्हांस आळवीत असतांना, संसार आमचा दास झाला आहे. हरीचे दास म्हणवितांना आम्हांस दुःख व चिंता उरली नाहीं—असे जर तुमची सेवा करतांना जालों नाहीं तर तुझा अलंकार आम्हांस सांग झाला नाहीं असें म्हणावें लागेल.

॥ ६८३ ॥

॥ होतो सांपडलों वेठी । जातां भेटी संवसारा ॥ १ ॥
॥ धृ ॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली वीठोबासी ॥ धृ ॥
॥ होता भार माथां माझे । बहु ओझें अमुप ॥ २ ॥
॥ तुका म्हणे केली चींता । कोण दाता भेटेल ॥ ३ ॥

(६८३) संवसाराच्या भेटीस गेलों तों त्यानें वेठीस धरलें तसा वेठ करीत वाटेनें जात होतो. डोक्यावर ओझें फार होतें, आपणास कोणी दाता भेटेल कां म्हणून चिंता केली—तों विठोबाची भेटी होऊन त्यानें कृपा केली.

॥ ६८४ ॥

॥ भय होतें आम्हीपणें । पाठी येणें घातलें ॥ १ ॥
॥ धृ ॥ आवघा आपला च देश । काव्ठा लेश उरेची ना ॥ धृ ॥
॥ समर्थाचें नाम घेतां । मग चींता कासाची ॥ २ ॥
॥ तुका म्हणे नारायणें । जालें जीणें सुखाचें ॥ ३ ॥

( ६८४ ) आम्हांस आम्हीपणानें भय होते. पण यानें—बळीयांच्या शिरो· मणी चक्रपाणी यानें, पाठीशीं घातलें—आतां हा सर्व प्रांत आपला च आहे. काळास रेसभर हि जागा उरली नाही. समर्थाचें नांव घेतांना चिंता कशाची ? तुका म्हणे या नारायणामुळें जीणें सुखाचें झालें.

॥ ६८५ ॥

॥ अनंताच्या येको कीर्ती । ज्याच्या चीतीं हरीनाम ॥ १ ॥
॥ धृ ॥ उलंघोनी गेले सींधु । हा भवबंधु तोडोनीया ॥ धृ ॥
॥ आतां हळुहळु तेची वाही । चालो कांहीं अधीकारें ॥ २ ॥
॥ खुंडुनीया गेले नावा । नाही हेवा खोळंवला ॥ ३ ॥
॥ नलगे मोल द्यावा रुका । भावे येका कारण ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे पाहतो वाट । उभा नीट पाउली ॥ ५ ॥
॥ भीमातीरी थडवा केला । उठा चला लवलाहे ॥ ६ ॥

( ६८५ ) भवबंध तोडून—व भवसिंधु उलंघून जे गेले आहेत—ज्यांच्या चित्तांत हरी नाम आहे, त्याच्या तोंडून अनंताच्या कीर्ति ऐकू. व आतां हळु हळु त्याच प्रवाहानें—थोड्या फार अधिकारानें चालू—ते नावा सांठवून ठेवून गेले आहेत—त्याचा कांहीं हि हेवा करावयास नको—ते खोळंबले नाहींत. त्यासाठीं मोल नको, रुका खर्चावयास नको, एक भाव गांठीं असला कीं कार्य साधतें—भीमा तीरीं त्यांनीं थडवा ( डबकें ) केलें आहे. तेव्हा उठा घाई करा तुका म्हणे तो सम पाउलावर उभा राहून आपली वाट पाहात आहे. ( येथें ओघ बदलतो. )

॥ ६८६ ॥

॥ आला भागासी तो करी वेवसाव । परी राहो भाव तुझ्या पाई ॥ १ ॥
॥ धृ ॥ काय चाले तुम्हीं बांधले दातारा । वाहीलीया भारा उसंतीतो ॥ धृ ॥
॥ शरीर हे करी शरीराचे धर्म । नको देउं वर्म चुको मना ॥ २ ॥
॥ चळण फीरवी ठाव बहु वस । न घडो आळस चींतनाचा ॥ ३ ॥
॥ इंद्रीयें करोत आपले व्यापार । आवडीसी थार देई रुपीं ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे नको देउं काळा हातीं । येतो काकुळती म्हणउनी ॥ ५ ॥

( ६८६ ) माझ्या वाट्यास जो व्यवसाय आला आहे तो मी करीन, पण देवा—तुझ्या पायीं माझा भाव राहू दे. देवा तुम्हींच बांधल्यावर आम्हीं कांहीं केलें तरी काय चालणार आहे ? जो भारा वाहतो आहे तो उसंतींत

आहे. देवा शरीर शरीराचें धर्म करो पण तूं वर्म चुकूं देऊं नकोस. माझ्या चलण वलणानें ठाव जरी बहुवस फिरलें–तरी तूं चितनांत आलस पडूं देऊं नकोस, इंद्रियें खुशाल आपापले व्यापार करोत पण माझ्या आवडीस तुझ्या पायीं थार–ठिकाण–वसतीस जागा दे. देवा तूं मला काळाच्या हातीं देऊं नकोस येवढीच तुला काकुळती करीत आहे.

॥ ६८७ ॥

॥ सुटायाचा कांहीं पाहातो उपाय । तों हे देखे पाय गोवींयेले ॥ १ ॥
॥ध्रु॥ यैसीया दुखाचे सांपडलो संदीं । हारपली बुधी बळ माझें ॥ ध्रु ॥
॥ प्रारब्ध क्रीयमाण संचीताचे । वोढत ठाईचें आलें साचे ॥ २ ॥
॥ वीधी नीपेधाचे सांपडलो चपे । येके येक लोपे नीवडेना ॥ ३ ॥
॥ सारावें तें वाढे त्याचीया च आंगें । तृष्णेचीया संगें दुखी जालो ॥४॥
॥ तुका म्हणे आतां करी सोडवण । सर्व शक्तीहीन जालो देवा ॥ ५ ॥

(६८७) प्रारब्ध–संचीत–क्रीयमाण यांनीं जें कर्म ओढवलें–त्या कर्मात मी सांपडलों–त्यांच्या–विधी–निपेधाच्या संधींत सांपडून एकमेकासी मेळ नाहीं. बरें जी गोष्ट मागें सारावी–ती त्याच अंगानें वाढूं लागते–अशा तऱ्हेनें तृष्णेच्या संगानें मी दुःखी जालों. या दुःखांत मी सांपडलो असतांनां माझी बळ व बुद्धि पार हारपली. अशा संकटाचे वेळीं कांहीं तरी सुटायाचा उपाय पाहत होतों तों या विठोबाचे पाय देखिले–तेव्हां तुका म्हणे–देवा आतां सोडवण कर. मी शक्तीहीन जालों आहे–

॥ ६८८ ॥

॥ भय वाटे पर । न सुटे हा संवसार ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ यैसा पडीलो काचणी । करी धावा म्हणउनी ॥ ध्रु ॥
॥ वीचारीतां कांहीं । तों हे मन हातीं नाहीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । येथें न पुरे रीघावा ॥ ३ ॥

(६८८) भय वाटतें पण हा संसार कांहीं सुटत नाहीं. अशा कांचणींत मी सांपडलों आहे. तेव्हां आतां देवा, धावा–मी तुम्हांस कांहीं विचारीन तों हें मन हातीं नाहीं–तुका म्हणे देवा येथें रिघावा (जबरदस्तीनें आंत शिरणें) पुरत नाहीं–आम्हांस दांडगाईनें कांहीं करतां येणार नाहीं–तुम्ही कृपेनें जेवढें कार्य कराल तेवढें च होईल.

॥ ६८९ ॥

॥ ये गा पांडुरंगा । घेई उचलुनी वोसंगा ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसी असोनीया वेसी । दीसतो मी परदेसी ॥ धृ ॥
॥ उगउनी गोवा । सोडउनी न्यावें देवा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे न्हुषीकेशी । काय उशीर लावीलासी ॥ ३ ॥

(६८९) म्हणून ये गा, ये गा, पांडुरंगा तूं आपल्या कडेवर आम्हांस उचलून घे. असा हा मार्ग असून मी परदेशी (वाट चुकल्यासारखा) का दिसतों. देवा जो काहीं गोवा असेल तो सोडवून मला न्यावें—तुका म्हणे हृषीकेशी—उशीर का वरें लाविलास ?

॥ ६९० ॥

॥ तरीच म्या देवा । साटी करुनीया जीवा ॥ १ ॥
॥ धृ ॥ येथे बैसलों धरणें । दृढ कायावाचा मनें ॥ धृ ॥
॥ आवरल्या वृती । मन घेउनीया हातीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जरा । बाहेर येउं नेदी घरा ॥ ३ ॥

(६९०) म्हणून या जीवासाठीं देवा, काया वाचा मन घट्ट करून धरणें धरून बसलों आहे—मन हातीं घेऊन सर्व वृत्ती आवरल्या आहेत, देवा तुला मी जरासुद्धां या घराबाहेर येऊ देणार नाहीं. दारांत धरणेकरी बसला आहे.

॥ ६९१ ॥

॥ हे तों येक संतां ठाईं । लाभ पाई उत्तम ॥ १ ॥
॥ धृ ॥ म्हणवीतां त्यांचे दास । पुढे आस उरेना ॥ धृ ॥
॥ कृपा दान केले संतीं । कल्पांतीं ही सरेना ॥ २ ॥
॥ तुका म्हणे संत सेवा । हाची हेवा उत्तम ॥ ३ ॥

(६९१) संतांचे दास म्हणविल्यानें—त्याच्या पाईं एक उत्तम लाभ होतो. तो हा कीं दुसरी कशाची हि आस उरत नाहीं. संत जें कृपादान करितात तें कल्पांतीं हि सरत नाहीं. तुका म्हण देवा—संतसेवा ही सर्वांत उत्तम.

(ओघ बदलला)

॥ ६९२ ॥

॥ अनुभवें आले अंगा । ते या जगा देतसे ॥ १ ॥
॥ धृ ॥ नव्हती हातलुके बोल । मूळ ओल अंतरींची ॥ धृ ॥*
॥ उतरुनी दीले कसीं । शुद्ध रसीं सरते ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली ॥ ३ ॥

( ६९२ ) जी गोष्ट मला स्वानुभवानें कळली, समजली, पटली आहे, तेवढी च गोष्ट मी लोकास सागत असतो. माझे शब्द हे केव्हा हि अटकळींचे म्हणजे अनुमान धपक्याचे नसतात तर शब्द बाहेर पडतो तेव्हां त्या शब्दानें व्यक्त होणाऱ्या अवस्थेचा जिव्हाळा माझे अतरात नादत असतो म्हणून माझ्या जिनसेला कस लावून पहाल, माझ्या शब्दाचा अनुभव पहाल, तर शब्द शुद्ध रसाचे असल्यामुळें केव्हा हि सरते म्हणजे पटण्याजोगे असतात. तुका म्हणे येथील शब्द अनुभवाशिवाय नाही अशी मी ग्वाही म्हणजे साक्ष पटविली आहे.

॥ ६९३ ॥

॥ मागे पुढें नाहीं । दुजे या लागे कांहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं उरले आणिक । केला झाडा सकळीक ॥ धृ ॥
॥ विश्वासावाचून । नांवें दुजियाचे शून्य ॥ २ ॥
॥ देवावीण कांहीं । तुका म्हणे उरी नाहीं ॥ ३ ॥

( ६९३ ) माझ्या शब्दासारखा शब्द मागें कोणी ऐकला नाहीं व पुढें फारसा ऐकू येईल अशी आशा नको. मी काहीं मागें उरी = बाकी ठेविलें नाहीं प्रत्येक गोष्टीचा झाडा, निकाल स्पष्ट केला आहे. माझा एक पांडुरगावर विश्वास व दुसऱ्याच्या नावानें माझे ठिकाणीं शून्य आहे. तुका म्हणे एका देवा शिवाय मला दुसऱ्या कोणत्या हि गोष्टीकडे पाहण्यास उरी, उसत, सवड नाहीं.

॥ ६९४ ॥

॥ साहोनीया टोले उरवावे सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥ १ ॥
॥ धृ ॥ भोगाचे सांभाळी द्यावे कलेवर । संचीताची थार मोडुनीयां ॥ धृ ॥
॥ महत्वाचे ठाई भोगावी अप्रतिष्टा । वीटवावे नष्टा पंचभुतां ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मग कैचा संवसार । जयाचा आदर तेची व्हावे ॥ ३ ॥

( ६९४ ) टोले खाऊन सार उरवावें तेव्हां खऱ्या मोलानें अगीकार होतों. तसें भोगाचे साभाळी कलेवर द्यावें–सचीतानें जें मानाचें स्थान आलें असेल तें मोडून टाकून तेथें अप्रतिष्ठा भोगावी आणि नष्ट पच भूताना वीट आणावा असें झाल्यावर तुका म्हणे ससार कोठून होणार ? ज्याचा चित्तीं आदर ते च आपण प्रत्यक्ष होऊ, प्रत्यक्ष देव होऊ व तें होण्याचा स्वतः केलेला उपाय वर सागितला आहे.

॥ ६९५ ॥

॥ तांतडीची धाव आंगां आणी भाग। खोळंबा तो मग नीरचींतीचा ॥१॥
॥घृ॥ म्हणउनी बरी वीचाराची चाली। उरीची ते बोली कामा येते ॥घृ॥
॥ कोरडे वैराग्य माजीरा बडीवार। उतरे तो शुर आंगिचें तें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बरी झऱ्याची ते चाली। सांठवण्या खोली कासयाची ॥३॥

( ६९५ ) तांतडीनें धांव घेऊन जो भाग आपल्या अंगास वाटयास येईल त्यामुळें नंतर निश्चींतीनें खोळंबा होईल. म्हणून तांतडी न करतां बरी चाल काय आहे तें विचारावें. उरीची बोली म्हणजे थोडें अंतर ठेवून बोललें तर उपयोगी पडतें. कोरडें वैराग्य–हें उन्मत्तपणाचें प्रदर्शन आहे–खरें वैराग्य ते की जो शूर आहे तो शौर्याची गोष्ट स्वतःच्या तोंडानें न सांगतां ती गोष्ट–तें त्यांच्या अंगीं उमटलेलें दिसेल. तुका म्हणे सांठविलेल्या पाण्याला खोली कोठून असणार! तुका म्हणे झुळू झुळू झरा वाहतो तो उत्तम. तुका म्हणे बरी झऱ्याचीते चाली। हें वाक्य सर्व संस्थांनीं ब्रीदवाक्य घ्यावें असें आहे. शौर्य भुपद हि लक्षांत धरावें असें आहे. कोरड्या वैराग्याचें दर्शन आपणास सदा होत असतें च. वैराग्य हें अंगीं कसें मुरलेलें दिसतें ते सांगताहेत.

॥ ६९६ ॥

॥ नीर्वैर होणें साधनाचें मुळ। वेर ते वीलहाळ सांडी मांडी ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं चालो येत सोंग संपादणी। नीवडे अवसानीं शुधा शुध ॥ धृ ॥
॥ त्यागे नांव तरी नीर्वीशय वासना। कार्या कारणा पुरते वीधी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे राहे चींतनीं आवडी। येणे नांवें जोडीं सत्यत्वेसी ॥ ३ ॥

( ६९६ ) आपण सर्वांबरोबर निर्वेर असावें हें सर्व साधनांचें मूळ आहे. बाकी इतर सर्व प्रकार विल्हाळ दुःखाचे प्रकार होत. ते सर्व सांडीमांडीचे होत. सोंगाची संपादणी ही कांहीं फारवेळ टिकत नव्हीं. ऐन वेळेस–शुद्ध–अशुद्ध याचा निवाडा होतो. वासना ही निर्विषय असणें याचें नांव त्याग. विधी हे कार्य करण्यापुरते असो यात. एवढें असून ज्याची चिंतनी आवडी असते, त्यानें सत्यत्वेसी जोडी केली म्हणावयाची. त्यागें नांव तरी नीर्वीशय वासना। हीं त्यागाची व्याख्या किती थोड्या शब्दांत साधली आहे.

॥ ६९७ ॥

॥ आपुल्याचा भोंत चाटीं। मारी करंटी पारख्या ॥ १ ॥
॥ धृ ॥ ऐसें जन भुलले देवा। मीथ्या हेवा वाढवा ॥ धृ ॥
॥ गळा गीळीं आमीषें मासा। प्राण आशा घेतला ॥ २ ॥
॥ तुका म्हणे वोकड मोहो। धरी पहा हो खाटीक ॥ ३ ॥

(६९७) गाय आपल्या पाडसाची भोत चाटते. आणि इतरांस करंटी म्हणून मारते. देवा, खोट्या हेव्यानें जग हें असें भुललें आहे. गळास लाविलेल्या आमिषानें मासा आमिष गिळीतो व प्राणास मुकतो. तुका म्हणे खाटीक बोकडाचा कसा मोह धरितो तो पहा.

॥ ६९८ ॥

॥ पशु येसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयांचे ॥ १ ॥
॥ धृ ॥ ठेवूनीयां लोभी लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥ धृ ॥
॥ केला आणीकां वाढी पाक । खाणे ताक मूर्खासी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ३ ॥

(६९८) तसें ज्ञानी लोक विषयाच्या चर्वणांत पशू होतात. लोभावर नजर ठेविल्यानें आत्मत्वाची सोय मोडते आपण जर पाक केला आहे, ज्ञान मिळविलें आहे. तर तें आपण सेवन न करिता म्हणजे तें ज्ञान वर्तनांत न उतरविता दुसऱ्यास शिकवावयास जातात व आपण ताक पितात. ज्ञान विकून द्रव्य मिळवितात. या देहाचा हीं ज्ञानी माणसें फार वाताहत करतात.

॥ ६९९ ॥

॥ सावधान येसे काय ते वीचारा । आले हो संसारा सकळ ही ॥ १ ॥
॥धृ॥ अतीं समयाच्या करणे वीचार । वेचती सादर घटिकापळे ॥ धृ ॥
॥ मंगळ हे नोव्हे कन्यापुत्रादीक । राहील लौकीक अंतरपाट ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देव अंतरला दुरी । डोळीयां आंधारी पडलीसे ॥ ३ ॥

(६९९) अरे ससारी आलेल्यांनों—सावधान—म्हणून लग्नाचे वेळीं अतर्पाठ धरून म्हणता, पण सावधान कशाबद्दल, कोणापासून का व्हावयाचें असा प्रश्न प्रत्येक जण कां विचारीत नाहीं. आयुष्य घटिका पळानें जात आहे तेव्हा शेवटच्या वेळेचा विचार करा, पण सावधान म्हणून कन्यापुत्रादिक होणें म्हणजे काहीं मगळ नव्हे—लौकिकाचा अन्तर्पाठ राहावयाचा तो राहतो च व त्यामुळें देव दुरावतो व डोळ्यांना अधारी आलेली असते.

॥ ७०० ॥

॥ वीषय तो मरण संगी । नेणे सुटीका अभागी ॥ १ ॥
॥धृ॥ शास्त्रांचा केला लुंडा । तोंडीं पाडीयेला धोंडा ॥धृ॥
॥ अगदी मोक्ष नाही ठावा । काय सांगावे गाढवा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ग्यानगंड । सुखे पावो दैवा नाड ॥ ३ ॥

( ७०० ) विषयी जो आहे त्याला मरणाशिवाय संग सुटणार नाहीं. असा तो अभागी आहे. शास्त्राचा लुंडा ( लुला ) करून तोंडावर धोंडा पाडून घेतो. स्वतः त्याला मोक्ष माहीत नाहीं — मग या गाढवास आम्हीं सांगावें तें काय ? देवा, हे ग्यानगंड सुखें अडकलेले राहोत — ज्ञानी मोक्षाच्या गप्पा मारतात. त्यांस मोक्ष कशापासून हें माहीत नसतें — व गप्पांतून ते कधीं सुटावयाचे नाहींत.

॥ ७०१ ॥

॥ आपलें तें नाहीं । येथें सांगायास कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ परी हे वाणी वायाचळ । छंद करवीते वरळ ॥ ध्रु ॥
॥ पंचभुतांचा मेळा । देह सत्यत्वें नीराळा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भुली । इछा उफराटी चाली ॥ ३ ॥

( ७०१ ) या ग्यानगंडांस आपला स्वतःचा अनुभव म्हणून सांगावयास एक हि गोष्ट नसते. परंतु त्याची वाणी उगाच चळ लागल्यासारखी छंद करून बरळत असते. पंचभूतांचा हा मेळा आहे व देह निराळा आहे अशा भुलीनें व उफराटी चालीनें हे बरळत असतात. येथें ओघ बदलतो.

॥ ७०२ ॥

शोधीतांची नये । म्हणोनी वोळगतो पाये ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आतां दीसो नये जना । ऐसें करा नारायणा ॥ १ ॥
॥ परतोनी मन । गेलें ठाइंच मुरोन ॥ २ ॥
॥ विसरला तुका । बोली चाली जाला मुका ॥ ३ ॥

( ७०२ ) मला कोणत्या हि तऱ्हेनें तुमचा शोध लागत नाहीं म्हणून तुमचे पायीं वोळंगतो आहे. म्हणजे चरणाची सेवा करून आहे तेव्हां यापुढें मी जनांस दिसणार नाहीं ऐसें करा. माझें मन परतून ठाईंच मुरालें आहे. तुका आतां बोलण्याचालण्यास विसरला व मुका झाला. येथून पुढील २३ अभंग पंडीत प्रतींत कायाब्रम्हं केली ते आहेत. पण तें प्रकरण तेवढें स्पष्ट नसल्यामुळें येथें उतरून घेतलें नाहीं.

॥ ७०३ ॥

॥ वैराग्याचा अंगीं जालासे संचार । इछी वनांतर सेवावया ॥ १ ॥
॥ध्रु॥ कांजी माझें करु नये समाधान । वीयोगानें मन सीणतसे ॥ ध्रु ॥
॥ नयेची न्यावया पंढरीचे मुळ । न देखेची माळ कंठींची हीं ॥ २ ॥
॥ तुका म्हणे जाले अप्रीतीचे जीणें । लाजीरसें वाणें सेवा करी ॥ ३ ॥

(७०३) माझे अंगीं वैराग्याचा संचार झाला असून वनांतरास जावें, अशी मनांत इच्छा उत्पन्न झाली आहे. माझें मन समाधान कां पावत नाहीं? — तुमच्या वियोगानें मन शिणत आहे. मला न्यावयास पंढरपूरचें मूळ येत नाहीं — कंठीची माळ (वैजयंती माळ) दिसत नाहीं. देवा, मला हें असलें जिणें अप्रीतीचें वाटतें — लाजीरवाणें वाटतें.

॥ ७०४ ॥

॥ येतील अंतरा शीस्टांचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ १ ॥
॥धृ॥ आतां माझा जीव घेउनीयां बळी । बैसवावे वोळी संतांचिये ॥ धृ ॥
॥ वीस्तारली वाचा फळेवीण वेल । कोरडे च बोल फोल माझे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आलो नीर्वाणाचे वरी । राहो नेदीं उरी नारायणा ॥ ३ ॥

(७०४) माझ्या अंतरांत शिष्टांच्या अनुभवाची आठवण होऊन मी त्या सुखासाठीं तळमळत आहे. आतां माझा जीव बळी घेऊन संतांच्या ओळीस मला बैसवावें. माझी वाणी — आजवर कोरडे — फोल — फळावीण बोल — बोलून — विस्तार पावली आहे. देवा, आतां निवाड्याची वेळ आली आहे — आतां तुम्हां आम्हांत उरी — अंतर — राहूं देत नाहीं. तुम्हीं अंतर ठेऊं नयेत.

॥ ७०५ ॥

॥ आपण ची व्हाल साहे । कार्य आहे नीर्वाणीचे ॥ १ ॥
॥ भाकीली ते उरवी कींव । आहे जीव जीवपणं ॥ धृ ॥
॥ आहा च कैंचा बीजामोड । प्रीती कोड वाचुनी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे दंडीन काया । याल तया धावणीया ॥ ३ ॥

(७०५) देवा तुम्ही आपण होऊन च साहाय्य व्हाल तर ठीक — कारण ही वेळ निर्वाणीची आली आहे. आतां जीव जीवपणानें करुणा भाकून उरला आहे. प्रीतिचें कोड असल्याशिवाय बीजास मोड कसा यावा? तुका म्हणे यापुढें मी अशी काया दंडीन कीं तुम्हांस यावेसें च वाटेल.

॥ ७०६ ॥

॥ नीस्चींतीनें होतो करुनीया सेवा । कांजी मन देवा उद्वेगीलें ॥ १ ॥
॥धृ॥ अनंत उठती चीताचे तरंग । करावा हा त्याग वाटतसे ॥ धृ ॥
॥ कोण तुम्हा वीण मनाचा चालक । दुजें सांगा येक नारायणा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे माझा मांडीला वीनोद । करउं नेणें छंद कराल काइ ॥ ३ ॥

(७०६) देवा, तुमची सेवा करून निश्चित होतों–मग माझें मन असें उद्विग्न कां झालें ? चित्तात अनत तरग उठतात, देह त्याग करावा असें हि वाटतें. तुमच्या शिवाय माझ्या मनास दुसरा कोणी चालक आहे का ? तेव्हा मनात जे हे विचार स्फुरताहेत, त्यावरून वाटलें कीं, तुका म्हणे, तुम्ही माझ्या विनोद चेष्टा मांडलेली दिसत आहे. पण मला कांहीं आतां छद करवत नाहींत आता त्या छंदानीं खेळ करवत नाहींत तेव्हां तुम्ही काय कराल तें खरें.

॥ ७०७ ॥

॥ नीरोधती परी न मोडे वीकार । वहु हीं दुस्तर वीषय द्वारें ॥ १ ॥
॥धृ॥ राहातेती तुम्ही भरोनि अंतरी । होतो तदाकारी नीर्वीषयची ॥धृ॥
॥ कृपेचीया साक्षी असती जवळी । वचनें मोकळी सरत नाही ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ताळा मेळवणी पासीं । वीनंती पायापासीं हे ची करी ॥३॥

(७०७) मी पुष्कळ निरोध करतों–पण हीं विषय–द्वारें दुस्तर आहेत. तुम्ही जर त्यात भरून राहिलात–तर तींच द्वारें तदाकार होऊन निर्विषय होतात तुम्ही कृपेचे साक्षी जवळ असताना मोकळें वचन सरत–पटत नाहीं. तेव्हा तुका म्हणे मिळवणीपाशीं ताळा आहे तेव्हां तुका ही विनती पायापाशीं करीत आहे.

॥ ७०८ ॥

॥ आम्वासा आम्हांस । तरी घडे तो वीस्वास ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं चुकता चाकरी । फुट लाडस्याचे थोरी ॥ धृ ॥
॥ स्वामीच्या उतरें । सुख वाटे अभयंकरें ॥ २ ॥
॥ न मगें परी भातें । तुका म्हणे नीढळ रीतें ॥ ३ ॥

(७०८) देवा, तुम्ही कांहीं आश्वासन दिलें तर विश्वास पटेल, मीं तुमच्या चाकरींत कांहीं चुकत नाहीं. स्वामीच्या अभयकर उत्तरानें सुख वाटतें. तुका म्हणे मी फिरून काहीं भातें मागत नाहीं. तुका म्हणे माझें कपाळ मोकळें आहे. फुट लाडस्याचे थोरी हा चरण लागला नाहीं.

॥ ७०९ ॥

॥ याच साठीं भक्ती । जगीं रुढवावया ख्याती ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं तरी कोठें दुजे । आहे बोलावया सहजें ॥ धृ ॥
॥ गोरव या साठीं । स्वामी सेवची कसोटी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे अलंकार । देव भक्त लोकी खरा ॥ ३ ॥

( ७०९ ) जगीं हरिभक्त नामाची ख्याती—प्रसिद्धी व्हावी म्हणून भक्ति करावयाची, एरव्हीं दुर्जेपण बोलून दाखवावयास आहे कोठें ? स्वामीच्या वचनाचा गौरव वाढाया ही कसोटी आहे. तुका म्हणे देव व भक्त यांना खरा अलंकार भक्ति ही आहे.

॥ ७१० ॥

॥ कां जी धरीलें नाम । तुम्ही असोनी नि काम ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोणा सांगतसा ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥ धृ ॥
॥ आवडीनें नाचे । आहे तरी पुढें साचें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥ ३ ॥

( ७१० ) देवा, तुम्ही जर निष्काम तर मग तुम्हांस नांव काय म्हणून ? तेव्हां ज्ञानाच्या—निष्कामपणाच्या गोष्टी कोणास सांगतां—तें ठकाठकीचें मरण आहे. मी तुमच्यापुढें आवडीनें नाचत आहे ही तर गोष्ट खरी आहे ना ? देवा, प्रेमभंग होईल असलें काम तुम्हीं करूं नका— ज्ञानाच्या गोष्टी सांगूं नका.

॥ ७११ ॥

॥ कोणे साक्षीवीण । केले उधारा भजन ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसें सांगाजी दातारा । माझी भग्तीपरंपरा ॥ धृ ॥
॥ कोणें नाहीं आळी केली । ब्रह्मज्ञानाहुनी वेगळी ॥ २ ॥
॥ कोणाचे तो कोड । नाहीं पुरवीला लाड ॥ ३ ॥
॥ कोणाच्या उधारा । केला वीलंब माघारा ॥ ४ ॥
॥ तुका म्हणे भीन । कां हे बोला साक्षीवीण ॥ ५ ॥

( ७११ ) देवा, तुमच्या साक्षीवीण दुसऱ्या कशाचें तरी स्वतःच्या उद्धारासाठीं मी भजन केलें का तें सांगा—व माझी भक्तीची परंपरा काय आहे ती हि सांगा, ब्रह्मज्ञानाहून वेगळी आळी केली नाहीं ना ? तें सांगा. बरें तुम्ही कोणाचें कोडकौतुक करून लाड पुरविले नाहींत—तें सांगा. बरें कोणाच्या उद्धारासाठीं विलंब लावलात व माघार घेतलीत तें सांगा मग माझ्याशीं ही वागणूक भिन्न कां—मला साक्ष कां पटत नाहीं ?

॥ ७१२ ॥

उद्वेगासी बहु फाकती मारग । नव्हे येसे अंग माझे होते ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां कोण यासी करणे वीचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥ धृ ॥
॥ मज तो अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी नाश जीवीत्वाचा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आहे वचनासी उरी । करीतो तों वरी वीज्ञापना ॥ ३ ॥

(७१२) देवा, तुम्ही विलंब लावल्यानें—उद्वेग येऊन मन—अनेक विध होते—फाटे फार फुटतात व मग हें अंग माझें नाहींसें वाटतें. आतां यास काय उपाय करावा तो विचार पांडुरंगा तुम्ही करा. मला तुमच्या दर्शनाची अत्यत आस लागली आहे—मग त्यासाठीं जीवीत्वाचा नाश झाला तरी होवो. देवा, तुमच्या वचनाची तेवढी उरी आहे—व तें वचन येईपर्यंत मी विज्ञापना करीत आहे—करीत राहीन.

॥ ७१३ ॥

॥ न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळकळ ॥ १ ॥
॥ धृ ॥ तो हे चावटीचे बोल । जन रंजवणं फोल ॥ धृ ॥
॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जो सादर ॥ २ ॥
॥ तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ३ ॥

(७१३) देवा, नेत्रांस जळ येत नाहीं—अंतरीं कळवळा उमटत नाहीं तोंपर्यत हे सर्व जनरंजवणार्थ फोल चावटीचे बोल आहेत. जोंपर्यंत स्वामी सादर नाहीं, उत्तर फळत नाहीं, प्रति उत्तर येत नाहीं.—तोंपर्यत—देवा—जोंपर्यत भेटी नाहीं—दृष्टादृष्ट नाहीं—तापर्यंत सर्व फोल आहे—

॥ ७१४ ॥

॥ जे केली ते आळी अवघी गेली वाया । उरला पंढरीराया श्रम माझा ॥१॥
॥ धृ ॥ काय समाधान केले कोणे वेळे । कोण माझे लळे पाळीयेल ॥ धृ ॥
॥ आभासही नाहीं स्वपनीं दुश्चीता । प्रत्यक्ष बोलता केचा ची तो ॥ २ ॥
॥ आतां पुढे लाज वाटे पांडुरंगा । भग्त येसे जगामाजी जाले ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा । मोकलीसी येसा वाटतोसी ॥ ४ ॥

(७१४) देवा, आजवर जी आळी केली—ती अवघी वाया गेली—व पढरीराया माझे फक्त श्रम तेवढे उरले. देवा, तुम्ही, कोणत्या वेळीं माझें समाधान केलेत?—माझे कोणते लळे पाळलेत? मला दुश्चीताला दर्शनाचा नुसता आभास हि नाहीं. मग प्रत्यक्ष बोल्लात असें कसें म्हणावें! जगात, देवा, माझी भक्त अशी ख्याती झाली आहे—त्याची मला लाज वाटते. देवा, मला तुझा भरवसा वाटत नाहीं—मला तू सोडशील असे वाटते.

॥ ७१५ ॥

॥ आतां सांडु तरी हातीं नापदरीं । सखीं सहोदरीं मोकलीलों ॥ १ ॥
॥ धृ ॥ जनाचारामधीं उडाला पातेरा । जालों नीलाजीरा म्हणउनी ॥ धृ ॥
॥ कोणाचीया दारा जावेनासे जाते । म्यांच वीटंबीलें आपणासी ॥ २ ॥
॥ कोण जाला माझे बुधीसी संचार । नाहीं कोठें थार थैसें जालें ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे तुज भग्त झालें फार । म्हणुनीयां थार नाहीं येथें ॥ ४ ॥

(७१५) देवा, मला सख्यासहोदरांनीं मोकलिलें आहे. आतां ज्याच्या साठीं जगावें किंवा राहावें असें माझ्या हातीं किंवा पदरीं काय आहे? जनाचारामध्यें माझी फाजिती झाली व निलाजरा म्हणून ओळखिला जावूं लागलों. मला कोणाच्या हि दारांत जावूं नयेसें वाटूं लागलें. माझें मी च आपणांस विटंबीलें माझ्या बुद्धीस काय संचार झाला तो कळत नाहीं—पण मला कोठें थारा उरला नाहीं. देवा, तुला फार भक्त झाले म्हणून का मला येथें थारा मिळत नाहीं?

॥ ७१६ ॥

॥ जेयें जातो तेथें पडतो मतोळा । न देखीजे डोळा लाभ कांहीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ कपाळीचीं रेखा असतां उतम । तरी कां श्रम पावतो मी ॥ धृ ॥
॥ नव्हे ची तुम्हांस माझा अंगीकार । थीता संवसार अंतरला ॥ २ ॥
॥ भोग तव जाला खरा भोगावा तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥ ३ ॥
॥ कोठें तुझी कीर्ति आइकीली देवा । मुकतो कां जीवा तुका म्हणे ॥ ४ ॥

(७१६) जेथें जातो तेथें मतोळा (घोटाळा—बात्र) पडतो—व डोळ्यास लाभ तर कोठें दिसत नाहीं. माझ्या कपाळाची रेषा उत्तम असती—माझें नशीब चांगलें असतें—तर मला श्रम कां होते? माझा थिता (लहान, बाया,) संवसार हि अंतरला व तुम्ही हि अंगीकार करित नाहीं. जो भोग आहे तो भोगून मोकळें व्हावें म्हणून म्हणावें तों आयुष्य काळ खात आहे. देवा, तुझी कीर्ति ऐकून येथवर आलों, तेव्हां आतां तूं अंगीकार केल्याविना प्राणास मुकतो कीं काय असें भय वाटतें.

॥ ७१७ ॥

॥ लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव ॥ १ ॥
॥ धृ ॥ आतां कळेल तें करी । सीस तुझे हातीं सुरी ॥ धृ ॥
॥ अधीकार नाहीं । पुजा करीती तैसी कांहीं ॥ २ ॥
॥ मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥ ३ ॥

(७१७) देवा, लोक मला च देव म्हणू लागले हा तर मोठा च अधर्म आहे. आता तुझे हातीं माझे शीर हि आहे व सुरी हि आहे तेव्हा तुला सुचेल तें पारिपत्य कर देवा, लोक माझी पूजा करितात असा माझा काहीं हि अधिकार नाहीं तुका म्हणे—मायबापा, मला—माझ्या मनास, माझी पूजा करतात, हें पाप, काय आहे, तें जाणवतें.

॥ ७१८ ॥

॥ माता कापी गळा । तेथ कोण राखी बाळा ॥ १ ॥

॥ धृ ॥ हे का नेणां पढरीराया । मज चाळवीतां वाया ॥ धृ ॥

॥ नागवी धारण । तेथें साहे व्हावें कोणें ॥ २ ॥

॥ तुझ्या केल्यावीण । न घडे वश्य जन ॥ ३ ॥

॥ तुका म्हणे दोरी । सुत्र तुझ्या हातीं हरी ॥ ४ ॥

(७१८) देवा, माता जर बाळाचा गळा कापू लागली तर बाळास कोण बरें राखील ? हे पढरीराया, तुम्हांस कळत का नाहीं ? मग मला तुम्हीं उगाच का चाळविता ? बायको नागवी जर धावू लागली तर तेथें कोणीं साहाय्य करावें ? तसें देवा, तुम्हीं काहीं मनावर घेतल्याशिवाय—मला जन वश होणार नाहींत. देवा, हा कळसूत्री बाहुल्याचा खेळ आहे व ही दोरी तुझ्या हातीं आहे

॥ ७१९ ॥

॥ जेणे होय हीत । ते तु जाणसी उचीत ॥ १ ॥

॥ धृ ॥ मज नको लावू तैस । वाया जाये थैस पीसे ॥ धृ ॥

॥ धरीतोसी सत्ता । होसी सकळ जाणता ॥ २ ॥

॥ चतुराच्या राया । अंगीकाराचे तुकया ॥ ३ ॥

(७१९) देवा जेणें करून माझें हित होईल तें तुला सर्व माहीत आहे तेव्हा माझे श्रम वाया जातील असें पिसें—वेड, मला लावू नकोस—देवा, तुझ्या हातीं सत्ता आहे तू हें सकळ जाणता आहेस तेव्हा चतुराच्या राया—तुक्याचा अगीकार करा

॥ ७२० ॥

॥ आधळ्याची काठी । हीरोनिया कडा लोटी ॥ १ ॥

॥ धृ ॥ हे का देखण्या उचीत । लाभ कीया काहीं हीत ॥ धृ ॥

॥ चाल्टवोनी हातीं । साखर म्हणउनी धावी माती ॥ २ ॥

॥ तुका म्हणे वाट । देवा पसराचे सराटे ॥ ३ ॥

( ७२० ) आंधळ्याची काठी हिरावून घेऊन त्यास कड्यावरून लोटून द्यावे – किंवा साखर म्हणून हातीं मातीं द्यावी – किंवा आंधळा जात असेल त्या वाटेवर सराटे पसरावेत हें तुका म्हणे देखण्यास – डोळसाला उचित आहे का? तसेंच

॥ ७२१ ॥

॥ रायाचे सेवक । सेवटीची पींडी रंक ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ तरी ती उणीव कवणा । कां हो नेणा नारायणा ॥ ध्रु ॥
॥ परसाचीये भेटी । नाहीं लोहोपणा तुटी ॥ २ ॥
॥ तुझे नाम कंठीं । तुक्या काळासवे भेटी ॥ ३ ॥

( ७२१ ) रायाचे सेवक हे सेवटींचे लोकांस – गरीब लोकांस – पिडूं लागले तर ती उणीव कोणांस हे – नारायणा, तुम्हांस समजत का नाहीं? परीस लोखंडास भेटून त्याचें लोखंडत्व गेलें नाहीं तर तो कमीपणा कोणास? तुझें नाम कंठीं असतांना तुक्याची काळासवें भेटी व्हावी! याचा कमीपणा कोणास!

॥ ७२२ ॥

॥ असो आतां कीती । तुम्हां यावें काकुळ्ती ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ माझे प्रारब्ध गाढे । तुं बापुडे तयापुढें ॥ ध्रु ॥
॥ सोडवीन आतां । ब्रीदें तुझी दीनानाथा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बळी । तो गांढ्याचे कान पीळी ॥ ३ ॥

( ७२२ ) देवा – आतां पुरें हें बोलणें – तुम्हांस काकुळ्ती तरी किती यावयाचें. बा, माझें प्रारब्ध गाढें – जबर – आहे – तूं त्यापुढें बापुडा आहेस – दीनानाथा, तुझी ब्रीदें आतां सोडवीन – तुझ्याकडून – दीनानाथ हें नांव टाकून देववीन – तुका म्हणे बळी जो असतो तो गांवढ्याचें कान पिळतो – तसें मला कांहीं काळाचे कान पीळतां येत नाहींत.

॥ ७२३ ॥

॥ वळीतें जे गाई । त्यासी फार लागे काई ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ नीचे भावाच्या उतरीं । भलते येके धणीवरी ॥ ध्रु ॥
॥ न लागती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ २ ॥
॥ सांडी थोरपण । तुका म्हणे सर्वे दीना ॥ ३ ॥

(७२३) जे गाई वळतात त्यांस कांहीं फार खटपट करावी लागते कां– ते भावाचे उत्तरानें निवतात – व त्यांना कांहीं हि सांगितलें तरी धर्णावरी= हौसेने ऐकतात. त्यांना मानाच्या आदराचे कांहीं प्रकार लागत नाहींत. हा गवळ्यांचा दृष्टांत घेऊन देवास सांगत आहेत कीं, देवा, गवळ्यांत जसा तूं दीनपणानें खेळलास तसा खेळावयास ये. तेव्हां देवा, आतां तुझा थोरपणा सोड. तुका म्हणे तूं सर्वांत दीन आहेस.

॥ ७२४ ॥

॥ संचीता वाचुन । पंथ न चले कारण ॥ १ ॥
॥ धृ ॥ कोरडी ते अवघी आटी । वाया जाय लाळ घोटी ॥ धृ ॥
॥ धने वीतें जोडें । देव यैसें तो न घडे ॥ २ ॥
॥ तुका म्हणे आड । स्वहीतास वहु नाड ॥ ३ ॥

(७२४) संचीतावांचून या गवळ्यांच्या पंथानें चालतां येत नाहीं. कोरडी आटी वायां जाय–व नुसती लाळ घोटावी लागते–देव, हा, धनानें–वित्तानें, जोडला जात नाहीं. तुका म्हणे स्वहितास पुष्कळ नडी आड असतात. येथें ओळ बदलते.

॥ ७२५ ॥

॥ दानें कापे हात । नावडे तेवीसीं मात ॥ १ ॥
॥ धृ ॥ कथे चावटीचे वोल । हींग क्षीर मीथ्या फोल ॥ धृ ॥
॥ न व जातीं पाय । तीर्थां म्हणे वेचु काय ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मनीं नाहीं । न ये आकारा तें कांहीं ॥ ३ ॥

(७२५) दान द्या म्हटलें तर हात कांपतो–त्यावद्दल मात–गोष्ट– आवडत नाहीं. कथेमध्यें–हिंग मीरे यांच्या चावटीचे बोल बोलतो. खिरींत हिंग घालतो–तीर्थाटणास जावून वेचूं काय म्हणून म्हणतो–तुका म्हणे यांच्या मनांत च कांहीं नसतें तेव्हां आकारास काय येणार ?

॥ ७२६ ॥

॥ खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
॥ धृ ॥ येसें फुकाचे उपाय । सांडुनीया वाया जाय ॥ धृ ॥
॥ पर उपकार । येक वचनाचा फार ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मट्ट । मनें सांडीतां सीतट ॥ ३ ॥

(७२६) खरें बोललें असतां फुकासाठीं जोडे हरी! असले फुकाचे उपाय उगाच वाया कां घालवितां? परउपकार हा एका वचनानें फार होतो. तुका म्हणे मनानें मळ सांडिला कीं तें शीतळ च आहे.

॥ ७२७ ॥

॥ येणें जाणें तरी । राहे देव कृपा करी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ ऐसें तंव पुण्य नाहीं । पाहतां माझे गांठीं कांहीं ॥ ध्रु ॥
॥ भय निवारीता । कोण वेगळा अनंता ॥ २ ॥
॥ तुका म्हणे बा रे भोग । वारी तरी पांडुरंग ॥ ३ ॥

(७२७) माणसाची ये जा थांबली कीं देव कृपा करतो. पण माझ्या गांठीं कांहीं ऐसें पुण्य नाहीं. अनंता, तुझ्याशिवाय माझें भय दुसरा कोण निवारण करील? तुका म्हणे बा–रे–पांडुरंगा माझा भोग तरी बाजूस सार.

॥ ७२८ ॥

॥ जोडीलें अंजुळ । असे दान उतावीळ ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ पाहा पाहा कृपादृष्टी । आणा अनुभवा गोस्टी ॥ ध्रु ॥
॥ तुं स्वामी मी सेवक । अहिक्य तो येकायेक ॥ २ ॥
॥ करीतो वीनंती । तुका सन्मुख पुढती ॥ ३ ॥

(७२८) मी अंजुळी जोडून तुम्ही जें दान घाल तें घ्यावयास उतावीळ आहे. देवा, माझ्याकडे–पहा–पहा, हो–कृपादृष्टी–आणि आजवर जें ऐकलें–जें बोललों–त्या गोष्टी अनुभवांत आणा. तूं स्वामी–मी सेवक असें आपलें ऐक्य आहे. अशी तुका सन्मुख उभा राहून विनति करीत आहे.

॥ ७२९ ॥

॥ तुझें वर्म ठायें । माझ्या पाडीयेलें भावें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ रूप कासवीचे परी । धरुनी राहेन अंतरी ॥ ध्रु ॥
॥ नेदी पडो तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । चींतन ते तुझी सेवा ॥ ३ ॥

(७२९) देवा, तुझें वर्म–मला भावानें ठाऊक झालें, तेव्हां अंतर्यामीं मी तुझें रूप कासवाप्रमाणें धरून राहीन, दृष्टीस दृष्टी मिळवीन–त्यांत कधीं तुटी पडूं देणार नाहीं. तुझें चिंतन–हीच तुझी सेवा होय. चितन तें तुझी सेवा.

॥ ७३० ॥

॥ नव्हतो सावचीत । तेणें अंतरलें हीत ॥ १ ॥

॥ धृ ॥ पडीला नामाचा वीसर । वाढवीला संवसार ॥ धृ ॥

॥ लटीक्याचे पुरी । गेलो वाहोनीया दुरी ॥ २ ॥

॥ तुका म्हणे नांव । आम्हां सांपडला भाव ॥ ३ ॥

( ७३० ) येवढी गोष्ट पटेपर्यंत मी सावचित्त नव्हतों — यामुळें — नामाचा विसर पडला. ससार =( पसारा – साधनांचा पसारा ) वाढला व त्यानें हित अतरलें हा जो साधनांचा पसारा वाढविला त्या लटिक्या गोष्टींच्या पुरात वाहवून दूर गेलों. अखेर तुझ्या पायीं भाव ही नाव आम्हांस सापडली.

॥ ७३१ ॥

॥ नव्हती माझे बोल । आवघे करीतो वीठल ॥ १ ॥

॥ धृ ॥ कांहीं न धरावी खंती । हीत होईल धरा चीतीं ॥ धृ ॥

॥ खोटी त अहंता । वाट टाकीली सांगतां ॥ २ ॥

॥ ज्याचे तो ची जाणे । मी मापाडे तुका म्हणे ॥ ३ ॥

( ७३१ ) हें कवित्व हे कांहीं माझे बोल नाहींत. हे सर्व काम विठ्ठल करीत आहे हे बोल आपण कसे ऐकावेत — त्यापासून आपलें हित होईल का — अशी खंती मनात येऊ देऊ नका. तुमचें हित च होईल ही गोष्ट मनांत नीट धरा. तुमच्या हिताची वाट दाखवून जर ती टाकलीत तर ती खोटी अहंता आहे. हे पहा, तुम्हांस कोणती वाट दाखवावयाची हें ज्याचें तों जाणून तें काम करीत आहे. मी तेवढा माप टाकीत आहे. कवीत्वाबद्दलचा हा अति स्पष्ट परिहार आहे.

॥ ७३२ ॥

॥ कोण पुण्य कोणा गांठीं । ज्यासी यैसीयांसी भेटी ॥ १ ॥

॥ धृ ॥ जीहीं हरी धरीला मनीं । दीले संसारासी पाणी ॥ धृ ॥

॥ कोण हा भाग्याचा । यैसीयांसी बोले वाचा ॥ २ ॥

॥ तुका म्हणे त्याचे भेटी । होये संवसारे तुटी ॥ ३ ॥

( ७३२ ) ज्यानें हरि मनीं धरिला आहे. ससाराच्या फापटपसाऱ्यावर, सावनाच्या पसाऱ्यावर, पाणी सोडलें आहे. म्हणजे जे हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा या सांप्रदायाचे आहेत — ऐशियाची केवढ्या पुण्यानें भेट होऊन गाठ पटेल ! असे माझें केव्हां भाग्य उघडेल तेव्हा अशा हरिभक्तांशीं मी बोलेन. तुका

म्हणे अशाचें नुसत्या भेटीनें (साधनांचा पसारा होऊन जो लटिक्यांचा संग होतो) त्यास तुटी पडते.

॥ ७३३ ॥

॥ माझे पाय तुझी डोई । ऐसें करी गा भाक देई ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ पाहतां तंव उफराटें । घडे तई भाग्य मोठें ॥ ध्रु ॥
॥ बहु साधन मोलाचें । यासी दुजे जोडा कैचें ॥ २ ॥
॥ नका अनमानुं वीठला । तुका म्हणे धडा घाला ॥ ३ ॥

(७३३) देवा, माझे पाय तुझी डोई–असा योग कधीं येईल कां रे–तूं असें कधीं करशील कां रे–अशी मी भाक (विनवणी) मागतो आहे. व ती गोष्ट तूं मला दे. दिसण्यांत ही गोष्ट उरफाटी आहे. पण हें असें तुझ्या कृपेनें घडलें तर मी आपलें मोठें भाग्य मानीन. हें साधन अतिमोलाचें आहे. याला दुसरा जोडा नाहीं–विठ्ठला ही गोष्ट देण्यास अनमान करूं नका–असा धडा–रिवाज–प्रघात घालून ठेवा. हा भक्तीभाग्याचा कळस आहे. अमृतानुभव प्र. ९।३४ जाला देवो चि भक्तु । ठावो चि जाला पंथु । होऊन ठेला एकांतु । विश्वाचि हें । हा येथें अनुभव आहे.

॥ ७३४ ॥

॥ मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ खापराचे होन खेळती लेकुरें । काय त्या वेव्हारें लाभ हानी ॥ध्रु॥
॥ मंगळ दायक खेळतीं कुमारीं । काय त्याची खरी सोयरीक ॥ २ ॥
॥ स्वपनींचे सुख दुख जालें कांहीं । जाग्रतीं तो नाहीं साच भाव ॥३॥
॥ सारी जाली मेली लटीकें वचन । बद्ध मुग्त शीण तुका म्हणे ॥४॥

(७३४) मृगजळाचा उतार व्हावयास, पैलतीर गांठण्यास काय उपाय करावा ? लहान मुलें खापराचे होन करून खेळतात. त्या वेव्हारांत कांहीं लाभ हानी आहे का ? लहान मुलें–लग्नाचा खेळ खेळतात–ती काय खरी सोयरीक आहे का ? स्वप्नांत सुखदुःख झालें, तर जागृती येतांच तें सुख किंवा दुखः खरें असतें का ? तेव्हां सारी झाली–मेली–ही लटिकी वचनें आहेत–तेव्हां बद्ध-मुक्त हे शीण देणारे शब्द आहेत. तेव्हां आजवर तुमचा आमचा सख्य घडला आहे. याची खूण म्हणून एकवार वरील अभंगांत म्हटल्याप्रमाणें रंग उडूं दे. नाहीं तर माझें आजवरचें कवित्व तुमची कृपा–या गोष्टी मृगजळासारख्या म्हणाव्या लागतील.

॥ ७३५ ॥

॥ प्रेम नये सांगतां दावीतां बोलतां । अनुभव चीता चीत जाणे ॥ १ ॥
॥ धृ ॥ कासवीच्या पीला दुधा नाहीं भेटी । वाढे कृपा दृष्टी जयापरी ॥ धृ ॥
॥ पोटामधीं कोणे सीकवीलें सर्पा । उपजत लपा म्हणउनी ॥ २ ॥
॥ बोलो नेणे परी जाणे गोड क्षार । आंतरीं वीचार त्यासी ठाया ॥ ३ ॥
॥ तुका म्हणे वीचारावे मनीं । आणीक भल्यांनी पुसो नये ॥ ४ ॥

(७३५) प्रेम हें सांगतां–दाखवितां किंवा बोलतां येत नाहीं–त्याचा अनुभव–प्रेम करणाऱ्याच्या चित्तास व ज्याचेवर केले त्याच्या चित्तास च ठाऊक. कासवीच्या पिलास–कासवी प्रत्यक्ष पान्हा पाजीत नाहीं पण तें बाळ कृपा दृष्टीनें–नजरेनें पान्हा पोहोंचून वाढत असतें–पोटामध्यें असतांना सर्पास उपजतांच लप असें कोणी शिकविलें नाहीं–या गोष्टी बोलून दाखवितां येत नाहींत पण कोणतीहि (गोष्ट) गोड आहे किंवा खारट आहे–हें प्रत्येकास अंतरांत कळतें च तेव्हां भल्या लोकानी जें समजून घ्यावयाचें तें आपलें आपण घ्यावें–आणीक ज्यास्त विचारीत सुटूं नये. म्हणजे माझे पाय तुझी होई। असला विचार मला कां आला-तें मला माहीत नाहीं. मी कासवीच्या पिलाप्रमाणें तुमच्या दृष्टीस दृष्टी भिडवून पान्हा पीत होतों. परतु सर्पाच्या पिलास जसें लपावें असें उपजत ज्ञान होतें तसें हें मला कां झालें तें तुमचें तुम्ही पाहून घ्या.

(येथें ओळ बदलते.)

॥ ७३६ ॥

॥ नेणती वेद श्रुती कोणी । आम्हां भावीकां वांचुनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ रुप आवडे आम्हांसी । तैसी जोडी न्हुषी केशी ॥ धृ ॥
॥ आम्ही भावे बळींवंत । तुज घालुं हृदयांत ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुज धाक । दतां पावसील हाक ॥ ३ ॥

(७३६) देवा, वेदांनीं किंवा श्रुतींनीं तुला ओळखला नाहीं. तो आम्ही भाविकांनीं ओळखला. आम्हांस तुझें रूप आवडतें–व आम्हांस जसें आवडतें तसा हे हृषीकेशी–तूं होतोस. आम्ही भावाच्या बळानें बळींवत आहोंत व त्या जोरानें तुला हृद्यात घालतो. तुका म्हणे तुला आमचा धाक एवढा आहे कीं आम्हीं हांक मारतांच तू हजर होतोस.

॥ ७३७ ॥

॥ कळों आलें तुझें जीणें। देवा तुं माझें पोसणें ॥ १ ॥
॥ धृ ॥ वाट पाहासी आठवाची। सता स्वतंत्र कईची ॥ धृ ॥
॥ बोलवीतां यावें रुपा। सदा नीर्गुणीं च लपा ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुं परदेशी। येथें आम्हां आंगेजीसी ॥ ३ ॥

(७३७) आमच्या भावानें तूं पोसला आहेस हें तुझें जिणें आम्हांस कळलें. तूं आम्हीं आठवण करावी याची वाट पाहात असतोस तुला स्वतंत्र अशी काय सत्ता आहे ? तूं सदा निर्गुणांत दडलेला आहेस, आम्ही हांक मारूं तेव्हां तुला बाहेर येतां येते. तुका म्हणे तूं परदेशी आहेस—तेव्हां येथें तूं आमच्या अंगाचा आश्रय करून आहेस.

॥ ७३८ ॥

॥ करुं स्तुती परते नींदा। तुम्ही जाणा हे गोवींदा ॥ १ ॥
॥ धृ ॥ आम्हां लडीवाळांचे बोल। करा कवतुक नवल ॥ धृ ॥
॥ बोबड्या उत्तरीं। तुम्हां रंजवीतो हरी ॥ २ ॥
॥ मागतो भातुकें। तुका म्हणे कवतुकें ॥ ३ ॥

(७३८) हे गोविंदा—आम्हीं स्तुति केली तरी ती परती निंदा च व्हावयाची. म्हणजे तुझी स्तुती करावयास आमची वाचा पुरत नाहीं. तरीहि तुम्ही व आम्हां लडीवाळांचे बोल कवतुक करून ऐकतां—देवा मी बोबडें बोलतों—पण त्यानें तुमची करमणूक होते—तुका म्हणे मी कौतुकानें तुमच्या जवळ कांहीं खाऊ—कांहीं खेळणें मागत आहे.

॥ ७३९ ॥

॥ तुं पांढरा स्फटीक मणी। करीसी आणीकां त्याहुनी ॥ १ ॥
॥ धृ ॥ म्हणउनी तुझ्या दारा। न येत ते ठकले दातारा ॥ धृ ॥
॥ तुझी ठावी नांदणुक। अवघा बुडवीला लोकें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे ज्याचे घेसी। त्यासी हेंची दाखवीसी ॥ ३ ॥

(७३९) देवा, तूं पांढऱ्या स्फटीका सारखा आहेस—व दुसऱ्यांना आपल्याहून ज्यास्त पांढरे करतोस—म्हणून जे एकेकदां फसलेले आहेत—ते तुझ्या दारांत येत नाहींत. तुझी नांदणूक त्यांस माहीत असते—तूं सर्व लोकांस बुडविलें आहेस. तुका म्हणे—या त्रिभुवनांत तुजा असा ठसा उमटला आहे.

॥ ७३० ॥

॥ तुजसीं समंधु चीं खोटा । परता परता रे थोटा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ देवा काय तुझें ध्यावें । आप आपणा ठकावें ॥ ध्रु ॥
॥ जेथें मुदल नये हाता । व्याज लेखावें मोजीतां ॥
॥ तुका म्हणे येसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ३ ॥

( ७४० ) अरे थोट्या देवा, तुजशीं संबंध ठेवणें हें खोटें काम आहे तेव्हां तूं मागें सर. देवा तुझ्या पासून आम्हांस काय मिळणार आहे ? आम्ही स्वतःला च गमावून बसूं ! जेथें मुद्दल हातीं येत नाहीं – तेथें व्याज मोजीत बसून काय करावयाचें ! तुका म्हणे त्रैलोक्यांत तुझा असा ठसा आहे. तुकोबा देवाशीं व्याजबट्टा करूं पाहताहेत.

॥ ७३१ ॥

॥ याची हांका तुझे दारीं । सदा देखो रीणकरी ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ सदा करीसी खंडदंड । देवा बहु गा हुं लंड ॥ ध्रु ॥
॥ सुखें गोवीसी भोजना । लपउनीयां आपणा ॥ २ ॥
॥ येकें येक बुझांवीसी । तुका म्हणे ठक होसी ॥ ३ ॥

( ७४१ ) तुझ्या दारांत सदा ऋणकरी असतात व त्यांच्या हाका सदा ऐकूं येतात – देवा सदा कोणाशीं कांहीं करार करतोस – ते मोडतोस हि – असा तूं मोठा लंड आहेस. तूं स्वतः लपतोस व दुसऱ्याला जेवणांत गुंतवितोस – तुका म्हणे एकेकास तूं समजावीत असतोस – असा तूं ठक आहेस.

॥ ७३२ ॥

॥ आम्ही जाणो तुझा भाव । दृढ धरीयेले पाव ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ फांको नेदीं चुकाविता । नेघे थोडे बहु देतां ॥ ध्रु ॥
॥ बहुतां दीसांचे लींगाड । आले होत होत जड ॥ १ ॥
॥ तुका म्हणे आतां । नेघो सर्वस्व देता ॥ ३ ॥

( ७४२ ) देवा, तूं असा ठक आहेस असें ओळखून आम्ही तुझे पाय घट्ट धरले आहेत. आतां थोडें फार कांहीं देऊन तूं चुकवाचुकवी करून पळून जाऊं पाहशील तर तें कांहीं साधणार नाहीं. तुमचें माझें हें फारा दिवसांचें जाड लिगाड आहे. देवा, आतां – तूं सर्वस्व देतो म्हणालास तरी तें आम्ही घेणार नाहीं.

॥ ७४३ ॥

॥ सोसुनीया आपत्ती । जोडी दील्ही तुझे हातीं ॥ १ ॥
॥ धृ ॥ याचे हेची उपकार । अंतीं आम्हांसी वेव्हार ॥ धृ ॥
॥ नांवरूपा जाला ठाव । कोण म्हणे तुज देव ॥ २ ॥
॥ तुका म्हणे हरी । तुला ठाव दिल्हा तरी ॥ ३ ॥

( ७४३ ) आम्हीं आजवर संकटें सोसून जी कांहीं जोडी केली ती सर्व तुझ्या हातीं आणून दिली. या सर्व उपकारांची फेड तूं शेवटीं आमच्याशीं हा असा व्यवहार करून केलीस. तुला आम्ही नांव ठेवलें—रूप दिलें. एरव्हीं तुला देव म्हणून कोण म्हणत होतें ? तुला एरव्हीं कोण ओळखीत होते ? तुलां वस्तीस ठिकाण देत होते, तें आमच्या देहांत आम्ही तुला दिलें ! येवढें आम्ही करून

॥ ७३४ ॥

॥ आम्ही देतो हांका । कां रे जालासी तुं मुका ॥ १ ॥
॥ धृ ॥ न बोलसी नारायणा । कळलासी क्रीयाहीना ॥ धृ ॥
॥ आधीं करुं चौघाचार । मग सांडुं भीडभार ॥ २ ॥
॥ तुका म्हणे सेवटीं । तुम्हां आम्हां घालुं तुटी ॥ ३ ॥

( ७४४ ) आतां आम्ही तुझ्या नांवानें हांका मारीत आहोंत—त्या वेळीं तूं असा मुका काय म्हणून ? तूं क्रियाहीन आहेस हें आम्हांस कळलें—पण बोलत कां नाहींस ? आधीं चार लोक गोळा करतो मग सर्व भीडभाड सोडून देतो. व मग तुझी पंचाईत काय करावयाची ती करीन. तुका म्हणे सरतेशेवटीं तुमचा आमचा संबंध तोडून घेऊं.

॥ ७४५ ॥

॥ नव्हे भीडा हें कारण । जाणे करुं येसें जन ॥ १ ॥
॥ धृ ॥ जो जो धरावा लौकीक । रडवीतोसी आणीक ॥ धृ ॥
॥ चाल जाऊं संतांपुढें । ते हे नीवडती कोडें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे तुं नीर्लज । आम्हां रोकडी गरज ॥ ३ ॥

( ७४५ ) भीड धरल्यानें कोणती हि गोष्ट साधत नाहीं—हें सर्व जन जाणतात; आम्ही हि आतां तसेंच—म्हणजे भीड सोडून वागूं. आम्हीं जों जों लौकिक संभाळण्याचा प्रयत्न करावा—तों तों तूं अधिक च रडवितोस. तेव्हां

चल सतांपुढें जाऊं, व ( त्यांना आपलें भांडण सांगूं ) ते हा आपला वाद तोड-तील. तुका म्हणे—तूं निर्लज्ज आहेस पण आम्हांस तुझी गरज आहे ना? आमचें तुझ्यावांचून चालत नाहीं ना?

॥ ७४६ ॥

॥ बहु होता भला । पर या रांडेनें नासला ॥ १ ॥
॥ धृ ॥ बहु सीकला रंग चाळे । खरे खोटे याचे वेळे ॥ धृ ॥
॥ नव्हते आळवीत कोण्ही । इनें केला जगरुणी ॥ २ ॥
॥ ज्याचें त्यास नेदी देऊं । तुका म्हणे धांवे खाऊं ॥ ३ ॥

( ७४६ ) हा देव पूर्वी फार चांगला होता. पण या रांडेनें (मायेनें) बिघड-विला. हा हिच्या खेळांत पुष्कळ रंग ढंग चाळे खरे—खोटे शिकला. याम पूर्वी कोणी हि आळवीत नव्हतें—पण सर्व जगाचें कर्ज याच्यावर रचलें हा ज्याचें त्यास देण्यास तयार आहे पण ही तसें करू देत नाहीं उलट जो मागावयास आला असल त्यास च खाण्यास धावते.

॥ ७४७ ॥

॥ काय करावें तें आतां । झालं नयेसें बोलतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ नाहीं दोघांचीये हातीं । गांठी घालावी येकांतीं ॥ धृ ॥
॥ होये आपुलें काज । तों हे भीड सांडुं लाज ॥ २ ॥
॥ तुका म्हणे देवा । हातीं नीवडूं हा गोवा ॥ ३ ॥

( ७४७ ) आतां यास इलाज काय करावा बरें! यानें जर दुसऱ्यांचें रीण दिलें नाहीं तर तें फिटणार कसें? ही गोष्ट दोघांच्या (देव व भक्त याच्या) हातीं नाहीं—तेव्हां या मायेस वगळून त्या उभयतांची एकांतांत गाठ पडेल असे काहीं केलें पाहिजे. आपले काम होत असेल तर भीड लाज धरून काय उपयोग! ती सोडली च पाहिजे! तुका म्हणे देवा, हा मायेचा गोवा•तुम्ही आम्ही आपसांत आपल्या हातानें निवडू—निकालांत काढू.

॥ ७४८ ॥

॥ रीण वैर हत्या । हे तां न सरे नेदीतां ॥ १ ॥
॥ धृ ॥ हे कां नेणां पांडुरंगा । तुम्हीं सांगतसा जगा ॥ धृ ॥
॥ माझा समंधु तो कीती । चुकवा लोकांची फजीती ॥ २ ॥
॥ तुका म्हणे याची साटी । मज घेतां न ये तुटी ॥ ३ ॥

(७४८) ऋण, वैर व खून ही परतफेड केल्याशिवाय कांहीं सुटत नाहीत. तेव्हां व्यर्थ भलत्या गोष्टी सांगून टाळाटाळ करण्यांत काय अर्थ! या गोष्टी जगास सांगून काय उपयोग! आतां माझें देणें तें किती–त्यासाठीं चार चौघांत फजिती कां करून घेतां–चुकवा ती फजिती! तुका म्हणे माझें देणें दिल्याशिवाय कांहीं सुटका होणार नाहीं.

॥ ७४९ ॥

॥ आपलें मागतां। काये नाहीं आम्हां सता ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ परी या लौकीका कारणें। उरी ठेवीलें बोलणें ॥ ध्रु ॥
॥ येची आतां घडी। करून बैसतो चौपडी ॥ २ ॥
॥ तुका म्हणे करीतो तुला। ठाव नाहींसे वीठला ॥ ३ ॥

(७४९) आमचें मागून घेण्यास–आम्हांस सत्ता कां नाहीं! पण चार-चौघांत तुमचा लौकिक जाऊं नये–म्हणून बोलण्यांत थोडा आडपडदा ठेवला. आतां या घटकेस ती गोष्ट फाड करून उघड करून सांगतों. तुका म्हणे–विठ्ठला, तुला उभा राहण्यास जागा नाहीं असें करतों.

॥ ७५० ॥

॥ केली सलगी तोंडपीटी। आम्ही लडीवाळ धाकुटीं ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ न बोलावें तें ची आलें। देवा पाहीजे साहीलें ॥ ध्रु ॥
॥ अवघ्या मध्यें येक वेडें। ते ची खेळवीती कोडें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे मायेबापा। आम्हां वरी कोपों नका ॥ ३ ॥

(७५०) देवा, आम्ही लडिवाळ धाकुटीं मुलें तेव्हां सलगी करून उगाच तोंडानें वडवड केली व जे बोलूं नये तें बोललो. आतां तुम्हांस तें सोसणें आलें. सर्व शहाणी माणसें जसें एखादें वेडें खेळवतात–तसें मला संभाळा. तुका म्हणे मायबापा, ही सलगी केली म्हणून आम्हांवर कोपूं नका–रागावूं नका.

॥ ७५१ ॥

॥ सीकवुनी बोल। केलें कवतुक नवल ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ आपणीया रंजवीलें। बापें माझीया वीठलें ॥ ध्रु ॥
॥ हातीं प्रेमाचे भातुकें। आम्हां देउनीयां नीकें ॥ २ ॥
॥ तुका म्हणे टाहो। पाहे रखुमाईचा नाहो ॥ ३ ॥

(७५१) माझ्या विठ्ठलानें—माझ्या बापानें—मला हें बोल शिकवून—ते माझेकडून वदवून आपली स्वतःची करमणूक करून घेतली. व आमच्या हातीं निक्या—शुद्ध प्रेमाचें—भातुकें खेळणें—खाऊ दिला. तुका म्हणे आम्ही रखुमाईच्या पतीच्या नांवानें टाहो फोडतो.

ही १६ अभगांची ओळ सताजी बावांच्या गाथ्यांतील जशीची तशीं उतरली आहे.

तुकोबानीं विठोबास ऋणको करून—आपण धनको होऊन सावकार व कूळ हें रूपक साधलेलें आहे, तेव्हा त्या काळीं प्रचलित असलेली भाषा शब्द-प्रयोग—हीं सर्व येथें साधलीं आहेत. शेवटीं शिकवुनी बोल—या अभगानें—सर्व विनोद आहे—सलगी आहे—विठोबाची करमणूक आहे—असें म्हणून हें रूपक संपविलें आहे. हातीं प्रेमाचें भातुकें । आम्हा देऊनीयां निके । अशी तुकोबां-कडून श्रीविठ्ठलानें तुकोबांस काय बोलावें ते बोल शिकवून आपली करमणूक करून घेतली तसेंच थोडेंसें प्रेमाचें भातुकें आम्हांस देऊन आमचे तोंडानें आपली रजवणूक करून घ्या अशी श्रीविठ्ठलास व तुकोबांस विनती करून हें रूपांतर संपवितों.

---

# जास्त अभंग

सख्या हरी शिपी यांचे वहींत नसून—येथें जे अभंग छापले आहेत त्यांची यादी—व ते अभंग येथें घेण्याचीं कारणें.

| | |
|---|---|
| २४ कांहीं येक तरी असावा आधार। <br> २६ घालुनी लोळणी पडीलों अंगणीं। | हे दोन्ही अभंग इंदुप्रकाश प्रतींतून घेतले आहेत. या दोन्ही अभंगामधील अभंग मनाचींये साक्षी जाली सांगो मात हा इंदुप्रकाश प्रतींत आहे. नव्हे मी स्वतंत्र हा २३ वा अभंग या नंतर भिजल्या वहींत मनाचींये साक्षी हा अभंग आहे, परंतु कांहीं येक तरी हा अभंग मध्यें नीट बसतो. |
| ३७ सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं।— | भिजल्या वहीच्या नकलेंत ३६ व्या अभंगाच्या शेवटीं—सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं हा एकच चरण लिहिलेला आहे—तेव्हां बाकीचे चरण लिहावयाचे राहिले असें समजून ते चरण लिहून घेतले. |
| ४० कुचराचें श्रवण। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत तृषाकाळें उदकें भेटीं। व जग तरी आम्हां देव या मध्यें आहे व तो तसा बरोबर बसतो म्हणून घेतला. |
| ८७ बरवी नामावळी। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत मूळ करणें सत्ता या नंतर १३०० वा आहे. मूळ करणे सत्ता हा व घटीं आलिप्त असे रवी या मध्यें हा बरोबर बसतो. |
| ९६ थुंकोनीया मान।— | हा अभंग इंदुप्रकाश गाथ्यांत देवावरील भार व काय ह्याचें घ्यावें या दोन अभगामध्यें आहे व तो येथें बरोबर बसतो. |

| | |
|---|---|
| ११२ येसी जीहुवा नीकी।– | हा अभंग महाराजांच्या हस्तलिखित वहींतील मला जें अस्सल पृष्ठ मिळालें त्यांत आहे. हा अभग सख्या हरीच्या घरन्या वहींत नाहीं. येथें या नकलेंत अभंग गळलेले आहेत अशी खात्री पटली म्हणून सर्व अभंग इंदुप्रकाश प्रतींत पाहण्याचें सुचलें. |
| १३३ नाही उल्लंघीलें कोणाचें वचन।–<br>१३४ जवि जायेवरी सांडीकरी माता। | हे दोन्ही अभग पुजेंतील वहींत आहेत. तेव्हां नकलेंत ते चुकीनें गळले होते हें स्पष्ट च आहे. |
| १४५ भक्त ऐसे जाणा। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतीत तों चि ही क्षुल्लकें या पूर्वी आहे व तो येथें असावा असें वाटतें म्हणून घेतला आहे. |
| १५२ म्हणउन धरीलें पाय।<br>१५३ समर्थ या नांवें। | हे अभंग पुजेंतील वहींत आहेत वें नकलेंत नाहींत. तेव्हां नकल दुरुस्त करून घेतली. |
| १७२ सांगतां दुर्लभ।– | हा अभंग मूळ पुजेंतील वहींत आहे व नकलेंत गळला होता म्हणून नकल दुरुस्त केली. |
| १७९ बोलवा वीठल।<br>१८० वीठल टाळ वीठल। | हे अभंग मूळ वहींत आहेत व नक-लेंत गळले होते म्हणून घेतले आहेत. |
| १८४ तुमच्या पालना। | हा अभंग मूळ वहींत आहे. |
| १८८ वछ पळे। | ” |
| १९० अवघा वेचलों | ” |
| १९१ कोणाचें चींतन | ” |
| १९२ साधक जालें कळीं | ” |
| २०५ कां जी तुम्ही येसे | ” |
| २२९ मन वळी मना | ” |
| २३१ शुध चर्या हें संतांचे | ” |
| २४० काये ज्ञानेश्वरी उणे। | ” |
| २५३ काये तुम्ही जाणा। | ” |
| २५५ मुसावीलें अंग। | ” |

| | |
|---|---|
| २५६ नव्हती ही माझी। | हे अभंग मूळ वहींत आहेत. |
| २५७ सहज लीळे मी | ” |
| २५८ बोलाल त्या आतां। | ” |
| २६७ मागत्याची कोठें घडे। | मूळ वहींत असून नकलेंत गळलेला अभंग. |
| २९७ कथेचा उल्लघ। | ” |
| ३१४ लटीके तें रुचे। | ” |
| ३४० मथनें भोगें सार। | ” |
| ४५३ देव बराडी। ४५७ देव भला। ४५८ देव पाहो। ४५९ देव आमचा। ४६० जाऊं देवाचीया गांवा। ४६१ प्रेम तेथें वास करी। | हे सर्व अभंग एकाच अर्थाचे आहेत. म्हणून येथें इंदुप्रकाश प्रतींतून घेतले आहेत. एरव्हीं देव दयाळ या अभंगाचा शेवट देव चांगला देव चांगला। असा चरण तुकोबांनीं म्हणतांच काय नेणो होता दावेदार मेळा असें जीजावाईस म्हणण्यास पुरेसा वाव आहे. तीच गोष्ट पुढें हि प्रेम तेथें वास करी या अभंगाचे शेवटीं हि करितां येईल |
| ४७१ कैसा तो देखीला होसील गोपाळीं। ४७२ कासया या लोभें। ४७३ काय माझा पण होईल टीका। | हे तीन अभंग इंदुप्रकाश प्रतींत तुम्हां आम्हां जव जातीया समान या अभगाचे वर आहेत. ४७० वा अभंग आइकावी माझी कवतुक उत्तरें हा आहे. यांत लाडे कोडें बोललेलीं उत्तरें बोल– पुढें यावयास हवेत. ते बोल या तीन अभगांत आहेत व हे तीन अभंग– तुम्हां आम्हां जव जातीया समान याच्यावर आहेत म्हणून घेतले. |
| ५१५ आतां देह अवसान। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत– कुळींची ही कुळदेवी व ज्याणें आह . यावें कांहीं या दोन अभंगांमध्यें आहे व तो तेथें बरोबर बसतो म्हणून घेतला आहे. |
| ५३७ कोणापाशीं यावें माय। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींतून घेतला आहे व तो सकळ सत्ताधारी व नभोमय जालें जळ यामध्यें आला व तो तेथें नीट बसतो. |

| | |
|---|---|
| ५४५ मी हें येसें काय जाती।– | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत सर्करसीं भीनलें चीत्त या नंतर आहे व तसा बरोबर आहे म्हणून घेतला आहे. हा अभंग नकलेंत पुढें वचनें चि व्हावें आपण उदार या नंतर आला च आहे. |
| ५५२ बोलावें म्हुण बोलतो उपाय। | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत उरलें आयुष्य या नंतर आहे व तो बरोबर आहे. भिजल्या वहीच्या नकलेंत—लटीक्याचे वाणी या पूर्वी भक्ती तो कठीण हा अभंग आहे. अशा तऱ्हेनें जुन्या वह्या एकत्र आणून अभंगांची ओळ नीट लावतां येते. |
| ५९७ जग येसें बहु नांवें।– | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींत सळा सदा क्षुद्री द्दष्टी व निघालें तें आगीहुनी यामध्यें आहे. तसाच तो येथें घेतला आहे. |
| ५९९ आतां दुसरें नाहीं वर्नी।– | हा अभंग इंदुप्रकाश प्रतींतून वरलि कारणास्तव घेतला आहे. |
| ६०६ भक्तां समागमें हरी।<br>६०७ प्रेम अमृतें रसना। | हे दोन अभंग इंदुप्रकाश प्रतींत हें वर्म सांपडलें नीकें या नंतर आहेत— ते संदर्भास धरून आहेत म्हणून येथें घेतले आहेत. |
| ६१० भीक्षा पात्र अवलंबणें।<br>६११ भाववळें विष्णुदास। | हे दोन अभंग इंदुप्रकाश प्रतींत निंदा स्तुती करवी पोट या नंतर व कोरड्या गोष्टी चटल्या बोल या पूर्वी आहेत— व ते योग्य ठिकाणीं आहेत—म्हणून येथें घेतले आहेत. |
| ६७७ आतां पावीजेल घरा।<br>६७८ वरवें माझ्या केलें मनें।<br>६७९ मागें पुढें नाहीं। | हे तिन्ही अभंग इंदुप्रकाश प्रतींतून घेतले आहेत. |

७३६–७५१ ही ओळ अभंग १०७८–९३ संताजीमधून घेतली आहे.

आचार तो व्हावा १४१
आधळ्याची काठी ७२०
आपण चालक ४२
आपण ची व्हाल ७०५
आपलें आपण ४४९
आपलें तें नाहीं ७०१
आपलें मागतां ७४९
आपल्या आपण ४०५
आपुला तो देह ३८२
आपुल्याच फुंदे १५६
आपुल्याचा मोत चाली ६९७
आपुलीया काजा ३३९
आपलाला टाहो करुं ३१८
आमची विश्रांती ५२४
आमच्या हें आलें मागा ३५
आमुचीया भावें तुज ४४१
आमुचे ठाउके ६४१
आम्हां आवडे नाम घेतां १०
आम्हा आहे नाहीं ५८१
आम्हां का आपलें ३२६
आम्हां शरणा गतां ५९२
आम्हां हें कवतुक २२४
आम्हीं आर्त भूत ३९३
आम्ही आळीकरें २६४
आम्ही जाणों तुझा भाव ७४२
आम्ही देतो हाका ७४४
आम्ही देव तुम्ही देव ५४०
आम्ही घालों येक वेंधें ३९२
आम्ही चळक्ट १२३
आम्ही शकोनें १३१
आम्ही सर्वकाळ ५७२
आम्हीं क्षेत्रींचे संन्यासी ६१३
आर्त भुता प्रनी ३०४
आवचीनची हातीं ४१९
आवडी धरुनी २७९
आवडी न पुरे २८६
आवडीची न पुरे धणी ३६३
आला मागासी तो करी वेरसार ६८६
आलीया याचका १२५
आलों उलंघोनी ६२८
आशिर्वाद तया जाती ४२९
आम्हांसि आम्हांस ७०८
आसुरी स्वभाव १६८
आहाक्ता त्याचें ३५४
आहा च तो मोड ५४२
आहे तैसा आतां ३४९
आहे तरी सत्ता १४४
आळस पाडी ३२८
आळी सलगी पायापाशीं ६०
इहलोकीं आम्हां ९१
उत्तरें आयुष्य जायाचें ५५१
उगेंची हें मन १२२
उचीताचा काळ ७१
उचीताचा मार्ग ३७४
उजळलें भाग्य आता ३१९
उद्वेगासी बहु फाकती ७१२
उधन त्या जाती ३०६
उपदेस तो मलत्यां हातीं ३०९
उपाधीचें बीज ६०२
उपाधीच्या नावें ६४
उभारीला हात १५२
एक विष वुनी ५०
एका एक वर्म ४३
एका हातीं टाळ ७
एके परी बहिरे ६२
ऐसा तव मोठा ४७

ऐसी जिव्हा निकी ११२
अतरींचें ध्यान ८५
अतरलों कुटी मेटी ७३४

क

कई तो दीवस ४४६
कडसणीं धरितां ६४८
कथेचा उलघ २९७
करा नारायेणा २९२
कराल तें करा ५७९
करावा उद्धार ४९
करावा वरुआव ४४८
करितां वीचार तो हा ६२०
करिता वीचार सांपडलें ५०८
करु जाता सन्निधान १००
करु तेसे पाठांतर ४२३
करुनी राहो जरी ३६
करुनीं वीनवणी २७०
करु स्तुती परते नींदा ७३८
कल्याण या आशीर्वादें १६१
कळों आलें येसे आतां ५६२
कळों आलें तुझें जीर्णे ७३७
कळो येतां धर्म ४४७
काउल्याती नाहीं ४१५
कां जी तुम्ही २०५
कां जी धरिलें नाम ७१०
कां जी माझे जीवीं १०६
काम नाहीं काम नाहीं ५९०
कामातुर चवी सांडी २३३
कामें नेलें चीत ३५०
काय आम्ही आता १३६
काय करावें तें आतां ७४७
काय करु पोरा ३०७
काय नेणो होता ४६२
काय ग्या मानावें ५६७
काय रुपेवीण घालावें १३२
काय याचें घ्यावें ९७
काय शरीराचें काम ६२१
काया वाचा मनें ६२५
काये उरली ते करु २७८
काये करु जी दातारा ३८६
काये तुम्हीं जाणा २५३
काय माझा पण ४७३
काये मी जाणतां २३९
काये लवण कळीके वीण २८०
काये मानेश्वरी उणें २४०
कारणां पें असतां द्रुस्टी ३१०
का रे माझा नये ५२३
कासया गा लोभें ४७२
कांहीं जाणों नये २०२
कांहीं येक तरी २४
कां हो आलें नेणों भागा ५७५
कां हो वाढवितां देवा ४५
काळावरी सता ३७३
कीती रांडवडे ५०२
कीती सोसती करटीं ६६२
कुचराचे श्रवण ४०
कुतग्या येछे त्याचे ३८४
कुरवही करीन काया ४६९
कुळीची हे कुळदेवी ५१४
रुपेची उत्तरें १५०
कृस्णांजनें जाले २३४
केवढा तो अहकार १११
केलाते वेंघाड ५०४
केली प्रज्ञा मनासी २६६
केली सलगी ७५०
केलें तरी आतां ३३५

कैसा तो देखीला ४७१
कैसी दीसो बरी ६८२
कोण आतां कळी काळा ९
कोण घरा येतें ३२३
कोण पुण्यें यांचा ५०७
कोण येथें रीता गेला ४९९
कोण वेची वाणी ७७३
कोण होईल आतां ५८९
कोणाचें चींतन १९१
कोणापाशीं यावें माप ५३७
कोणासी वीचार ४७९
कोणें साक्षीविण ७११
कोण पुण्य कोणा गाठी ७३२
कोरड्या गोस्टी ६१२
कौतुकाची सृष्टी ३३१
कौलें भरीयेली पेठ ४८६

## ख

खुटोनीया दोरी ४८६
खयोलें फुलवीलें रवीपुर्डे ढुंग ५४७
खळा सदा क्षुद्री दृष्टी ५९६
खेळो मानासवें ६७
खरे नानवट निक्षेपीलें २०
खरें बोलें तरी ७२६

## ग

गुणाचाची साठा ३२१
गोदे कांठी होता आड ४१०
गोणी आली घरा ९४
गोवींद गोवींद २४५
गोवींदा वाचोनी ३८३
गोरव गोरवा पुरतें ३६७
गंगा न देखे विगळ ५१
गंगेचीया अंतर्वाणा २१

## घ

घटीं अलिप्त असे रवी ८८
घालुनीया मापी ६६५
घालुनी लोळणी २६
घ्यावी तरी घ्यावी ५५९

## च

चचर्की चचळ ७६
चावळले काय ३८०
चालीले न वाटे ६१९
चींतनाची जोडी ३५८
चींतनें अचींत २१३
चींताच्या सकोचें २३२
चींतीलें तें मनीचें जाणें ५९३
चुकली ते वाट ४४५
चुमळी चाकरी ३९०

## ज

जग अवघे देव १९३
जग तरी आम्हां देव ४१
जग येसें बहु नावें ५९७
जडलो अंगा अंगी १३०
जडलो तो आतां पाई ३६४
जन्मा आलीयाचा लाभ ४८०
जन्ही आलें राज्य ५८७
जवळी मुक्तापासी ३१५
जळो आतां नांवरूप ६०८
जळोत तीं येथें ३५१
जाऊं देवाचीया गांवा ४६०
जाणपण बरें १७३
जाली सडपणी ६९
जाली तडातोडी १४०
जाली होती काया ६५०
जालें आतां साटें २८७

जालें आतां येके ठायीं ५३१
जाली तंव साचे ६४४
जोंकावा सवसार ६२९
जीव जायेवरी १३४
जीवीत्व तें कीती २९३
जीवेसाठीं यत्नभाव ४२८
जे केली ते आळी ७१४
जेणें वाढे अपकीर्ती ४८१
जेणें होय हीत ७१९
जेथें जातों तेथें ७१६
जेवीतो तो माझा पिता ८२
जैसासाठीं तैसे व्होवें २१८
जैस्या तुम्ही दुरी आहा २५९
जो जो घ्यावा सोस ३१२
जोडीले अजुळ ७२८
ज्याचें जया ध्यान २४६
ज्या ज्या आम्हापासीं २२३
जेणें आड यावें कांहीं ५१६

झ

झाड कल्पतरु ६४५

ठ

ठेउनीया डोई २४१
ठेवीलें जतन १९६

ड

डोळा भरीलें रूप ५८०

त

तर्जीलें भेटवी २४४
तयासाटीं वेचुवाणी ४३०
तरीच म्या देवा ६९०
तरी भले थायां गेली ३८
तरी सदा निर्भर दास ५४३
तांतडीची धांव ६९५
ताप हें हरण श्रीमुख २
तीर्थ जळ देखे १५७
तीर्थांचीये आसे ४७६
तीर्थांची अपेक्षा १०५
तुजची पासाव २१५
तुजवीण सता २३८
तुज सर्वें आम्ही ३५३
तुजसी समधुची खोटा ७४०
तुझें वर्म ठावें ७२९
तु पांढरा स्पटीक मणी ७३९
तुमच्या तुम्ही केला गोवा १४२
तुमचे स्तुती योग्य ३
तुमच्या पालना १८४
तुं माझा कोंवसा ३७७
तुम्हां आम्हां जव ४७५
तुम्हां आम्हां सर्वें ५२८
तुम्हां ठावा होता देवा २९
तुम्हां न पडे वेच ३३७
तुम्हांसी न कळे सांगा २८५
तुम्हां होईल देवा १२६
तुम्हीं साच नुपेक्षाल १२४
तृषा काळें उदकें भेटी ३९
तेव्हां होतो भोगाधीन ५०१
तों चि हे क्षुलकें १४६
त्याग तव मज १७८
त्यागें भोग माझ्या ४४०
त्रीपुटीच्या योगें १५४
त्रिविध कर्माचे वेगळाले भाव ९३

थ

थुंकोनीया मान ९६

द

दर्पणासी नकटे लाजे २२५

दर्पणासी बुजे ३७८
दर्शनाची आस ३१
दानें कापे हात ७२५
दीन रजनी हा चि धद्रा १८
दाप न देखे अधारा १६
दु खाची सगती ६५९
दुग्रुधी ते मना ३५९
दुर्जनाचें आंग ५८२
दुर्बळ हे अवघे जन ५८६
देईल तें उणें नाहीं ५००
देऊ तें उपमा ३०
देखण्याच्या तीन जाती १५५
देव आड जाला ६८१
देव आमचा ४५९
देव आहे सुकाळ देशीं ४८४
देव जाणता ४५३
देव दयाळ ४५५
देव नीढळ ४५२ अ
देव पाहों ४५८
देव बराडी ४५६
देव बासर ४५२
देव भला ४५७
देव मजुर ४५४
देव सखा आतां ८
देव सखा तरी ४६४
देखोन हरखेली आंड ३५६
देवाचीये माथा ७७
देवाचीये चाडे ५९५
देवाचे म्हणउन २९६
देवाच्या उद्देशें ६४७
देवाच्या सबधें १८९
देवा वनवास ३३०
देवावरील मार ९५
देवासी तो पुरे ५१७
देवें जीव धाला ६४९
देवें दील्हा देह २९८
देह आणि देहसबधें ६६
देह तव असे भोगाचे १२
देह नव्हे मी हें सरे ७८
दोश पळती दरशेनें २६९
द्याजी माझा वीचारोनीयां ६४०

### ध

धनवता घरीं १९९
धने शुध जाती २७५
धन्य काळ सत भेटी १७
धरुनीयां सोई परतलें मन ६००
धर्म तो नक्ळे ३८७
धर्माची तु मूर्ती ३३६
धाकुट्याचें मुखीं ४२५
धांव घाली आई २७
धांवा शीघ्रवत ५६५

### न

न करावी आतां ३४
न करावी टाचणी ६६७
न करीतां चि गाढेपण १५
न करी तुमची सेवा ५९३
नका मज्पाशीं १७६
नका वाटु मन १४७
नका होऊ देऊ १४९
नको आतां पुसो कांहीं ८०
नको कांहीं पडो २४२
नको घालु ह्या सा २७२
नको माझें मानू ४७४
नको सांडु अन्न ४३३
न गमेसी जाली ६७२

नट नाट्य तुम्ही ४८५
न देखवे डोळां ५६६
न देखीजे ऐसें केलें ११
न पडो आतां हाटीं घाव ४३९
न पवीजे तया ठाया ४९७
न पाहे माघारे ४११
नमोमय जालें जळ ५३८
नये इछुं सेवा ३४७
न ये नेत्राजळ ७१३
नये स्तवुं काचे ५५५
न लगे देशकाळ ६२२
नसतां अधीकार ६६८
नसतां ची दाउनी भेव ५७३
नसतो कौतीकवाणें ६४३
न सरे भांडार ६३१
न संगावें वर्म ४४३
न संडाश आतां ४९२
न संडावा ठाव ६०१
न संडी अवगुण ३७९
न सांगतां तुम्हां कळो ३५२
न हो आतां जीवीं २५४
नव्हती ते संत ३४५
नव्हती माझे बोल ७३१
नव्हती हे उसणे बोल ३११
नव्हती याचा सोस होता ६१४
नव्हनी हीं माझी २५६
नव्हतो सावचीत ७३०
नव्हे खळवादी २१०
नव्हे दास खरा २३७
नव्हे नीग्रह देहासी दंडण ५७७
नव्हे ब्रह्मचर्य ४१२
नव्हे मीडा हें कारण ७४५
नव्हो आम्ही आजीकाळीची ४०१
नव्हे मी स्वतंत्र २३
नव्हो समाधीट ४६
नामाचा महीमा ६७४
नावडे तरी का २२६
नाहीं आलें मन्तीमुख ६२४
नाहीं उलंघीले १३३
नाहीं खंड जाला ५७
नाहीं गुणदोष ४८७
नाहीं तरी आतां ५७१
नाहीं दुकाललो अन्ना ६८०
नाहीं देवा पासीं २४३
नाहीं मज कोणी १८५
नाहीं म्या वंचिला ७५
नाहीं येथें वाणी १९५
नाहीं लोपो येत गुण ५४६
नाहीं सरो येत कोरड्या उत्तरीं ५४८
नाहीं सरो येत ४१३
नाहीं संतपण ३७०
नाहीं होत मार ५१९
निघालें तें आगीहुनी ५९८
निघालें दिवाळें ४४२
नींदा स्तुती करवी ६०९
नीरोधतां परी ७०७
नीवडुनी धान १६९
नीर्गुणाचे घ्यावें २१४
नीर्दयासी तुम्हीं ६४२
नीर्धाराचे अवघे १३९
नीर्वाहापुरतें अन्न ६५३
नीर्वैर होणें साधनाचें मुळ ६९६
नीश्चीतीनें होतो ७०६
नीस्तुर तो दिसे ३९६
नीस्तुर मी जालो ५२९
नेणे जप तप ५६१

नेणें फुंको कान ७४
नेणती वेद श्रुती कोणी ७३६

प

पडीलीया ताळा ७२
पडीलों मोवणी २८
पतीव्रते आनद मनीं २३३ अ.
पर उपकारी ५०६
परपीडक तो आम्ही ६५
पशु येसे होती ज्ञानी ६९८
पाठवणें पडणें पाया २२२
पापी म्हणो तरी १६७
पाहतां ठाया ठाव ६५७
पाहा रे हें देवत केसें ५२०
पाहावया माजी नमा ५२१
पाहो ग्रंथ तरी ४२४
पाहातोसी काये १२८
पाहोनीया ग्रथ २४७
पुज्या येकासनीं ३४४
पुढीलांचे सोई माझ्या ६२६
पुण्य विकरा ८४
पुसांवें तें ठाई २०१
पृथक मी सांगो किती ७९
पोटापुरतें काम २९९
पोट धाले आतां ६
प्रसिद्ध हा असे जगा ४९१
प्राण समर्पिला आम्ही १२९
प्रीत भंग माझा २१६
प्रीतीचा तो कळवळा २८८
प्रीतीच्या भाडणा २७१
प्रेम अमृतें रसना ६०७
प्रेम तेथें वास करी ४६१
प्रेम न ये सांगतां ७३५

फ

फावलें तें तुम्हां मागे ५६

ब

बरगासाठीं ३९१
बरवीं नामावळी ८७
बरवें ऐसें आलें मना ५०९
बरवें माझ्या केलें मनें ६७८
बरवें देशाउर जालें ३१६
बरें जालें आली ३३
बरें जालें देवा १७७
बहु गर्भवासी ५१०
बहुत करुनी चाळवाचाळवी ६२७
बहुतां जन्मा अंतीं ३००
बहुतां जातांचा केला ६२३
बहुतां पुरे येसा वाण ६३२
बहुता रीती काकुळती २१९
बहु दुरवरी ६५१
बहु देवा बरें जालें ३९९
बहु नावें ठेवीली ९०
बहु फीरलो ठाया ठाव ४९८
बहु वाटे भय ३२५
बहुतां पुरे येसावाण ६३२
बहु होता मला ७४६
बळीवंत आम्ही ६०३
बाईल सवासिण ६५४
बीजापोटीं पाहे फळ २०६
बीजीं फळाचा भरंवसा २७७
बुद्धीहीना जड जीवा ८१
बोलणेंची नाहीं ६५८
बोलाल त्या आतां २५८
बोलावा वीठल १७९
बोलावें म्हुण बोलतो उपाय ५५२

बोलीली उत्तरें २५२
बोलीलों तें आतां ५६९
ब्रह्मादिक तया लाभासी ठेंगणें ५

भ

भक्त ऐसे जाणा १४५
भक्तां समागमें ६०६
*भक्ताचीये पोटीं १७१*
भक्ती ता कठाण ५५३
भय वाटे पर ६८८
भय होतें आम्हांपणें ६८४
भयाचीं तीं आम्हां १०७
भरला दीसे हाट ६६१
भागल्यांचा तु वीसावा ४६८
भाडवी माउली ३०१
भाग्यवता येसी जोडी ५८५
भाग्यवता हे परवडी १९
भागेवता हें चीं काम ३०८
भाव देवाचे उचीत ३६०
*भाव बळें वीष्णुदास ६११*
भावीकां हें वर्म ६०५
भीत नाहीं आतां ५६८
भीक्षा पात्र अवलंबणें ६१०
भुके नाहीं अन्न ५९४
भुकेलीया अन्न ४६६
मूर्ती भगवत २११
भोग भोगावरी घ्यावा २९१
भोगावरा आम्हीं ३२
भोजन तें २९५
भोवडी सरीसें ३३२
भ्रमणा पाउलें १९७

म

मज कांहीं शीण १८६
मज चीं भीवता ४६३
मज नाहीं धीर ६७१
मज सर्वे नको चेष्टा ३२०
मजुराचे पोट भरे ११०
मथनींचें नवनीत ४१८
मथनें भोगें सार ३४०
मन वळी मना २२९
*मनाचीये साक्षी २५*
मरणा हातीं सुटली काया ४०९
मधुरा ऐसी फळें ५३
माउलीची चाली १०२
माउस खातां हाउस करी २२८
मागतां वींभाग ६३८
मागत्याची कोठें घडे २६७
मागायाची नाहीं इंछा २२१
मार्गे नेणपणें ६५५
मार्गे पुढें नाही ६७९
मार्गे पुढें नाहीं ६९३
माझी आतां रुत्ता ५५
*माझी भक्ती भोळा १४३*
माझी मज जाती ६३५
माझे गडी कोण ३९८
माझे तो फुकाचे ११५
माझे पाय तुझी डोइ ७३३
माझें माझ्या हातीं ७३०
माझे लेखीं देव मेला २१२
माझ्या कपाळाच्या गुणें ४८
माझ्या बापें मज २५०
माला कापी गळा ७१८
*मातेची जो २०७*
माना मान कीती १२७
माया साक्षी आम्ही ५५६
मारु नये सप सताचीया दृष्टी ५५०

होतो सांपडलो वेठी ६८३
होते बहुत हे दीवस मानसीं ४१६
होतो तें चिंतीत मानसीं १

क्ष

क्षर अक्षर हे तुमचे ५२६
क्षीर मार्गे तया १०३
क्षीण क्षीणा हाची ४७८

ज्ञ

ज्ञानीयाचा तु राजा २५१